इवान तुर्गेनेव (१८१८-१८८३) यांचे लेखन म्हणजे रशियन साहित्यामधील एक उत्तुंग शिखर. स्वतःच्या पुस्तकांमधून त्यांनी रशियन जीवनातील सर्व महत्त्वाच्या व प्रत्यक्षातील पैलूंचे दर्शन घडविले. जणू काही स्वातंत्र्याच्या व प्रगतीच्या अखिल राष्ट्राच्या आकांक्षा त्यांनी स्वतःच्या लेखनातून प्रकट केल्या.

प्रस्तुत आवृत्तीत समाविष्ट केलेल्या तीन कथा: 'आस्या', 'पहिले प्रेम', 'वसंतामधील जलधारा' ह्या प्रेम-कथा आहेत. त्यांच्यामधून तुर्गेनेव यांनी प्रेमभावनेचे काव्यात्मक, सूक्ष्म आणि यथार्थ चित्रण केले आहे—हळूहळू जन्माला येणारे, हळुवार आणि अभंग अथवा आनंददायी, सुखी, सर्वविजिगीषु प्रेम; ज्यामुळे माणसाला सुखाचा आणि दुःखाचा अनुभव घ्यावा लागतो, ज्या-च्यामुळे तो अधिक चांगला, अधिक नितळ, अधिक उदात्त बनतो असे प्रेम.

ज्याने ह्या प्रेमाला त्याच्या सर्व सौंदर्यानिशी व सामर्थ्यानिशी अनुभवले, तोच केवळ प्रेमाबद्दल असे लिहू शकतो.

अनुवाद : अनिल हवालदार
सजावट : सेर्गेई बाराबाश

Иван Тургенев
ТРИ ПОВЕСТИ О ЛЮБВИ
*на языке маратхи*

Turgenev I.
THREE STORIES ABOUT LOVE
*in Marathi*



सोविएत संघात मुद्रित

T $\frac{47002010100-570}{031(01)-83}$ 338—84

ИБ 1317

# अनुक्रमणिका

## प्रस्तावना

एक अत्यंत श्रेष्ठ रशियन लेखक, इवान तुर्गेनेव (१८१८-१८८३), यांना त्यांच्या गद्यलेखनातील सूक्ष्म काव्यात्मकतेबद्दल, मनोविश्लेषणावरील त्यांच्या प्रभुत्वाबद्दल, मानवी भावनांच्या जगात सखोल अवगाहन करण्याच्या त्यांच्या दुर्मिळ कौशल्याबद्दल, सुरेख शैली व अस्सल कलात्मक लेखनाबद्दल मायदेशात आणि दूरदूरच्या देशांमध्ये दिगंत किर्ती मिळाली. त्यांनी फार मोठा साहित्यिक वारसा मागे ठेवला: सहा कादंबऱ्या, अनेक लघुकादंबऱ्या, लघुकथा, नाटके व कविता.

त्यांच्या लेखनामध्ये निकट काव्यात्मक आरंभ आणि सामाजिक ऐतिहासिक समस्या यांचे अविद्राव्य ऐक्य नेहमी अस्तित्वात असते. असे असले तरी, एका संपूर्ण पुस्तकमालिकेत, एक कलाकार ह्या नात्याने त्यांचे अवधान निव्वळ मानसशास्त्रीय प्रश्न सोडविण्यावर व वैयक्तिक आचारसंहितेच्या समस्या सोडविण्यावर एकवटलेले आहे.

ह्या पुस्तकमालिकेतच प्रस्तुत आवृत्तीमधील तीन लघुकादंबऱ्यांचा समावेश आहे: 'आस्या,' 'पहिले प्रेम' आणि 'वसंतामधील जलधारा.' ह्या प्रेमकहाण्या आहेत. तुर्गेनेव प्रेमाचे उत्स्फूर्त शाहीर होते. त्यांच्या दृष्टीने प्रेम म्हणजे एक करुण भावना आहे, जीवनातील महान रहस्यांपैकी एक रहस्य आहे, निसर्गातील मूलभूत शक्तीपैकी एका शक्तीची अभिव्यक्ती आहे. ह्या शक्तींपुढे माणूस पूर्णतया संरक्षणविहीन आणि अगतिक असतो. तुर्गेनेव यांच्या बहुसंख्य कादंबऱ्यांमधून, लघुकथांमधून, प्रेम लोकांवर दैवाप्रमाणे आघात करते, भावना पेटविते आणि काव्यात्मक रोषणाई सजग करते, शेवटी करुणरसात त्याची परिणती होते .

तुर्गेनेव प्रगाढ कविमनाचे होते. त्यांच्या वैयक्तिक भावना, त्यांची निरीक्षणे आणि त्यांचे अनुभव त्यांच्या सृजनशील कार्यात निर्णायक घटक

ठरले आहेत. त्यांच्या हृदयाने ज्या काही यातना भोगल्या आणि जे त्यांना स्वानुभवाने माहीत झाले, त्या गोष्टींना त्यांनी साहित्यामध्ये उतरवले. वयाच्या पंचविशीत पॉलीना गार्सिया-विआर्दो ह्या गायिकेच्या ते आत्यंतिक प्रेमात पडले हा एक दैवयोगच. हा तरुण लेखक त्या गायिकेपाठोपाठ फ्रान्सला गेला. गायिकेचे आधीच लग्न झालेले होते व नवऱ्याला सोडण्याचा तिचा मुळीच इरादा नव्हता. पण पॉलीना आणि तिचे कुटुंब ह्यांच्या जवळपासच्या परिसरात, अशा परिस्थितीत आपल्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत तुर्गेनेव राहिले. त्यांच्याच शब्दांमध्ये सांगायचे तर "दुसऱ्याच्या घरट्याच्या प्रदेशात" राहिले. प्रेमाच्या करुण स्वरूपाची तीव्र जाणीव ह्यातूनच तर निर्माण झाली नाही ना?

ह्या आवृत्तीत समाविष्ट केलेल्या लघुकादंबऱ्या लेखकाला फार फार मोलाच्या वाटत होत्या, कारण स्वतःच्या जीवनामधील घटना, स्वतःच्या अंतःकरणातील भावना, त्याने त्यांच्यामधून व्यक्त केल्या आहेत. ह्या कथा आपल्याला विशेष प्रिय असल्याचे तुर्गेनेव यांनी अनेकदा कबूल केले होते. त्यांच्या सृजनामधील हे अत्यंत महत्त्वाचे लेखन नसणे शक्य आहे, पण ते त्यांच्या आत्म्याचा एक भाग आहे; शिवाय, रशियन काव्यात्मक गद्याचे ते अस्सल श्रेष्ठ नमूने आहेत. त्यांच्यात असाधारण काव्यात्मकता, अभिव्यक्ती आणि डौल आहे. तुर्गेनेव यांनी केलेली उत्तम वर्णने वाचून ल्येव तल्स्तोयसुद्धा आनंदून म्हणाले होते: "इतर कुणाही लेखकाच्या आवाक्या-पलिकडचे हे अस्सल मोती आहेत."*

अर्थात रशियन साहित्यामधील ह्या अद्भुत मोत्यांचा खुलासा देण्यात काही अर्थं नाही. कोणतेही विवेचन करण्याची गरज नाही. म्हणून ह्या लेखनाच्या सृजनाच्या चरित्रातील वस्तुस्थितींचे निवेदन करण्यापुरते व तत्का-लीनांची वैयक्तिक मते सांगण्यापुरते आम्ही स्वतःला मर्यादित ठेवत आहोत.

'आस्या' ही लघुकादंबरी १८५७ मध्ये लिहिण्यात आली. तिच्या नायिकेचेच नांव तिचे शीर्षक म्हणून देण्यात आले. "कुठेतरी दूर जायचे, अखेरीला भेटायचे, अवघड पराक्रम करायचे" असे स्वप्न बाळगणारी अशी ती एक मनस्वी, मानी आणि धीट मुलगी आहे. तिच्या मनाची सहेतुकता, तिची नैतिक निष्ठा आणि तिचा भावनावेग तिला गुदमरवून टाकतात.

---

* तुर्गेनेव इ. से.; संपूर्ण साहित्य आणि पत्रे, २८ खंडात; खंड ७, म.–ल., "नाऊका," १९६४, पान ४३१ (रशियनमध्ये).



आस्याचे नशीब वाईट आहे. ती "अनौरस" आहे; एक श्रीमंत जमीनदार आणि एक भूदास स्त्री यांच्या संबंधातून जन्मलेली भूदास-मुलगी. आस्याचा चित्रकार भाऊ तिला परदेशी घेऊन जातो, कारण मायदेशात तिच्या "खोट्या दर्जा" मुळे तिला त्रास सोसावे लागले होते. तुर्गेनेव यांच्या खऱ्या मुलीवरून, पॉलीनावरून, आस्याची व्यक्तिरेखा निर्माण झालेली आहे. एका सामान्य शेतकरी स्त्रीशी तुर्गेनेव यांचा संबंध आला होता व त्यातून ही अनौरस मुलगी जन्मली होती. दैवाच्या आघातांपासून आणि आत्म-प्रतिष्ठेच्या वेदनादायी बोचणींपासून तिचे रक्षण व्हावे ह्या उद्देशाने तुर्गेनेव यांनी पॉलीनाला कायमचे फ्रान्सला पाठवून दिले होते, एखाद्या फ्रेंच सरदारा-च्या मुलीप्रमाणे तिला शिक्षण दिले होते. आस्याचे मायदेशातील जीवन पॉलीनाच्या जीवनाशी अनेक दृष्टींनी साधर्म्यं राखणारे आहे आणि तुर्गेनेव ह्यांच्या शब्दांमध्ये सांगायचे तर "अक्षरशः अश्रुभरल्या अवस्थेत" त्यांनी ही कथा लिहिली.

आस्याच्या हृदयस्पर्शी प्रेमाचा शोकांत घडला. ज्या पुरुषावर तिचे प्रेम जडले होते आणि ज्याच्यापाशी आपल्या प्रेमाचा तिने प्रथम उच्चार केला होता, तो माणूस निर्णायक कृती करण्यास असमर्थ होता. तिचा प्रेमाचा कबुलीजबाब ऐकल्यानंतर, त्या क्षणाला अत्यंत अस्थायी असे थंडे प्रवचन तो तिला देतो. जाता जाता सांगायचे म्हणजे हा प्रसंग दूरत्वाने आपल्याला रशियन महाकवी पूष्कीन यांच्या 'येवगेनी अनेगिन' ह्या पद्यमय कादंबरी-तील विषयाची आठवण करून देतो.

तुर्गेनेव यांच्या कथेतील काव्यात्मक, तसेच नैतिक "सौंदर्याने व विशु-द्धतेने" त्यांचे समकालीन मुग्ध झाले होते. 'आस्या' प्रथम ज्या नियतका-लिकात प्रसिद्ध झाली, त्या 'सोवरेमेन्निक'चे संपादक, नामवंत कवी निकोलाय नेक्रासोव यांनी लेखकाला लिहिले होते: "तुझ्या लघुकादंबरीबद्दल आणि ती अत्यंत मोहक वळल्याबद्दल मी तुला कडकडून अलिंगन देतो. तिच्यातून यौवनाच्या मनाचे धुमारे उमटतात. ही कथा म्हणजे विशुद्ध सोनेरी काव्य आहे."* लेखक दमित्री ग्रिगोरोविच 'आस्या' मधील काव्या-त्मकतेने मोहून म्हणाले होते: "तुझ्या अंतरंगात जांभळं फूल फुलतंय."**

---

* तुर्गेनेव इ. से. खंड ७, पान ४३४

** कित्ता.

'पहिले प्रेम' ही कथा १८६० साली लिहिण्यात आली. लेखकाच्या सांगण्यानुसार, सत्य घटनेवर ती आधारलेली आहे आणि तिच्यातील व्यक्ति-रेखा खऱ्या माणसांवरून घेतलेल्या आहेत: स्वत: लेखक, त्याचे वडील – माजी लष्करी अंमलदार – ज्यांनी त्यांच्याहून दहा वर्षांनी मोठ्या असलेल्या अत्यंत श्रीमंत स्त्रीबरोबर हिशेबीपणाने, प्रेम नसतानाही लग्न केले... लेखकाच्या आयुष्यातील ही एक अविस्मरणीय घटना होती. ह्या लघुकादंबरी-मधील घटनांसंबंधी तुर्गेनेव म्हणाले होते: "माझ्या स्वत:च्या वडिलांचे 'पहिले प्रेम' मध्ये मी चित्रण केले होते. अनेक लोकांनी ह्याबद्दल माझा धिक्कार केला. ही वस्तुस्थिती मी कधीही लपविली नाही म्हणून विशेषत: त्यांनी माझ्यावर टीका केली. लपविण्यासारखे माझ्यापाशी काहीही नाही. माझे वडील अत्यंत देखणे पुरुष आहेत: मी असे म्हणू शकतो, कारण अनेक बाबतीत माझे त्यांच्याशी साम्य नाही – मी मातृमुखी आहे. माझे वडील पौरुषाचा सुरेख नमुना होते – खराखुरा, देखणा रशियन पुरुष. त्यांचे वागणे असाधारण थंड आणि मगरूरपणाचे होते, पण त्यांची चाह व्हावी अशी त्यांना फार इच्छा असे – त्यांच्या मुद्रेवर आणि त्यांच्या हालचालींमध्ये अनिवार्य मोहकता आढळायची. ज्या स्त्रिया त्यांना आवडत, त्यांच्यासमोर विशेषत्वाने ते असे वागत."*

कथेतील प्रसंग आणि स्वत:च्या यौवनातील वास्तव घटना ह्यांच्यातील परस्परसंबंधावर बुरखा घालण्याचा तुर्गेनेव यांचा आरंभी इरादा होता. उदाहरणार्थ, वालोद्या हा पोरका असून त्याच्या काकांबरोबर राहतो असे त्यांना दाखवायचे होते. पण नंतर त्यांनी ठरविले की, प्रत्यक्ष आयुष्यातल्या-प्रमाणे ती पिता-पुत्रांमधील संघर्षाची कहाणी ठरली पाहिजे. वास्तवातल्या-प्रमाणे, गोष्टीतील घटनाही १८३३ सालाशी संबंधित आहेत. तुर्गेनेव तेव्हा १५ वर्षांचे होते. पण वालोद्या रेखाटताना मात्र त्याला त्यांनी एक वर्षाने मोठा दाखविला आहे. आपला नायक वयाच्या सोळाव्या वर्षी स्वत:च्या कुटुंबात निर्माण होणाऱ्या अवघड मानसशास्त्रीय नाट्यातील सर्व घडामोडींना अधिक सखोलतेने व संवेदनक्षमतेने जाणून घेऊ शकेल, अनुभवू शकेल, असे त्यांना वाटले होते.

दोन मूलभूत पातळींवर निवेदन उलगडत जाते. सर्वप्रथम तपशीलवार वर्णन येते अद्याप पौगंडावस्थेत असलेल्या वालोद्याला शेजारच्या दाचामधील

* किता. खंड ९, पाने ४५९-४६०.



झिनैदाबद्दल वाटणाऱ्या प्रेमबाधेचे. आणि ह्या पार्श्वभूमीवर, वालोद्याच्या दृष्टीमधून लघुकादंबरीचा मूळ विषय पुढे जातो – झिनैदा आणि प्योत्र वासिल्येविच – वालोद्याचे वडील – यांच्यातील प्रेमाचा.

कदाचित सर्वात स्वारस्यपूर्ण प्रतिमा झिनैदाची आहे. आरंभी आपल्याला दिसते चाहत्यांच्या गराड्यात वावरणारी सुंदर, नखरेल मुलगी. पण बाह्य आकर्षकपणा एवढेच काही झिनैदाचे वैशिष्ट्य नव्हे. ती चतुर आहे, सौंदर्याबद्दल कमालीची संवेदनक्षम आहे. तिच्या घरातील जीवनाचा आणि तेथील क्षुद्र वातावरणाचा तिला तिरस्कार वाटतो; त्यांच्याबद्दल तिला अनाकर्षणाची भावना आहे. योगायोगाने तिची प्योत्र वासिल्येविच यांच्याशी भेट घडते. ते देखणे आहेत, असाधारण आहेत आणि त्यांच्या भोवती गूढतेचे वलय आहे. ह्या पहिल्या खऱ्या भावनेच्या ती पूर्ण आहारी जाते. भविष्याबद्दल मुळीच विचार न करता ती असे धैर्याने वागते. पण दुर्दैवाने त्यांच्या प्रेमाचा शोकांत घडतो: त्यांच्या प्रेमाच्या वाटचालीत अनेक अडथळे येतात आणि प्रेमिकांना एकमेकांपासून विलग व्हावे लागते.

दुसऱ्या एखाद्या लेखकाच्या लेखणीतून हीच कथा सामान्य, अतिरंजित उतरली असती. पण थोर कलावंत तुर्गेनेव यांच्या कसबामुळे नायकांच्या सर्व भावनांना आणि कृतींना काळजीपूर्वक हेतू पुरविलेले आहेत. 'पहिले प्रेम' ही कथा तुर्गेनेव यांच्या श्रेष्ठ कलाकृतींमध्ये समाविष्ट आहे. म्हातार-पणी तुर्गेनेव म्हणाले होते: "फक्त एकच लघुकादंबरी मी आनंदानं पुन:पुन्हा वाचू शकतो – 'पहिले प्रेम.' माझं कदाचित ते सर्वात आवडतं लेखन आहे. इतर लेखनात थोडं का होईना, पण काहीतरी काल्पनिक आहे. पण 'पहिले प्रेम' मध्ये कोणतीही काल्पनिक घटना न घुसडता सत्य घडामोडीं-संबंधी मी लिहिलं आहे आणि त्याचं परत वाचन करताना माझ्यासमोर खरे चेहरे जिवंत उभे राहतात."* तुर्गेनेव यांच्या अनेक समकालीनांनी ही कथा फार उच्च दर्जाची मानली होती. लेखकाच्या निकट परिचयाचे, नामवंत रशियन क्रांतिकारक-लोकशाहीवादी आणि लेखक अलेक्सान्द्र हेर्झेन यांनी तुर्गेनेवना लिहिलेल्या पत्रात म्हटले होते: "तुझं 'पहिले प्रेम' एक आनंददायी वस्तू आहे."** त्या काळातील एक बुद्धिमान साहित्य-समीक्षक आपोलोन ग्रिगोर्येव यांनी ग्वाही दिली होती की, वाचक "धडधडत्या

* तुर्गेनेव इ. से. खंड ९, पान ४६०.

** किता, पान ४६५

आनंदाने 'पहिले प्रेम' वाचतात, जरी त्यातून काहीही प्रकट होत नाही, काहीही बोधक नाही – फक्त प्रयत्न, सुगंध आणि काव्य याशिवाय काहीही नाही..."*

१८७० सालाच्या मध्यापासून ते १८७१ च्या अखेरीपर्यंत तुर्गेनेव यांनी 'वसंतामधील जलधारा' चे लेखन केले. हीसुद्धा एक शोकांत प्रेमकहाणी आहे. द्मित्री सानिन आणि जेम्मा यांची पहिली, यौवनसुलभ, प्रेमाची विशुद्ध भावना मारली जाते सानिनला योगायोगाने भेटलेल्या "घातकी", निष्ठुर, थंड काळजाच्या, पण असाधारण आकर्षक अशा स्त्रीविषयी वाटलेल्या आंधळ्या व अपमानास्पद वासनेंमुळे. कदाचित ही लघुकादंबरीही एखाद्या वैयक्तिक गोष्टीवर आधारलेली आहे. सानिनप्रमाणेच, तरुण तुर्गेनेव एकदा इटलीहून परत येत होते तेव्हा फ्रँकफर्ट ऑन मायनेत मिठाईच्या दुकानात त्यांना एक सुंदर मुलगी भेटली होती व भोवळ येऊन पडलेल्या तिच्या धाकट्या भावासाठी त्यांनी तिला मदत केली होती. त्या तरुणीबद्दल वाटलेल्या जबरदस्त आकर्षणावर मात करण्यासाठी तुर्गेनेव तात्काळ मायदेशाला परतले होते. असे असले तरी, 'वसंतामधील जलधारा'चा केवळ पूर्वार्ध नव्हे, तर उत्तरार्धही आत्मचरित्रपर आहे. खुद्द तुर्गेनेव यांनीच ही आठवण सांगितली होती. "ही संपूर्ण लघुकादंबरी खरी आहे. मी वैयक्तिकरीत्या ती अनुभवली आहे आणि तिला जगलो आहे. ही माझी स्वतःची कहाणी आहे. माझ्या उत्तम परिचयाच्या प्रिन्सेस त्रूबेत्स्काया यांच्यावरून मी मादाम पोलोझोवा रेखाटलीय. पॅरिसमध्ये एकेकाळी त्यांनी बरीच खळबळ उडवली होती. अजूनही तेथे त्यांच्या आठवणी निघतात. त्यांच्याकडे पान्तालिओने रहात होता. स्नेही आणि नोकर यांच्या दरम्यानचे स्थान त्याला त्या घरात होते. इटालियन कुटुंबसुद्धा प्रत्यक्षातून घेतलेले आहे. मी फक्त काही तपशील बदलले आणि त्यांची सरमिसळ केली, कारण डोळे मिटून फोटो काढणे मला शक्य नाही. उदाहरणार्थ, प्रिन्सेस जन्माने जिप्सी होत्या, पण मी त्यांच्यावरून निर्माण केली एक सामान्य कुळात जन्मलेली सांसारिक, रशियन बाई. एका इटालियन कुटुंबात मी पान्तालिओनेला घातले..."**

'वसंतामधील जलधारा' रशियन भाषेत प्रसिद्ध झाल्यानंतर लौकरच तिचे अनुवाद फ्रान्स, अमेरिका, इंग्लंड, इटली, डेन्मार्क, पोलंड येथे

* कित्ता.

** तुर्गेनेव इ. से. खंड ११, पान ४६१.



झाले... तुर्गेनेव यांच्या समकालीनांच्या असंख्य आठवणींपैकी नामवंत फ्रेंच लेखक व तुर्गेनेव यांचे निकटवर्ती ग्यूस्ताव फ्लोबेर यांची एक आठवण खास स्वारस्याची आहे. त्यांनी तुर्गेनेवना लिहिले होते: "तुम्हाला सांगावेसे वाटते की, 'वसंतामधील जलधारा'मी वाचली... मी हेलावून गेलो, काही अश्रुसिंचन केले आणि एक विचित्र तणाव अनुभवला. आपल्यापैकी प्रत्येकजण ज्यातून गेला आहे अशी गोष्ट तिच्यात आढळते. हाय! आणि तिच्यामुळे आपल्यापैकी प्रत्येकजण शरमिंदा होतो. मित्रा तुर्गेनेव, तू केवढा थोर माणूस! मिठाईच्या दुकानातील स्त्रीचे अंतरंग खूप मोहक आणि स्वर्गीय आनंद देणारे आहे. आणि सकाळच्या प्रहरी दोघे फिरायला जातात व बाकावर बसून एकमेकांशी गप्पा मारतात तेव्हा! पान्तालिओने, छोटे केसाळ कुत्रे, एमिलिओ... आणि त्याची निष्पत्ती, शांत आणि अश्रुपूर्ण. ही खरी प्रेमाबद्दलची कादंबरी, जर असे प्रेम मुळात अस्तित्वात असेल तर! माझ्या प्रिय मित्रा, आयुष्याबद्दल तुम्हाला खूप माहीत आहे आणि तुम्हाला जे माहीत आहे ते सांगण्याचे कसब तुमच्यापाशी आहे – आणि असे फार क्वचित आढळते. मला साहित्याचा अध्यापक व्हायची इच्छा आहे, म्हणजे तुमच्या पुस्तकांचा खुलासा मी करू शकेन. पण एक नोंद घ्या, मी खरोखरी त्यांचा खुलासा करू शकणार नाही. तशी गरज नाही. मला वाटते की, त्यातील ज्या कौशल्याचा मला आनंद वाटतो, उदाहरणार्थ, 'वसंतामधील जलधारा'-तील दोन स्त्रिया व त्यांचा परिसर यांच्यामधील विरोधाभास, त्याची समज एखाद्या वेड्यालासुद्धा मी समजावून देऊ शकेन. तुमच्या ह्या सर्वात ताज्या पुस्तकाचे वर्णन करायला माझ्यापाशी 'मोहक' ह्या अत्यंत मूर्ख शब्दाशिवाय दुसरे शब्द नाहीत. पण माझ्या शब्दांना खरा आणि गहिरा अर्थ द्या. हे पुस्तक वाचकांच्या अंतःकरणांमध्ये प्रेमाला जन्म देते: चेहऱ्यावर स्मित उमटते, पण तरीही रडण्याची इच्छा होते"*.

तुर्गेनेव यांच्या ह्या तीन लघुकादंबऱ्या प्रदीर्घ काळापासून रशियन साहित्यात अभिजात मानल्या जात आहेत. त्या खास तुर्गेनेव-धाटणीच्या आहेत. त्यांच्या गुणांची जमेची बाजू ह्या लेखनातून प्रतीत होते. ह्या कथांचे वाचन करताना मन हमखास हेलावून जाते. अनेकदा तरुण वाचकांना ह्या लघुकादंबऱ्यांमार्फत तुर्गेनेव यांच्या साहित्याची पहिली ओळख घडते. मानवी भावनांचे अप्रतिम जग त्या त्यांच्यापुढे खुले करतात. आणि तुर्गेनेव

* तुर्गेनेव इ. से. खंड ११, पाने ४७१-४७२

यांनी ज्या घटनांबाबत लिहिले आहे त्या घटना आपल्या आजच्या काळापासून शंभरपेक्षा जास्त वर्षांपूर्वी जरी घडलेल्या असल्या, तरी सद्यःकालीनांना त्या स्वतःत सहभागी करतात, कारण चिरंतन व अविनाशी अशा खऱ्या मानवी भावनांबद्दल त्या सांगतात.

आर्तूर तल्स्त्याकोव

# आस्या[1]

१

माझे वय तेव्हा पंचवीस होते, न. न. सांगू लागला, म्हणजे हा सारा खूप जुना इतिहास आहे, हे तुम्हाला दिसेल. पालकांच्या तावडीतून मी नुकताच मुक्त झालो होतो आणि परदेशी निघालो होतो. त्या काळी म्हणायचे त्याप्रमाणे "माझे शिक्षण पूर्ण करायला" नव्हे, तर केवळ विशाल जगावर एक नजर टाकायची माझी इच्छा होती म्हणून. मी निकोप होतो, तरुण होतो, उत्साही होतो. माझ्यापाशी पैसा विपुल होता, पण अजून कसल्याही जबाबदाऱ्या अंगावर घेतल्या नव्हत्या. वर्तमानात जगत होतो. एका शब्दात सांगायचे तर मनाला येईल तसे वागत होतो. माझ्या जीवनाचा तो वसंतकाळ होता. पण त्यावेळी माझ्या मनातसुद्धा आले नाही की, माणूस म्हणजे वनस्पती नव्हे आणि त्याच्या जीवनातील वसंतकाळ अगदी अल्प असतो. तारुण्य चमकदार वेष्टनामधील सुंठीची चवदार बिस्कीटे खात असते आणि तीच रोजची भाकरी आहे अशी समजूत करून घेत असते. पण अशी एक वेळ येते की, पावाचा सुका तुकडा मिळाला तरी आनंद होतो. पण ह्या विषयावर खंथ करण्याचे काही प्रयोजन नाही.

कोणतेही उद्दिष्ट वा योजना मनाशी न बाळगता मी प्रवास करीत होतो. जेथे आवडेल तेथे थांबत होतो आणि नवे चेहरे पहायची इच्छा झाली म्हणजे पुन्हा प्रवास सुरू करीत होतो. नवनवे चेहरे पाहण्यास मी आसुसलो होतो. मला फक्त माणसांमध्ये रस होता. स्वारस्यपूर्ण स्मारके, भव्य संग्रह यांचा मला तिटकारा होता. एखादा गाईड[2] नुसता नजरेला पडला तरी मला किळस यायची आणि संताप यायचा. ड्रेस्डेनच्या 'ग्रूने गेवोल्बे'[3] मध्ये मला वेड लागायचे तेवढे बाकी उरले होते. निसर्गाचा माझ्यावर तीव्र परिणाम व्हायचा, पण तथाकथित रमणीय स्थळांची, उत्तुंग शिखरांची अथवा प्रपातांची मला फारशी क्षिती नव्हती. निसर्गाने मुद्दाम माझ्या नजरेत भरणे मला आवडत नव्हते. त्याने माझ्यात ढवळाढवळ केलेली मला आवडत नव्हती.

पण चेहरे, जिवंत माणसांचे चेहरे, मानवी बोलणे, माणसांच्या हालचाली आणि त्यांचे हसणे — ह्या गोष्टींविना मात्र माझे चालत नव्हते. गर्दीमध्ये मला नेहमी विशेष आनंद व्हायचा आणि सहजपणे वावरायचा. जेथे इतर लोक जातात तेथे जाणे मला आवडायचे, दुसऱ्यांनी आरडाओरडा केला म्हणजे मलाही ओरडावेसे वाटायचे. आणि त्याचवेळी इतरजण कसे ओरडतात ते पहायला आवडायचे. माणसांचे निरीक्षण माझी मुख्य करमणूक होते... आणि मी त्यांचे केवळ निरीक्षण करीत नसे, तर आनंदी, अतृप्त कुतूहलाने त्यांची तपासणी करीत असे. पण पुन्हा एकदा मी माझ्या निवेदनापासून दूर भरकटत चाललोय.

तर वीस वर्षांपूर्वी झ. नामक एका छोट्या जर्मन गावात मी रहात होतो. ऱ्हाईन नदीच्या डाव्या तीरावर हे गाव वसले होते. मी एकांतवासाच्या शोधात होतो. औषधी झऱ्यांच्या स्थळी एका तरुण विधवेशी माझी नुकतीच ओळख झाली होती व प्रेमभंगाच्या यातनांनी मी होरपळून निघालो होतो. ती अतिशय देखणी होती, चतुर होती व माझ्यासारख्या नालायकासह सर्वांबरोबर प्रणयाचे खेळ खेळत होती. प्रथम तिने मला उत्तेजन दिले आणि नंतर क्रूरपणे माझे काळीज विद्ध करून ती मला टाकून एका गुलाबी गालांच्या बव्हेरियन लेफ्टनंटबरोबर निघून गेली. माझ्या काळजाची जखम खोल नव्हती हे मला कबूल केले पाहिजे, पण काही काळ मी दु:खात आणि एकांतवासात काढला पाहिजे असे माझ्या मनाने घेतले होते. तारुण्याची ती एक लहर होती. म्हणून झं. गावी मी मुक्कम टाकला होता.

दोन उंच टेकड्यांच्या पायथ्याशी ते छोटे गाव वसले होते. त्याच्या कोसळायला आलेल्या तटांच्या भिंती व मनोरे, तेथील अविस्मरणीय लिंबोणीची झाडे, ऱ्हाईनची उपनदी असलेल्या तेथील नदीच्या चमकत्या पाण्यावरील उंच पूल आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे तेथील सुरेख मदिरा — ह्या गोष्टींमुळे ते गाव माझ्या मनात भरले होते. सूर्य मावळतीला जाताच (ते जूनचे दिवस होते), रोज संध्याकाळी गावातील अरुंद रस्त्यांवरून सुरेख सुरेख सोनेरी केसांच्या जर्मन तरुणी फिरायला लागायच्या. «Guten Abend!» * असे प्रसन्नपणे बोलून परदेशी माणसाला अभिवादन करायच्या. त्यांच्यापैकी काहीजणी तर प्राचीन घरांच्या उंच छपरांवर चंद्र उगवला आणि त्याच्या थंड किरणांमध्ये रस्त्यावरचे छोटे फरसबंदी दगड स्पष्ट दिसू लागले, तरीही

* शुभ-संध्या — (जर्मन भाषेत)



जात नसत. अशा वेळांना त्या छोट्या गावाच्या रस्त्यांवरून भटकायला मला सर्वांत जास्त आवडायचे. निरभ्र आकाशातून चंद्र टक लावून त्या गावाकडे पाहतोय असे भासायचे आणि त्याची ही नजर जाणवून ते गाव निश्चलपणे प्रतिसाद देत चांदण्यात न्हात पडून रहायचे. तो चंद्रप्रकाश स्तब्ध असला तरी सूक्ष्मपणे चित्त विचलित करायचा. उंच गॉथिक घुमटावरील वारायंत्राचा कोंबडा फिकट सोनेरी चमकायचा आणि तेच सोने नदीच्या काळ्या चमकत्या पृष्ठावर थरथरत रहायचे. फरशी-छपरांच्या खाली असलेल्या अरुंद खिडक्यांमधून निमुळत्या मेणबत्त्या (जर्मन माणसे काटकसरी!) मंदपणे फडफडत दगडी भिंतींमागून द्राक्षवेलींच्या कुरळ्या फांद्या रहस्यमयरीत्या डोकावीत गावातील त्रिकोणी चौकाच्या मध्यभागी असलेल्या प्राचीन विहीरीच्या सावलीपासून काहीतरी फडफडत जायचे, रात्रीच्या पहारेकऱ्याची पेंगुळलेली शीळ अचानक शांततेचा भंग करायची, एक प्रेमळ कुत्रा हलकेच गुरगुर करायचा. हवेचा चेहऱ्याला हलकेच स्पर्श होई, लिंबोणीच्या झाडांचा सुगंध श्वास भरभरून घ्यावासा वाटे आणि ग्रेथन हा शब्द उद्‌गार व प्रश्न यांच्या सीमारेषेवर कुठेतरी ओठांवर उमटायचा.

झ. शहर ऱ्हाईनच्या तीरापासुन दोन वेर्स्ता अंतरावर वसले होते. त्या प्रचंड नदीकडे टक लावून पहायला मी अनेकदा जात असे. एका भल्यामोठ्या ॲशच्या एकाकी झाडाखाली दगडी बाकावर तासन्‌तास बसून त्या चंचल विधवेपायी मी बळेच झुरायचा. बालकासमान चेहऱ्याचा आणि उघड्या वक्ष:स्थळावर तलवारींनी आरपार खुपसलेल्या लालभडक काळजाचा मॅडोन्नाचा छोटुकला पुतळा झाडाच्या पालवीमधून केविलवाणा डोकावायचा. समोरच्या तीरापलिकडे ल. गाव वसले होते. मी ज्या गावात मुक्काम टाकला होता त्यापेक्षा ते गाव थोडेसे मोठे होते. एके संध्याकाळी माझ्या आवडत्या बाकावर बसून नदी, आकाश आणि द्राक्षमळे यांच्याकडे मी आळीपाळीने टक लावून पहात होतो. डांबर माखलेले आडे पालथे करून नदीकिनाऱ्यावर ओढून आणून ठेवलेल्या एका होडीभोवती तागासारख्या केसांची पोरे कडमडत होती. शिडे ढिली पाडून जहाजे खालच्या प्रवाहाला संथपणे चालली होती. हिरव्या छटेच्या लाटा मंद खळाळणाऱ्या लहरींमधून निसटत होत्या. अचानक माझ्या कानांवर संगीताचे सूर पडले. मी जास्त लक्षपूर्वक ऐकू लागलो. ल. गावामध्ये वॉल्तझ वाजविण्यात येत होता. डबल-बास घुमत होता, व्हायोलिनमधून अस्पष्ट गीत उमटत होते, बासरी उल्हासाने शीळ घालीत होती.

"ते काय आहे?" माझ्या दिशेने येणाऱ्या एका म्हाताऱ्याला मी विचारले. त्या म्हाताऱ्याने मखमाली जाकीट घातले होते, निळे मोजे व बक्कलाचे बूट चढविले होते.

"ते?" आपल्या पाईपचा दांडा तोंडाच्या एका कोपऱ्यातून दुसऱ्या कोपऱ्यात सरकवीत तो उत्तरला–"तिथं ब. चे विद्यार्थी कोम्मेर्शसाठी आलेत!"

"ह्या कोम्मेर्शवर नजर टाकली पाहिजे" मी स्वतःशी विचार केला. "शिवाय अजून कधी ल. गावात गेलोच नाही." मी एक नावाडी शोधला आणि नदी ओलांडून समोरच्या तीरावर पोहोचलो.

२

कॉम्मेर्श म्हणजे काय हे माहीत नसणारे काही लोक असू शकतील. एकच एक प्रदेशातील अथवा एकाच बांधिलकीतील (Landsmannschaft) विद्यार्थ्यांनी हजेरी लावलेली ही खास मेजवानी असते. कॉम्मेर्शमध्ये भाग घेणारे जवळ जवळ सर्व विद्यार्थी परंपरेने चालत आलेला जर्मन छात्र-वेष परिधान करतात–आखूड लष्करी डगले, उंच बूट आणि ठरवून दिलेल्या रंगाच्या फिती बांधलेल्या छोट्या टोप्या. आपल्या सीनियरच्या, म्हणजे वरिष्ठाच्या अध्यक्षतेखाली सर्वसाधारणपणे सर्व विद्यार्थी दुपारच्या भोजनाला जमतात आणि दुसऱ्या दिवशी पहाटेपर्यंत खात-पीत, गाणी म्हणत–Landesvater, Gaudeamus–धूम्रपान करीत, अडाण्यांना शिव्य घालीत मेजवानी साजरी करतात. काहीवेळा ते भाडोत्री बँडही आणतात.

तर अशा प्रकारचा कॉम्मेर्श त्या ल. गावामध्ये साजरा होत होता. "सूर्य" नामक एका माफक हॉटेलसमोरील रस्त्यालगतच्या बागेत हा समारंभ चालला होता. हॉटेलवर फडकणाऱ्या झेंड्यांची सजावट केलेली होती. छाटलेल्या लिंबोणीच्या झाडांखाली मांडलेल्या टेबलांपाशी विद्यार्थी बसले होते. एका टेबलाखाली एक प्रचंड बुलडॉग पहुडला होता. वादक थोडेसे वेगळे, हिरव्यागार लतामंडपात बसले होते व दमदारपणे वाजवीत होते, अधूनमधून बीयरचे घुटके घेऊन ताजेतवाने बनत होते. बागेच्या बैठ्या कठड्यांसमोर, रस्त्यामध्ये अनेक लोक जमले होते. पाहुण्यांच्या मेजवानीचा समारंभ पाहण्याची संधी न दवडविण्याचा ल. गावातील भल्या माणसांचा निर्धार दिसत होता. त्या बघ्यांच्या गर्दीत मी सामील झालो. विद्यार्थ्यांचे



चेहरे पाहताना माझी खूप करमणूक झाली. त्यांची आलिंगने, त्यांचे उद्गार, यौवनाचे निष्पाप विभ्रम, तिखट कटाक्ष, अकारण हसणे–जगातील हे सर्वात उत्तम प्रकारचे हसणे–ही ताज्या यौवनपूर्ण जीवनाची आनंदी ऊर्मी, ही पुढे घुसण्याची ऊर्मी–मग कुठे का असेना, तोवर पुढे जाणे आहे–हा सुस्वभावी मुक्तपणा मला भिडला आणि त्याने मला स्फुरण दिले. त्यांच्यात जाऊन मिसळण्याची मला तीव्र इच्छा झाली...

"आस्या, तुझं पाहून पाहून अजून समाधान झालं नाही का?" माझ्यामागून रशियन भाषेत बोलणारा एक पुरुषी आवाज उमटला.

"आणखी थोडं थांबू या", त्याच भाषेत एका बायकी आवाजाने उत्तर दिले.

मी चटकन मागे वळलो... एक टोकदार टोपी आणि ढिले जाकीट घातलेल्या उमद्या तरुणावर माझी नजर पडली. फारशा उंच नसलेल्या, चेहऱ्याचा वरचा संपूर्ण भाग गवती टोपीने झाकलेल्या एका तरुणीचा हात त्याने धरला होता.

"तुम्ही रशियन आहात काय?" अनवधानाने माझ्या तोंडून शब्द बाहेर पडले.

त्या तरुणाने स्मित करून म्हटले: "होय."

"मला कधी अपेक्षा नव्हती... अशा दूरच्या आडगावी..." मी बोलायला आरंभ केला.

"आम्हालाही अपेक्षा नव्हती!" तो मध्येच म्हणाला. "पण झालं ते छानच झालं! माझी मी ओळख करून देतो... माझं नांव गागीन. आणि ही माझी..." तो बोलताना क्षणभर अडखळला... "माझी बहीण. आणि आपलं नांव समजेल काय?"

मी माझे नांव सांगितले आणि आमचे संभाषण सुरू झाले. मला समजले की, माझ्याप्रमाणेच गंमतीसाठी प्रवास करणारा गागीन ल. गावी सुमारे एक आठवड्यापूर्वी आला होता व तेथे मुक्काम करून राहिला होता. खरं सांगायचे तर, परदेशी रशियनांबरोबर मैत्री करण्यास मी फारसा उत्सुक नव्हतो. त्यांच्या चालीवरून, त्यांच्या कपड्यांच्या शिवणीवरून आणि विशेषतः त्यांच्या चेहऱ्यांवरील भावावरून मी त्यांना दूर अंतरावरूनही ओळखत असे. सर्वसाधारणपणे आत्मतुष्ट आणि तिरस्कार दर्शवणारा, अनेकदा ताठ्यात दिसणारा हा मुद्राभाव अचानक सावध आणि चिंतातुर बनायचा. तो अनोळखी तात्काळ सावध बनायचा आणि त्याच्या डोळ्यांची चलबिचल सुरू

व्हायची. "अरे देवा, मी मूर्खासारखा तर वागलो नाही ना! मला पाहून ते हसत तर नाहीत ना?" त्याची भिरभिरती नजर जणू बोलायची... क्षण उलटून जायचा आणि पुन्हा एकदा मुद्रेवर तो दिमाख उमटायचा. मात्र मधून मधून आश्चर्याचे झटके त्या चेहऱ्याला मठ्ठ दाखवायचे. मी रशियनांना टाळत असे हे खरे, पण गागीन मला एकदम आवडला. काही चेहरे असे असतात की, त्यांच्याकडे पहायला प्रत्येकाला आवडते; असे चेहरे प्रेमळ ऊब देतात आणि मनाला शांत करतात; गागीनचा चेहरा अशांपैकी एक होता... प्रसन्न, प्रेमळ, मोठ्या स्निग्ध डोळ्यांचा, मऊ रेशमी कुरळ्या केसांचा. आणि जेव्हा तो बोलायचा, तेव्हा जरी त्याचा चेहरा तुम्हाला दिसला नाही तरी, केवळ त्याच्या आवाजाच्या ध्वनीवरून तुम्हाला भासायचे की, तो स्मित करीत होता.

त्याने जिला आपली बहीण म्हटले होते ती मुलगी मला तात्काळ आकर्षक वाटली. छोटी सुरेख नासिका, जवळजवळ बालिश गाल आणि तेजस्वी काळे डोळे असलेल्या तिच्या गोल, किंचित श्यामलवर्णी चेहऱ्यात काहीतरी स्वारस्यपूर्ण व असाधारण होते. तिचा बांधा डौलदार होता, पण अजून ती पूर्ण वयात आलेली दिसत नव्हती. आपल्या भावाशी तिचे मुळीच साधर्म्य नव्हते.

"आमच्या घरी येता का?" गागीनने विचारले. "मला वाटतं आपण जर्मनांना भरपूर बघून घेतलं. आपल्या विद्यार्थ्यांनी एव्हाना नक्की प्याले फोडायला आणि खुर्च्या मोडायला सुरुवात केली असती. हे भलतेच शांत आहेत. आस्या, तुझं काय मत आहे, जायचं ना घरी?"

त्या मुलीने मानेनेच संमती दिली.

"आम्ही गावाच्या बाहेर राहतो," गागीन पुढे सांगू लागला, "खूप उंचावर, एका द्राक्षाच्या मळ्यामध्ये असलेल्या एकाकी घरात. फार छान आहे जागा. तुम्हाला आवडेल! आमच्या घराच्या मालकिणीनं आमच्यासाठी आंबवलेलं दूध तयार ठेवायचं वचन दिलंय. आता लौकरच अंधार पडेल आणि परत ऱ्हाईन ओलांडून जाण्यापूर्वी चंद्रोदयाची वाट पाहणं तुमच्या दृष्टीनं इष्ट ठरेल."

आम्ही निघालो. गावाच्या अरुंद वेशीमधून बाहेर पडल्यावर (तिच्याभोवती खडबडीत दगडांची प्राचीन भिंत अजून उभी होती आणि जंगी अद्याप शाबूत होत्या), आम्ही उघड्या माळावर आलो. भिंतीलगत सुमारे संभर यार्ड अंतर चालून गेल्यावर एका वेताच्या फाटकापाशी आम्ही पोहोचलो.



गागीनने ते फाटक उघडले व दुतर्फा द्राक्षवेली लावलेल्या एका चढाच्या पाऊलवाटेवरून आम्हाला घेऊन तो निघाला. सूर्य नुकताच मावळला होता. हिरव्या द्राक्षवेलींवर, उंच देठांवर, कोरड्या जमिनीवर, फरसबंदी वाटेवर, त्या उताराच्या माथ्यावर असलेल्या छोट्या घराच्या चुना फासलेल्या भिंतींवर आणि चार खिडक्यांवर आर्द्र लालसर प्रकाश पसरला होता.

"हे आमचं घर!" घरापाशी पोहोचताच गागीन उद्‌गारला. "आणि ती बघा आमची घरमालकीण आंबवलेलं दूध आणतेय. «Guten Abend, Madame!...»* आत्ता ताबडतोब आपल्याला काहीतरी खायला मिळेल, पण त्याआधी मागं वळून पहा... कसा वाटतो देखावा?"

देखावा खरोखरीच सुंदर होता. खाली खूप दूरवर ऱ्हाईन नदी पसरली होती. तिच्या हिरव्या तीरांदरम्यान पाणी रुपेरी चमकत होते. एका ठिकाणी मावळतीचा लाल-सोनेरी प्रकाश पडला होता. तीराला लगटून उभ्या असलेल्या छोट्या गावातील सर्व घरे आणि रस्ते दिसत होते. दूरपर्यंत टेकड्या आणि शेते विखुरली होती. खाली छानच होते, पण वर जास्त सुंदर होते. आकाशाच्या नितळपणाने आणि गहिराईने, वातावरणातील तेजस्वी पारदर्शीपणाने, माझ्यावर खोल ठसा उमटविला. हवा शीतल आणि हलकी व कंपायमान होती. जणू त्या उंचीवर तिलाही अधिक मोकळे वाटत होते.

"तुम्ही रहायला फार सुंदर ठिकाण निवडलंय," मी म्हणालो.

"आस्यानं शोधलं", गागीन उत्तरला. "चल आस्या", तो पुढे म्हणाला, "तुझी व्यवस्था कर पाहू. बाहेरच बसू जेवायला. इथं संगीत जास्त चांगलं ऐकता येतं. तुमच्या लक्षात आलं", माझ्याकडे वळून तो म्हणाला, "जवळून ऐकताना सुरांचा नुसता गोंगाट वाटणारा वॉल्त्झ दूरवरून एकदम किती आल्हादक आणि रोमांचकारी वाटतो!"

आस्या (तिचे खरे नांव आन्ना होते, पण गागीन तिला आस्या म्हणून हाक मारायचा आणि तुमची हरकत नसेल तर मीसुद्धा त्याच नांवाने तिचा उल्लेख करीन) घरात गेली व घरमालकिणीबरोबर लौकरच परत बाहेर आली. त्या दोघींनी मिळून एक मोठा ट्रे धरला होता. दूध भरलेले एक मोठे काचपात्र, बशा, चमचे, साखर, बेरीची फळे आणि पाव एवढ्या

---

* नमस्ते, बाईसाहेब.

वस्तू त्या ट्रेमध्ये ठेवलेल्या होत्या. आम्ही बसून खाऊ लागलो. आस्याने आपल्या डोक्यावरील टोपी काढली. किंचित आखूड कापलेले तिचे काळे, तुकतुकीत केस एखाद्या मुलाप्रमाणे भासत होते. तिच्या मानेवर आणि कानांभोवती दाट कुरळ्या बटा रूळत होत्या. प्रथम ती माझ्याशी लाजून वागत होती, पण गागीनने त्याबद्दल तिला चिडविले.

"आस्या, उगीच घुम्यासारखी बसू नको! ते काही तुला चावत नाहीत!"

तिने स्मित केले आणि थोड्या वेळानंतर स्वतःच माझ्याशी बोलायला आरंभ केला. एवढा अस्वस्थ जीव मी कधीही पाहिला नव्हता. एक क्षणभरही ती स्तब्ध बसत नव्हती. सारखी उड्या मारीत होती, घरात पळत जात होती आणि परत लगबगीने बाहेर येत होती, गुणगुणत होती, वारंवार आणि विचित्रपणे हसत होती. जणू काहीतरी ऐकल्यानंतर ती हसत नव्हती, तर तिच्या मनात येणाऱ्या सर्व प्रकारच्या विचारांपायी हसत होती. तिचे टपोरे डोळे थेटपणे, तेजस्वीपणे आणि निर्भयतेने समोर पहात होते, पण वारंवार पापण्या आकुंचित व्हायच्या आणि तिची नजर आश्चर्यकारकरीत्या सखोल व स्निग्ध भासायची.

जवळ जवळ दोन तासपर्यंत आम्ही गप्पा मारल्या. दिवस केव्हाच संपला होता. भडकत्या ज्वाळांसारख्या दिसणाऱ्या संधिप्रकाशाची लाली हळूहळू फिकट होत गेली आणि शेवटी रात्रीच्या अंधारात विरून गेली. पण आमच्या भोवतालच्या निवांत आणि शांत हवेप्रमाणे आमचे निवांत आणि शांत बोलणे चालूच राहिले. गागीनने ऱ्हाईनच्या मद्याची एक बाटली मागविली व त्या मद्याची चव चाखत चाखत आम्ही आरामात गप्पा मारीत राहिलो. अजूनही संगीत आमच्या कानांपर्यंत पोहोचत होते, पण त्याचे ध्वनी आता अधिक मधुर आणि मंद भासत होते. गावात आणि नदीवर दिवे उजळले होते. अचानक आस्याने मान खाली झुकविली. तिचे केस तिच्या डोळ्यांवर पसरले. गप्प होऊन तिने एक सुस्कारा टाकला. आपण झोपायला जाते असे तिने आम्हाला सांगितले आणि ती घरात गेली. पण मी खूप वेळपर्यंत पहात राहिलो. मेणबत्ती न पेटविता बंद खिडकीशी ती उभी होती. अखेरीस चंद्र उगवला. त्याची किरणे ऱ्हाईनवर बागडू लागली. सर्व काही वेगळे दिसू लागले. काही वस्तू उजळून उठल्या, तर काही अंधारात बुडून गेल्या. आमच्या बिलोरी काचपात्रांमधील मदिरा गूढपणे चमकत होती. वारा पडला होता. जणू आपले पंख दुमडून तो मरण पावला होता. जमिनीमधून निशागंधांची ऊब उमटत होती.



"बापरे, खूप वेळ झाला!" मी एकदम ओरडलो, "नाही तर नावाडी सापडायचा नाही नदी ओलांडायला!"

"खूप वेळ झाला!" गागीनने माझेच शब्द उच्चारले.

पाऊलवाटेवरून आम्ही खाली पायथ्याशी गेलो. अचानक आमच्यामागून छोटे दगड घरंगळत आले. आस्या पाठीमागून धावत येत होती.

"मला वाटलं, तू झोपलीस!" तिचा भाऊ म्हणाला, पण चकार शब्द न बोलता ती तशीच पुढे धावत गेली.

हॉटेलसमोरील बागेत विद्यार्थ्यांनी पेटविलेल्या शेवटच्या मंद मशालीमुळे झाडांची पालवी उजळली होती व झाडांना उत्सवी आणि अद्भुत रूप लाभले होते. नदीतीरावर नावाड्याशी आस्या बोलत असलेली आम्हाला आढळली. मी होडीत उडी टाकली आणि माझ्या नव्या मित्रांचा निरोप घेतला. दुसऱ्या दिवशी माझ्याकडे येऊन मला भेटण्याचे गागीनने आश्वासन दिले. मी त्याचा हात दाबला आणि माझा हात आस्यासमोर धरला. पण तिने केवळ माझ्याकडे पाहिले आणि मान हलविली. होडी पाण्यात शिरली आणि वेगवान धारेवरून तरंगत जाऊ लागली. म्हाताऱ्या भक्कम नावाड्याने मोठ्या कष्टाने काळ्या पाण्यात वल्ही बुचकळली.

"तुम्ही चांदण्याच्या खांबात घुसून त्याला मोडलंत!" आस्या माझ्या पाठीमागे ओरडली.

मी खाली पाहिले. होडीच्या कडांभोवती पाण्याच्या काळ्या लाटा उसळत होत्या.

"अच्छा!" पुन्हा तिचा आवाज घुमला.

"उद्या भेटू!" गागीन ओरडला.

होडी किनाऱ्याला लागली. मी बाहेर पडून मागे नजर टाकली. दुसऱ्या तीरावर आता कुणीही दिसत नव्हते. सोनेरी पुलाप्रमाणे चांदण्याचा स्तंभ परत नदीवर पसरला होता. जुन्या धर्तीच्या लान्नेर वॉल्तझ्चे[4] सूर कानी पडत होते. जणू ते मला निरोप देत होते. गागीनचे म्हणणे खरे होते. त्या लाघवी सुरांनी माझ्या अंतःकरणातील सर्व नाजुक तारा छेडल्या होत्या. गंधित हवा सावकाशपणे हुंगत, काळ्या शेतांना ओलांडून मी घरी परतलो. कुठल्यातरी अस्पष्ट, अखंड अपेक्षेचा गोड थकवा अंगभर पसरला होता. मला खूप सुख वाटत होते... पण कशाने मला एवढे सुखी केले होते? मला कसलीही इच्छा नव्हती, कसलाही विचार मनात नव्हता... मी सुखात होतो.

नाजुक, प्रसन्न संवेदनांच्या अतिरेकापायी मला जवळ जवळ हसू फुटत होते. तशाच मनःस्थितीत मी झोपण्याचा पोषाख चढविला आणि आता डोळे मिटणार तोच अचानक मनात विचार आला की, सबंध संध्याकाळभर त्या माझ्या दुष्ट सुंदरीची आठवण मला झाली नव्हती... "याचा अर्थ काय?" मी स्वतःला विचारले. "मी प्रेमात नाही?" पण त्याच क्षणाला एखाद्या लहान बाळाप्रमाणे मला तात्काळ गाढ झोप लागली असावी.

३

दुसऱ्या दिवशी सकाळी (मी एव्हाना जागा झालो होतो, पण अद्याप बिछान्यातच लोळत होतो) खिडकीच्या तावदानावर काठीची खडखड झाली व पाठोपाठ गाण्याच्या लकेरी ऐकू आल्या. तो गागीनचा आवाज होता हे मी तात्काळ ओळखले:

अजून झोपलास काय?
गिटार छेडून तुला जागं करीन...[६]

त्याला दार उघडायला मी घाईघाईने उठलो.

"नमस्कार", आत येत तो म्हणाला. "मी तुम्हाला फार लौकर जागं केलं, पण किती रम्य सकाळ आहे बघा! हवा ताजी आहे, सगळीकडं दंव पडलंय, चंडोल गाणी गाताहेत..."

कुरळ्या, चकचकीत केसांमधले आणि गुलाबी गालांमधले त्याचे रूप सकाळइतकेच ताजेतवाने होते.

मी कपडे केले आणि बाहेर बागेतील बाकावर बैठक टाकली. कॉफी मागवून आम्ही गप्पा सुरू केल्या. गागीनने आपल्या पुढील योजना मला सांगितल्या. पुरेसे उत्पन्न येत असल्यामुळे आणि पूर्ण स्वतंत्र असल्यामुळे, त्याने स्वतःला चित्रकलेला वाहून घ्यायचे ठरविले होते. हा मनाचा निर्धार करायला त्याने खूप काळ घेतला होता व एवढा वेळ वाया घालविला होता, इतकीच त्याला खंत होती. मी त्याला विश्वासात घेऊन स्वतःच्या भावी योजना सांगितल्या. इतर गोष्टींबरोबर माझ्या असफल प्रेमाचीही माहिती मी त्याला दिली. त्याने लक्षपूर्वक माझे गुपित ऐकून घेतले, पण माझा



भावनावेग त्याच्या मनात विशेष सहानुभूती निर्माण करू शकला नाही असे मला आढळले. केवळ सभ्यतेखातर माझ्या सुस्काऱ्यांमध्ये स्वतःच्या चार सुस्काऱ्यांची भर टाकून त्याने मला आपल्या घरी त्याच्याबरोबर जाण्याचे व त्याच्या रेखाचित्रांवर नजर टाकण्याचे निमंत्रण दिले. मी ताबडतोब होकार भरला.

आम्हाला घरात आस्या आढळली नाही. घरमालकिणीने सांगितले की, ती "अवशेषां"कडे गेली होती. ल. गावापासून दोन वेर्स्ता अंतरावर एका मध्ययुगीन किल्ल्याचे अवशेष होते. गागीनने आपली सर्व रेखाचित्रे माझ्यापुढे खुली केली. त्या रेखाचित्रांमध्ये खूप जिवंतपणा व प्रामाणिकपणा होता, एक प्रकारची स्वतंत्रता आणि विशालता होती. पण एकही रेखाचित्र पूर्ण केलेले नव्हते आणि रेखाटन निष्काळजी व दुबळे होते असे मला वाटले. मला जे वाटले ते मी त्याला प्रांजलपणे सांगितले.

"बरोबर आहे!" उसासा टाकीत तो उद्गारला. "तुमचं बरोबर आहे. हे सारं अगदी खूप सामान्य आणि अपरिपक्व आहे. पण मी काय करणार? खरा अभ्यास मी कधीच केला नाही आणि त्याच्या भरीला हा करंटा स्लाव स्वभाव. पुढं काय करायचं यावर तुम्ही चिंतन करत असता तोवर गरुडासारख्या भराऱ्या मारता, त्यावेळी पर्वतांना हलविण्याची ताकद आहे असं वाटतं... पण प्रत्यक्षात त्या कल्पना उतरवायची जेव्हा वेळ येते तेव्हा अचानक दुबळे आणि थकलेले बनता!"

काहीतरी उत्तेजनपर बोलण्याचा माझा विचार होता, पण त्याने हाताला झटका देऊन मला गप्प केले व सगळ्या चित्रांना एकत्र गोळा करून त्यांचा भारा दिवाणावर टाकला.

"माझ्यापाशी पुरता धीर असेल तर माझ्यातून काहीतरी निर्माण होईल", दात आवळून तो म्हणाला. "आणि नसेल तर मी ठोंब्या ठरीन. चला, आपण आस्याला शोधू!"

आम्ही घराबाहेर पडलो.

४

दाट झाडीने भरलेल्या एका अरुंद घळीच्या उतारावरून नागमोडी रस्ता त्या पडक्या किल्ल्याकडे जात होता. ह्या घळीच्या पायथ्याशी एका वेगवान ओढ्याचे पात्र होते. पर्वतराजीच्या काळसर ओळींपलिकडे शांतपणे चमकणाऱ्या मोठ्या नदीला घाईघाईने भेटण्यासाठी जणू तो दगडगोट्यांमधून खळखळ

आवाज करीत धावत होता. ज्या स्थळी प्रकाश विशेष सुंदरतेने पडला होता अशा ठिकाणांकडे गागीनने माझे लक्ष वेधले. त्याच्या शब्दांवरून मला आढळले की, जरी तो चित्रकार नसला तरी त्याचा आत्मा कलाकाराचा होता. पडका किल्ला आमच्या दृष्टीक्षेपात आला. एका बोडक्या पाषाणाच्या टोकावर एक काळाकुट्ट, भक्कम चौकोनी बुरूज उभा होता. त्याला एक मोठी आडवी भेग पडली होती. त्याच्या दोन्ही बाजूंना शेवाळे माजलेल्या तटाच्या भिंती पसरल्या होत्या. त्या भिंतींच्या दगडांमधून आईव्ही वनस्पतीचे पुंजके चिकटले होते. पांढुरक्या जंगींवरून आणि कोसळल्या कमानींवरून वेडीवाकडी झाडे झुकली होती. अद्याप धडधाकट असलेल्या दरवाजाकडे एक दगडी वाट जात होती. दरवाजापाशी आम्ही पोहोचलो तेव्हा एका स्त्रीची आकृती क्षणभर दिसली. दगडांच्या ढिगाऱ्यावरून भरभर चढून, विवराच्या अगदी टोकाला असलेल्या भिंतीच्या कडेपाशी जाऊन ती थांबली.

"अरेच्चा! ती आस्या आहे!" गागीन उद्गारला. "मूर्ख पोरगी आहे!"

दरवाजामधून आत गेल्यानंतर आम्हाला एक छोटे आवार आढळले. तेथे रान-सफरचंदांची आणि खाजकुयलीची झाडे वाढलेली होती. आणि तटावर खरेच आस्या उभी होती. आमच्या दिशेने आपला चेहरा वळवून ती हसली, पण जागची मुळीच हलली नाही. गागीनने हाताच्या बोटाने तिला दटावले. तिच्या अविचारी वागण्याबद्दल मोठ्या आवाजात तिची मी खरडपट्टी काढली.

"नका लक्ष देऊ तिच्याकडं!" दबल्या आवाजात गागीन मला म्हणाला. "तिला चिडवू नका. तुम्हाला तिचा स्वभाव माहीत नाही. आणखी त्या मनोऱ्यावरसुद्धा चढून जाईल. त्यापेक्षा इथल्या माणसांचं निरीक्षण करा".

मी भोवती नजर टाकली. एका कोपऱ्यात, छोट्या लाकडी दुकानात एक म्हातारी पायमोजे विणत बसली होती व चष्म्यामधून आमच्याकडे रोखून पहात होती. बीयर, सुंठीची बिस्कीटे आणि सोडावॉटर ह्या वस्तू प्रवाशांना विकत होती. एका बाकड्यावर आम्ही बसलो व जस्ताच्या जड पेल्यांमधून थंडगार बीयर प्यायला सुरुवात केली. आस्या आपल्या जागी पाय मुडपून स्तब्ध बसली होती. आपल्या डोक्याभोवती तिने जाळीदार रुमाल गुंडाळला होता. निरभ्र आकाशाच्या पार्श्वभूमीवर तिची डौलदार आकृती रम्यपणे उठून दिसत होती. पण नाखुषीच्या भावनेने मी तिच्याकडे पाहिले.



आदल्या दिवशी मला तिच्यात काहीतरी तणाव जाणवला होता, तिच्यात काहीतरी अस्वाभाविक होते... "आमच्यावर भाव खायचा तिचा विचार असावा", माझ्या मनात आले. "असं कशाला वागते ती? किती पोरकट-पणा!" जणू काही माझे विचार जाणून अचानक तिने माझ्याकडे एक शोधक कटाक्ष टाकला, ती पुन्हा हसली. दोन झेपांमध्ये तट पार करून म्हातारी-पाशी गेली आणि ग्लासभर पाण्याची तिने म्हातारीजवळ मागणी केली.

"मला तहान लागली असं वाटतं तुला?" आपल्या भावाला उद्देशून ती म्हणाली. "मुळीच नाही... तिथं तटावर काही फुलं उगवलीत आणि त्यांना पाणी घातलंच पाहिजे."

तिच्या बोलण्याकडे गागीनने मुळीच लक्ष दिले नाही. आपल्या हाती पाण्याचा ग्लास धरून ती परत तटावर चढू लागली. अधूनमधून थांबत, मोठेपणाचा विचित्र आव आणून, पाण्याचे एक-दोन थेंब ती ओतत होती. पाण्याचे थेंब उन्हात चकाकत होते. तिच्या हालचाली मोहक होत्या, पण अजूनही माझ्या मनात तिच्याबद्दल राग होता. मात्र तिच्या चपळपणाचे कौतुक वाटत होते. एका अत्यंत धोक्याच्या जागी तिने खोटी किंकाळी मारली आणि मग ती खो खो हसत सुटली... मला तिचा अधिकच राग आला.

"एखाद्या शेळीसारखी चढतेय!" मोजा विणायचे क्षणभर थांबवून म्हातारी पुटपुटली.

अखेरीस सर्व पाणी ओतून झाल्यानंतर, देहाला खट्याळ झोके देत देत आस्या आमच्यापाशी आली. तिच्या भुवया, नाकपुड्या आणि तिचे ओठ विचित्र उपहासाने थरथरत होते. तिचे काळे डोळे किंचित उर्मटपणाने आणि किंचित मजेने आकुंचित पावले होते.

"माझं वागणं तुम्हाला चुकीचं वाटतंय हे मला ठाऊक आहे", तिचा चेहरा जणू सांगत होता, "पण मला त्याची मुळीच पर्वा नाही. तुम्ही खरोखरी माझं कौतुक करता आहात हे ठाऊक आहे मला!"

"शाब्बास आस्या, शाब्बास!" गागीन खालच्या आवाजात म्हणाला.

अचानक ती शरमल्याचे भासले व आपल्या लांब पापण्या खाली झुकवून, जणू काही अपराध घडल्याप्रमाणे ती मुकाटपणे आमच्या शेजारी खाली बसली. प्रथमच मी तिचा चेहरा बारकाईने न्याहाळला. एवढे भराभर भाव बदल-णारा चेहरा मी आजवर पाहिला नाही. काही मिनिटांनंतर तो चेहरा खूप फिका पडला व गहन विचारात गुंतल्याचा, जवळजवळ कष्टी असा भाव त्यावर उमटला. तेच नाक-डोळे आता अधिक मोठे, जास्त साधे आणि

सामान्य बनल्याचे मला जाणवले. गहन स्तब्धतेत ती बुडून गेल्याचे भासत होते. तेथील देखाव्याचे कौतुक न्याहाळीत आम्ही किल्लाभर फिरलो (आस्या आमच्या पाठोपाठ चालत होती). जेवायची वेळ जवळ येत होती. गागीनने म्हातारीला पैसे देऊन आणखी एक बीयरचा प्याला घेतला व माझ्याकडे वळून हेतूपूर्वक नजरेने तो उद्गारला :

"तुमच्या हृदयाच्या राणीच्या आरोग्यासाठी!"

"म्हणजे... त्यांची... खरंच अशी कुणी आहे तुमची?" आस्याने अचानक विचारले.

"कुणाची असत नाही?" गागीनने उलट विचारले.

आस्या क्षणभर विचारात पडली. परत तिच्या मुद्रेवरील भाव बदलला. पुन्हा एकदा तिचा चेहरा उर्मट दिसू लागला; जवळजवळ उद्दाम उपहास त्यावर उमटला.

परतीच्या वाटेवर ती अधिकच मुक्तपणे हसत-खिदळत होती. एक लांब फांदी तिने तोडली, आपल्या खांद्यावर बंदुकीसारखी आडवी धरली आणि रुमाल डोक्याभोवती गुंडाळून घेतला. मला आठवते की, वाटेत आम्हाला सोनेरी केसांचे, पारंपारिक असे एक मोठे इंग्रज कुटुंब भेटले. त्या कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीने जणू हुकूम मिळावा त्याप्रमाणे आस्याकडे थंड, निर्विकार नजरांनी वळून पाहिले आणि जशी काही त्यांच्याबद्दलची तुच्छता दाखविण्यासाठी ती मोठमोठ्याने गाणे म्हणू लागली. घरी जाताच ती आपल्या खोलीत गायब झाली आणि केवळ टेबलावर जेवण मांडले गेले तेव्हाच परत अवतरली. तिने उत्तमातील उत्तम फ्रॉक परिधान केला होता, केस व्यवस्थित विंचरले होते, कंबर घट्ट आवळली होती व हातमोजे चढविले होते. अत्यंत शांतपणे, जवळजवळ पारंपारिक पद्धतीने ती टेबलाशी बसली होती. खाण्याच्या पदार्थांना फारसा स्पर्श करीत नव्हती आणि मद्यचषकामधून पाणी पीत होती. सद्वर्तनी, सुसंस्कृत अशा तरुणीच्या नव्या भूमिकेत माझ्यापुढे सादर होण्याचा तिचा उद्देश स्पष्ट दिसत होता. गागीनने तिच्याकडे दुर्लक्ष केले. तिच्या सर्व लहरी चालवून घेण्याकडे त्याचा कल होता असे मला आढळले. फक्त अधूनमधून तो माझ्या दिशेने गंमतीचा कटाक्ष टाकीत होता व एक खांदा किंचित उंचावून जणू सांगत होता: "ती पोर आहे... क्षमेच्या दृष्टीनं पहा!" जेवण संपताक्षणी आस्या उठली, किंचित झुकून तिने अभिवादन केले व डोक्यावर टोपी ठेवीत फ्राऊ लुईझाकडे जाण्याची परवानगी गागीनला विचारली.



"माझी परवानगी केव्हापासून विचारायला सुरुवात केलीस?" आपले नेहमीचे स्मित करीत तो म्हणाला. त्याच्या स्मितामध्ये यावेळी शरमिंदी छटा जाणवत होती. "आमच्या सहवासाचा तुला एवढा कंटाळा आला?"

"मुळीच नाही. पण काल मी फ्राऊ लुईझाना कबूल केलंय भेटायला येईन म्हणून. शिवाय मला वाटतं, तुम्हा दोघांचा एकत्र वेळ जास्त चांगला जाईल. श्रीयुत न. (तिने माझ्याकडे बोट दाखविले) तुला आणखी काही सांगू शकतील."

ती आम्हाला सोडून गेली.

"फ्राऊ लुईझा," माझी नजर टाळीत गागीन बोलू लागला, "माजी नगराध्यक्षांची विधवा आहे. एक लायक, पण रिकाम्या डोक्याची म्हातारी. तिला आस्या खूप आवडलीय. खालच्या थरातल्या माणसांना जाणून घ्यायचा आस्याला नाद आहे. अशी गोष्ट गर्वापायी निर्माण होते असं माझ्या ध्यानात आलंय. तुमच्या लक्षात आलंच असेल की, ती थोडी लाडावलेली आहे", क्षणभर गप्प राहून तो पुढे म्हणाला. "पण त्याबद्दल काय करणार? कुणाशीही कडक वागणं मला कधी जमलं नाही. तिच्याशी तर नाहीच नाही. तिच्या लहरी सहन करणं मला **आवश्यक** आहे".

मी काहीच बोललो नाही आणि गागीनने विषय बदलला. त्याला मी जेवढा जास्त ओळखू लागलो तेवढा तो मला जास्त आवडू लागला होता. लौकरच त्याच्या बाबतीत मी निष्कर्ष काढला. त्याचा अस्सल रशियन स्वभाव होता. खरा, प्रामाणिक, साधा. पण खेदाची बाब म्हणजे आळशीपणा, चिकाटी आणि ज्वलंतपणाचा अभाव. त्याच्यात यौवन मुसमुसत नव्हते; त्याचा केवळ मंद प्रकाश पडला होता. त्याच्यात माधुर्य आणि बुद्धिमत्ता होती, पण पुढे परिपक्व बनल्यानंतर तो कसा होईल याची कल्पना मी करू शकत नव्हतो. तो चित्रकार बनला असता का? पण चित्रकार बनायला अखंड, खडतर कष्ट करावे लागतात... आणि त्याचा मृदु चेहरा पाहून, त्याचे मंद बोलणे ऐकून माझ्या मनात विचार आला की, कष्ट करणे त्याला जमणार नाही, ते शक्य नाही. पण तो न आवडणे शक्य नव्हते. कुणाचाही त्याच्यावर तात्काळ जीव जडला असता. कधी दिवाणावर बसून, तर कधी घराच्या समोर सावकाश फेऱ्या मारीत आम्ही दोघांनी सुमारे चार तास एकत्र घालविले. त्या काळात आम्ही जिवाभावाचे मित्र बनलो.

सूर्य मावळला होता आणि माझी जाण्याची वेळ झाली होती. आस्या अद्याप परत आली नव्हती.

"किती स्वच्छंदी पोरगी!" गागीन उद्गारला. "तुम्हाला मी सोडायला येऊ? वाटेत फ्राऊ लुईझाकडं डोकावून बघू, आस्या तिथं आहे अथवा नाही ते! फारशी वाकडी वाट करावी लागणार नाही."

गावाच्या दिशेने आम्ही खाली उतरलो व एका अरुंद, वाकड्या गल्लीत वळलो. तेथे चार मजली उंच आणि अवघ्या दोन खिडक्या रुंद अशा घरासमोर थांबलो. तळमजल्यापेक्षा दुसरा मजला रस्त्यावर पुढे आला होता आणि तिसरा व चौथा मजला दुसऱ्याच्या पुढे आले होते. ते दगडी बांधकाम कोसळण्याच्या अवस्थेत होते. दोन जाड खांबांनी वरच्या मजल्यांना सावरुन धरले होते. फरशांचे उंच छप्पर आणि पोटमाळ्यावरील चोचीसारखा पुढे आलेला भाग, ह्यामुळे ते घर एखाद्या प्रचंड, दबा धरून बसलेल्या पक्ष्यासारखे भासत होते.

"आस्या!" गागीनने हाक मारली. "तू तिथं आहेस?"

तिसऱ्या मजल्यावरील प्रकाशित खिडकी उघडल्याचा आवाज आम्ही ऐकला आणि आस्याचे छोटे काळे डोके पाहिले. तिच्या पाठीमागून बोळक्या तोंडाच्या, धूसर डोळ्यांच्या वयस्क जर्मन बाईचा चेहरा डोकावला.

"मी इथंच आहे!" खिडकी चौकटीवर आपल्या हातांचे कोपर नखरेबाजपणे टेकवीत आस्या ओरडली. "मी मजेत आहे. हे घे, पकड!" गागीनकडे जेरानियमची एक डहाळी फेकीत ती पुढे म्हणाली. "तुझ्या हृदयाची मी राणी आहे असं समज!"

फ्राऊ लुईझा हसली.

"न. घरी चाललेत", गागीन म्हणाला. "त्यांना तुझा निरोप घ्यायचाय".

"खरंच?" आस्या म्हणाली. "तसं असेल तर त्यांना फूल दे. मी लौकर येईन."

तिने खिडकी धाडकन बंद केली आणि फ्राऊ लुईझाचे चुंबन घेतले असावे. गागीनने मुकाटपणे फुलाची डहाळी माझ्या हाती दिली. मीसुद्धा मुकाटपणेच ती माझ्या खिशात ठेवली, नदीच्या किनाऱ्यापर्यंत चालत गेलो व होडीमधून दुसऱ्या तीराला पोहोचलो.

मला आठवते की, घराकडे चालत जात असताना माझ्या मनात विशेष विचार असे काही नव्हते, पण छातीवर एक चमत्कारिक दडपण आल्यासारखे वाटत होते. अचानक एका परिचित, परंतु जर्मनीत क्वचित भेटलेला असा उग्र दर्प मला जाणवला. मी स्तब्ध उभा राहिलो आणि रस्त्याच्या कडेला



अंबाडीचा झुपका उगवलेला पाहिला. त्या वासाने तात्काळ माझ्या मायभूमीच्या स्तेपची आठवण झाली. माझ्या मनात पूर्वीच्या आठवणी उमाळून आल्या. रशियन हवा हुंगण्याची, रशियन भूमीवर चालण्याची तीव्र इच्छा झाली. "काय करतोय मी इथं? ह्या परक्या भूमीत, अनोळखी माणसांमध्ये मी कशाला भटकतोय?" मी उद्गारलो आणि माझ्या उरावरील जड वजनाचे एकदम कडवट, जळत्या खळबळीमध्ये रूपांतर झाले. घरी आलो तेव्हा आदल्या दिवशीपेक्षा माझी मनःस्थिती अगदी वेगळी होती. काहीसा रागावलेल्या अवस्थेत मी होतो आणि काही काळपर्यंत तो राग झटकून टाकण्यास असमर्थ ठरलो. चिडीची भावना मला कुरतडत होती आणि तिचे मला आकलन होत नव्हते. सरतेशेवटी माझ्या चंचल विधवेचा विचार करण्यासाठी बसलो (ह्या स्त्रीच्या गंभीर आठवणी काढण्यात प्रत्येक दिवसाची अखेर व्हायची) आणि तिचे एक पत्र बाहेर काढले. पण ते पत्र मी धड उघडलेसुद्धा नाही, कारण माझ्या विचारांनी झटकन दुसरे वळण घेतले. मी विचार करू लागलो... आस्याविषयी. मला आठवण झाली की, संभाषणाच्या ओघामध्ये गागीनने त्याच्या रशियाला परतण्यामधील कसल्यातरी अडचणीचा सूचक उल्लेख केला होता... "अरेच्चा! ती खरंच त्याची बहीण आहे का?" मी मोठ्यांदा म्हणालो.

कपडे उतरवून मी बिछान्यात पडलो आणि झोपायचा प्रयत्न करू लागलो. पण एक तासानंतर मी परत उठून बसलो. उशीमध्ये हाताचा कोपर खुपसून "बळेच हसणाऱ्या त्या लाडावलेल्या मुलीविषयी" परत विचार करू लागलो... "...तिची आकृती फर्निसिना भित्तीचित्रांमधल्या राफाएलच्या छोट्या गालातेयासारखी[6] आहे", मी पुटपुटलो. "आणि खात्रीनं ती त्याची बहीण नाही..."

आणि विधवेचे पत्र निवांतपणे फरशीवर पडले होते, चंद्रकिरणांमध्ये पांढरे दिसत होते.

## ५

दुसऱ्या दिवशी सकाळी मी परत होडीमधून ल. गावी गेलो. मी स्वतःला बजावले होते की, मला गागीनला भेटायचे होते. पण माझ्या मनात मात्र सुप्त इच्छा होती आस्या कशी वागेल हे बघायची. आदल्या दिवसाप्रमाणेच पुन्हा ती खट्याळ वागणार आहे अथवा नाही हे बघायचे

होते. ती दोघेही बैठकीच्या खोलात बसलेली मला आढळली आणि सांगायला विचित्र वाटेल – कारण त्या रात्रभर व सकाळीसुद्धा मी रशियाबद्दल खूप विचार करीत असल्यामुळे असेल कदाचित – आस्या मला खास रशियन मुलीसारखी भासली. अगदी सामान्य, अक्षरशः घरच्या मोलकरणीसारखी. जुना फ्रॉक घालून, कानांमागे केस विंचरून, खिडकीपाशी ती स्तब्ध बसली होती. हातामधील कशिदाकामात ती पुरती गढून गेली होती. जणू त्या कामाव्यतिरिक्त आपल्या आयुष्यात तिने दुसरे काहीही केले नसावे. ती क्वचित बोलत होती. आपल्या कामावर तिने आपली नजर खिळविली होती. तिच्या चेहऱ्यावर एवढा सामान्य, गद्य भाव होता की, अपरिहार्यपणे मला घरच्या आमच्या कात्या आणि माशा आठवल्या. आणि हे साधर्म्य पूर्ण करण्यासाठी ती गुणगुणू लागली : "मातुष्का, गलुबूष्का"*[7]. तिच्या फिकट, निर्जीव चेहऱ्याकडे नजर टाकताना मला कालच्या स्वप्नांची आठवण झाली आणि मला खेद वाटला. त्याचे कारण मात्र ठाऊक नाही. दिवस खूप छान होता. रेखाचित्रे काढण्यासाठी बाहेर जाण्याचा आपला इरादा गागीनने जाहीर केला. मी त्याला सोबत करावी अथवा त्याच्या कामात माझा अडथळा होईल, अशी मी त्याला विचारणा केली.

"अगदी उलट", तो उत्तरला. "तुम्ही मला उत्तम सल्ला देऊ शकाल!"

व्हॅन डाईक पद्धतीची गोलाकार टोपी चढवून आणि झगा घालून त्याने आपल्या काखोटीला कागदाचे जुगदान मारले व तो बाहेर गेला. मी त्याच्या पाठोपाठ गेलो. आस्या घरात थांबली. जाण्यापूर्वी गागीनने तिच्यावर कामगिरी सोपविली, सूप अतिपातळ होऊ नये हे पाहण्याची. तिने स्वयंपाकघरात डोकावण्याचे आश्वासन दिले. आता मला परिचित झालेल्या घळीत गागीन जेव्हा पोहोचला तेव्हा तेथे तो एका खडकावर बसला व एका जुन्या, पोकळ, फांद्या पसरलेल्या ओक झाडाचे चित्र रेखाटू लागला. मी गवतावर पहुडलो आणि खिशातून एक पुस्तक बाहेर काढले. पण माझे वाचन दोन पानांपलिकडे गेले नाही आणि त्याने केवळ आपला कागद खराब केला. आम्ही मुख्यतः बोलत राहिलो. माझ्या मताप्रमाणे आम्ही शहाणपणाने आणि चिकित्सकपणे चर्चा केली कामाच्या योग्य पद्धतीबद्दल; काय टाळावे, कोणती पद्धत स्वीकारावी, आमच्या काळात चित्रकाराचे महत्त्व कोणते होते याबद्दल.

---

* रशियनमध्ये "माते, लाडक्या माते." –अनु.



शेवटी गागीनने निर्णय घेतला की, आज तो "योग्य मनःस्थितीत नव्हता" आणि माझ्याशेजारी तो पहुडला. नंतर आमच्या यौवनसुलभ गप्पांचा ओघ मुक्तपणे वाहू लागला. आमच्या रशियन अंतःकरणाला अत्यंत प्रिय असलेल्या एका चर्चेमध्ये आम्ही पुरते रमून गेलो. ती चर्चा आलटून-पालटून कळकळीची होती, विचारी होती, उत्तेजक होती, पण अपरिहार्यपणे संदिग्ध होती. भरपूर गप्पा मारून समाधानी मनाने, जणू काही आम्ही काहीतरी यशस्वी-रीत्या साध्य केले होते अशा थाटात, आम्ही घरी परतलो. आस्या नेमकी सकाळसारखीच दिसत असल्याचे मला आढळले. तिचे बारकाईने निरीक्षण केले तेव्हा आता तिच्यात नखऱ्याचा, एखादी भूमिका वठविण्याचा लवलेशही नसल्याचे मला जाणवले. यावेळी तिच्यावर खोट्या वागण्याचा कुणीही आरोप करू शकले नसते.

"अरेच्चा", गागीन म्हणाला, "ही तर संन्यासिनीचा अवतार घेऊन बसलीय!"

संध्याकाळी तिने अनेकवेळा स्वाभाविक जांभया दिल्या व आपल्या खोलीत ती लौकर परतली. मीसुद्धा गागीनचा निरोप घेऊन घरी गेलो. त्या दिवशी स्वप्नांमध्ये रमलो नाही. तो शांत संवेदनांचा दिवस होता. मात्र बिछान्यावर पडता पडता नकळत माझ्या तोंडात उद्‌गार निघाल्याचे आठवते : "किती रंग बदलणारी मुलगी आहे!" थोडे थांबून पुढे म्हणालो : "आणि माझी खात्री आहे... ती त्याची बहीण नाही!"

## ६

दोन पूर्ण आठवडे लोटले. या काळात दररोज मी गागीनांकडे जात होतो. आस्या मला टाळत होती असे भासत होते. पण आमच्या ओळखीच्या पहिल्या दोन दिवसांमध्ये आपल्या विचित्र लहरी वागण्याने तिने जसे मला चकित केले होते, तसे इतःपर ती वागली नाही. मनातल्या मनात कदाचित ती झुरत होती, किंवा शरमली होती. तिचे हसणेसुद्धा कमी झाले. मी तिचे कुतूहलाने निरीक्षण करीत होतो.

फ्रेंच आणि जर्मन अशा दोन्ही भाषा ती उत्तम बोलत होती. पण लहानपणी तिला बाईचे मार्गदर्शन लाभले नव्हते असे तिच्या प्रत्येक वागण्या-मधून जाणवत होते. तिला लाभलेले शिक्षणही विचित्र आणि आगळे होते. खुद्द गागीनपेक्षा अगदीच वेगळे. व्हॅन डाईक टोपी आणि चित्रकाराचा झगा

चढवूनसुद्धा त्याच्या वागण्यामधून लाडावलेल्या रशियन सद्गृहस्थाचे मंद वातावरण निर्माण होत होते. पण तो मात्र सुसंस्कृत तरुणी मुळीच भासत नव्हती. तिच्या हालचाली अस्वस्थ होत्या. ह्या रानवेलीचे नुकतेच कलम केले होते, ही मदिरा अजून आंबविण्याच्या प्रक्रियेत होती. तिचा मूळ स्वभाव लाजरा आणि भित्रा होता. पण स्वतःच्या लाजरेपणाचा तिला संताप होता. धीट आणि स्वतंत्र वागण्याचा ती प्रयत्न करीत होती, पण त्यात फारसे यश तिला लाभत नव्हते. रशियातील तिच्या जीवनाबद्दल, तिच्या भूतकाळाबद्दल, तिला बोलते करण्याचा मी काही वेळा यत्न केला, पण माझ्या प्रश्नांना तिने नेहमी अनिच्छेने उत्तरे दिली. मात्र, परदेश-प्रयाणापूर्वी, दीर्घकाळ ती खेड्यात रहात होती एवढे मला समजले. एके दिवशी एका पुस्तकात डोके खुपसून ती बसलेली मला आढळली. तिचे डोके तिच्या हातांवर टेकले होते, बोटे तिच्या केसात खुपसलेली होती. छापील पान ती आधाशीपणे वाचत होती. "शाब्बास!" तिच्यापाशी जात मी म्हणालो. "तुम्ही फार उद्योगी बुवा!"

तिने आपले डोके वर उचलले व माझ्याकडे गंभीरपणे आणि कठोरपणे पाहिले.

"मला हसण्याशिवाय दुसरं काहीच येत नाही असं वाटतं का तुम्हाला", ती म्हणाली आणि तेथून जाण्याच्या इराद्याने तिने हालचाल केली.

तिच्या पुस्तकाच्या शीर्षकावर मी कटाक्ष टाकला. ती फ्रेंच कादंबरी होती.

"तुमच्या निवडीचं कौतुक करणं मला शक्य नाही", मी शेरा मारला.

"मग मी काय वाचू?" टेबलावर पुस्तक भिरकावून देत ती ओरडली. "त्यापेक्षा बाहेर जाऊन हुंदडणं जास्त बरं ठरेल!" आणि ती बाहेर बागेत धावली.

संध्याकाळी मी गागीनला 'हेर्मान आणि डोरोथी'[8] हे पुस्तक मोठ्यांदा वाचून दाखवीत होतो. आरंभी आस्या आमच्या जवळून पुसटशी जात-येत राहिली. पण थोड्या वेळानंतर तिच्या फेऱ्या थांबल्या आणि कलती मान करून शांतपणे ती माझ्याशेजारी येऊन बसली. माझे वाचन संपेपर्यंत ती बसून राहिली. दुसऱ्या दिवशी परत मी तिला ओळखले नाही. शेवटी माझ्या डोक्यात प्रकाश पडला... डोरोथीप्रमाणे धीरगंभीर आणि गृहिणीसारखे वागायचे खूळ तिच्यात संचारले होते. थोडक्यात, माझ्या दृष्टीने ती एक कोडे होती. ती कमालीची हळवी आणि संवेदनाशील होती. पण तिने मला



राग आणला तरीसुद्धा तिचे मला आकर्षण वाटायचे. दर दिवसागणिक एका गोष्टीची मात्र मला खात्री पटत चालली होती... ती गागीनची बहीण नव्हती! तो तिच्याशी भावाप्रमाणे वागत नव्हता. तो फार प्रेमळ वागायचा, तिचे लाड पुरवायचा. मात्र तिच्या सहवासात किंचित तणावाखाली वागायचा.

एका विलक्षण घटनेमुळे माझा संशय पक्का झाला.

गागीन रहात होते त्या द्राक्षमळ्यापाशी एके संध्याकाळी मी आलो तेव्हा फाटकाला कुलूप लावलेले मला आढळले. असे का याचे नवल करण्यात वेळ न दवडता, आधीच पाहून ठेवलेल्या भिंतीच्या फटीमधून मी तडक आत घुसलो आणि कुंपणावरून आत उडी मारली. ह्या ठिकाणापासून जवळच्या अंतरावर, अकाशियाच्या झुडुपांचा एक छोटा कुंज बनविलेला होता. मी तेथे पोहोचलो आणि पुढे जाणार तोच आश्चर्यकारकरीत्या माझ्या कानी आस्याचा गळा दाटलेला आवाज पडला:

"मला तुझ्याशिवाय दुसऱ्या कुणावरही प्रेम करायची इच्छा नाही... नाही, नाही... मला फक्त तुझ्यावर प्रेम करायचंय... तुझ्यावर कायम प्रेम करायचंय!"

"पुरे आता आस्या... शांत हो!" गागीन म्हणाला. "माझा तुझ्यावर विश्वास आहे हे तुला ठाऊक आहे".

लताकुंजामधून त्यांचे आवाज ऐकू येत होते. विरळ फांद्यांच्या जाळीमधून ती दोघेही मला दिसत होती. त्यांना माझी चाहूल लागली नाही.

"तू! फक्त तूच!" ती पुन्हा म्हणाली आणि त्याच्या छातीवर स्वतःचे अंग झोकून जोरजोराने हुंदके देऊ लागली, त्याला अधिक बिलगून त्याची चुंबने घेऊ लागली.

"पुरे, पुरे!" तिच्या केसांवरून हलकेच हात फिरवीत तो परत म्हणाला.

क्षण-दोन क्षणपर्यंत मी स्तब्ध उभा राहिलो... मग मी स्वतःचे शरीर झटकले. "त्यांच्याकडे जायचे? मुळीच नाही!" माझ्या मनात विचार चमकून गेला. झपाझपा चालत मी भिंतीपाशी परत गेलो, रस्त्यावर उडी मारली आणि अक्षरशः पळत घरी परतलो. मी हसत होतो, माझे हात चोळीत होतो, माझ्या तर्कांना अनपेक्षित पुष्टी देणाऱ्या घटनेचे नवल करीत होतो (त्यांच्या अचूकतेविषयी क्षणभरही मला शंका आली नव्हती) आणि त्याचवेळी माझ्या काळजात कडवटपणा निर्माण झाला होता. "फसवायची कला त्यांना उत्तम अवगत होती! पण का? मला मूर्ख बनवायचे त्यांना कारण

काय? त्याच्यापासून मी कधीही अशी अपेक्षा धरलो नव्हती... आणि किती हळवे कबुलीजबाब!"

७

वाईट रात्र घालविल्यानंतर दुसऱ्या दिवशी सकाळी मी लौकर उठलो, पाठीवर धोकटी मारली, संध्याकाळपर्यंत वाट पाहू नका असे घरमालकिणीला सांगितले आणि झ. गाव ज्या नदीतीरावर वसले होते त्या नदीच्या पात्राला धरून डोंगर चढायला आरंभ केला. ह्या डोंगरांच्या ओळीला कुत्र्याची पाठ (Hundsrück) म्हणून ओळखतात आणि भूगर्भशास्त्रीयदृष्टया हा भाग फार स्वारस्याचा आहे. विशेषत: बॅसाल्टच्या थराची नियमितता आणि विशुद्धता लक्षणीय आहे, पण भूगर्भशास्त्रीय अंदाजांमध्ये मला स्वतःला फारसा रस नव्हता. माझ्या अंतरंगात नेमके काय घडत होते ते मला नीटसे कळत नव्हते, पण एक भावना निश्चित होती: गागीनना इतःपर भेटण्याची माझी इच्छा नव्हती. त्यांच्याबद्दल अचानक नावड निर्माण होण्याचे एकमेव कारण म्हणजे त्यांच्या दुटप्पी वर्तनाचा राग, असे मी स्वतःला बजावले. नातेवाईक आहोत असे सांगायचा त्यांना कुणी आग्रह धरला होता? त्यांच्याविषयीचे सर्व विचार मनातून निपटून टाकण्याचा मी प्रयत्न केला. डोंगरावर आणि दरीमध्ये मी स्वच्छंद भटकलो. खेड्यातील पथिकाश्रमांमध्ये विश्रांती घेतली. तेथे मालकांशी आणि पाहुण्यांशी शांतपणे गप्पा मारल्या अथवा सपाट, उन्हात तापलेल्या दगडावर अंग ताणून दिले व तरंगणारे ढग पहात राहिलो. हवा सुंदर होती. ह्या उद्योगांमध्ये तीन दिवस मी निश्चितच मजेत घालविले, पण मधून मधून काळजात कळ उमटत होती. देशाच्या ह्या भागातील निवंत रमणीय निसर्ग माझ्या विचारांच्या सुरांशी छान जुळत होता.

योगायोगाने उमटणाऱ्या संवेदनांच्या, क्षणिक विचारांच्या मी पूर्ण आधीन झालो. माझ्या अंतःकरणात एकापाठोपाठ त्या संवेदना, ते विचार निवांतपणे उमटत होते आणि त्यांच्यातून एकच एक संवेदना तयार होत होती. त्या तीन दिवसांमध्ये मी पाहिलेले, जाणवलेले आणि ऐकलेले सर्व काही एकत्र मिळून एक संवेदना बनली होती–जंगलातील राळेचा मंद गंध, सुतार पक्ष्यांचे ओरडणे आणि टोक टोक आवाज, वालुकामय पात्रांमध्ये ठिपकेदार ट्राऊट मासे असलेल्या पारदर्शी निर्झरांची अखंड खळखळ, डोंगरांच्या किंचित



झोका खाणाऱ्या कडा, काळसर कडे, नेटकी खेडी, प्राचीन पवित्र प्रार्थनामंदिरे आणि झाडे, कुरणांमधील करकोचे, गरगर चाके फिरणाऱ्या सोयीस्कर पाणचक्क्या, निळे झगे आणि राखाडी मोजे घातलेल्या खेडुतांचे प्रेमळ चेहरे, धिप्पाड घोड्यांकडून अथवा काहीवेळा गायींकडून ओढल्या जाणाऱ्या मंदगती, करकर आवाज करणाऱ्या शेतावरील गाड्या, दुतर्फी सफरचंदांची आणि नासपातीची झाडे उभी असलेल्या उत्तम राखलेल्या रस्त्यांवरून जाणारे तरुण, लांब केसवाले यात्रेकरू...

ह्या सगळ्या ठशांची आठवण करण्यात आजसुद्धा मला आनंद मिळतो. माफक पूर्णत्व असलेल्या, उद्योगी हातांचा, चिकाटीच्या आणि निवांत श्रमांचा ठसा सर्व अंगभर मिरविणाऱ्या जर्मन भूमीच्या त्या नम्र तुकड्याचा जय असो! .. तुझा जय असो! तुला शांती लाभो!

तिसऱ्या दिवसाच्या अखेरी मी माझ्या निवासस्थानी परतलो. मी सांगायला विसरलो की, गागीनांवरील रागापायी माझ्या अंतःकरणात त्या पाषाणहृदयी विधवेची प्रतिमा पुनरुज्जीवित करण्याचा मी प्रयत्न केला, पण माझे यत्न निष्फळ ठरले. मला आठवते की, एकदा मी तिच्याबद्दल चिंतन सुरू केले, तेवढ्यात पाच वर्षांच्या एका गोल चेहऱ्याच्या आणि निष्पाप, टक लावून पाहणाऱ्या डोळ्यांच्या किसान बालिकेवर माझी नजर पडली. बालसुलभ भाबडेपणाने ती माझ्याकडे पहात होती... तिच्या नितळ नजरेने मी शरमलो. तिच्या संगतीत मला खोटेपण जमेना आणि त्या क्षणापासून माझा जुना प्रेमविषय मी कायमचा सोडून दिला.

घरी गागीनची चिठ्ठी माझी वाट पहात असल्याचे मला आढळले. माझ्या निर्णयाच्या आकस्मिकपणाबद्दल त्याने आपले आश्चर्य व्यक्त केले होते, त्याला माझ्याबरोबर न नेल्याबद्दल माझी खरडपट्टी काढली होती व मी परत येताक्षणी त्यांना जाऊन भेटण्याबद्दल लिहिले होते. त्रासिकपणे मी त्याची चिठ्ठी वाचली, तरीही दुसऱ्या दिवशी ल. गावी गेलो.

८

गागीनने माझे आस्थेने स्वागत केले आणि प्रेमळ शब्दांमध्ये आपला राग व्यक्त केला. पण आस्या मात्र मला पाहताच निष्कारण खो खो हसत सुटली आणि नेहमीप्रमाणे तात्काळ पळून गेली. गागीन अवघडल्यासारखा झाला व ती वेडी असली पाहिजे असे पुटपुटत मी तिला क्षमा करावी अशी

त्याने मला विनंती केली. आस्याची मला विलक्षण चीड आली होती हे मी मान्य करतो. आधीच मला विचित्र वाटत होते आणि ह्या खोट्या हसण्यामुळे, ह्या चमत्कारिक लहरींमुळे, माझी मन:स्थिती अधिकच वाईट झाली. मात्र मी जणू काहीच पाहिले नाही असे भासविण्याचा प्रयत्न करीत गागीनला माझ्या छोट्या सफरीचा वृत्तांत सांगायला आरंभ केला. आणि माझ्या अनुपस्थितीत त्याने काय केले याचा अहवाल त्याने मला सांगितला. पण आमचे संभाषण रंगले नाही. आस्या परत खोलीत आली आणि पुन्हा बाहेर धावली. सरतेशेवटी मी जाहीर केले की, तातडीच्या कामासाठी मला घरी जाणे भाग आहे. प्रथम गागीनने मला थांबवून धरण्याचा प्रयत्न केला, पण माझ्याकडे टक लावून काही वेळ पाहिल्यानंतर तो मला सोडायला यायला निघाला. हॉलमध्ये अचानक आस्या आली आणि तिने आपला हात माझ्यापुढे धरला. मी तिच्या बोटांच्या टोकांना ओझरता स्पर्श केला आणि किंचित झुकून अभिवादन केले. गागीन आणि मी होडीतून ऱ्हाईन नदी ओलांडून गेलो. माझ्या आवडत्या ॲश झाडापाशी, त्याच्या फांद्यांमध्ये लपलेल्या मॅडोन्नाच्या पुतळ्यापाशी, एका बाकावर बसून आम्ही समोरचा देखावा पाहू लागलो. आणि आमच्यात वैशिष्ट्यपूर्ण संभाषण घडले.

आमच्यामध्ये काही तुटक शब्दांची देवघेव झडली व गप्प बसून चमकत्या नदीकडे आम्ही टक लावून पाहू लागलो.

"मला सांगा", नेहमीचे स्मित करीत अचानक गागीन म्हणाला, "आस्याबद्दल तुमचं काय मत आहे? मला वाटतं, तुम्हाला ती थोडी विचित्र वाटली असावी".

"हो, का बरं", थोड्याशा आश्चर्यानेच मी उत्तरलो. तिच्याबद्दल तो काही बोलेल अशी माझी अपेक्षा नव्हती.

"तिच्याविषयी मत पक्कं करण्यापूर्वी तिला चांगलं जाणून घेतलं पाहिजे", तो म्हणाला. "तिचं अंत:करण फार चांगलं आहे, पण ती चलाख आहे. तिच्याबरोबर वागणं जड जातं. पण तिचा त्यात दोष नाही आणि जर तिची कहाणी तुम्हाला समजली..."

"तिची कहाणी?" मी मध्येच विचारले. "मला वाटतं तुम्ही म्हणाला होतात की, ती तुमची..."

गागीनने माझ्याकडे कटाक्ष टाकला.

"ती माझी बहीण नाही अशी कल्पना करून घेतलीत. काय? छे: छे:" माझ्या गोंधळाची दखल न घेता तो पुढे बोलू लागला, "ती खरो-



खरीच माझी बहीण आहे. ती माझ्या वडलांची मुलगी आहे. माझं ऐका. तुमच्यावर माझा विश्वास आहे, म्हणून ती सगळी हकीकत मी तुम्हाला सांगतो.

"माझे वडील एक अत्यंत दयाळू, शहाणे, सुशिक्षित... आणि दुर्दैवी माणूस होते. इतर अनेक लोकांप्रमाणं त्यांना दैवाचे तडाखे बसले, पण पहिलाच आघात सोसणं त्यांना अशक्य ठरलं. प्रेमापायी त्यांनी खूप लौकर वयात लग्न केलं. त्यांची बायको, माझी आई, लग्नानंतर थोड्याच काळात वारली. मी तेव्हा अवघा सहा महिन्यांचा होतो. माझ्या वडलांनी मला खेड्यात नेलं आणि पुढची तब्बल बारा वर्षं ते तिथं खेड्यातच राहिले. माझ्या शिक्षणाची जबाबदारी ते स्वत:च पार पाडत होते आणि जर त्यांचा भाऊ, माझे काका, त्यांना भेटायला खेड्यात आला नसता, तर मला त्यांनी आपल्यापासून कधीच दूर जाऊ दिले नसते. हे काका पीटरबुर्गमध्ये एका महत्त्वाच्या पदावर काम करत होते. माझ्या वडलांना खेड्यापासून अलग करणं अशक्य होतं हे जाणल्यावर, आपल्या ताब्यात मला द्यावं म्हणून वडलांपाशी त्यांनी आग्रह धरला. माझ्या वयाच्या मुलानं पूर्ण एकांतवासात राहणं इष्ट नव्हतं आणि माझ्या वडलांसारख्या अबोल व उदास शिक्षकाच्या संगतीत माझ्या समवयस्क मुलांच्या मी खात्रीनं मागं पडेन आणि माझ्या स्वभावावरही अनिष्ट परिणाम घडेल, असं त्यांनी दाखवून दिलं. माझ्या वडलांना आपल्या भावाचा युक्तिवाद बराच काळपर्यंत पटला नाही, पण शेवटी त्यांनी माघार घेतली. त्यांचा निरोप घेताना मी रडलो. त्यांना कधीही स्मित करताना मी पाहिलं नव्हतं, तरीही माझं त्यांच्यावर प्रेम होतं. मात्र एकदा पीटरबुर्गमध्ये आल्यानंतर लौकरच मी माझं काळोखं आणि उदास घर विसरलो. लष्करी अधिकाऱ्यांच्या प्रशिक्षण विद्यालयात मला पाठवण्यात आलं आणि तेथून मी सरळ रक्षक रेजिमेंटमध्ये गेलो. दरवर्षी एक-दोन आठवड्यांपुरता मी खेड्यात जायचा. दर वर्षागणिक माझे वडील जास्त जास्त कष्टी, घुमे बनत गेल्याचे मला आढळलं. अतिचिंतनापायी ते असे बुजरे, एकलकोंडे बनले होते. ते दररोज चर्चला जात आणि बोलण्याची त्यांची सवयच तुटली होती. माझ्या अशाच एका भेटीच्या वेळी (एव्हाना माझी विशी उलटली होती) माझ्या नजरेला काळ्या डोळ्यांची, सुमारे दहा वर्षांची छोटी मुलगी दिसली. यापूर्वी मी कधीही तिला आमच्या घरात पाहिलं नव्हतं. ही आस्या होती. माझ्या वडलांनी मला सांगितलं की, ह्या अनाथ मुलीला त्यांनी आपल्या घरात आसरा दिला होता. अगदी हेच त्यांचे

शब्द होते. मी तिच्याकडं फारसं लक्ष दिल नाही. एखाद्या छोट्या जनावरासारखी ती लाजरी, चपळ आणि गप्प होती. आणि जेव्हा जेव्हा मी माझ्या वडलांच्या आवडत्या खोलीत – माझी आई जिथं वारली होती, जिथं भरदिवसा मेणबत्त्या पेटवाव्या लागत अशा प्रचंड मोठ्या अंधाऱ्या दालनात – जात असे तेव्हा तेव्हा ती तात्काळ त्यांच्या उंच पाठीच्या आरामखुर्चीमागं किंवा पुस्तकांच्या फडताळामागं लपायची. माझ्या लष्करी नोकरीपायी ह्या भेटीनंतर तीन-चार वर्ष मला परत खेड्यात जायला जमलं नाही. दर महिन्याला माझ्या वडलांकडून एक त्रोटक पत्र मला येत असे. आस्याचा ते क्वचित उल्लेख करीत आणि तोसुद्धा अगदी सहज जाता जाता. आता त्यांची पन्नाशी उलटली होती, पण अजूनही एखाद्या तरुणासारखे दिसत होते. अचानक, ध्यानीमनी नसताना, माझे वडील प्राणांतिक आजारी आहेत असं आमच्या घरच्या मुनीमांकडून मला पत्र आलं तेव्हा मी किती चकित झालो असेन याची कल्पना करा. वडलांचा मृत्यू घडण्यापूर्वी त्यांना भेटावंसं वाटत असेल तर मी लौकरात लौकर यावं, असं त्या पत्रात म्हटलं होतं. मी तीरासारखा धावलो आणि माझे वडील अद्याप जिवंत असल्याचं मला आढळलं, पण ती त्यांची शेवटची धुगधुगी होती. मला पाहून त्यांना अतिशय आनंद झाला. आपल्या क्षीण हातांनी त्यांनी मला मिठी घातली. किंचित शोधक, किंचित आर्जवी नजरेनं माझ्या डोळ्यांमध्ये खूप वेळपर्यंत त्यांनी रोखून पाहिलं आणि त्यांची शेवटची विनंती मी पूर्ण करीन असं माझ्याकडून आश्वासन घेऊन, आपल्यापाशी आस्याला आणा असं म्हाताऱ्या नोकराला सांगितलं. म्हातारा नोकर तिला आत घेऊन आला. ती धड उभी राहू शकत नव्हती आणि तिचं सर्वांग थरथर कापत होतं.

"'ही...' माझे वडील कष्टानं म्हणाले, 'माझी मुलगी – तुझी बहीण, तुझ्या हवाली करतो. याकोव तुला सारं सांगेल', म्हाताऱ्या नोकराकडं बोट दाखवून ते पुढं म्हणाले. आस्याला हुंदका फुटला आणि बिछान्यावर तोंड पालथं टाकून ती ढसढसा रडू लागली... अर्ध्या तासानंतर माझ्या वडलांनी अखेरचा श्वास सोडला.

"तर मला असं समजलं. आस्या ही माझ्या वडलांची आणि माझ्या दिवंगत आईच्या मोलकरणीची, तात्यानाची मुलगी. ही तात्याना मला ठळक आठवते. उंच, सडपातळ बांधा; देखणा, कठोर, चतुर चेहरा; मोठे काळे डोळे. ती कमालीची मानी, अप्राप्य मुलगी मानली जायची. याकोवनं अदब राखून जे काही थोडं-फार सांगितलं, त्यावरून मी निष्कर्ष



काढला की, माझ्या आईच्या मरणानंतर काही वर्षांनी माझे वडील तात्यानाकडं आकर्षित झाले. एव्हाना तात्याना मोठ्या घरात रहात नव्हती, तर आपल्या विवाहित बहिणीच्या खोपटात रहात होती. तिची बहीण गुरांची व्यवस्था पहायची.

"माझे वडील तिच्यावर खूप मोहित झाले होते आणि मी खेड्यातून निघून गेल्यानंतर तिच्याशी लग्न करू पहात होते, पण त्यांनी कितीही मनधरणी केली तरी त्यांची पत्नी होण्यास तिनं नकार दिला.

"'दिवंगत तात्याना वसिल्येवना', आपले हात पाठीशी धरून दारापाशी उभं रहात याकोव मला म्हणाला, 'विचारीपणाचा आदर्श नमुना होती आणि तुमच्या वडलांना अपाय करण्याची तिची इच्छा नव्हती. "कसली मी तुमची बायको ठरणार? मी थोराघरची थोडीच आहे?" असं ती त्यांना उत्तर द्यायची. हे असं ती सरळ माझ्यादेखत म्हणायची'.

"तात्याना आमच्या घरातसुद्धा रहायला आली नाही. आस्याला घेऊन ती आपल्या बहिणीच्या खोपटातच राहिली. माझ्या बालपणी मी तात्यानाला चर्चमध्ये सणा-सुदीला फक्त पहायचा. ती नेहमी माणसांच्या गर्दीत खिडकीपाशी उभी असे. तिच्या डोक्यावर काळा रुमाल असायचा, खांद्यांभोवती पिवळी शाल असायची. खिडकीच्या स्वच्छ काचेच्या पार्श्वभूमीवर तिचा धारदार तिरपा चेहरा ठळक उठून दिसायचा. धीरगंभीर नम्रतेनं ती प्रार्थना म्हणायची आणि जुन्या पद्धतीनं अगदी भुईला वाकून नमस्कार करायची. माझे काका जेव्हा मला आपल्याबरोबर घेऊन गेले तेव्हा आस्या फक्त दोन वर्षांची होती आणि तिची आई वारली तेव्हा आठ वर्षांची होती.

"तात्यानाच्या मरणानंतर तावडतोब माझ्या वडलांनी आस्याला मोठ्या घरात रहायला आणलं. यापूर्वीच त्यांनी तिला आपल्याबरोबर ठेवण्याची इच्छा व्यक्त केली होती, पण तात्याना त्यालासुद्धा तयार नव्हती. मोठ्या घरात एकदम रहायला आल्यानंतर आस्या कोणत्या मनःस्थितीमधून गेली असेल याचा विचार करा! तिला प्रथम जेव्हा रेशमी पोषाख घातला गेला आणि तिच्या हाताचं चुंबन घ्यायला नोकर आले तो दिवस तिला अजूनही विसरता येत नाही. तिच्या आईनं तिला कडक शिस्तीत वाढवलं होतं. तिच्या वडलांच्या घरात तिला एकदम मोकळीक मिळाली. वडीलच तिचे शिक्षक; तेच तिचे एकमेव सोबती. त्यांनी तिला लाडांनी बिघडवली नाही, किंवा उगीच गोंजारलं नाही, पण त्यांचं तिच्यावर मनस्वी प्रेम होतं आणि तिला हवं ते करायला मुभा होती. तिचे ते अपराधी

होते असं त्यांना मनातून वाटायचं. घरात आपण सर्वात महत्त्वाची व्यक्ती आहोत आणि घराचे मालक आपले वडील आहेत, ही गोष्ट आस्या पटकन समजली. पण आपल्या स्थानामधील खोटेपणाही तिला तेवढाच चटकन उमगला. तिच्यात अतिरेकी गर्व निर्माण झाला आणि तेवढाच अतिरेकी न्यूनगंडही. वाईट सवयी तिच्यात रुजल्या, साधेपणा नाहीसा झाला. एकदा तिनं माझ्यापाशी कबूल केलं की, तिचं मूळ **सबंध जगाला** विसरायला लावण्याचं तिचं स्वप्न होतं. आपल्या आईचा तिला एकाच वेळी अभिमान वाटायचा आणि लाजही वाटायची व स्वतःच्या लाजेची लाज वाटायची.

"तिच्या वयाला अयोग्य अशा खूप गोष्टी तिनं पाहिल्या आणि ऐकल्या... पण हा तिचा दोष काय? यौवनाच्या भरात ती वहावत गेली. तिच्या धमन्यांमधून तरुण रक्त स्पंदत होतं. आणि तिला मार्गदर्शन करायला समर्थ हात नव्हता. सर्व तऱ्हांनी पूर्ण स्वातंत्र्य! हे ओझं काही हलकं नव्हे! इतर थोराघरच्या मुलींप्रमाणं चांगलं होण्याचा तिनं निर्धार केला होता. तिनं वाचनाचा जबरदस्त छंद लावून घेतला. ह्या सगळ्यातून काय चांगलं निघणार? आरंभापासूनच चुकीचं झालेलं तिचं आयुष्य पुढंही चुकीच्या दिशांनी विकसत गेलं, पण तिचं काळीज मात्र दूषित झालं नाही, तिचं मन निर्मळच राहिलं.

"आणि माझ्यासारख्या विशी उलटलेल्या तरुणावर ह्या तेरा वर्षांच्या मुलीची जबाबदारी पडली! माझ्या वडलांच्या मृत्युनंतरच्या पहिल्या काही दिवसात माझा नुसता आवाज कानी पडताच तिला कापरं भरायचं, माझ्या प्रेमळ कुरवाळण्यानं ती घाबरी व्हायची. माझी सवय व्हायला तिला थोडा वेळ लागला. एवढं मात्र खरं की, मी तिला खरंच माझी बहीण मानलं होतं आणि भावासारखा मी तिच्यावर जीव जडवला होता हे जेव्हा तिला जाणवलं, तेव्हा माझा तिला विलक्षण लळा लागला. तिच्या भावनांमध्ये कोणतंही हातराखलेपण नव्हतं.

"मी तिला पीटरबुर्गला नेलं. तिचा वियोग जरी मला क्लेशदायक होता, तरी माझ्याबरोबर तिला ठेवणं अशक्य होतं. एका सर्वोत्तम बोर्डिंग-शाळेत मी तिला ठेवलं. आमच्या अलग राहण्याची गरज आस्यानं मान्य केली, मात्र तिच्या आयुष्याच्या ह्या कालखंडाची सुरुवात आजारानं झाली आणि तो आजार जवळ जवळ जीवावर बेतला होता. पण हळूहळू तिला बोर्डिंग-शाळेच्या जीवनाची सवय झाली आणि तिथं तिनं चार वर्षं काढली. माझ्या अपेक्षांच्या अगदी विरुद्ध, काहीही न बदलता, ती शाळेतून बाहेर



आली. शाळेची मुख्याध्यापिका नेहमी तिच्याविरुद्ध तक्रार करायची. 'तिला शिक्षा करून काही उपयोग नाही,' मुख्याध्यापिका म्हणायची, 'आणि प्रेमळ वागण्यालाही ती प्रतिसाद देत नाही'. आस्या अत्यंत बुद्धिमान आणि सर्वोत्तम विद्यार्थिनी होती, पण कशाशीही जुळवून घेणं तिला जमायचं नाही. ती हट्टी आणि दुर्मुखली रहायची... तिला बोल लावणं मला जमेना. तिच्या परिस्थितीत संकोचून राहणं आणि बंड करणं यांच्या दरम्यान तिला दुसरा मार्गच नव्हता. बरोबरीच्या सगळ्या मुलींमधून फक्त एका गरीब, सामान्य रूपाच्या, दलित मुलीशी तिची मैत्री जमली होती. ज्या तरुणींबरोबर ती शिकत होती त्या बहुतेक चांगल्या कुटुंबांमधल्या होत्या. त्यांना ती आवडत नसे, म्हणून तिचा नेहमी पाणउतारा करून तिला घायाळ करण्याचा त्या प्रयत्न करीत. पण आस्यानं त्यांना मुळीच भीक घातली नाही. एकदा धर्माज्ञा शिकवणारे शिक्षक दुर्गुणांविषयी बोलत होते तेव्हा आस्यानं मोठ्या आवाजात शेरा मारला: 'स्तुती आणि भित्रेपणा सर्वात वाईट दुर्गुण आहेत'. थोडक्यात, तिनं आरंभ केला त्याच पद्धतीनं ती पुढं वागत राहिली. एकाच बाबतीत तिच्यात सुधारणा घडली – शिष्टाचारांमध्ये. पण याही क्षेत्रात तिनं फारशी प्रगती केलेली दिसत नाही.

"अखेरीस सतरावा वाढदिवस जवळ येऊन ठेपला आणि इतःपर बोर्डिंग-शाळेत राहणं तिला अशक्य ठरलं. माझी काहीशी अवघड परिस्थिती बनली होती. अचानक मनात सुखद विचार आला की, नोकरी सोडावी आणि वर्षा-दोन वर्षांसाठी आस्याला सांगाती घेऊन परदेशी जावं. ही कल्पना मनात येताच ताबडतोब प्रत्यक्षात अंमलात आणली आणि इथं आम्ही दोघं येऊन ठेपलोय... ऱ्हाईनच्या तीरावर... मी चित्रकलेत रमण्याचा प्रयत्न करतोय आणि ती... नेहमीप्रमाणंच विक्षिप्त आणि आडदांड वागतेय. मला वाटतं आता तुम्ही अधिक सहानुभूतीनं तिच्याविषयी मत बनवाल... तिनं कसलाही आव आणला तरी दुसऱ्यांच्या मतांची ती कदर करते... विशेषतः तुमच्या!"

आणि गागीनने पुन्हा आपले सौम्य स्मित केले. मी त्याचा हात जोराने दाबला.

"ते सगळं ठीक आहे", विषयाकडे परत वळत तो म्हणाला, "पण मला तिच्याबरोबर राहणं कठीण जातंय. दारूच्या कोठारासारखी आहे ती. अजून कुणी तिच्या मनात भरलेला नाही, पण जेव्हा ती प्रेमात पडेल!.. तिचं काय होईल याचा काहीवेळा मी विचार करत बसतो. अलिकडंच तिनं

डोक्यात काय खूळ घेतलं होतं माहीत आहे? पहिल्यांदा तिनं आरोप केला की, माझ्या तिच्या बाबतीतल्या भावना थंडावल्यात आणि पुढं म्हणते की, तिचं फक्त माझ्यावरच प्रेम आहे आणि सबंध आयुष्यात दुसऱ्या कुणावरही प्रेम करायची तिची म्हणे इच्छा नाही... आणि किती रडली म्हणून सांगू..."

"अच्छा, म्हणजे..." मी बोलायला सुरुवात केली आणि तात्काळ स्वतःला आवरले.

"मला सांगा", मी गागीनला विचारले... एव्हाना आम्ही खूपच मोकळेपणाने बोलू लागलो होतो... "तिच्या आवडीचा एकही पुरुष अद्याप तिला भेटला नाही असं म्हणायचंय तुम्हाला? पीटरबूर्गमध्ये कितीतरी तरुण तिला भेटले असणार..."

"तिला त्यांपैकी कुणीही आवडला नाही. छे:! आस्याला नायक हवा, खास पुरुष हवा... किंवा पर्वतखिंडीमधला रमणीय मेंढपाळ हवा! अरेच्चा, मी बडबड करीत बसलो आणि तुम्हाला निष्कारण ताटकळत ठेवलं", उठून उभे रहात तो पुढे म्हणाला.

"हे बघा", मी म्हणालो, "आपण परत जाऊ या. मला घरी जायची इच्छा नाही".

"आणि तुमच्या कामाचं काय?"

मी उत्तर दिले नाही. गागीन मिस्कील हसला आणि आम्ही ल. गावी परतलो. परिचित द्राक्षमळा आणि टेकाडावरचे छोटे पांढरे घर जेव्हा दृष्टीस पडले तेव्हा माझ्या अंतरंगात एक गोड संवेदना उमटल्याची मला जाणीव झाली. होय मधुर संवेदना! जणू माझ्या काळजात मधाची धार लागली होती. गागीनची कहाणी ऐकल्यापासून मला खूपच बरे वाटू लागले होते.

९

आस्या आम्हाला दाराशीच भेटली. तिच्या हसण्याची आणखी एक उबळ ऐकण्याची मी मनाने तयारी केली होती. पण फिकट, गप्प मुद्रेने व खाली नजर वळवून ती सामोरी आली.

"हे पहा आले परत", गागीन म्हणाला, "आणि लक्षात ठेव, ते स्वतःहून आले आहेत!"

आस्याने माझ्याकडे प्रश्नार्थक नजर टाकली. यावेळी मी माझा हात



तिच्यापुढे धरला आणि तिच्या थंड बोटांना मनःपूर्वक दाबले. मला तिच्याबद्दल खूप वाईट वाटले. पूर्वी तिच्याबद्दल वाटणारी अनेक कोडी आता मला उमजली होती. तिची अस्वस्थ वागणूक, व्यवस्थितपणे वागण्याची तिची असमर्थता, दिखाऊपणाची तिची हौस – ह्या सर्व गोष्टींमागील कारणे आता मला स्पष्ट झाली होती. तिच्या अंतरंगात मी डोकावलो होतो. एक गुप्त ऊर्मी तिला सतत रेटत होती, तिचा अपरिपक्व गर्व तिला शांती लाभू देत नव्हता, पण तरीही ती सत्याचा तनमनाने पाठपुरावा करीत होती. ह्या विलक्षण मुलीमधील कोणत्या गोष्टीचे आकर्षण मला वाटले होते ते उमजले. तिच्या कमनीय आकृतीमधून प्रकाशित होणारा अर्ध-रानटी मोहकपणाच केवळ मला आकर्षित करीत नव्हता, तर तिच्या आत्म्यावरही माझे प्रेम जडले होते.

गागीनने आपल्या चित्रांचा ढिगारा चाळायला आरंभ केला. द्राक्षमळ्यामध्ये भटकण्याचा प्रस्ताव मी आस्यापुढे मांडला. आनंदाने तात्काळ तिने संमती दिली. त्या संमतीत लीन तत्परता होती. अर्ध्या उतारापर्यंत पोहोचल्यावर एका मोठ्या दगडावर आम्ही बसलो.

"आमची तुम्हाला मुळीच आठवण आली नाही?" आस्याने संभाषणाला आरंभ केला.

"आणि तुम्हाला माझी आठवण झाली?" मी प्रतिप्रश्न टाकला.

आस्याने माझ्याकडे एक तिरपा कटाक्ष फेकला.

"हो", ती उत्तरली आणि ताबडतोब पुढे म्हणाली: "डोंगरात खूप छान होतं का? खूप उंच आहेत का डोंगर? ढगांपेक्षा उंच? तुम्ही तिथं काय काय पाहिलंत ते सांगा मला. माझ्या भावाला तुम्ही सांगितलंत, पण मी काहीच ऐकलं नाही".

"तुम्हाला तिथून निघून जावंसं वाटलं", मी टोमणा मारला.

"मी निघून गेले होते... पण आता मी जात नाही", ती पुढे आवाजात मार्दव आणून म्हणाली. "आज तुम्ही चिडलेले होतात".

"मी?"

"हो! तुम्ही!"

"पण कशासाठी?"

"मला माहीत नाही, पण आलात तेव्हा चिडलेले होतात आणि गेलात तेव्हासुद्धा. तुम्ही तसे निघून गेलात याचं मला फार दुःख झालं होतं. आणि तुम्ही परत आलात म्हणून खूप खूप आनंद झालाय".

"आणि मी परत आलो याचा मलाही आनंद झालाय", मी म्हणालो.

लहान मुले खूष झाली म्हणजे जसे खांदे उडवतात तसे आस्याने खांदे उडविले.

"माणसं कोणत्या मन:स्थितीत आहेत हे मी नेहमी सांगू शकते" ती पुढे म्हणाली. "शेजारच्या खोलीत पपा ज्या पद्धतीनं खोकत त्यावरुन ते माझ्यावर खूष आहेत किंवा नाहीत हे मी सांगू शकायची"

या क्षणापर्यंत आस्याने आपल्या वडिलांचा माझ्यापाशी कधीही उल्लेख केला नव्हता. आत्ता तिचे हे वागणे माझ्या मनाला फार भिडले.

"तुमचं आपल्या वडलांवर खूप प्रेम होतं?" मी विचारले आणि अचानक खजिल होऊन माझी कानशिले तापली.

ती उत्तरली नाही आणि तीसुद्धा लाजली. आम्ही दोघेही गप्प झालो. दूर ऱ्हाईनच्या पात्रातून जाणारी आगबोट धुराचे लोट सोडत होती. आम्ही तिकडे पहात राहिलो.

"डोंगरांबद्दल मला सांगा ना!" आस्या हळूच म्हणाली.

"आज मला पाहताच तुम्हाला हसू का फुटलं?" मी विचारले.

"माझं मलाच माहीत नाही. काहीवेळा मला खरं तर रडावंसं वाटत असतं आणि मी हसते... मी कशी वागते यावरुन तुम्ही माझ्याविषयीची मतं बनवू नका... खरंच, लॉरेलीयेची[9] कथा किती सुंदर आहे. तो तिचा खडक ना? असं सांगतात की, प्रथम ती प्रत्येकाला बुडवायची, पण जेव्हा ती प्रेमात पडली तेव्हा तिनं स्वत:लाच पाण्यात झोकून दिलं. मला ती गोष्ट आवडली. फ्राऊ लुईझा मला तऱ्हेतऱ्हेच्या अद्भुत गोष्टी सांगते. फ्राऊ लुईझाकडं पिवळ्या डोळ्यांचं काळं मांजर आहे..."

आस्याने डोके वर केले आणि आपल्या कुरळ्या बटांना मागे लोटले.

"खरंच, मला किती छान वाटतंय!" ती म्हणाली.

त्याच क्षणाला एकसुरी, द्रुतगती गाण्याचे सूर आमच्या कानी पडले. एक धर्ममंत्र शेकडो आवाज विशिष्ट अंतरानंतर म्हणत होते. खाली रस्त्यावरुन क्रूस व पताका घेतलेला यात्रेकरूंचा जमाव चालला होता.

"त्यांच्याबरोबर जावंसं वाटतंय मला", विरत जाणाऱ्या गाण्याचा आवाज कान ताणून ऐकण्याचा प्रयत्न करीत आस्या म्हणाली.

"का? तुम्ही धार्मिक आहात?"

"मला कुठंतरी खूप खूप दूर जाऊन प्रार्थना केली पाहिजे, काहीतरी अवघड पराक्रम गाजवण्यासाठी", ती पुढे म्हणाली. "कारण दिवस उलटताहेत, आयुष्य पुढं चाललंय आणि आपण एव्हाना काय केलंय?"



"तुम्ही महत्त्वाकांक्षी आहात", मी म्हणालो. "आपलं आयुष्य व्यर्थ जावं असं तुम्हाला वाटत नाही. आपल्या खुणा मागं ठेवण्याची तुमची इच्छा आहे..."

"आणि ते अशक्य आहे असं वाटतं तुम्हाला?"

माझ्या ओठांमधून "अशक्य" असा शब्द उमटणार होता... पण तिच्या तेजस्वी डोळ्यांमध्ये पाहून मी एवढेच म्हणालो: "प्रयत्न करा".

"मला सांगा", थोड्या वेळानंतर आस्या म्हणाली. दरम्यान परत फिकटलेल्या तिच्या चेहऱ्यावरून सावल्या झराझरा जात होत्या. "ती बाई तुम्हाला खूप आवडते?... आपली पहिली भेट झाल्यानंतर पडक्या किल्ल्यावर माझा भाऊ जिच्या नांवानं प्यायला ती..."

मी हसलो.

"तुमचा भाऊ थट्टा करत होता. मला कुठलीही बाई कधीही खूप आवडलेली नाही. निदान सध्या तरी माझ्या आवडीची कुणी नाही".

"आणि बायकांमधलं काय आवडतं तुम्हाला?" निष्पाप कुतूहलाने मानेला झटका देत आस्याने विचारले.

"किती विचित्र प्रश्न!" मी उद्‌गारलो.

आस्या किंचित वरमली.

"असे प्रश्न मी तुम्हाला विचारायला नकोत, होय ना? माफ करा, माझ्या डोक्यात जे काही येतं ते पटकन बोलून टाकायची मला सवय आहे. म्हणून मला बोलायचीच भीती वाटते".

"खुशाल बोला, मुळीच घाबरू नका", मी म्हणालो. "तुमचा लाजरेपणा नाहीसा झाला याचाच मला आनंद आहे".

आस्याने नजर खाली झुकविली आणि ती किंचित हसली. तिचे असे हसणे यापूर्वी कधी मी ऐकले नव्हते.

"बोला ना", आपल्या पायांवर स्कर्ट नीट करीत जणू खूप वेळ बसण्याच्या इराद्याने ती आर्जवाने म्हणाली. "माझ्याशी बोला, किंवा काहीतरी म्हणून दाखवा. त्यावेळी तुम्ही 'अनेगिन' म्हटलात तसं..."

ती बोलायची थांबली आणि नंतर दबल्या सुरात म्हणाली:

"कुठे आहे क्रूस, कुठे शाखांच्या सावल्या,
माझ्या दुर्दैवी मातेच्या थडग्यावर!"[10] —

"पुष्कीनची कविता तशी नाही", मी म्हटले.

"मला तात्याना[11] व्हायला आवडेल", पूर्वीप्रमाणेच कष्टी आवाजात ती पुढे म्हणाली. मग अचानक चेतना आल्याप्रमाणे उद्‌गारली: "सांगा ना काहीतरी!"

पण मी बोलण्याच्या मनःस्थितीत नव्हतो. सूर्यकिरणांमध्ये उजळलेल्या तिच्या शांत, सालस चेहऱ्याकडे मी पाहिले. सभोवार सर्वत्र–आमच्या खाली आणि आमच्या वर–आकाश, पृथ्वी आणि पाणी, उजळलेले होते. एकूण वातावरणच तेजाने काठोकाठ भरले होते.

"पहा, प्रत्येक गोष्ट किती सुंदर आहे!" मी नकळत खालच्या आवाजात म्हणालो.

"सुंदर!" तीसुद्धा खालच्या आवाजात उद्‌गारली. तिने माझ्याकडे पाहिले नाही. "आपण जर पक्षी असतो तर कशा भराऱ्या मारल्या असत्या, कसे उडालो असतो... त्या निळाईत कशी डुबी मारली असती... पण आपण पक्षी नाही!"

"पण आपल्याला पंख फुटतील!" मी म्हणालो.

"कसे?"

"जगा आणि पहा. काही अशा भावना असतात ज्या आपल्याला जमिनीपासून वर उचलतात. काळजी करू नका, एक दिवस तुम्हालाही पंख लाभतील."

"तुम्हाला कधी लाभले होते?"

"अं... सांगणं कठीण आहे... अद्याप मी उड्डाण केल्याचं आठवत नाही."

आस्या परत गप्प झाली. मी तिच्यावर किंचित झुकलो.

"तुम्हाला वॉल्तझ नृत्य येतं?" अचानक तिने विचारले.

"हो," काहीसे गोंधळून मी उत्तरलो.

"तर मग चला! चला... माझ्या भावाला मी आपल्यासाठी वॉल्तझ वाजवायला सांगते... आपण उडतोय असं समजू, आपल्याला पंख आहेत असं समजू."

ती घराकडे पळाली. मी तिच्या पाठोपाठ धावलो. काही मिनिटांच्या अवधीनंतर, लान्नेर वॉल्तझच्या गोड सुरांवर, सामान दाटलेल्या बैठकीच्या खोलीत आम्ही गिरक्या घेत होतो. आस्या वॉल्तझ खूप उत्साहाने सुरेख नाचत होती. तिच्या कठोर कौमार्याच्या रूपामधून अचानक काहीतरी सौम्य



आणि स्त्रीसुलभ असे दिसले. तिच्या बारीक कंबरेचा स्पर्श माझ्या हातावर खूप काळपर्यंत रेंगाळत राहिला. आणि माझ्या अगदी नजीक येणारा तिच्या जलद श्वासाचा ध्वनी, कुरळ्या केसांच्या चौकटीत ठळक दिसणाऱ्या तिच्या फिकट मुद्रेवरील काळे, स्तब्ध, अर्धवट मिटलेले डोळे, प्रदीर्घ काळपर्यंत माझ्या आठवणीत राहिले.

## १०

तो संपूर्ण दिवस आत्यंतिक आनंदात गेला. आम्ही लहान मुलांसारखे वागडलो. आस्या खूप गोड आणि साधी वागत होती. तिला तशी पाहून गागीनला छान वाटत होते. मी त्यांचा निरोप घेतला तेव्हा बराच उशीर झाला होता. होडी जेव्हा नदीच्या पात्राच्या मध्यभागी पोहोचली तेव्हा नावाड्याला मी प्रवाहाबरोबर तरंगत जायला सांगितले. म्हाताऱ्याने वल्ही मारणे थांबविले आणि त्या भव्य नदीने स्वतःच्या वक्षावर आम्हाला पेलले. कान देऊन ऐकत आणि आठवणी करीत मी सभोवार पाहिले व अचानक माझ्या काळजात एक गुप्त हुरहुर सुरू झाली... मी वर आकाशात नजर टाकली, पण तेथेही शांतता नव्हती. ताऱ्यांनी खच्चून भरलेले आकाश सतत गतिमान होते आणि स्पंदत होते. मी पाण्यावर झुकलो... पण येथेही काळोख्या थंड खोलाईमध्ये तारे चमचमत आणि थरथरत होते. सर्वत्र एक अस्वस्थ चिंता मला जाणवत होती आणि माझ्या मनातील बेचैनीही वाढत होती. होडीच्या कडेशी मी टेकलो... माझ्या कानांमधील वाऱ्याच्या झुळुकेच्या कुजबुजण्याने, होडीच्या नाळेभोवताली पाण्याच्या मंद खळखळीने मी घाबराघुबरा झालो, मनात खळबळ माजली. लाटांमधून उमटणारा ताजेपणा मला शीतलता देऊ शकला नाही. किनाऱ्यावरील बुलबुलाने आपल्या गीताचे मधुर वीष माझ्या नसांमध्ये भिनविले. माझ्या डोळ्यांमध्ये आसवे दाटली, पण ती गूढ उन्मादाची आसवे नव्हती. आत्म्याला विस्तृत व्हायला, गायला, एकूण निर्मितीमध्ये प्रेम आणि समंजसपणा आहे असे जाणवायला लावणारी सर्वस्पर्शी इच्छेची संवेदनाच केवळ आता मी अनुभवीत नव्हतो... सुखाची तहान मला आता ग्रासत होती. तिला नांव देण्याचे साहस अद्याप मी केले नव्हते, पण मला इच्छा होती सुखाची, दुथडी भरून वाहणाऱ्या सुखाची... होडी तरंगत होती... म्हातारा नावाडी सुकाणूवर स्वप्नाळूपणे झुकला होता.

## ११

दुसऱ्या दिवशी गागीनांकडे जायला मी निघालो तेव्हा मी आस्याच्या प्रेमात पडलो होतो का, असा प्रश्न स्वतःला विचारला नाही. पण तिच्याविषयी मी विचार मात्र खूप केला. तिच्या भवितव्याबाबत मला अतीव उत्सुकता होती. अखेर आम्ही एकमेकांच्या अधिक जवळ ओढले गेलो याचा मला आनंद झाला होता. फक्त आदल्या दिवसापासूनच मी तिला ओळखू लागलो होतो असे मला भासले. तोपर्यंत तिने नेहमी माझ्याकडे पाठ फिरविली होती. आणि आता जेव्हा ती माझ्यापुढे खुली झाली होती तेव्हा तिच्याविषयीच्या माझ्या प्रतिमेमधून केवढा मंत्रमुग्ध करणारा प्रकाश पाजळत होता! ही प्रतिमा मला किती नवी होती! तिच्या गहिराईमध्ये किती गुप्त लाजरा गोडवा भरलेला होता!

परिचित वाटेवरून झपझप पावले टाकीत, दृष्टीक्षेपात आल्यापासून त्या छोट्या घरावर माझी नजर खिळवून मी चालत होतो. दूरवरून ते घर पांढऱ्या ठिपक्याप्रमाणे भासत होते. भविष्याचा विचार करणे तर सोडाच, पण उद्याचाही विचार मी करीत नव्हतो. मी पूर्ण तृप्त होतो.

मी खोलीत शिरताच आस्या लाजली. पुन्हा तिने रुबाबदार पोषाख केल्याचे माझ्या ध्यानात आले, पण तिच्या पोषाखाला तिच्या मुद्रेवरील खिन्न भाव मात्र शोभत नव्हता. आणि मी तर भलत्याच उत्साहात आलो होतो! मला असेही वाटले की, नेहमीप्रमाणे आत्ताही ती पळून जायच्या बेतात होती, पण मोठ्या प्रयत्नांती संयम करून तेथेच थांबली होती. गागीनला त्या दिवशी कलेच्या धुंदीचा जोरदार झटका आला होता. हौशी लोकांना असे झटके अधूनमधून येत असतात आणि "निसर्गातील ओझरता क्षण पकडला" अशी त्यावेळी त्यांची धारणा झालेली असते. आपल्या चित्राच्या कॅन्व्हाससमोर तो विस्कटलेल्या आणि डागाळल्या अवस्थेत उभा होता. रंगाच्या कुंचल्याचा एक जोरदार फटका चित्रावर मारीतच त्याने मान हलवून माझ्या येण्याची दखल घेतली. किंचित मागे सरून, डोळे किलकिले करून त्याने पाहिले व परत तो कलाराधनेत मग्न झाला. त्याच्या कामात अडथळा आणण्याचे मी टाळले आणि आस्यापाशी बसलो. तिचे काळे नेत्र सावकाशपणे माझ्याकडे वळले.

"तुम्ही कालच्यासारख्या आज नाही," तिच्या ओठांवर स्मित उमटविण्याचे व्यर्थ प्रयत्न केल्यानंतर मी म्हणालो.



"नाही, कालच्यासारखी नाही," सावकाशपणे ती उत्तरली. "तरीही काही बिघडत नाही. मला झोप नीट लागली नाही, सर्व रात्रभर मी नुसती पडून राहिले... विचार करीत!"

"कसला?"

"खूप गोष्टींचा. लहानपणापासूनची माझी सवय आहे ती, माझ्या आईबरोबर रहात होते तेव्हापासूनची..."

शेवटचे शब्द तिने कष्टाने उच्चारले आणि पुन्हा एकदा मुद्दाम म्हणाली:

"माझ्या आईबरोबर रहात होते तेव्हापासूनची... पुढं काय होणार हे कुणालाही का ठाऊक नसतं याचं मला नवल वाटायचं. एखादी आपत्ती येत असताना काहीवेळा समजूनही तिला टाळू का शकत नाही, याचं मला आश्चर्य वाटायचं. आणि संपूर्ण सत्य कधीही का सांगता येत नाही याचंही आश्चर्य वाटायचं... मग मी स्वतःशी ठरवलं की, मला काहीही माहीत नाही, मला शिकलं पाहिजे. मला फार चुकीच्या पद्धतीनं लहानाचं मोठं करण्यात आलं. मला परत एकदा पूर्ण शिकवलं पाहिजे. मला पियानो वाजवता येत नाही, चित्रं काढता येत नाहीत, शिवणकामही धड येत नाही. माझ्या अंगी काहीही कलागुण नाहीत. माझी संगत अगदी कंटाळवाणी वाटत असणार."

"तुम्ही स्वतःवर अन्याय करता आहात," मी तिला सांगितले. "तुम्ही खूप वाचन केलंय, उत्तम शिक्षण घेतलंय आणि तुमची बुद्धी..."

"मी हुशार आहे असं वाटतं तुम्हाला?" तिने एवढ्या भाबड्या कुतूहलाने विचारले की, मला हसू आवरले नाही. पण तिने स्मितसुद्धा केले नाही. "भाऊ, मी हुशार आहे?" गागीनला उद्देशून तिने विचारले.

त्याने काहीच उत्तर दिलं नाही. आपले कुंचले सतत बदलीत आणि हात हवेत उंच उडवीत तो काम करीत राहिला.

"माझ्या डोक्यात काय आहे हे काहीवेळा माझं मलाच समजत नाही," तशाच विषण्णपणे पहात आस्या पुढे म्हणाली. "काहीवेळा माझी मलाच भीती वाटते... खरंच! माझी इच्छा होती... बायकांनी खूप वाचू नये हे खरं का?"

"अर्थात खूप वाचू नये, पण..."

"मी काय वाचावं ते मला सांगा. मी काय करावं ते सांगा. तुम्ही सांगाल ते सारं मी करीन," भाबड्या विश्वासाने माझ्याकडे वळत ती पुढे म्हणाली.

तिला काय उत्तर द्यावे हे मला चटकन सुचेना.

"माझ्याबरोबर तुम्ही कंटाळणार नाही?"

"अर्थात नाही..." मी बोलू लागलो.

"धन्यवाद!" ती मोठ्यांदा उद्गारली. "तुम्ही माझ्या संगतीत कंटाळाल अशी मला भीती वाटली होती."

आणि तिच्या छोट्या, गरम हाताने माझा हात घट्ट दाबला.

"न.!" त्याच क्षणाला गागीनने हाक मारली. "पार्श्वभूमी फार गडद वाटत नाही का?"

मी त्याच्यापाशी गेलो. आस्या उठली आणि खोलीबाहेर गेली.

१२

एक तासानंतर ती परतली आणि दारातच उभे राहून तिने खुणेने मला स्वत:जवळ बोलाविले.

"मला सांगा," ती म्हणाली, "मी मेले, तर तुम्हाला वाईट वाटेल?"

"आज काय विचित्र विचार तुमच्या डोक्यात येत आहेत?"

"मी लौकरच मरणार असे विचार माझ्या मनात येत राहतात. काहीवेळा असं भासतं की, प्रत्येकजण मला निरोप देतोय. असं जगण्यापेक्षा मरणं चांगलं... अशा रीतीनं माझ्याकडं बघायची गरज नाही तुम्हाला... मी बहाणा करत नाही, खरंच नाही! नाही तर परत मी तुम्हाला भ्यायला लागेन!"

"तुम्ही खरंच मला भीत होतात?"

"मी अशी विचित्र आहे हा माझा दोष नाही," ती पुढे म्हणाली. "पाहिलंत, आता मला हसतासुद्धा येत नाही..."

सबंध दिवसभर ती कष्टी आणि विचारांमध्ये गढलेली राहिली. मला अनाकलनीय असे काहीतरी तिच्या मनात चालले होते. तिची नजर वारंवार माझ्यावर स्थिरावत होती. ह्या गूढ नजरेखाली माझे काळीज किंचित संकोचल्यासारखे भासत होते. जरी ती पूर्णतया शांत दिसत होती, तरी तिने अस्वस्थ होऊ नये असे तिला सांगण्याची मला सतत ऊर्मी येत होती. तिला पहात असताना, आता खूप फिकट बनलेल्या तिच्या चेहऱ्यामध्ये, तिच्या अनिश्चित, मंद हालचालींमध्ये मला एक करुण गोडवा आढळला. आणि तिचा काही ना काही कारणाने समज झाला की, माझी मन:स्थिती ताळ्यावर नव्हती.



"तुम्हाला ठाऊक आहे?" मी तेथून निरोप घेऊन जाण्याआधी थोडा वेळ असताना ती म्हणाली. "मी चंचल स्वभावाची आहे असा तुमचा समज झाल्यामुळं मला खूप बेचैन वाटतंय... मला वचन द्या, मी सांगेन त्या प्रत्येक गोष्टीवर नेहमी विश्वास ठेवाल म्हणून! आणि तुम्हीही माझ्याशी प्रांजळ राहिलं पाहिजे. आणि मी नेहमी खरं तेच सांगीन, अगदी शप्पत..."

तिच्या "शप्पत"मुळे मला परत हसू फुटले.

"हसू नका!" अधीरपणे ती म्हणाली. "नाही तर काल तुम्ही मला विचारलात तो प्रश्न आज मी तुम्हाला विचारीन: 'तुम्ही हसताय कशाला?'" थोडा वेळ थांबून ती पुढे म्हणाली: "काल तुम्ही पंखांबद्दल काय म्हणालात ते आठवतं? मला पंख फुटलेत, पण उडायला जागाच नाही कुठं..."

"कमाल झाली!" मी म्हणालो. "सारं जग तुम्हाला मोकळं आहे..."

आस्याने माझ्या डोळ्यांना सरळ आपली नजर भिडविली.

"आज तुम्ही माझ्यावर नाराज आहात," कपाळाला आठ्या घालीत ती म्हणाली.

"मी? तुमच्यावर नाराज?"

"तुम्ही दोघं घुम्म काय बसला आहात?" मला उद्देशून गागीन मध्येच म्हणाला. "कालच्याप्रमाणं परत तुमच्यासाठी वॉल्तझ वाजवू का?"

"नको! नको!" मुठी वळवून आस्या ओरडली. "आज तर मुळीच नको!"

"कुणीही तुझ्यावर जबरी करत नाही... शांत रहा..."

"मुळीच नको!" ती परत उद्गारली आणि तिचा चेहरा पांढराफटक पडला.

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

"माझ्यावर तिचं प्रेम तर जडलं नाही ना?" ऱ्हाईनच्या वेगवान प्रवाहापाशी येत असताना माझ्या मनात विचार आला.

१३

"माझ्यावर तिचं प्रेम तर जडलं नाही ना?" दुसऱ्या दिवशी सकाळी मी जागा झालो त्या क्षणी स्वत:ला प्रश्न केला. माझ्या स्वत:च्या काळजात डोकावून पाहण्याची मला इच्छा नव्हती. मला जाणवले की, तिची प्रतिमा,

"कृत्रिम हसणाऱ्या मुलीची" प्रतिमा, माझ्या काळजावर कोरली गेली होती आणि तिच्यापासून सुटका करून घेणे सोपे नव्हते. मी ल. मध्ये गेलो आणि सारा दिवस तेथेच राहिलो. पण आस्याला मात्र फक्त क्षणभर पाहिले. तिची प्रकृती बरी नव्हती. तिचे डोके दुखत होते. कपाळावर पट्टी बांधून म्लान चेहऱ्याने ती क्षणभर खालच्या मजल्यावर आली. ती कृश दिसत होती आणि तिचे डोळे जवळ जवळ मिटलेले होते. फिकट स्मित करून ती म्हणाली : "जाईल हे! विशेष काही नाही. सारं काही जातं, होय की नाही?" आणि खोलीमधून निघून गेली. मी उदास बनलो. एक प्रकारचा पोकळ विषाद मनात भरला. पण तेथून माझा पाय काही निघेना. परत तिला न भेटता मी शेवटी घरी निघालो तेव्हा खूप उशीर झाला होता.

दुसरी सकाळ काहीशी तंद्रीतच गेली. काही काम हाती घेण्याचा मी प्रयत्न केला, पण जमेना. काहीही न करण्याचा आणि कसलाही विचार न करण्याचा मी प्रयत्न केला... पण तेही जमेना. गावभर भटकलो, परत घरी गेलो आणि पुन्हा बाहेर पडलो.

"तुम्हीच का श्रीयुत न.?" एक बालिश आवाज अचानक ऐकू आला. मी भोवती पाहिले. एक छोटा मुलगा माझ्यासमोर उभा होता. "फ्रॉलीन ॲन्नेटनी ही दिलीय," त्या मुलाने माझ्या हाती एक चिठ्ठी देत म्हटले.

चिठ्ठी उघडताच आस्याचे वेडेवाकडे व घाईघाईत खरडलेले हस्ताक्षर मी ओळखले. तिने लिहिले होते : "मी तुम्हाला भेटलंच पाहिजे. आज चार वाजता, पडक्या किल्ल्यापाशी, रस्त्यावर दगडी देवळापाशी या. आज मी बेसावधपणानं भलतंच काही करून बसलेय... कृपा करून जरूर या, तुम्हाला सारं समजेल... निरोप्याला सांगा : 'हो.'"

"काही उत्तर आहे?" मुलाने विचारले.

"सांग... 'हो'," मी त्याला म्हणालो. मुलगा धूम पळत गेला.

१४

माझ्या खोलीत परत जाऊन मी विचारांमध्ये गढलो. माझ्या काळजाचे ठोके जोरजोरात पडत होते. आस्याची चिठ्ठी मी परत परत वाचली. मी घड्याळावर नजर टाकली... अजून बारासुद्धा वाजले नव्हते.

दार उघडून गागीन आत आला.



त्याचा चेहरा काळवंडला होता. त्याने माझा हात पकडला आणि गच्च आवळला. तो खूपच बेचैन भासत होता.

"काय झालं?" मी विचारले.

त्याने खुर्ची ओढून घेतली आणि तो माझ्यासमोर बसला. त्याने चेहऱ्यावर खोटे हसू आणले आणि काहीसा चाचरत तो बोलू लागला : "चार दिवसांपूर्वी... मी सांगितलेल्या कहाणीनं तुम्ही चकित झाला होतात. आज मी तुम्हाला आणखी चकित करणार आहे. तुमच्या जागी दुसरा कुणी असता तर एवढं मोकळं बोलण्याचं माझं धाडसच झालं नसतं... पण तुम्ही सज्जन आहात, माझे मित्र आहात, होय ना? तर मग ऐका... आस्या, माझी बहीण, तुमच्या प्रेमात पडलीय!"

मी जोरात दचकलो आणि माझ्या खुर्चीतून अर्धवट वर उठलो...

"तुमची बहीण, तुम्ही म्हणता..."

"होय, होय," त्याने मला अडवीत म्हटले. "मी सांगतो, ती वेडी आहे आणि ती मलाही वेडा बनवणार. पण सुदैवानं तिला खोटेपणा जमत नाही... तिचा माझ्यावर विश्वास आहे. काय त्या पोरीचं काळीज आहे! पण ती स्वतःचा नाश करून घेणार, मला खात्री आहे..."

"तुमचा गैरसमज झाला असेल," मी म्हणालो.

"मुळीच नाही. तुम्हाला माहीतच आहे की, काल दिवसभर ती अंथरुणात पडून होती. काही खाल्ली-प्यायली नाही, पण कसली तक्रारही केली नाही तिनं... ती कधीच तक्रार करत नाही. संध्याकाळच्या सुमाराला तिला थोडासा ताप चढल्यासारखं वाटलं, तरीही मी फारशी काळजी केली नाही. रात्री दोन वाजता आमच्या घरमालकिणीनं मला जागं केलं आणि म्हणाली, 'तुमच्या बहिणीपाशी चला, तिला खूप बरं नाही.' घाईघाईनं मी आस्यापाशी गेलो. तिनं झोपायचे कपडे बदललेले नव्हते, तिला ताप चढला होता आणि तिच्या डोळ्यात पाणी भरलं होतं, असं मला आढळलं. तिचं कपाळ तापलं होतं, तिचे दात कडाकडा वाजत होते. 'काय झालं?' मी विचारलं. 'तू आजारी आहेस का?' तिनं माझ्या गळ्याभोवती मिठी घातली आणि माझी विनवणी करू लागली की, ती जर मरायला नको असं मला वाटत असेल तर ताबडतोब तेथून तिला दूर घेऊन जावं... मला काहीच समजेना. मी तिला शांत करायचा प्रयत्न केला... तिचे हुंदके आणखीच वाढले... आणि अचानक त्या हुंदक्यांमधून, मी... थोडक्यात म्हणजे, ती तुमच्या प्रेमात पडल्याचं तिनं मला सांगितलं. मी खात्रीपूर्वक

सांगतो, तिच्या भावनांची खोली आणि ह्या तिच्या भावना किती उग्र रूपं धारण करतात ह्याची खरी कल्पना तुमच्या-माझ्यासराख्या समतोल विचारांच्या माणसांना येत नाही. एखाद्या वादळी तुफानाप्रमाणं त्या भावना अचानकपणं आणि अनावरपणं तिचा कबजा करतात. अर्थात तुम्ही खूप आकर्षक आहात हे मला दिसतंय," गागीन पुढे बोलत राहिला, "पण मी कबूल करतो की, अशा प्रकारं तिनं तुमच्या प्रेमात का पडावं, हे माझ्या अकलेच्या पलिकडचं आहे. प्रथमदर्शनीच ती तुमच्या प्रेमात पडली, असं ती म्हणते. म्हणून त्या दिवशी रडरडून ती मला पटवून देत होती की, माझ्याशिवाय इतर कुणावरही प्रेम करायची तिची इच्छा नाही. तुम्ही तिचा तिटकारा करता, कदाचित तुम्हाला तिची सारा इतिहास ठाऊक आहे, असं तिच्या मनानं घेतलंय. मी तिची कहाणी तुम्हाला सांगितली का, असंही तिनं मला विचारलं. अर्थात मी तिला नाही असं उत्तर दिलं. पण तिचं अंतर्ज्ञान काहीसं भयानक आहे. तिला एकच हवंय... दूर जायचं... ह्या क्षणाला दूर निघून जायचं. मी सकाळपर्यंत तिच्यापाशी बसून राहिलो. उद्यापर्यंत आम्ही गेलेलो असू, अशी तिनं माझ्याकडून शपथ घेववली, तेव्हा कुठं ती झोपली. मी खूप खूप विचार केला आणि तुमच्याशी बोलायचं ठरवलं. मला वाटतं, आस्याचं योग्य आहे. आम्हा दोघांच्याही दृष्टीनं इथून निघून जाणं सर्वोत्तम ठरेल. माझ्या डोक्यात एक कल्पना आल्यामुळं मी थांबलो, नाहीतर आज मी तिला घेऊनच गेलो असतो. कदाचित... कुणास ठाऊक... माझी बहीण आवडते का तुम्हाला? तसं असेल तर कशाला तिला दूर नेऊ? म्हणून मी ठरवलं, सारी लाजलज्जा बाजूला ठेवून... शिवाय, माझ्याही काही ध्यानात आलंय... मी ठरवलं... तुम्हाला विचारायचं..." बिचारा गागीन गोंधळून बोलायचा थांबला. "क्षमा करा," तो म्हणाला. "एवढ्या पेचात मी कधी सापडलो नव्हतो."

मी त्याचा हात माझ्या हाती घेतला.

"तुम्हाला जाणून घ्यायचंय ना," मी खंबीर आवाजात म्हणालो, "तुमची बहीण मला आवडते अथवा नाही? मला ती आवडते..."

गागीनने माझ्याकडे कटाक्ष टाकला. "पण..." चाचरत तो म्हणाला, "तुम्हाला तिच्याशी लग्न करायचं नाही, नाही ना?"

"अशा प्रश्नाला मी उत्तर द्यावं अशी कशी अपेक्षा धरता? स्वतःलाच विचारा जर मी आत्ता..."

"माहीत आहे, माहीत आहे!" त्याने मला अडवले. "उत्तराची



मागणी करण्याचा मला हक्क नाही आणि माझा प्रश्न म्हणजे रांगडेपणाचा कळस होता... पण मी काय करू? आगीशी थट्टा करायची नसते. तुम्हाला आस्या ठाऊक नाही... आजारी पडणं, दूर पळून जाणं, तुमच्याशी सांकेतिक भेट ठरवणं, असल्या सगळ्या गोष्टी करायला ती समर्थ आहे... दुसरी एखादी मुलगी सारं लपवून वाट पाहील... पण हिचं तसं नाही. असं पहिल्यांदाच घडतंय तिच्या बाबतीत आणि तीच अडचण आहे. माझ्या पायांशी बसून ती हुंदके देत होती तेव्हा आज तुम्ही तिला पाहिलं असतंत, म्हणजे माझ्या धास्त्या तुम्हाला समजल्या असत्या."

मी विचार केला. "तुमच्याशी सांकेतिक भेट" हे गागीनचे शब्द माझ्या काळजात खुपसल्यासारखे वाटले. त्याच्या मोकळेपणाला तेवढ्याच मोकळे-पणाने उत्तर न देणे अयोग्य दिसले असते.

"होय," शेवटी मी म्हणालो. "तुमचं बरोबर आहे. एक तासापूर्वी तुमच्या बहिणीकडून मला पत्र मिळालं. हे पहा."

गागीनने चिठ्ठी खेचून घेतली, भराभरा तिच्यावरून नजर फिरविली आणि त्याचे हात त्याच्या गुडघ्यांवर लुळे पडले. त्याच्या चेहऱ्यावरील चकित भाव कमालीचा विनोदी होता, पण मी हसण्याच्या मनःस्थितीत नव्हतो.

"तुम्ही सज्जन गृहस्थ आहात असं मी म्हणालो होतो आणि तसं मी पुन्हा म्हणतो," तो मला म्हणाला. "पण आता काय करायचं? काय? तिला निघून जायचंय आणि स्वतःच्या अविचाराबद्दल पश्चात्ताप करीत ती तुम्हाला लिहितेय... पण तिला लिहायला वेळ केव्हा सापडला? तुमच्यापासून तिला काय हवंय?"

मी त्याला शांत केले आणि काय करता येईल यावर आम्ही जास्तीत जास्त थंडपणे चर्चा सुरू केली.

आणि सरतेशेवटी आम्ही ह्या निर्णयाला आलो: अनर्थ टाळण्यासाठी मी संकेतस्थळी जायचे आणि आस्याबरोबर मोकळेपणाने बोलायचे. गागीनने घरी बसण्याचे व तिच्या पत्राबद्दल आपल्याला काही माहीत नाही असा बहाणा करण्याचे मान्य केले. आणि संध्याकाळी आम्ही परत भेटायचे ठरविले.

"मी तुमच्यावर विसंबून आहे," माझा हात दाबून गागीन म्हणाला. "तिच्याशी दयेनं वागा आणि... माझ्यावरही दया करा. कोणत्याही परिस्थितीत आम्ही उद्या जाऊ," उठून उभे रहात तो पुढे म्हणाला, "कारण तुम्ही काही आस्याशी लग्न करणार नाही."

"मला संध्याकाळपर्यंत अवसर द्या," मी म्हणालो.

"ठीक आहे... पण तुम्ही तिच्याशी लग्न करणार नाही."

तो निघून गेला आणि मी दिवाणावर अंग झोकून डोळे मिटले. माझे डोके गरगरत होते. त्यावर लादलेल्या अनेक नव्या विचारांमुळे माझा मेंदू गरगरत होता. गागीनच्या मोकळेपणाची मला चीड आली होती. आस्याचीही मला चीड आली होती. तिच्या प्रेमामुळे मला कृतज्ञता वाटत होती आणि त्याच वेळी अवघडल्यासारखेही झाले होते. तिने आपल्या भावाला सर्व काही का सांगून टाकले ते मला समजत नव्हते. त्वरित, जवळजवळ तात्काळ निर्णय घेण्याची आवश्यकता पीडादायी होती...

"तिच्यासारखा स्वभाव असलेल्या सतरा वर्षांच्या मुलीशी लग्न करायचं?" दिवाणावरून उठत मी म्हणालो. "कसं शक्य आहे मला?"

## १५

ठरल्या वेळी ऱ्हाईन नदी ओलांडून मी गेलो आणि समोरच्या किनाऱ्यावर पहिली व्यक्ती मला भेटली ती म्हणजे सकाळी माझ्याकडे आला होता तोच मुलगा. माझी तो वाटच पहात असावा असे दिसले.

"फ्रॉलीन ॲन्नेटकडून," तो पुटपुटला आणि त्याने माझ्या हाती आणखी एक चिठ्ठी ठेवली.

आमच्या सांकेतिक भेटीची जागा बदलल्याचे आस्याने मला कळविले होते. दीड तासानंतर प्रार्थना मंदिरापाशी न जाता फ्राऊ लुईझाच्या घरी मला जायला सांगितले होते व तेथे रस्त्यावरील दार ठोकून तिसऱ्या मजल्यावर जायचे होते.

"परत... 'हो'?" मुलाने मला विचारले.

"हो," मी पुनरुच्चार केला आणि ऱ्हाईनच्या किनाऱ्यावर गेलो. घरी जाण्याएवढा पुरेसा वेळ नव्हता आणि रस्त्यांवर भटकायची माझी इच्छा नव्हती. गावाच्या वेशीपलिकडे एक छोटी बाग होती. त्या बागेत चेंडू फेकून दांडकी उडविण्याचा खेळ खेळण्याची सोय होती व बीयरची टेबले मांडलेली होती. मी तेथे गेलो. काही मध्यमवयीन जर्मन दांडकी उडविण्याचा खेळ खेळत होते. लाकडी चेंडू गडगडत जाताना मोठ्यांदा आवाज करीत होते आणि अधूनमधून कौतुकाच्या आरोळ्या ऐकू येत होत्या. रडून रडून डोळे लाल झालेल्या एका सुंदर सेविकेने बीयरचा प्याला मला आणून दिला.



मी तिच्या चेहऱ्याकडे पाहिले. ती पटकन वळली आणि तेथून निघून गेली.

"होय, होय," माझ्याशेजारी बसलेला एक धिप्पाड, लाल गालांचा नगरवासी म्हणाला. "आमची हान्खेन आज फार दुःखात आहे... तिचा प्रियकर सैनिक म्हणून गेला."

मी तिच्याकडे पाहिले. ती कोपऱ्याआड दडून उभी होती. हाताच्या एका मुठीवर तिने आपला गाल टेकविला होता. तिच्या बोटांमधून एक एक अश्रू ठिपकत होता. कुणीतरी बीयरसाठी तिला हाक मारली. तिने प्याला आणून दिला आणि सरळ आपल्या जागी ती परतली. तिच्या दुःखाचा माझ्यावर परिणाम घडला. माझ्या आगामी भेटीविषयी मी विचार करू लागलो. पण माझे विचार गंभीर आणि चिंतेचे होते. जड अंतःकरणाने ह्या भेटीची मी वाट पहात होतो. परस्पर प्रेमाचा आनंद लुटायला मी जात नव्हतो, तर माझा दिलेला शब्द पाळण्यासाठी, कठीण कर्तव्य पार पाडण्यासाठी जात होतो. "तिच्याशी थट्टा करायची नाही," गागीनचे शब्द माझ्या काळजात बाणाच्या टोकासारखे घुसले होते. अवघ्या चारच दिवसांपूर्वी, पाण्याच्या प्रवाहावर होडीमधून तरंगत जाताना, सुखाच्या इच्छेने मी आसुसलो नव्हतो का? आता ते सुख मिळणे शक्य होते आणि मी घुटमळत होतो, त्याला माझ्यापासून दूर लोटत होतो. त्या सुखाला माझ्यापासून दूर लोटणे मला भाग पडत होते... त्याच्या अचानकतेने मला गोंधळात टाकले होते. आणि खुद्द आस्याने, ह्या आकर्षक पण विचित्र मुलीने, भडक डोक्याच्या, असा भूतकाळ असलेल्या, अशा रीतीने लहानाची मोठी झालेल्या ह्या मुलीने, मला घाबरवून टाकले होते हे मी कबूल करतो. माझ्या मनात परस्परविरोधी भावनांचा दीर्घ काळ संघर्ष घडला. नियोजित घटका समीप येत होती. "तिच्याशी लग्न करणं मला शक्य नाही," शेवटी मी निर्णय घेतला. "मीसुद्धा तिच्यावर प्रेम करतो हे तिला कळणार नाही."

मी उठलो आणि गरीब बापड्या हान्खेनच्या हातावर थेलर टेकवून (तिने माझे आभारसुद्धा मानले नाही) फ्राऊ लुईझाच्या घराचा रस्ता धरला. संध्याछाया एव्हाना पसरू लागल्या होत्या. मावळतीच्या परावर्तित लालीमध्ये, काळसर रस्त्यावरील आकाशाचा अरुंद पट्टा शेंदरी दिसत होता. मी दारावर हळूच ठोकले. दार तात्काळ उघडले गेले. उंबरठा ओलांडून गेलो आणि भोवती दाट काळोख आढळला.

"इकडून या," एका म्हाताऱ्या बाईचा आवाज आला. "तुमची वाट पाहताहेत."

आवाजाच्या दिशेने मी एक-दोन पावले टाकली आणि एका कृश हाताने माझा हात पकडला.

"आपण फ्राऊ लुईझा का?" मी विचारले.

"होय," तोच आवाज परत उत्तरला. "होय, माझ्या सुरेख तरुण माणसा!" त्या वृद्ध स्त्रीने एका उंच जिन्यावरून मला नेले व तिसऱ्या मजल्यावर ती थांबली. छोट्या खिडकीमधून झिरपत येणाऱ्या उजेडात नगराध्यक्षांच्या विधवेचा सुरकुतलेला चेहरा मला दिसत होता. सुकलेल्या ओठांवर मधाळ स्मित पसरवून आणि अंधुक डोळे आकुंचित करून तिने एका छोट्या दाराकडे निर्देश केला. कापऱ्या हाताने मी ते दार उघडले आणि माझ्यापाठी धाडदिशी बंद केले.

१६

आत्ता मी ज्या छोट्या खोलीत उभा होतो ती काहीशी अंधारी होती आणि आस्या चटकन मला दिसली नाही. खिडकीजवळच्या खुर्चीवर ती बसली होती. तिने मान फिरविली होती, एका प्रचंड शालीमध्ये स्वतःला गुरफटून घेतले होते व एखाद्या घाबरलेल्या पक्ष्यासारखी ती दिसत होती. तिचा श्वास जोरात चालला होता आणि तिचे सर्वांग थरथर कापत होते. मला तिच्याविषयी अतीव अनुकंपा वाटली. मी तिच्याजवळ गेलो. तिने आपली मान अधिकच बाजूला फिरविली.

"आन्ना निकोलायेवना," मी म्हणालो.

ती सरळ बसली व माझ्याकडे पाहण्याचा तिने प्रयत्न केला, पण तिला जमले नाही. मी तिचा हात धरला. तो खूप थंड होता व माझ्या पंजात निर्जीव राहिला.

"माझी इच्छा होती," तिने बोलायला आरंभ केला आणि स्मित करण्याचा यत्न केला, पण तिच्या फिकट ओठांनी तिची आज्ञा मानली नाही. "माझी इच्छा होती... नाही, मला शक्य नाही!" ती उद्‌गारली आणि पुढे काहीही बोलली नाही. आणि खरेच तिच्या दर शब्दागणिक आवाज पडत गेला.

मी तिच्याशेजारी बसलो.

"आन्ना निकोलायेवना," मी परत म्हणालो व मलाही पुढे काही बोलता येईना.

शांतता भरून राहिली. तिचा हात धरून मी तिच्याकडे पहात राहिलो. शालीमध्ये ती गुरफटली होती, मोठ्या कष्टाने श्वासोच्छ्वास करीत होती



आणि रडू येऊ नये म्हणून, उमडणाऱ्या अश्रूंना आवर घालता यावा म्हणून, आपला खालचा ओठ तिने गच्च आवळून धरला होता. मी तिच्याकडे पाहिले... तिची भित्री स्तब्धता करुणाजनक हतबल होती. जणू थकव्यापायी ती जेमतेम त्या खुर्चीपर्यंत जाऊन तिच्यात कोसळली होती. माझे काळीज विरघळले.

"आस्या," मी अगदी पुसट हाक मारली...

तिचे डोळे सावकाशपणे माझ्या चेहऱ्यावर वळले... स्त्री प्रेमात असते तेव्हाचा तिचा कटाक्ष! त्याचे वर्णन कोण करणार? ते डोळे विनवीत होते, विसंबीत होते, प्रश्न टाकीत होते, सर्वस्व अर्पण करीत होते... त्यांच्या मोहकतेपुढे माझा टिकाव लागेना. माझ्या नसांमधून सुयांसारख्या बारीक ज्वाला पेटल्या. मी खाली वाकलो आणि माझे ओठ तिच्या हातावर दाबले. एक कापरा चीत्कार माझ्या कानांवर आला आणि मला हलकासा स्पर्श जाणवला. माझ्या केसांवर पानासारखा थरथरणारा हात फिरला. मी मान वर करून तिचा चेहरा पाहिला. अचानक तो किती बदलून गेला होता! भीतीचा भाव त्यावरून नाहीसा झाला होता, तिची नजर खूप खोल माघारी गेली होती आणि ती मला स्वतःमागे खेचून नेत होती. तिचे ओठ किंचित विलग झाले होते, कपाळ संगमरवरासारखे फिकटले होते आणि जणू वाऱ्याने उडविल्याप्रमाणे कुरळ्या बटा मागे पडल्या होत्या. माझे भान हरपले. तिला मी माझ्याजवळ ओढले. तिचा हात आज्ञाधारकपणे पुढे आला आणि तिच्या सर्व देहाने हाताचे अनुकरण केले. तिच्या खांद्यांवरून शाल खाली ओघळली आणि तिचे डोके शांतपणे माझ्या छातीवर, माझ्या पेटल्या ओठांखाली टेकले...

"तुमची," अगदी अस्फुटपणे ती म्हणाली.

माझे हात तिच्या कंबरेवर खाली सरकले... पण अचानक विद्युल्लते-प्रमाणे गागीनची आठवण माझ्या मनात चमकून गेली. "आपण काय करतोय?" मी ओरडलो आणि दचकून मागे सरकलो. "तुमच्या भावाला... त्याला ठाऊक आहे सगळं! मी तुम्हाला भेटतोय हे त्याला माहीत आहे..."

आस्या परत खुर्चीत कोसळली.

"होय," मी पुढे म्हणालो आणि उठून खोलीच्या दूर कोपऱ्यात गेलो. "तुमच्या भावाला सगळं माहीत आहे... त्याला सगळं सांगणं मला भाग पडलं..."

"भाग पडलं?" तिने अस्पष्टपणे पुनरुच्चार केला. अजून ती भानावर

15-Aug-13 / 18:28:50

आली नव्हती आणि जे काही मी बोलत होतो त्याचे तिला आकलन होत नव्हते.

"होय," गूढ आवेशाने मी म्हणालो. "आणि हे सारं तुमच्या चुकीपायी! तुम्ही स्वतःच तुमचं गुपित उघडं का केलंत? तुमच्या भावाला कशाला सगळं सांगितलंत? आज तो स्वतः माझ्याकडं आला आणि तुम्ही त्याला जे सांगितलंत ते सारं त्यानं मला सांगितलं" आस्याकडे बघण्याचे मी टाळू लागलो व खोलीत येरझाऱ्या घालू लागलो. "सगळं काही बिघडून गेलंय आता, सगळं!"

आस्याने खुर्चीतून उठण्याची हालचाल केली.

"खाली बसा," मी ओरडलो. "कृपा करून खाली बसा. तुम्ही एका सज्जन माणसाबरोबर व्यवहार करता आहात... हो हो, एका सज्जनाबरोबर. मला सांगा, एवढ्या कशानं तुम्ही बेचैन बनलात? माझ्यात तुम्हाला काही बदल आढळला? आज तुमचा भाऊ मला भेटायला आला तेव्हा त्याच्यापासून सत्य लपवून ठेवणं मला अशक्य ठरलं."

"काय बोलतोय मी?" मी स्वतःला प्रश्न केला आणि मनात विचार आला की, मी दुष्ट फसव्या होतो, गागीनला आमच्या भेटीविषयी माहीत होते, सर्व काही विपरीत घडले होते, उघडकीला आले होते... माझा मेंदू गरगरू लागला.

"मी माझ्या भावाला पाठवलं नव्हतं," आस्याचा भेदरलेला अस्फुट उद्‌गार आला. "तो स्वतःहून आला."

"पाहिलंत तुम्ही काय केलंत!" मी पुढे बोलत राहिलो. "आता तुम्हाला दूर निघून जायचंय..."

"होय, मला गेलंच पाहिजे," पूर्वीप्रमाणेच हळू आवाजात ती म्हणाली. "म्हणूनच तुम्हाला मी इथं बोलावलं. तुमचा मला निरोप घ्यायचाय."

"आणि तुमचा वियोग सहन करणं मला सोपं आहे असं वाटतं तुम्हाला?" मी विचारले.

"पण माझ्या भावाला तुम्ही का सांगितलंत?" गोंधळलेल्या स्वरात आस्याने विचारले.

"दुसरं काही करणं मला शक्यच नव्हतं. जर तुम्ही स्वतःहून त्याला सांगितलं नसतं..."

"मी स्वतःला माझ्या खोलीत कोंडून घेतलं होतं," ती साधेपणाने म्हणाली. "घरमालकिणीजवळ दुसरी किल्ली होती हे मला ठाऊक नव्हतं."



अशा क्षणाला अशी निष्पाप क्षमायाचना तिच्या ओठांवर उमटलेली पाहून मला संताप आला... आणि आता त्याची आठवण झाली म्हणजे गलबलून येते. बिचारी प्रामाणिक, कळकळीची पोर!

"आणि आता सारं काही संपलंय," मी परत बोलू लागलो. "सारं काही. आता आपल्याला अलग झालं पाहिजे." मी आस्याकडे एक भेदरट कटाक्ष टाकला. तिचा चेहरा अचानक लाल झाला. ती शरमली होती आणि घाबरली होती हे मला जाणवले. मी स्वतः तापात असल्याप्रमाणे हालचाली करीत होतो आणि बरळत होतो. "जी भावना आपोआप उलगडू लागली होती तिला तुम्ही परिपक्व होऊ दिलं नाही. आपल्यातले बंध तुम्ही स्वतःच तोडलेत, माझ्यावर तुम्ही विश्वासू शकला नाहीत, तुम्ही माझ्याविषयी शंका घेतलीत..."

मी बोलत होतो तेव्हा आस्या पुढे पुढे झुकत होती, शेवटी ती अचानक आपल्या गुडघ्यांवर कोसळली व हातांमध्ये तोंड लपवून हुंदके देऊ लागली. मी तिच्यापाशी धावलो आणि तिला वर उठविण्याचा प्रयत्न केला. पण तिने मला प्रतिकार केला. स्त्रीचे अश्रू मी पाहू शकत नाही. त्यामुळे माझा स्वतःवरचा ताबा पूर्णपणे सुटतो.

"आन्ना निकोलायेवना, आस्या," मी परत म्हणालो. "मी तुमची विनवणी करतो, पण कृपा करून रडू नका..." पुन्हा एकदा मी तिचा हात धरला...

पण मला चकित करून ती अचानक उभी झाली आणि विजेच्या वेगाने दाराकडे धावून अदृश्य झाली.

काही मिनिटांनंतर जेव्हा फ्राऊ लुईझा खोलीत आली तेव्हा अद्यापही मी खोलीच्या मध्यभागी वज्राघात झाल्याप्रमाणे स्तब्ध उभा होतो. ही भेट अशी चटकन, अशी वेडपटासारखी कशी संपली हेच मला उमजेना. मला जे म्हणायचे होते, जे मी सांगायला हवे होते त्यातला शतांश भागसुद्धा मी व्यक्त केला नव्हता, त्यातून काय निर्णय लागायचा होता हे अद्याप मलासुद्धा ठाऊक नव्हते...

"फ्रॉलीन गेली?" आपल्या पिवळट भुवया थेट कपाळाच्या टोकापर्यंत उंचावीत फ्राऊ लुईझाने विचारले.

मी तिच्याकडे भकासपणे पाहिले आणि बाहेर गेलो.

## १७

गावामधून चालत चालत शेवटी मी उघड्या माळावर आलो. तीव्र संतापाने माझे डोके भणाणले होते... स्वतःला मी अनेक दूषणे दिली. आमच्या भेटीची जागा आस्याला का बदलावी लागली होती, ह्या कारणाचा तर्क लावायला मी कसा चुकलो? त्या म्हाताऱ्या बाईकडे जाऊन सर्व खुलासा करायला तिला किती त्रास झाला असेल हे जाणायला कसा विसरलो? मला सोडून जायला मी तिला प्रतिबंध का केला नाही? त्या दूरच्या, जवळ जवळ अंधाऱ्या खोलीत, तिच्याबरोबर एकटा असताना मला तिची निर्भर्त्सना करण्याचे, तिच्यावर चिडण्याचे धैर्य सापडले... आणि आता तिची प्रतिमा माझा पाठलाग करीत होती, मी तिची क्षमायाचना करीत होतो. तो चिकट चेहरा, ते आर्द्र, भित्रे डोळे, तिच्या मानेवर निर्जीव पडलेले केस, तिच्या डोक्याचा माझ्या छातीला झालेला ओझरता स्पर्श... या सर्व आठवणी मला भाजून काढत होत्या. "तुमची..." मी तो अस्फुट उद्गार परत ऐकला... "मी सदसद्विवेकबुद्धीला धरून वागलो," मी स्वतःची खात्री पटविली... पण ते खरे नव्हते. ह्या अखेरीची मी इच्छा धरली होती? तिचा वियोग सहन करायला मी समर्थ होतो? तिला गमावणे मी सोसू शकणार होतो? "वेडेपणा! शुद्ध वेडेपणा!" मी कडवटपणे उद्गारलो...

दरम्यान रात्र पडू लागली होती. आस्या रहात होती त्या घराकडे मी चालू लागलो.

## १८

गागीन मला पाहून बाहेर आला.

"माझ्या बहिणीला तुम्ही भेटलात?" दुरूनच त्याने मला विचारले.

"ती घरात नाही?" मी विचारले.

"नाही."

"ती परत आली नाही?"

"नाही. माफ करा," गागीन पुढे म्हणाला, "पण मला राहवलं नाही आणि आपण ठरवलं होतं त्याविरुद्ध वागून मी प्रार्थनामंदिराकडं गेलो. ती तिथं नव्हती. मला वाटलं, ती आलीच नाही."

"ती प्रार्थनामंदिरात नव्हती."



"आणि तुम्ही तिला भेटला नाहीत?"

मी तिला भेटलो होतो हे सांगणे मला भाग पडले.

"कुठं?"

"फ्राऊ लुईझाच्या घरी. एक तासापूर्वी मी तिचा निरोप घेतला," मी पुढे सांगितले. "ती घरी गेली अशी मला खात्री वाटली."

"आपण वाट बघू."

आम्ही घरात जाऊन एकमेकांशेजारी बसलो. दोघांपैकी कुणीच बोलला नाही. आम्हा दोघांनाही कमालीचे अवघडल्यासारखे झाले होते. आम्ही सारखे दाराकडे कटाक्ष टाकीत होतो, कान टवकारून ऐकत होती.

शेवटी गागीन उठला.

"हे अशक्य!" तो उद्गारला. "काय करावं ते माझं मलाच समजत नाही. ती माझा मृत्यू घडवणार, खरंच सांगतो... चला, तिचा शोध घेऊ."

आम्ही बाहेर गेलो. आता चांगलाच काळोख झाला होता.

"कशाबद्दल चर्चा केलीत?" आपल्या भुवयांपर्यंत टोपी खाली खेचत गागीनने विचारले.

"मी तिच्याबरोबर फक्त पाच मिनिटं होतो," मी म्हणालो. "आपण जे ठरवलं होतं ते मी तिला सांगितलं."

"मी तुम्हाला सांगू," तो म्हणाला, "आपण आता वेगवेगळ्या रस्त्यांनी जाऊ या. त्यामुळं तिची लौकर भेट घडेल. कोणत्याही परिस्थितीत एक तासानं इथं परत या."

## १९

द्राक्षमळ्यापासून निघणाऱ्या उतारावरून धावत मी परत गावात शिरलो. सर्व रस्त्यांवरून मी वेगाने चक्कर मारली, सर्वत्र शोध घेतला. फ्राऊ लुईझाच्या खिडक्यांमध्येसुद्धा डोकावलो. ऱ्हाईनच्या तीरावर परतलो आणि किनाराभर धावलो... अधूनमधून स्त्रियांच्या आकृत्या माझ्या नजरेला पडायच्या पण आस्या मात्र कुठेच दिसत नव्हती. एव्हाना माझा संताप गेला होता. त्याच्या जागी सुप्त भीती छळू लागली होती... आणि केवळ भीतीच नव्हे, तर आता मला पश्चात्ताप वाटू लागला होता... खेदाची भावना जाळू लागली होती... प्रेम... होय, अत्यंत नाजुक प्रेमभावना माझ्या मनात जागी झाली होती! मी जोरजोरात हातवारे करीत होतो, रात्रीच्या

दाटणाऱ्या काळोखात मी तिला हाक मारली... प्रथम दबल्या आवाजात आणि नंतर मोठमोठ्यांदा... माझे तिच्यावर प्रेम आहे असे शंभरदा मी म्हणालो. पुन्हा तिच्यापासून कधीही अलग व्हायचे नाही अशी मी प्रतिज्ञा केली. तिचा थंड हात परत धरण्यासाठी, तिचा अस्पष्ट आवाज परत ऐकण्यासाठी, माझ्यासमोर तिला परत पाहण्यासाठी, जगातील वाट्टेल ती गोष्ट द्यायला मी तयार होतो... किती नजीक आली होती ती माझ्या! पूर्ण निर्धाराने, संपूर्ण निष्पाप अंतःकरणाने आणि मनस्वी भावनेने ती माझ्यापाशी आली होती! आपले अस्पर्श यौवन घेऊन ती माझ्यासाठी आली होती... आणि मी तिला माझ्या छातीशी कवटाळले नव्हते, आनंदाने आणि मूक उन्मादाने उजळलेल्या तिच्या गोड चेहऱ्याला पाहण्याचे भाग्य मी उधळून लावले होते... ह्या विचाराने मी अक्षरशः वेडापिसा बनलो.

"कुठे गेली असावी ती? तिने स्वतःचे काय करून घेतले असावे?" निर्बल निराशेने मी ओरडलो... नदीच्या अगदी काठावर अचानक काहीतरी पांढरे दिसले. मला ही जागा ठाऊक होती. सत्तर वर्षांपूर्वी पाण्यात बुडून मेलेल्या एका माणसाच्या थडग्यावर तेथे प्राचीन लिपी कोरलेला एक दगडी क्रूस जमिनीत अर्धवट पुरलेला होता. माझे काळीज एकदम थांबले... क्रूसापाशी मी धावत गेलो... पांढरी आकृती अदृश्य झाली होती. "आस्या!" मी ओरडलो. माझ्या आवाजातील भयानकतेने मीच घाबरलो... पण कुणीही उत्तर दिले नाही...

गागीनला ती सापडली होती अथवा नाही हे जाऊन पाहण्याचा मी निर्णय घेतला.

२०

द्राक्षमळ्यातील वाटेने मी घाईघाईने वर चढलो. आस्याच्या खोलीत मी उजेड पाहिला... त्यामुळे मी थोडासा शांत झालो.

मी घरापर्यंत पोहोचलो. पुढच्या दाराला कडी होती. मी दार ठोठावले. खालच्या मजल्यावरील एक अंधारी खिडकी सावधपणे उघडली गेली आणि गागीनचे डोके बाहेर डोकावले.

"तुम्हाला ती सापडली?" मी विचारले.

"ती परत आलीय," तो दबल्या आवाजात उत्तरला. "आपल्या खोलीत ती कपडे बदलतेय. सर्व काही ठीक आहे."



"देवाची कृपा!" अवर्णनीय सुटकेच्या भावनेने आणि आनंदाने मी उद्गारलो. "देवाची कृपा! आता सारं काही सुरेख घडेल. पण आपण आणखी एकदा चर्चा केली पाहिजे."

"दुसऱ्या एखाद्या वेळी," खिडकीचे तावदान हळूच स्वतःकडे ओढीत तो म्हणाला. "दुसऱ्या एखाद्या वेळी. आणि आता, निरोप घ्या."

"उद्या भेटू," मी म्हणालो. "उद्या सगळं काही निश्चित होईल."

"अच्छा!" गागीन म्हणाला. खिडकी बंद झाली होती.

तावदानावर टकटक करण्याच्या मी अगदी बेतात होतो. गागीनपाशी त्याच्या बहिणीला लग्नाची मागणी घालायला तेव्हा मी तयार होतो. पण लग्नाची मागणी घालायला तो क्षण योग्य भासला नाही... "उद्यापर्यंत," मी विचार केला. "उद्या मी सुखी माणूस असेन."

उद्या मी सुखी असणार होतो. पण सुखाला उद्या माहीत नसते. किंवा त्याला कालसुद्धा नसते. सुख भूतकाळाला विसरते आणि भविष्याचा विचार करीत नाही. त्याला फक्त वर्तमानकाळ माहीत असतो... आणि तोसुद्धा दिवस नव्हे, तर एक क्षण.

मी झ. गावी कसा परतलो ते मला आठवत नाही. माझे पाय मला परत घेऊन आले नाही, होडीने मला नदीवरून आणले नाही... रुंद, बळकट पंखांनी मी तरंगत तरंगत आलो. एका झुडुपाजवळ एक बुलबुल गात होता. तेथे खूप वेळ उभा राहून मी त्याचे गाणे ऐकले. माझ्या प्रेमाचे आणि माझ्या सुखाचे गीत तो गात होता असे मला भासले.

२१

दुसऱ्या दिवशी सकाळी मी जेव्हा परिचित घरापाशी पोहोचलो तेव्हा सर्व दारे आणि खिडक्या सताड उघडी पाहून मला आश्चर्य वाटले. घरासमोर कागदाचे काही कपटे विखुरले होते. झाडू घेतलेली एक मोलकरीण दारात अवतरली.

मी तिच्यापाशी गेलो...

"ते गेले," गागीन घरात आहे का असे मी विचारायच्या आधीच ती मोठ्यांदा म्हणाली.

"गेले?" मी पुनरुच्चार केला. "म्हणजे? कुठं गेले?"

"आज सकाळी सहा वाजताच त्यांनी घर सोडलं आणि कुठं जाणार

हे त्यांनी सांगितलं नाही. जरा थांबा... तुम्हीच का श्रीयुत न.?"

"हो."

"घरमालकिणीजवळ त्यांनी तुमच्यासाठी पत्र ठेवलंय."

मोलकरीण वरच्या मजल्यावर गेली आणि पत्र हाती धरून परतली. "हे तुमच्यासाठी..."

"शक्यच नाही... कसं..." मी बरळलो. त्या मुलीने माझ्याकडे निर्विकारपणे पाहिले व झाडण्याचे काम सुरू केले.

मी पत्र उघडले. ते गागीनने लिहिले होते... आस्याकडून एक शब्दही नव्हता. त्याच्या आकस्मिक प्रयाणाबद्दल मी त्याच्यावर रागावू नये अशी त्याने पत्राची सुरुवात केली होती. पूर्ण विचारांती त्याच्या निर्णयाशी मी सहमत होईन अशी त्याची खात्री होती. अवघड आणि धोक्याच्या होऊ शकणाऱ्या प्राप्त परिस्थितीमधून दुसरा मार्ग शोधण्यास तो असमर्थ ठरला होता. "काल रात्री," त्याने म्हटले होते, "आपण मुकाट बसून आस्याची वाट पहात होतो तेव्हा अलग होण्याच्या आवश्यकतेची मला अंतिम खात्री पटली. काही दूषित पूर्वग्रहांचा मी मान राखतो. आस्याशी तुम्ही लग्न करू शकणार नाही हे मला समजते. तिने मला सर्व सांगितले. तिच्या वारंवारच्या, कळकळीच्या विनंत्यांना मान्यता देऊन तिला शांत करणे मला भाग पडले." आमची मैत्री अशी चटकन तुटल्याबद्दल त्याने खेद व्यक्त केला होता, मला सुयश चिंतले होते, आपल्या आदरभावनेची खात्री दिली होती आणि त्यांना शोधण्याचा प्रयत्न मी करू नये अशी विनंती केली होती.

"कोणते दूषित पूर्वग्रह?" मी उद्गारलो. जणू त्याला माझे बोलणे ऐकू जाणार होते. "काय हा मूर्खपणा! माझ्यापासून तिला हिसकावून नेण्याचा अधिकार कुणी दिला?" मी माझे कपाळ धरले...

मोलकरणीने मालकिणीला मोठ्यांदा हाक मारली. तिच्या घाबरण्यामुळे मी स्वतःला सावरणे भाग पडले. एकाच विचाराने मला पूर्णतः झपाटले होते: त्यांना शोधून काढायचे; काय वाट्टेल ते झाले तरी त्यांना शोधून काढायचे! ह्या धक्क्याखाली खचून जाण्याची माझी तयारी नव्हती. असा पराभव पत्करण्याची माझी इच्छा नव्हती. मालकिणीकडून मला समजले की, सकाळी सहा वाजता, खालच्या दिशेने जाणाऱ्या स्टीमरमध्ये बसून ते गेले होते. मी तिकीट-कचेरीत गेलो. तेथे मला समजले की, त्यांनी कलोनची तिकिटे घेतली होती. मी घाईने घरी आलो. माझे सामान भरायचे आणि पुढचीच बोट त्यांच्या पाठोपाठ पकडायची असा माझा इरादा होता.



माझी वाट फ्राऊ लुईझाच्या घरावरून जात होती... अचानक मला कुणीतरी हाक मारली. वर पाहिले तो आदल्या दिवशी ज्या खोलीत मी आस्याला भेटलो होतो त्याच खोलीच्या खिडकीत नगराध्यक्षाची विधवा उभी असलेली दिसली. तिने आपले किळसवाणे स्मित केले व मला बोलाविले. मी मान फिरविली आणि पुढे जाण्याच्या बेतात होतो, तेवढ्यात तिने परत हाक मारून सांगितले की, माझ्यासाठी तिच्यापाशी काहीतरी आहे. ह्या शब्दांनी मी थबकलो आणि तिच्या घरात शिरलो. त्या खोलीत मी परत प्रवेश केला तेव्हाच्या माझ्या भावनांचे वर्णन मी कसे करू?

"खरं म्हणजे," एक छोटी चिठ्ठी दाखवीत म्हातारी बोलू लागली, "तुम्ही जर माझ्याकडं आला असतात, तरच ही वस्तू तुम्हाला द्यायची होती. पण तुम्ही इतके छान तरुण गृहस्थ आहात! घ्या!"

मी चिठ्ठी घेतली.

कागदाच्या एका छोट्या कपट्यावर पुढील शब्द पेन्सिलीने घाईघाईने खरडले होते:

"अच्छा, आपण परत कधीही भेटणार नाही. अभिमानापायी मी इथून जात नाही... तर एवढी एकच गोष्ट मला करण्यासारखी आहे. जेव्हा तुमच्यासमोर काल मी रडले तेव्हा तुम्ही जर एक शब्द उच्चारला असतात, अवघा एक शब्द, तर मी राहिले असते. तुम्ही तो उच्चारला नाही. मला वाटते, झाले ते सर्व बऱ्याकरताच झाले... तुमचा निरोप घेते, कायमचा!"

एक शब्द... किती मूर्खासारखा वागलो मी! तो शब्द आदल्या दिवशी अश्रूभरल्या डोळ्यांनी मी उच्चारला होता, रिकाम्या हवेत ठासून उच्चारला होता, मोकळ्या मैदानांमध्ये पुनःपुन्हा उच्चारला होता... पण तिच्यासमोर उच्चारला नव्हता... माझे तिच्यावर प्रेम होते हे मी तिला सांगितले नव्हते. आणि तेव्हा तो शब्द मी उच्चारू शकलो नसतो. त्या घातकी खोलीत जेव्हा मी तिला भेटलो, तेव्हा माझ्यातील प्रेमाची मला अद्याप स्पष्ट जाणीव झालेली नव्हती. तिच्या भावाशेजारी सुन्न मनःस्थितीत आणि ताणलेल्या शांततेत बसून होतो तेव्हाही ती भावना जागी झालेली नव्हती... जेव्हा संकट कोसळले, मी तिला शोधू लागलो, तिच्या नांवाने हाका मारू लागलो, तेव्हा कुठे काही मिनिटांनंतर अदम्यपणे उसळी मारून ती भावना जागी झाली होती... पण एव्हाना फार उशीर झाला होता. "पण ते अशक्य

आहे!" तुम्ही मला सांगाल. हे शक्य आहे अथवा नाही, मला माहीत नाही. पण हे खरे आहे एवढे मला माहीत आहे. आस्यामध्ये नखऱ्याची किंचित जरी छटा असती आणि जर ती अशा चुकीच्या प्रसंगात सापडली नसती, तर ती कधीही दूर निघून गेली असती. इतर कुणाही मुलीने जे सहन केले असते ते तिला सहन करणे जमले नाही. मी हे समजू शकलो नाही. अंधाऱ्या खिडकीसमोर गागीनची शेवटची भेट झाली तेव्हा माझ्या दुष्ट बुद्धीने माझ्या ओठांवरील शब्दांना बांध घातला आणि अखेरची गवताची काडीही माझ्या हातून तेव्हा निसटून गेली.

त्याच दिवशी मी माझ्या सामानासह ल. गावी परतलो आणि कलोनची स्टीमर पकडली. मला आठवते की, स्टीमर सुरू झाली व त्या अविस्मरणीय रस्त्यांचा, त्या सर्व स्थळांचा मी मनाने निरोप घेत होतो, तेव्हा अचानक हान्खेन माझ्या दृष्टीला पडली. नदीतीरावरील एका बाकावर ती बसली होती. तिचा चेहरा फिकटला होता, पण दुःखी नव्हता. एक देखणा तरुण तिच्याशेजारी उभा होता, तिला काहीतरी सांगून हसत होता. आणि ऱ्हाईनच्या पलिकडे माझी छोटी मॅडोन्ना जुन्या ॲश वृक्षाच्या काळसर पानांमधून नेहमीप्रमाणे खिन्नपणे पहात होती.

२२

कलोनमध्ये मी गागीनांचा मागोवा घेतला. ते लंडनला गेल्याचे मला समजले आणि मी त्यांच्या पाठोपाठ लंडनला गेलो. पण तेथे त्यांना शोधण्याचे माझे सर्व प्रयत्न व्यर्थ ठरले. खूप काळपर्यंत मी पराभव पत्करायला तयार नव्हतो. मी चिकाटीने शोध चालू ठेवला, पण सरतेशेवटी त्यांना शोधून काढण्याची आशा मला कायमची सोडून द्यावी लागली.

आणि मी त्यांना परत कधीही पाहिले नाही... आस्याला मी परत कधीही पाहिले नाही. तिच्या भावासंबंधी काही अस्पष्ट बातम्या माझ्या कानांपर्यंत कधीमधी येऊन पोहोचत, पण ती मात्र माझ्यापासून कायमची अदृश्य झाली. ती जिवंत आहे अथवा मरण पावली, हेसुद्धा मला माहीत नाही. काही वर्षांनंतर परदेशात असताना, रेल्वेच्या डब्यात एका स्त्रीला मी क्षणभर ओझरते पाहिले आणि तिच्या चेहऱ्याने मला त्या अविस्मरणीय नाक-डोळ्यांची ठळक आठवण करून दिली ... पण योगायोगाच्या साधर्म्याने मी चकलो होतो यात काही संदेह नाही. माझ्या जीवनातील सर्वात सुखी



कालखंडातील मला माहीत असलेली मुलगी म्हणून आस्या माझ्या स्मरणात राहिलीय. एका सखल लाकडी खुर्चीत अंगाची मुटकुळी करून बसलेली तिची आकृती अद्याप माझ्या स्मरणात राहिलीय.

मात्र मी कबूल करतो की, तिच्यासाठी मी फार काळ झुरत बसलो नाही. उलट मी स्वतःला सांगितले की, आस्याचा आणि माझा संयोग न घडवून दैवाने माझ्यावर उपकारच केले. तिच्यासारख्या पत्नीबरोबर बहुधा मी सुखी झालो नसतो, असे मी विचारांती स्वतःचे सांत्वनही केले. तेव्हा मी तरुण होतो... आणि अल्पकालीन, वेगवान भविष्य मला अपार भासत होते. "असंच परत घडणार नाही का," मी स्वतःला विचारले होते, "आणि याहून चांगली, अधिक सुंदर?" इतर स्त्रियांबरोबर माझी जवळीक घडली, पण आस्याने माझ्या मनात जी भावना जागी केली होती, ती प्रामाणिक, स्निग्ध, गहिरी भावना परत कधी अनुभवली नाही. माझ्यावर प्रेमाने खिळलेल्या त्या डोळ्यांच्या जागी दुसरे डोळे आले नाही. माझ्या छातीवर टेकलेल्या त्या काळजाला माझ्या हृदयाने जशा मधुर, सुखद झिणझिण्यांनी प्रतिसाद दिला, तसा इतर कुठल्याही काळजाला दिला नाही. एकाकी ब्रह्मचाऱ्याचे जीवन माझ्या वाट्याला आले आहे. कंटाळवाणी वर्षे मी ढकलतो आहे. पण तिच्या चिठ्ठ्या आणि जेरानियमची सुकलेली डहाळी... खिडकीतून तिने एकदा माझ्या दिशेने फेकलेले ते फूल... पवित्र स्मृती म्हणून मी जपून ठेवलीत. आजघटकेलाही त्या फुलाला मंद सुवास येतो. आणि ज्या हाताने मला ते दिले, जो हात फक्त एकदाच मी माझ्या ओठांनी स्पर्शू शकलो, तो हात कदाचित केव्हाच थडग्यात मातीत मिसळला असेल. आणि मी... माझे काय उरलेय? माझ्यातील काय राहिलेय, त्या सुखमय आणि वादळी दिवसांमधील, त्या पंखांवर आरूढ झालेल्या आशा-आकांक्षांमधील काय राहिलेय? त्या छोट्या फुलाच्या उच्छ्वासांमधून मानवाची सर्व सुख-दुःखे टिकून राहिलीत... खुद्द मानवाला त्यांनी टिकवून धरलेय.

१८५७

# पहिले प्रेम

पा. अनेन्कोव यांस अर्पण[12]

...पाहुणे केव्हाच निघून गेले होते. घड्याळात साडेबाराचा टोल पडला. यजमानाशिवाय त्या खोलीत फक्त सेर्गेई निकोलायेविच आणि व्लादीमिर पेत्रोविच असे दोघेच राहिले.

यजमानाने घंटी वाजवून नोकराला बोलाविले आणि रात्रीच्या जेवणाच्या उरलेल्या बशा उचलून न्यायला सांगितले.

"तर आपलं ठरलं," आपल्या आरामखुर्चीत व्यवस्थित बैठक मारीत आणि सिगार पेटवीत यजमान म्हणाले. "आपल्यापैकी प्रत्येकानं स्वतःच्या पहिल्या प्रेमाची गोष्ट सांगायची. तुम्ही सुरुवात करा, सेर्गेई निकोलायेविच."

गोल अंगयष्टीच्या, फुगीर चेहऱ्याच्या आणि सोनेरी केसांच्या सेर्गेई निकोलायेविचनी यजमानाकडे पाहिले आणि नंतर आपली नजर वर छताला लावली. "माझं पहिलं प्रेम कधी झालंच नाही," शेवटी ते म्हणाले. "मी सरळ दुसऱ्या प्रेमानंच सुरुवात केली."

"ते कसं काय?"

"अगदी सरळ. मी अठरा वर्षांचा होतो तेव्हा एका मोहक तरुणीचं प्रणयाराधन करायला मी आरंभ केला, पण मी वागत मात्र असा होतो की जणू त्या प्रांतात मला नवीन काहीच नव्हतं. नंतरच्या काळात अगदी त्याच पद्धतीनं मी इतर स्त्रियांचं प्रणयाराधन केलं. खरं सांगायचं तर पहिल्या आणि शेवटल्या वेळी मी प्रेमात पडलो वयाच्या सहाव्या वर्षी, माझ्या दाईच्या. पण ते फार फार पूर्वी घडलं आणि आमच्या संबंधांचा तपशील माझ्या स्मरणातून निघून गेलाय. शिवाय जरी मी तो आठवू शकलो, तरी कुणाला त्यात रस वाटणार?"

"तर मग आपण काय करायचं?" यजमान बोलू लागले. "माझ्या पहिल्या प्रेमातही फारसं रंजक काही नाही. आन्ना इवानोवनाला, माझ्या



सध्याच्या पत्नीला, भेटण्यापूर्वी मी कधीही प्रेमात नव्हतो आणि अर्थात आमच्या प्रेमाचा प्रवास प्रथमपासूनच सुरळीत घडला. आमच्या वडलांनी आमची जोडी जमवून दिली, लौकरच आम्हाला एकमेकांचा लळा लागला आणि विनाविलंब आम्ही लग्न केलं. माझी गोष्ट अगदी थोडक्या शब्दांमध्ये सांगता येईल. भल्या गृहस्थांनो, मी कबूल करतो की, पहिल्या प्रेमाबद्दलचा प्रश्न जेव्हा मी उपस्थित केला, तेव्हा माझी तुमच्यावर भिस्त होती, कारण तुम्ही जरी म्हातारे नसलात, तरी अगदी तरुण ब्रह्मचारीही नाही. कदाचित तुम्ही काही रसदार सांगू शकाल व्लादीमिर पेत्रोविच?"

सुमारे चाळीस वयाचे, काळ्या-करड्या केसांचे व्लादीमिर पेत्रोविच काहीसे अडखळत म्हणाले: "माझ्या पहिल्या प्रेमाची कथा मात्र काहीशी वेगळी आहे."

"वा!" यजमान आणि सेर्गेई निकोलायेविच एकाच वेळी उद्गारले. "फारच छान... सांगा बघू."

"ठीक... पण नाही, मी तुम्हाला गोष्ट सांगणार नाही. मला निवेदन चांगलं करता येत नाही. एकतर ते शुष्क आणि त्रोटक होईल, अथवा लांबड लागेल आणि खोटं वाटेल, अशी मला खात्री आहे. तुमची जर हरकत नसेल, तर मला आठवतं तेवढं सगळं मी वहीत उतरवून काढतो आणि नंतर तुम्हाला वाचून दाखवतो."

त्यांच्या मित्रांनी प्रथम विरोध केला, पण शेवटी व्लादीमिर पेत्रोविच यांनी आपल्या मनाप्रमाणेच केले. एका पंधरवड्यानंतर ते परत भेटले आणि व्लादीमिर पेत्रोविचनी आपला शब्द पाळला.

आपल्या श्रोत्यांना त्यांनी पुढील गोष्ट आपल्या वहीमधून वाचून दाखविली:

## १

मी तेव्हा सोळा वर्षांचा होतो. आत्ता मी जे निवेदन करणार आहे ते १८३३ च्या उन्हाळ्यात घडले.

मॉस्कोमध्ये मी माझ्या आई-वडिलांबरोबर रहात होतो. गावाबाहेर, काल्लूझस्की गेटाजवळ, न्येस्कूचनी बागेच्या अगदी समोर, त्यांनी एक घर भाड्याने घेतले होते. विद्यापीठात जाण्याची मी तयारी करीत होतो, पण फारसा स्वतःला शिणवून घेत नव्हतो.

मी पूर्ण स्वातंत्र्य उपभोगीत होतो आणि मनाला येईल तसे वागत होतो. विशेषत: माझ्या शेवटच्या शिक्षकाला सोडल्यानंतर. तो फ्रेंच होता आणि एखाद्या बाँबप्रमाणे (comme une bombe) तो रशियावर कोसळला होता हा विचार त्याच्या मनातून काही केल्या जात नव्हता. उमंट चेहऱ्याने तो सबंध दिवसभर बिछान्यात लोळत पडायचा. माझे वडील माझ्याशी प्रेमळ तिऱ्हाईतपणे वागायचे. माझ्या आईला आणखी मुले नव्हती, तरीही ती क्वचितच माझी दखल घ्यायची. इतर काळज्यांमध्ये ती सदैव मग्न असायची. माझे वडील अजून तरुण आणि खूप देखणे होते व केवळ पैशासाठी त्यांनी माझ्या आईशी लग्न केले होते. ती त्यांच्यापेक्षा दहा वर्षांनी मोठी होती. माझी आई अतिशय दु:खी जीवन कंठायची. ती सदैव चिंतेत असायची, मत्सराने ग्रासलेली आणि मनाने खचलेली असायची. मात्र माझ्या वडिलांच्या उपस्थितीत तसे कधी दाखवायची नाही. तिला त्यांची खूप भीती वाटायची आणि ते नेहमी थंड अलिप्तपणाने वावरायचे. त्यांच्या वर्तनात करडेपणा जाणवायचा. माझ्या वडिलांइतका उत्तम शिष्टाचार जाणणारा, आत्म-विश्वासाने आणि दिमाखाने वागणारा दुसरा माणूस मला अद्याप कधी भेटला नाही.

त्या घरामधील माझे पहिले आठवडे मी कधीही विसरणार नाही. हवा उत्तम होती. ९ मे रोजी, संत निकोलाच्या दिवशी, आम्ही त्या घरात रहायला आलो. आमच्या आवारातून आणि न्येस्कूचनी बागेतून मी भटकत असे. काहीवेळा शहराच्या वेशीपलिकडे जायचा. सर्वसाधारणपणे माझ्या सांगाती एखादे पुस्तक घेऊन जायचा. कैदानोवचा इतिहास[13] अथवा तत्सम काहीतरी, पण कधी एक पानसुद्धा उघडून वाचले नाही. कविता म्हणण्यात मुख्यत: मी रमलेला असे, कारण माझी कवितेबाबत स्मरणशक्ती चांगली होती. काहीतरी अनोळखी, खास वेदनेने माझ्या रक्तात झिणझिण्या येत होत्या आणि काळजात दुखत होते. कशाच्यातरी अपेक्षेने आणि भीतीने मी सतत ग्रासलेला होतो. प्रत्येक गोष्टीचे मला नवल वाटत होते आणि कोणत्याही प्रसंगाला मी सज्ज होतो. पहाटेच्या वेळी घंटा-बुरूजावर पाकोळ्या घिरट्या घालतात त्याप्रमाणे सारा वेळ ठराविक विचारांभोवतीच माझी कल्पनाशक्ती धावत आणि घिरट्या घालीत रहायची. मी स्वप्नरंजनात दंग व्हायचा, दु:खी बनायचा, काहीवेळा आसवेसुद्धा ढाळायचा. एखाद्या मधुर ओळीमुळे असो, अथवा सायंकालीन सुंदर देखाव्यामुळे असो, पण ह्या सर्व अश्रुसिंचनांमध्ये आणि दु:खाच्या अचानक झटक्यांमध्ये यौवनाच्या खळबळत्या



आणि खदखदत्या आनंदी संवेदना सतत जाणवत रहायच्या. वसंतामध्ये जमिनीतून फुटणाऱ्या गवताच्या पात्यांप्रमाणे.

माझ्या स्वत:च्या वापरासाठी एक तट्टू होता. त्याच्यावर मी स्वत:च खोगीर चढवायचा आणि दौडत दूर रपेटीला जायचा. त्याच्या पाठीवरून दौडत असताना स्वत:ला खेळांच्या स्पर्धेत भाग घेणारा सरदार समजायचा (माझ्या कानांमागून वारा किती मजेने भणाणत जायचा!), अथवा आकाशाकडे माझा चेहरा वर उचलून त्याचा तेजस्वी प्रकाश व निळाई माझ्या ग्रहणक्षम मनाने आत्मसात करायचा.

मला आठवते की, माझ्या मनात स्त्रीच्या प्रतिमेने, स्त्रीच्या प्रेमाच्या किंचित छायेने, क्वचितच निश्चित रूप धारण केले होते. पण माझ्या एकूण विचारामध्ये आणि जाणीवेमध्ये काहीतरी नवीन, अत्यंत मधुर, अर्ध-स्फुट, लाजरे चित्र–थोडक्यात म्हणजे काहीतरी स्त्रीविषयक अस्तित्वात होते.

ह्या चित्राने, ह्या सतत अपेक्षेने, माझे सर्वस्व झपाटून टाकले होते. माझ्या श्वासात ते होते, माझ्या नसांमधून त्याचे धावणे मला जाणवत होते, माझ्या रक्ताच्या प्रत्येक थेंबात ते होते... आणि लौकरच ते खरे ठरले होते.

आमच्या दाचाची* मुख्य इमारत म्हणजे खांबांची लाकडी इमारत होती व तिच्या शेजारी दोन उतरत्या छपरांच्या जोड-इमारती होत्या. डावी-कडील जोड-इमारतीत हलक्या दर्जाचा भिंतीचा कागद तयार करणारा एक छोटा कारखाना होता... मी अनेकदा तेथे जाऊन बघत उभा रहायचा. सुमारे डझनभर लुकडी, अस्वच्छ, रोड चेहऱ्याची मुले मळकट झगे घालून लाकडी तरफांवर उड्या मारीत असत व स्वत:च्या दुबळ्या शरीरांच्या वजनाने चौकोनी शिळाछाप कागदांवर दाबून भडक ठसे उमटवीत असत. उजव्या बाजूची जोड-इमारत रिकामी होती व भाड्याने द्यायची होती. एक दिवस, ९ मे नंतर सुमारे तीन आठवड्यांनी, त्या जोड-इमारतीच्या झडपा सताड उघड्या झाल्या व खिडक्यांमधून बायकांचे चेहरे दिसले. कुणा कुटुंबाने जोड-इमारत घेतली होती. मला आठवते की, त्या दिवशी दुपार-च्या जेवणाच्या वेळी माझी आई आमच्या खानसाम्यापाशी नव्या शेजाऱ्यां-बद्दल चौकशी करीत होती आणि प्रिन्सेस झासेकिनाचे नांव ऐकताच काहीशा

---

*दाचा–गावाबाहेरील लाकडी बांधणीचे, रशियन धर्तीचे उन्हाळी निवासस्थान–अनु.

आदरानेच प्रथम उद्गारली होती : "ओहो, प्रिन्सेस..." आणि मग म्हणाली होती : "बहुधा अडचणीत असावी."

"तीन इझ्वोश्चिकांनी* त्यांचं बिऱ्हाड आणलं," मेजावर आदबीने वशी ठेवीत खानसामा म्हणाला. "त्यांची स्वतःची गाडी नाही आणि फर्निचर अगदीच स्वस्तातलं दिसलं."

"अस्सं," माझी आई म्हणाली. "पण तरीही छान!"

माझ्या वडिलांनी तिच्याकडे एक थंड कटाक्ष टाकला आणि ती पुढे गप्प झाली.

आणि खरेच, प्रिन्सेस झासेकिना श्रीमंत बाई असणे शक्य नव्हते. तिने भाड्याने घेतलेली जोड-इमारत एवढी तकलादू, छोटी आणि उतरत्या छताची होती की, किंचित सुस्थित अशा कोणत्याही कुटुंबाने तेथे वास्तव्य करायला मान्यता दिली नसती. पण त्यावेळी त्या संभाषणाची मी विशेष दखल घेतली नाही. प्रिन्सेसपदाचा माझ्यावर फारसा प्रभाव पडला नाही. शिलरचे 'दरोडेखोर'[14] मी नुकतेच वाचले होते.

२

कावळे मारण्याच्या उद्देशाने खांद्यावर बंदूक टाकून रोज संध्याकाळी आमच्या आवारात भटकण्याची मला सवय होती. त्या सावध, धूर्त, लुटारू पक्ष्यांविषयी फार पूर्वीपासून माझ्या मनात चीड निर्माण झाली होती. ज्या दिवसाविषयी मी बोलतोय त्या दिवशी मी नेहमीच्या शोधार्थ गेलो होतो आणि सर्व वाटा व्यर्थ धुंडाळून झाल्यानंतर (कावळ्यांनी मला पाहिले होते आणि दूर अंतरावर कोठेतरी त्यांची "काव-काव" चालली होती) आमचे आवार आणि उजव्या जोड-इमारतीच्या परसदारीचा बाग्याचा अरुंद पट्टा, यांच्या दरम्यानच्या सखल कुंपणापाशी मी पोहोचलो. खाली नजर करून मी चालत होतो. अचानक माझ्या कानी आवाज आले. मी कुंपणापलिकडे नजर टाकली आणि स्तंभित होऊन जागच्या जागी खिळलो... माझ्या डोळ्यांना एक विचित्र देखावा दिसत होता.

काही पावलांच्या अंतरावर, रासबेरीच्या हिरव्या झुडुपांच्या मधल्या मोकळ्या जागेत एक उंच, सडपातळ तरुणी गुलाबी, पट्ट्यापट्ट्याच्या फ्रॉकमध्ये उभी होती. तिने डोक्याला पांढरा रुमाल बांधला होता. चार तरुणांनी

*गाडीवान. —अनु.



तिच्याभोवती वेढा घातला होता आणि मुलांना खूप परिचित असलेल्या, पण मला नांव ठाऊक नसलेल्या छोट्या करड्या-निळ्या फुलांनी ती तरुणी त्या तरुणांच्या कपाळांवर आळीपाळीने प्रहार करीत होती : भक्कम पृष्ठभागावर आघात करताच त्या फुलांच्या छोट्या पिशव्यांसारख्या मिटलेल्या पाकळ्या एकदम उघडत होत्या. ते तरुण मोठ्या अधीरपणे आपली मस्तके तिच्यापुढे धरीत होते आणि त्या तरुणीच्या एकूण हालचालींमध्ये (तिचा तिरपा चेहरा मला दिसत होता) डौल होता, प्रेमळपणा होता, लाडिकपणा आणि आकर्षकपणा होता. आश्चर्याने आणि आनंदाने माझ्या तोंडून चीत्कार उमटला. त्या सुरेख बोटांनी माझ्या कपाळावर आघात करावा म्हणून काय वाट्टेल ते द्यायला मी तयार होतो. माझी बंदूक गवतावर निसटून पडली. माझे भान हरपले आणि मी आधाशीपणे तिचे रूप निरखू लागलो : नाजुक कंबर, डौलदार मान, सुंदर बाहू, पांढऱ्या रुमालाआडून डोकावणारे किंचित विस्कटलेले सोनेरी केस, पापण्यांखाली अर्धे झाकले गेलेले बुद्धिमान डोळे, पापण्यांखालील नाजुक गाल...

"तरुण माणसा! अरे तरुण माणसा!" माझ्या अगदी कानांशी एक आवाज ओरडला. "अनोळखी तरुणींकडं टक लावून पाहणं ही काय वागण्याची रीत झाली?"

मी चकित होऊन दचकलो... अगदी जवळच, कुंपणाच्या दुसऱ्या बाजूला, आखूड काळ्या केसांचा एक माणूस माझ्याकडे उपहासाने बघत उभा होता. त्याच क्षणाला त्या मुलीने माझ्याकडे लक्ष गेले... सजग आणि उत्साही चेहऱ्यावर दोन टपोरे राखाडी डोळे मला दिसले. अचानक त्या चेहऱ्यावर हसू फुटले, पांढरे दात चमकले, भुवयांची गंमतीदार कमान उंचावली... मी लाजलो आणि माझी बंदूक झटकन उचलून तडक माझ्या खोलीची वाट धरली. स्नेहल हास्याच्या लहरी माझा पाठलाग करीत होत्या. खोलीत येताच धाडकन मी पलंगावर अंग टाकले आणि माझ्या हातांनी माझा चेहरा झाकून घेतला. माझे काळीज धाडधाड उडत होते. मला एकाच वेळी शरम वाटत होती आणि आनंदही झाला होता. अशी खळबळ यापूर्वी कधीही मी अनुभवली नव्हती.

थोडा वेळ विश्रांती घेतल्यानंतर मी माझे केस नीट विंचरले, कोटावर ब्रश मारला आणि खालच्या मजल्यावर चहा घ्यायला गेलो. सारा वेळ त्या तरुणीची प्रतिमा माझ्या डोळ्यांसमोर नाचत होती. इतःपर माझ्या काळजात धडधड होत नव्हती, पण अधूनमधून एक जोरदार कळ उमटत होती.

"काय झालं रे?" माझ्या वडिलांनी अचानक मला प्रश्न केला. "कावळा मारलास काय?"

त्यांना सर्व सांगून टाकण्याची इच्छा मला झाली, पण मी तो मोह आवरला आणि केवळ एक रहस्यमय स्मित केले. झोपण्यापूर्वी काही कारणाने मी टाचेवर दोन-तीन गिरक्या घेतल्या, केसांना पोमेड चोपडले आणि सबंध रात्र गाढ झोपलो. पहाटेला मी क्षणभर जागा झालो, उशीवरून डोके किंचित उचलले, भोवती एक आनंदी कटाक्ष टाकला आणि पुन्हा झोपी गेलो.

३

"त्यांची ओळख कशी करून घ्यायची?" जागे झाल्यावर हाच पहिला विचार माझ्या मनात आला. न्याहरीपूर्वी मी बागेत गेलो, पण कुंपणाच्या जास्त जवळ जाण्याचे धाडस मी केले नाही आणि कुणीही माझ्या दृष्टीस पडले नाही. न्याहरीनंतर त्यांच्या घरासमोरच्या रस्त्यावर मी येरझाऱ्या मारीत राहिलो, दुरून त्यांच्या खिडक्या न्याहाळीत राहिलो... एकदा **तिचा** चेहरा पडद्यामागे दिसल्याचा मला भास झाला व घाबरून मागे फिरलो. न्येस्कूचनी बागेसमोरच्या वाळूच्या पट्ट्यावर फिरत असताना माझ्या मनात येत होते: "तिची ओळख करून घेतलीच पाहिजे! पण कशी? तोच तर प्रश्न आहे." कालच्या भेटीच्या प्रसंगातील बारीकसारीक तपशील मी आठवून पाहिले. का कुणास ठाऊक, पण ती माझ्याकडे पाहून हसत असल्याचे दृश्य माझ्या स्मरणात सर्वांत जास्त ठळक राहिले. पण तेथे मी झुरत होतो आणि योजना जुळवीत होतो तेव्हा दैव माझ्यावतीने काम करण्यात गुंतले होते.

मी घरात नव्हतो तेव्हा माझ्या आईला तिच्या नव्या शेजारणीकडून एका राखाडी कागदावर लिहिलेले पत्र आले होते. सर्वसाधारणपणे पोस्टात किंवा हलक्या दर्जाच्या मद्याच्या बाटल्यांवर असते तसल्या काळसर मेणाने ते पत्र बंद केलेले होते. अत्यंत वाईट हस्ताक्षरातील आणि व्याकरणाच्या असंख्य चुकांनी भरलेल्या त्या पत्रात, प्रिन्सेसने माझ्या आईपाशी तिच्या वतीने वशीला वापरण्याची विनंती केलेली होती. तिने लिहिले होते की, माझ्या आईच्या ओळखीच्या काही जबाबदार व्यक्तींवर प्रिन्सेसचे आणि तिच्या मुलांचे भवितव्य अवलंबून होते व तिच्यावर काही महत्त्वाचे खटले



चालू होते. "एक घरंदाज बाई दुसऱ्या घरंदाज बाईला ज्या रीतीने विणंती करते," तिने लिहिले होते, "तशी मी तुम्हाला विणंती करतेय आणि त्याच वेळी ही संधी मिळालेबद्दल मला खुप खुप आणंद होतोय." माझ्या आईने तिची भेट घ्यावी अशी विनंती करून तिने पत्र संपविले होते. माझ्या आईला त्या पत्राचा फारसा आनंद झाला नाही, असे मला आढळले. माझे वडील घरी नव्हते आणि तिला सल्ला द्यायला दुसरे कुणी नव्हते. "घरंदाज बाईला," आणि त्यातही प्रिन्सेसला, उत्तर न देण्याचा प्रश्नच नव्हता, पण काय उत्तर द्यायचे हे माझ्या आईला सुचत नव्हते. फ्रेंचमध्ये चिठ्ठी लिहिणे योग्य नव्हते असे तिला वाटत होते आणि खुद्द माझ्या आईचे रशियन शुद्धलेखन फारसे बरे नव्हते व ते तिला माहीत होते आणि आपले हे रहस्य उघड करण्याची तिची मुळीच इच्छा नव्हती. म्हणून मी घरात आलो तेव्हा तिला खूप आनंद झाला व तिने तात्काळ मला प्रिन्सेसकडे तोंडी निरोप देऊन पाठविले. प्रिन्सेस बाईसाहेबांना मदत करायला आपल्याला केव्हाही आनंदच वाटेल आणि बारा ते एकच्या दरम्यान आपण भेट घ्यायला तयार आहोत, असा तिने माझ्याकरवी निरोप दिला. माझ्या सुप्त इच्छा अशा अनपेक्षित जलदपणे पूर्ण झाल्याने मी खूप आनंदी झालो, पण त्याचवेळी मला भीतीही वाटली. मात्र माझे अवघडलेपण मी उघडपणे दाखविले नाही आणि माझ्या वरच्या मजल्यावरील खोलीत गेलो... नवा टाय बांधायला आणि वरचा झगा घालायला. घरात मला जाकीटामध्ये आणि दुमडलेल्या कॉलरमध्ये वावरावे लागायचे व हा पोषाख मला मुळीच आवडायचा नाही.

४

थरथरत्या सर्वांगाने जोड-इमारतीच्या घाणेरड्या, दाटी झालेल्या दर्शनी खोलीत मी शिरलो तेव्हा एक पुरातन, पांढऱ्या केसांचा, काळसर-तांबूस वर्णाचा, डुकरासारख्या डोळ्यांचा नोकर मला भेटला. त्याच्या कपाळावर होत्या तशा खोल रेषा पूर्वी मी कधीही पाहिलेल्या नव्हत्या. त्याच्या हातातील बशीमध्ये खारवलेल्या हेरिंग माशाचे अवशेष होते. आपल्या पायाने दार बंद करीत तुटकपणे त्याने मला विचारले:

"तुमचं काय काम आहे?"

"प्रिन्सेस झासेकिना घरात आहेत?" मी विचारले.

"वोनीफाती!" दारामागून एक कापरा बायकी आवाज आला.

एक शब्दही न बोलता तो नोकर टाचेवर वळला. राजचिन्हांचा शिक्का असलेल्या एकमेव गंजलेल्या बटणाने सजवलेल्या त्याच्या वापरून जीर्ण झालेल्या विशिष्ट पोषाखाची पाठमोरी बाजू त्याने दाखविली व बशी फरशीवर ठेवून तो चालत निघून गेला.

"पोलिस ठाण्यावर गेला होतास?" त्याच कापऱ्या आवाजाने विचारले. उत्तरादाखल नोकर तोंडातल्या तोंडात काहीतरी बरळला. "काय म्हणालास?" आवाजाने पुढे विचारले. "कुणीतरी मला भेटायला आलंय? शेजारचे छोटे उमराव? बोलाव त्यांना आत!"

"दिवाणखान्यात जावं साहेब," परत बाहेर येत व दाराजवळची बशी फरशीवरून उचलीत नोकर म्हणाला. मी टाय सरळ केला व "दिवाणखान्यात" गेलो.

एका छोट्या, अव्यवस्थित असलेल्या, जणू काही घाईघाईने टाकले असावे असे कळकट फर्निचर असलेल्या खोलीत मी उभा असल्याचे मला आढळले. खिडकीपाशी, एक हात तुटलेल्या आरामखुर्चीवर, सामान्य रूपाची, सुमारे पन्नाशीची एक बाई बसलेली होती. तिच्या डोक्यावर टोपी नव्हती, तिने जुना हिरवा पोषाख घातला होता व तिच्या गळ्याभोवती भडक रंगाचा लोकरी रुमाल गुंडाळलेला होता. तिचे छोटे काळे डोळे माझ्यावर खिळलेले होते.

मी तिच्यापाशी चालत गेलो आणि लवून अभिवादन केले.

"प्रिन्सेस झासेकिना यांच्याशी बोलण्याचा मान मला लाभेल काय?"

"मीच प्रिन्सेस झासेकिना. आपण श्री. व. यांचे सुपुत्र काय?"

"होय! माझ्या आईकडून निरोप घेऊन मी आलोय."

"बसा ना आपण! वोनीफाती! माझ्या किल्ल्या कुठं आहेत? पाहिल्यास का तू?"

प्रिन्सेस झासेकिनाला माझ्या आईने तिच्या पत्राला उत्तर म्हणून पाठवलेला निरोप मी सांगितला. जाड तांबड्या बोटांनी खिडकीच्या चौकटीत टिचक्या वाजवीत तिने माझे बोलणे ऐकून घेतले आणि मी बोलून संपविले तेव्हा परत माझ्यावर आपली नजर खिळवली.

"छान! मी नक्की येईन," अखेरीस ती बोलली. "तुम्ही खूप लहान दिसता? किती आपलं वय?"

"सोळा," मी अडखळत म्हणालो.

प्रिन्सेसने आपल्या झग्याच्या खिशामधून संपूर्ण चिताडलेले काही तेलकट



कागद बाहेर काढले आणि आपल्या डोळ्यांच्या अगदी जवळ धरून त्यांना निरखायला सुरुवात केली.

"छान वय आहे," आपल्या खुर्चीत वळून चुळबुळ करीत ती अचानक म्हणाली. "तुम्ही आमच्याशी अनौपचारिक वागत चला. आम्ही अगदी साधं राहतो इथं."

"फारच साधं," तिच्या बेढब आकृतीकडे स्वाभाविक तिटकाऱ्याचा एक कटाक्ष टाकीत मी मनाशी म्हटले.

त्याच क्षणाला दिवाणखान्याचे दुसरे दार सताड उघडले आणि आदल्या दिवशी मी पाहिलेली तरुणी दारात अवतरली. तिने आपला हात उंचावला आणि तिच्या ओठांवर स्मित विलसले.

"माझी मुलगी," दाराच्या दिशेने आपल्या कोपराने खूण करीत प्रिन्सेस म्हणाली. "झीना, हे आपले शेजारी श्री. व. यांचे चिरंजीव. माफ करा, काय नांव आपलं?"

"व्लादीमिर," उठत आणि उत्तेजित झाल्यामुळे जवळजवळ चाचरत मी उत्तरलो.

"आणि वडलांचं नांव?"

"पेत्रोविच."

"असं? माझ्या ओळखीचे एक पोलीसप्रमुख होते, त्यांचंही नांव व्लादीमिर पेत्रोविच होतं. वोनीफाती, माझ्या किल्ल्या शोधत बसू नको. त्या माझ्या खिशातच आहेत."

ती तरुण मुलगी आपले डोळे किंचित किलकिले करून आणि डोके एका बाजूला कलते ठेवून आपल्या उपरोधिक स्मिताने माझ्याकडे बघतच राहिली होती.

"मस्ये वोल्देमार यांना मी आधी पाहिलंय," ती बोलू लागली. (तिच्या आवाजातील रुपेरी स्वरांनी माझ्या सर्वांगातून झिणझिण्या गेल्या.) तुमच्या पहिल्या नांवानंच तुम्हाला मी हाक मारली तर चालेल ना?"

"अ-अर्थातच-चालेल!" मी कसाबसा म्हणालो.

"कुठं पाहिलंस?" प्रिन्सेसने विचारले. पण तरुण प्रिन्सेसने आपल्या आईला उत्तर दिले नाही.

"आत्ता तुम्ही कामात आहात का?" माझ्यावरील आपली नजर न ढळविता तिने मला विचारले.

"नाही, मुळीच नाही!"

"मग लोकर गुंडाळायला मला मदत कराल का? या माझ्याबरोबर."

तिने मला मान हलवून इशारा दिला आणि ती दिवाणखान्यातून निघून गेली. मी तिच्या पाठोपाठ गेलो.

आम्ही आता ज्या खोलीत प्रवेश केला होता तिथे फर्निचर कमी कळकट होते आणि अधिक व्यवस्थितपणे मांडलेले होते. त्या क्षणी अशा गोष्टींकडे लक्ष देण्याच्या मनःस्थितीत मी मुळीच नव्हतो. स्वप्नात असल्याप्रमाणे मी वावरत होतो. भाग्याची संवेदना थेट मूढतेच्या टोकापर्यंत पोहोचली होती आणि माझी सर्व गात्रे बधीर झाली होती.

तरुण प्रिन्सेस खाली बसली, तिने लाल लोकरीची एक लडी बाहेर काढली आणि काळजीपूर्वकरीत्या तिला उलगडून माझ्या पसरलेल्या हातांमध्ये दिली. गप्प राहून, आरामशीर मजेच्या थाटात, आपल्या विलग ओठांवर संथ लबाड स्मित ठेवून ती हे सर्व करीत होती. वाकवून दोन भाग केलेल्या एका कार्डबोर्डाभोवती तिने लोकर गुंडाळायला आरंभ केला आणि अचानक माझ्याकडे असा एक जलद तेजस्वी कटाक्ष टाकला, की नकळतपणे माझे डोळे खाली वळले. बहुधा किलकिले असलेले तिचे डोळे जेव्हा क्षणासाठी विस्फारले तेव्हा तिचा चेहरा पूर्ण बदलून गेला. तिची मुद्रा एकदम उजळून उठली.

"काल तुम्ही माझ्याबद्दल काय मत करून घेतलंत मस्ये वोल्देमार?" शांततेचा भंग करीत तिने विचारले. "मला वाटतं, मी तुम्हाला मुळीच आवडले नाही."

"मी... प्रिन्सेस... मी कसलंच मत बनवलं नाही... कसं शक्य आहे?.." गोंधळून मी म्हणालो.

"हे पहा!" ती म्हणाली. "तुम्ही मला अजून नीट ओळखत नाही. मी फार विचित्र आहे. प्रत्येकानं मला नेहमी खरं सांगावं अशी माझी इच्छा असते. तुम्ही सोळा वर्षांचे आहात असं सांगितलेलं मी ऐकलं. मी एकवीस; तुमच्यापेक्षा मी किती मोठी आहे हे तुम्हाला समजलंय आणि म्हणून तुम्ही माझ्याशी नेहमी खरं बोललं पाहिजे... आणि माझ्या आज्ञा पाळल्या पाहिजेत," ती पुढे म्हणाली. "माझ्याकडं पहा बघू, माझ्या चेहऱ्याकडं पहात का नाही तुम्ही?"

मी आणखीच अवघडलो. मात्र माझे डोळे मी तिच्या चेहऱ्यावर रोखले. तिने स्मित केले. पण ते पूर्वीसारखे नव्हते, तर यावेळी संमतीदर्शक होते.

"पहा, खुशाल पहा मला!" लाडिकपणे खालच्या आवाजात ती



म्हणाली. "माझी काही हरकत नाही. मला तुमचा चेहरा आवडला. आपली मैत्री होणार अशी मला खात्री आहे. मी आवडते तुम्हाला?" तिने लबाड स्वरात विचारले.

"प्रिन्सेस..." मी बोलायला सुरुवात केली.

"पहिली गोष्ट म्हणजे तुम्ही मला झिनैदा अलेक्सान्द्रोवना ह्या नांवानं हाक मारायची आणि दुसरं म्हणजे मुलं... तरुण पुरुष," तिने स्वतःची चूक दुरुस्त केली, "त्यांच्या मनात जे येतं ते सरळ बोलून दाखवत नाहीत हे मला आवडत नाही. वडीलधाऱ्या माणसांच्या बाबतीत ते ठीक आहे. मी तुम्हाला आवडते ना?"

तिचा प्रांजलपणा जरी मला आवडला, तरी मला थोडा अपमान झाल्यासारखे वाटले. ती लहान मुलाबरोबर बोलत नाही हे दाखविण्याच्या घाईपायी मी मोठा गंभीर आव आणून म्हटले:

"अर्थात तुम्ही मला आवडता झिनैदा अलेक्सान्द्रोवना, खूप आवडता आणि ही वस्तुस्थिती लपविण्याची माझी तिळमात्र इच्छा नाही..."

तिने सावकाशपणे माझ्याकडे पाहून मान हलविली.

"तुमचे शिक्षक आहेत?" अचानक तिने विचारले.

"नाही. बऱ्याच काळापासून मला शिक्षक नाहीत."

हे खोटे होते. माझ्या फ्रेंच शिक्षकाला सोडून जेमतेम एक महिना उलटला होता.

"अस्सं! खरंच, तुम्ही चांगलेच मोठे झालेले दिसताय!"

माझ्या बोटांवर तिने हलकेच टिचक्या मारल्या. "हात सरळ धरा!" आणि लोकर उलगडण्यात ती मनःपूर्वक गढून गेली.

ती खाली मान घालून काम करीत होती याचा फायदा घेऊन मी तिला निरखू लागलो. प्रथम चोरून आणि नंतर अधिकाधिक धिटाईने. आदल्या दिवशीपेक्षा तिचा चेहरा मला जास्त मोहक भासला. तिचे नाक-डोळे खूप नाजुक होते, गोड होते, बुद्धिमत्ता दाखवीत होते. पांढरा पडदा टांगलेल्या खिडकीकडे पाठ करून ती बसली होती. त्या पडद्यामधून झिरपत आलेल्या एका सूर्यकिरणाचा तिच्या भुरभुरीत सोनेरी केसांवर, तिच्या निष्पाप मानेवर, निमुळत्या खांद्यांवर आणि तिच्या नाजुक, शांत वक्षःस्थळांवर मंद प्रकाश पाझरत होता. मी तिच्याकडे पाहिले आणि ती मला खूप निकटची व परिचित भासली. मला असे वाटले की, युगानुयुगे मी तिला ओळखत होतो, आणि तिला भेटण्यापूर्वी मला काहीच माहीत नव्हते, मी

त्यापूर्वी खरा जगलोच नव्हतो... तिने गडद रंगाचा, किंचित जुनाट पोषाख घातला होता व वरती मलवस्त्र बांधले होते. ह्या पोषाखाच्या आणि मलवस्त्राच्या प्रत्येक घडीला गोंजारावे अशी मला इच्छा झाली. तिच्या पोषाखाखालून तिच्या बुटांची टोके डोकावीत होती. त्या बुटांच्या कौतुकादाखल मी तिला साष्टांग नमस्कार घालायला तयार होतो... "आणि हा मी तिच्यासमोर बसलोय,..." माझ्या मनात विचार आला, "...तिची मी ओळख करुन घेतलीय... कमाल आहे... केवढं भाग्य!" अतिआनंदाच्या भरात माझ्या बैठकीवरून मी जवळ जवळ उडीच मारणार होतो, पण वेळीच स्वतःला आवरले आणि एखाद्या लहान मुलाला छान छान खाऊ दिल्यानंतर ते जशी आपल्या पायांची चाळवाचाळव करते, तशी मी माझ्या पायांची चाळवाचाळव केली.

पाण्यातील माशाप्रमाणे मी अगदी मजेत होतो आणि त्या खोलीत, त्या खुर्चीवर, कायम बसून रहायची माझी तयारी होती.

खाली असलेल्या पापण्या हळूच परत वर झाल्या आणि तिच्या तेजस्वी डोळयांनी पुन्हा एकदा स्निग्ध तेजात मला न्हाऊ घातले व पुन्हा तिने स्मित केले.

"कसं पाहता आहात मला!" बोटाने मला दटावीत ती हळूच म्हणाली.

मी लाजेने लाल झालो. "तिला सगळं समजतं, तिला सगळं दिसतं," माझ्या मनात विचार चमकून गेला. "आणि सगळं न पाहणं व न समजणं तिला कसं शक्य आहे?"

शेजारच्या खोलीत अचानक आवाज झाला... तलवार खडखडली.

"झीना!" दिवाणखान्यातून प्रिन्सेसने हाक मारली. "बेलोवझोरोव तुझ्यासाठी मांजरीचं पिलू घेऊन आलेत!"

"मांजरीचं पिलू!" खुर्चीवरून उडी मारीत झिनैदा उद्‌गारली. लोकरीचा चेंडू तिने माझ्या मांडीवर फेकला आणि ती खोलीबाहेर पळाली.

मीसुद्धा उठलो आणि लोकर खिडकीच्या चौकटीत ठेवून दिवाणखान्यात गेलो. तेथे मी चकित होऊन स्तब्ध उभा राहिलो. खोलीच्या मध्यभागी, चारही पाय फरशीवर पसरुन मांजरीचे एक पट्टेरी पिलू बसले होते. झिनैदा त्या पिलावर ओणवी झाली होती व त्याचे डोके हळूच वर उचलीत होती. म्हाताऱ्या प्रिन्सेसच्या शेजारी, दोन खिडक्यांमधील सर्व जागा अडवून एक सुरेख तरुण शिलेदार उभा होता. त्याचे केस सोनेरी आणि कुरळे होते, त्याचा चेहरा लाल होता व डोळे मोठे होते.



"किती मजेदार आहे!" झिनैदा किणकिणली. "त्याचे डोळे राखी नाहीत, हिरवे आहेत आणि कान पहा केवढे मोठ्ठे! धन्यवाद, विक्तर येगोरीच! तुम्ही किती छान आहात!"

काल पाहिलेल्या तरुणांमध्ये हा शिलेदार होता हे मी ओळखले. त्याने आपल्या बुटांच्या टाचा खाडकन जुळवून सस्मित अभिवादन केले. त्याच्या तलवारीच्या म्यानाच्या धातूच्या कड्या किणकिणल्या.

"मोठ्या कानांचं मांजरीचं पट्टेरी पिलू तुम्हाला खूप आवडेल असं काल तुम्ही म्हणाला होतात... म्हणून हे घेऊन आलो. तुमचा शब्द म्हणजे कायदा!" त्या तरुणाने आणखी एकदा झुकून अभिवादन केले.

मांजराच्या पिलाने क्षीणपणे म्यॉव आवाज केला व जमीन हुंगायला आरंभ केला.

"त्याला भूक लागलीय!" झिनैदा उद्‌गारली. "वोनीफाती! सोन्या! थोडं दूध आणा!"

मळकट पिवळा पोषाख घातलेली आणि गळयाभोवती विटका रुमाल गुंडाळलेली एक मोलकरीण बशीत दूध घेऊन आली व तिने ती बशी मांजराच्या पिलासमोर ठेवली. पिलू दचकले, त्याने आपले डोळे किलकिले केले व नंतर दूध चाटायला सुरुवात केली.

"त्याची जीभ किती गुलाबी आहे!" आपले डोके जवळ जवळ जमिनीला टेकवीत आणि मांजरीच्या पिलाच्या हनुवटीखाली डोकावून पाहण्याचा प्रयत्न करीत झिनैदा म्हणाली.

मांजराचे पिलू पोटभर दूध प्यायले आणि आपले पुढील पंजे नखरेबाजपणे खाली-वर करीत घुर्रर्र आवाज करू लागले. झिनैदा उठली आणि मोलकरणीकडे वळून तिऱ्हाईतपणे म्हणाली : "घेऊन जा त्याला!"

"मांजराच्या पिलाबद्दल... तुमचा हात..." मानभावी हसत शिलेदार म्हणाला. त्याच्या घट्ट नव्या गणवेषात त्याचे प्रचंड धूड वळवळत होते.

"दोन्ही!" झिनैदा उत्तरली आणि आपले दोन्ही हात तिने त्याच्या समोर धरले. जेव्हा तो त्यांचे चुंबन घेत होता तेव्हा त्याच्या खांद्यावरून तिने माझ्याकडे पाहिले.

मी स्तब्ध उभा होतो. हसावे, का काही बोलावे अथवा गप्प रहावे, याबद्दल माझ्या मनाचा निर्णय होत नव्हता. अचानक दर्शनी खोलीच्या उघड्या दाराकडे माझे लक्ष गेले. आमचा नोकर फ्योदर मला बाहेर

येण्याबद्दल खुणा करीत होता. मी यांत्रिकपणे त्याच्यापाशी चालत गेलो.

"काय झालं?" मी विचारले.

"तुमच्या आईसाहेबांनी तुम्हाला बोलावून आणण्यासाठी मला पाठवलंय," तो हळूच पुटपुटला. "तुम्ही उत्तर घेऊन परत आला नाहीत म्हणून त्या खूप रागावल्यात."

"अरेच्चा, इथं मी किती वेळ आहे?"

"एक तासापेक्षा जास्त."

"एक तासापेक्षा जास्त!" नकळत मी त्याचेच शब्द परत उच्चारले आणि दिवाणखान्यात जाऊन वाकून अभिवादन करीत व पाय घासत निरोप घेऊ लागलो.

"कुठं चाललात?" शिलेदाराच्या खांद्यावरून माझ्या दिशेने तीक्ष्ण कटाक्ष फेकीत तरुण प्रिन्सेसने विचारले.

"मला घरी गेलं पाहिजे. म्हणजे माझ्या आईला निरोप सांगता येईल..." म्हातारीकडे वळून मी पुढे म्हणालो, "...एक वाजल्यानंतर तुमची वाट पहायला!"

"हो, हो. तसं सांगा त्यांना!"

म्हाताऱ्या प्रिन्सेसने घाईघाईने आपली तपकिरीची डबी बाहेर काढली आणि एवढ्या जोरात तपकिरीचा बार भरला, की मी अक्षरशः दचकलो. "सांगा त्यांना," पाणीभरले डोळे मिचकावीत आणि खाकरीत ती परत म्हणाली.

मी आणखी एकदा झुकून अभिवादन केले आणि टाचांवर वळून खोली-बाहेर गेलो. कुणाही कोवळ्या तरुणाला जेव्हा त्याच्याकडे इतर पहात आहेत याची जाणीव असते, तेव्हा त्याला परिचित असणारी पाठीमधील अवघडले-पणाची संवेदना त्यावेळी मी अनुभवीत होतो.

"पुन्हा आमच्याकडं जरूर या, मस्यो वोल्देमार," झिनैदा ओरडली आणि तिच्या लकबीने हसली.

"एवढी का हसते ही?" फ्योदरबरोबर घरी जात असताना माझ्या मनात विचार आला. जरी फ्योदर काही बोलला नाही, तरी चेहऱ्यावर नापसंती उमटवून तो माझ्या पाठोपाठ येत होता. माझ्या आईने माझी खरडपट्टी काढली आणि एवढा वेळ प्रिन्सेसच्या घरी मी काय करीत होतो याबद्दल आश्चर्य व्यक्त केले. मी काहीही उत्तर न देता माझ्या खोलीत गेलो. एकाएकी मला खूप उदास वाटले. रडू आवरण्याची मी पराकाष्ठा केली... त्या शिलेदाराचा मला मत्सर वाटला होता!



## ५

प्रिन्सेस आश्वासनानुसार माझ्या आईला भेटायला आली, पण तिचा अनुकूल प्रभाव पडू शकला नाही. त्या भेटीच्या वेळी मी हजर नव्हतो, परंतु टेबलाशी बसून माझी आई माझ्या वडिलांना सांगत असलेली मी ऐकले की, प्रिन्सेस झासेकिना अगदी गावढळ वाटली होती, प्रिन्स सेर्गेईना तिच्या-बद्दल बोलण्याच्या विनंत्या करून करून तिने अगदी बेजार केले होते, तिच्यावर अनेक खटले चालले होते व तिच्या अनेक आर्थिक भानगडी होत्या आणि ती फार मोठी कारस्थानी बाई असावी. मात्र माझी आई पुढे म्हणाली की, दुसऱ्या दिवशी तिने प्रिन्सेसला आणि तिच्या मुलीला दुपारी जेवायला बोलाविले होते (मी जेव्हा 'तिच्या मुलीला' असे शब्द ऐकले तेव्हा माझ्या बशीवर आणखी खाली झुकलो), कारण काही झाले तरी ते शेजारी होते आणि त्यांचे नांव मोठे होते. ह्या सगळ्याला उत्तर म्हणून माझ्या वडिलांनी माझ्या आईला सांगितले की, ही बाई कोण होती हे त्यांना आता आठवले होते; त्यांच्या तरुणपणी त्यांना दिवंगत प्रिन्स झासेकिन माहीत होते. तो घरंदाज, पण वाया गेलेला मूर्ख माणूस होता. त्यांनी, पॅरिसमध्ये दीर्घ काळ वास्तव्य केल्यामुळे 'पॅरिसवासी' या नांवाने ते लोकांमध्ये ओळखले जात. एकेकाळी ते खूप श्रीमंत होते, पण जुगारात त्यांनी सर्व इस्टेट गमावली होती आणि नंतर काहीतरी कारणामुळे, बहुधा पैशासाठी — जरी त्यांना अधिक चांगली निवड करणे शक्य होते — ह्या ठिकाणी माझ्या वडिलांनी आपले थंड स्मित केले — एका सामान्य अधिकाऱ्याच्या मुलीशी लग्न केले आणि शेवटी सट्टाबाजारात सगळा पैसा गमावून सर्वनाश ओढवून घेतला.

"तिनं पैसे उसने मागायचा प्रयत्न केला नाही म्हणजे मिळवली!" माझी आई म्हणाली.

"तिनं तसं केलं तर मला आश्चर्य वाटणार नाही," माझे वडील शांत-पणे म्हणाले. "ती फ्रेंच बोलते?"

"फार वाईट."

"हं. पण काय फरक पडतो? मला वाटतं तू मला म्हणालीस की, तिच्या मुलीलाही तू निमंत्रण दिलं आहेस. कुणीतरी मला सांगितलं की, ती फार छान आणि शिकलेली मुलगी आहे."

"तसं असलं तर तिनं आपल्या आईचा कित्ता गिरवू नये!"

"किंवा वडलांचाही," माझ्या वडिलांनी प्रतिटोला मारला. "कारण तो सुशिक्षित होता, तरीही महामूर्ख होता."

माझ्या आईने उसासा टाकला आणि ती विचारात गढली. माझे वडील आणखी काही बोलले नाही. ह्या संपूर्ण संभाषणाच्या वेळी मला अत्यंत अवघडल्यासारखे झाले होते.

जेवणानंतर मी बागेत गेलो, पण बरोबर बंदूक घेतली नाही. "झासेकिना बागे"च्या जवळसुद्धा न जाण्याची मी स्वतःशी प्रतिज्ञा केली होती, पण कसलीतरी अनावर शक्ती मला तिकडे खेचून नेत होती आणि व्यर्थ नव्हे. कुंपणाच्या जवळ मी गेलो न गेलो तोच झिनैदाला मी पाहिले. यावेळी ती एकटी होती. हातात पुस्तक धरून ती मंदपणे पायवाटेवरून चालत होती. तिने मला पाहिले नाही.

मी तिला जवळ जवळ पुढे जाऊ दिले, पण वेळीच फेरविचार करून हलकेच खोकलो.

न थांबता ती मागे वळली, आपल्या गोल गवती टोपीची रुंद निळी फीत तिने केवळ बाजूला सारली व परत पानावर डोळे स्थिर करण्यापूर्वी माझ्याकडे पाहून एक मंद स्मित केले.

मी माझी टोपी काढली, उगीचच इकडेतिकडे रेंगाळत राहिलो आणि मोठ्या जड अंतःकरणाने तेथून निघालो. Que suis-je pour elle?* मी स्वतःशी फ्रेंचमध्ये म्हणालो. (कशाला ते देव जाणे!)

माझ्या पाठीमागे परिचित पावले वाजली. मी वळून पाहिले. माझे वडील आपल्या नेहमीच्या जलद, हलक्या चालीने माझ्या दिशेने येत होते.

"ती प्रिन्सेसची मुलगी होती काय?" त्यांनी विचारले.

"हो."

"तुझ्या ओळखीची आहे?"

"तिच्या आईच्या घरी आज सकाळी मी तिला पाहिलं."

माझे वडील थांबले, आपल्या टाचेवर एकदम गर्रदिशी वळले आणि परत गेले. जेव्हा ते झिनैदाच्या शेजारी पोहोचले तेव्हा त्यांनी अदबीने झुकून अभिवादन केले. तिनेही प्रति-अभिवादन केले, मात्र तिच्या चेहऱ्यावर आश्चर्य उमटले होते आणि तिने पुस्तक खाली केले. ते चालत गेले तेव्हा तिचे डोळे त्यांचा पाठलाग करीत असल्याचे मी पाहिले. माझे वडील नेहमी रुबाबदार पोषाख करीत. त्यांचा पोषाख साधाच असे, पण त्यात त्यांची स्वतःची विशिष्ट आवड दिसून येई. पण त्यांची आकृती एवढी डौलदार

---

* तिच्या दृष्टीने मी कोण? —अनु.



यापूर्वी कधीही दिसली नव्हती, अथवा त्यांच्या किंचित विरळ होत चाललेल्या लाटा-लाटांच्या केसांवर त्यांची राखी टोपी एवढी कधीच शोभली नव्हती.

मी झिनैदाच्या दिशेने काही पावले टाकली, पण तिने माझ्याकडे साधा दृष्टिक्षेपसुद्धा टाकला नाही आणि परत एकदा पुस्तक वर उचलून ती निघून गेली.

## ६

सबंध संध्याकाळ आणि दुसऱ्या दिवशीची सकाळ एक प्रकारच्या बधीर केविलवाणेपणात मी घालविली. काही काम करण्याच्या उद्देशाने कैदानोवचे पुस्तक हाती घेतल्याचे मला आठवते, पण त्या प्रख्यात क्रमिक पुस्तकातील सनावळ्या नजरेला दिसतच नव्हत्या. "ज्यूलीयस सीझर लढाईतील शौर्याबद्दल प्रसिद्ध होता," हे शब्द किमान दहा वेळा मी वाचले आणि त्यातून काही बोध होत नाही असे ध्यानात आल्यानंतर शेवटी पुस्तक ठेवून दिले. दुपारच्या जेवणाच्या जरा आधी मी माझ्या केसांना परत पोमेड चोपडले आणि परत एकदा वरचा अंगरखा चढवून आणि टाय बांधून सजलो.

"कशासाठी हे?" माझ्या आईने विचारले. "अजून तू विद्यापीठात शिकायला गेलेला नाहीस आणि परीक्षांमध्ये पास होतोस किंवा नाही कुणास ठाऊक! शिवाय, तुझं जाकीट नवीनच आहे, ते काय बाजूला फेकून द्यायचं?"

"पण आपल्याकडं जेवणाला पाहुणे येणार आहेत," घायकुतीला येत मी दबल्या आवाजात म्हणालो.

"मूर्खपणा! हे कसले पाहुणे!"

मुकाट आज्ञापालनाखेरीज दुसरे काहीही करणे शक्य नव्हते. मी जाकीट घातले, पण टाय मात्र सोडला नाही. जेवणापूर्वी अर्धा तास आधी प्रिन्सेस आणि तिची मुलगी यांचे आगमन झाले. म्हातारीने मला एव्हाना परिचित झालेला हिरवा पोषाख घातला होता व त्यावर पिवळी शाल ल्यायली होती. ज्वालांच्या रंगाच्या फितींची जुन्या धाटणीची टोपी तिच्या डोक्यावर होती. आपल्या प्रॉमिसरी नोटांच्या विषयाला तिने तात्काळ हात घातला, उसासे टाकले, आपल्या दारिद्र्याविषयी कुरकुर केली, पिरपिरली, पण किंचितही

न संकोचता वावरली. जणू स्वतःच्या घरात असल्याप्रमाणे तिने आवाज करीत तपकिरीचे बार भरले आणि खुर्चीत स्वैरपणे चुळबुळ केली. ती प्रिन्सेस होती हा विचार तिच्या मनाला शिवत नव्हता असे भासत होते. उलट झिनैदा मात्र अगदी नेटकी, आढ्यतेने, अस्सल प्रिन्सेसच्या थाटात बसली होती. तिच्या चेहऱ्यावर थंड कठोरपणा आणि गंभीरपणा उमटला होता. मी तिला ओळखलेच नाही. तिचे स्मित आणि कटाक्षही वेगळे होते. पण ह्या तिच्या नव्या अवतारातही माझ्या डोळ्यांना ती तेवढीच सुंदर भासत होती. तिने उघड्या गळ्याचा हलकासा फ्रॉक घातला होता व त्या फ्रॉकवर फिकट निळ्या सुरळ्यांचे नक्षीकाम होते. इंग्लिश धाटणीप्रमाणे तिच्या चेहऱ्याच्या दोन्ही बाजूंना केसांच्या लांब बटा रुळत होत्या. तिच्या मुद्रेवरील थंड भावाला ही केशरचना योग्य दिसत होती. जेवणाच्या वेळी माझे वडील तिच्या शेजारी बसले होते आणि आपल्या सुरेख व शांत अदबशीर वागणुकीने तिचे मनोरंजन करीत होते. अधूनमधून ते तिच्या चेहऱ्याकडे पहात आणि अधूनमधून ती त्यांच्याकडे पहात होती. त्या नजरांमध्ये काहीतरी विचित्र, काहीशी शत्रुत्वाची चमक जाणवत होती! त्यांचे संभाषण फ्रेंचमधून चालले होते. झिनैदाच्या शुद्ध उच्चारांमुळे मी चकित झाल्याचे मला आठवते. म्हातारी प्रिन्सेस आधी ज्या मोकळेपणाने वावरली होती त्याच मोकळेपणाने जेवणाच्या टेबलाशी वागत होती. ती अगदी सहज वागत होती, भरपूर खात होती आणि पदार्थांचे कौतुक करीत होती. माझ्या आईला अर्थातच तिचा कंटाळा आला होता व काहीशा खिन्न विमनस्क मनाने तिच्या प्रश्नांना उत्तरे देत होती. माझे वडील क्वचित प्रसंगी न जाणवेल अशा बेताने भुवया उंचावून आठ्या घालीत होते. माझ्या आईने झिनैदाचीही विशेष दखल घेतली नाही.

"गर्विष्ठ कारटी आहे," दुसऱ्या दिवशी माझी आई म्हणाली. "कसला गर्व करते कुणास ठाऊक! अवतार तर फ्रेंच कामकरणीचा!"

"याचा अर्थ फ्रेंच कामकरणीला तू आपल्या आयुष्यात कधी पाहिलेलं नाहीस!" माझ्या वडिलांनी शेरा मारला.

"त्याबद्दल देवाचे आभारच मानायला पाहिजेत!"

"देवाचे आभार तर खरेच... पण तशा परिस्थितीत त्यांच्यावर आपली मतं मांडायचा तुला अधिकार नाही."

झिनैदाने माझी किंचितही दखल घेतली नाही. जेवणानंतर लौकरच तिची आई जायला निघाली.



"तर मारिया निकोलायेवना आणि प्योत्र वासिल्येविच, तुमच्या आधारावर मी भिस्त ठेवू ना?" माझ्या पालकांना उद्देशून ती आपल्या उंच स्वरात म्हणाली. "काय करणार? बरे दिवस होते, पण आता ते निघून गेलेत. आणि ही मी अशी... बाईसाहेब," अप्रिय हास्य करीत ती पुढे म्हणाली. "खायला काही नसतं तेव्हा नुसत्या मानाला काही अर्थ नाही."

माझ्या वडिलांनी तिला अदबीने झुकून अभिवादन केले व निरोप द्यायला ते दारापर्यंत गेले. आखूड जाकीट घातलेला मी तेथे जमिनीवर नजर लावून मृत्युदंडाची शिक्षा झालेल्या अपराध्यासारखा उभा होतो. झिनैदाच्या वागणुकीमुळे मी छिन्नभिन्न झालो होतो. पण माझ्या जवळून जात असताना, पूर्वीच्या प्रेमळ भावाला नजरेत आणून जेव्हा ती जलदपणे पुटपुटली तेव्हा माझ्या आश्चर्याला पारावार उरला नाही: "आज संध्याकाळी आठ वाजता आमच्याकडं या, अगदी नक्की यायचं..."

मी केवळ थक्क होऊन हात उडविले... दरम्यान आपल्या डोक्यावर पांढरा रुमाल टाकून ती निघून गेली होती.

## ७

बरोब्बर आठ वाजता, वरचा अंगरखा चढवून आणि डोक्यावर केसांचा कोंबडा काढून मी प्रिन्सेसच्या जोड-इमारतीच्या दर्शनी खोलीत प्रवेश केला. तेथे बाकड्यावर बसलेला म्हातारा नोकर माझ्याकडे एक विषण्ण कटाक्ष टाकून नाइलाजाने उठला. दिवाणखान्यामधून आनंदी आवाज ऐकू येत होते. मी दार उघडले आणि चकित होऊन मागे सरलो. खोलीच्या मध्यभागी एका खुर्चीवर तरुण प्रिन्सेस आपल्या हातांमध्ये एक पुरुषी टोपी धरून उभी होती आणि पाच पुरुष त्या खुर्चीभोवती वेढा घालून उभे होते. त्या टोपीच्या आत हात घालण्याचा त्या सर्वांचा प्रयत्न चालला होता, तर टोपी त्यांच्या आवाक्यापलिकडे धरून तरुण प्रिन्सेस तिला हलवीत होती. मी तिच्या नजरेला पडताच ती ओरडली:

"थांबा, थांबा! आणखी एक नवा पाहुणा आलाय, त्यालाही तिकीट दिलं पाहिजे!" तिने हलकेच खुर्चीवरून खाली उडी मारली व माझ्या कोटाच्या बाहीला धरून म्हणाली, "चला, तिथं उभं राहू नका! Messieurs, मी तुमची ओळख करून देते. हे मस्ये वोल्देमार, आमच्या शेजाऱ्यांचे

चिरंजीव. आणि हे," ती माझ्याकडे वळली आणि एकापाठोपाठ एक अशी सर्व पाहुण्यांची नांवे तिने घेतली: "काऊंट मालेवस्की, डॉक्टर लूशिन, कवी मैदानोव, निवृत्त कप्तान निर्मात्स्की आणि शिलेदार बेलोवझोरोव – त्यांच्याशी तुमची याआधी भेट झालीय. तुमची एकमेकांशी मैत्री जुळेल अशी आशा आहे."

झुकून अभिवादन करायलासुद्धा मी अवघडलो होतो. डॉ. लूशिन म्हणजे बागेत ज्यांनी माझा क्रूर उपहास केला होता ते काळ्या केसांचे गृहस्थ, हे मी ओळखले, पण बाकी सर्व मला अनोळखी होते.

"काऊंट!" झिनैदा पुढे म्हणाली. "मस्ये वोल्देमार यांच्यासाठी तिकीट तयार करा."

"हे बरोबर नाही," किंचित पोलिश हेल काढीत काऊंटने आक्षेप घेतला. तो देखणा होता, त्याचा पोषाख रंगेल होता, वर्ण काळसर होता आणि त्याचे तपकिरी डोळे बोलके होते. त्याचे नाक पातळ आणि फिकट होते व अत्यंत छोट्या तोंडावर रेखीव छोटी मिशी होती. "आमच्या-बरोबर ते दंडाचा खेळ खेळलेले नाहीत."

"हे बरोबर नाही, बरोबर नाही!" बेलोवझोरोवने आणि निवृत्त कप्तान म्हणून माझ्याशी ज्याची ओळख करून देण्यात आली होती त्या माणसाने काऊंटची री ओढली. हा निवृत्त कप्तान सुमारे चाळीशीचा होता. त्याच्या चेहऱ्यावर देवीचे भयानक वण होते, त्याचे केस निग्रोप्रमाणे कुरळे होते, खांदे गोल आणि पाय फेंगडे होते व खांदफिती नसलेला, मोकळ्या बटणांचा लष्करी कोट त्याच्या अंगात होता.

"मी तुम्हाला सांगत्ये, त्यांना तिकीट लिहून द्या," प्रिन्सेस परत म्हणाली. "काय ही बंडखोरी? मस्ये वोल्देमार यांचा आपल्याबरोबर पहिलाच दिवस आहे आणि त्यांच्या बाबतीत नियम थोडा ढिला केला पाहिजे. आता तक्रारी बंद करा आणि मी सांगत्ये त्याप्रमाणं वागा!"

काऊंटने खांदे उडविले, पण आज्ञाधारकपणे आपले डोके झुकविले, अंगठ्या घातलेल्या पांढऱ्या बोटांमध्ये लेखणी धरली व कागदाचा कपटा फाडून त्यावर लिहायला आरंभ केला.

"मस्ये वोल्देमारना निदान नियम सांगण्याची तरी आम्हाला परवानगी चाल ना?" लूशिन यांनी खोचक आवाजात विचारले. "ते पुरते बावरून गेलेले दिसतात. हे पहा तरुण गृहस्थ, आम्ही दंडाचा खेळ खेळतोय. प्रिन्सेस-ना दंड झालाय आणि ज्याला सुदैवी तिकीट मिळेल त्याला प्रिन्सेसच्या हाताचं चुंबन घेता येईल. मी जे काही सांगितलं ते तुम्हाला समजलं?"



मी फक्त त्यांच्याकडे टक लावून पाहिले आणि स्तंभित झाल्याप्रमाणे तेथे उभा राहिलो. दरम्यान प्रिन्सेस परत खुर्चीवर उभी झाली व टोपी हलवू लागली. प्रत्येकजण टोपी धरायचा प्रयत्न करू लागला. मीसुद्धा त्यांच्यात सामील झालो.

"मैदानोव," एका उंच, रोड चेहऱ्याच्या, लघुदृष्टिदोषी डोळ्यांच्या आणि लांब काळ्या केसांच्या तरुणाला उद्देशून प्रिन्सेस म्हणाली, "तुम्ही कवी आहात, तेव्हा तुम्ही मनाचा मोठेपणा दाखवला पाहिजे. मस्ये वोल्दे-मारना तुमचं तिकीट द्या आणि त्यांचं स्वतःचंही द्या, म्हणजे त्यांना एका-ऐवजी दोनदा संधी मिळेल."

पण आपले लांब केस मागे उडवीत मैदानोवने मान हलवून नकार दिला. सरतेशेवटी मी टोपीत हात घातला आणि माझे तिकीट खेचले... उलगडून वाचले. त्यावर 'चुंबन घे' असे शब्द वाचल्यानंतर माझी मनःस्थिती काय झाली असेल त्याची कल्पना करा!

"चुंबन घे!" मी नकळत ओरडलो.

"शाब्बास! ते जिंकले!" प्रिन्सेस तात्काळ ओरडली. "मला खूप आनंद झाला!" खुर्चीवरून खाली उतरून तिने एवढ्या मधुर आणि शांत स्मिताने माझ्या डोळ्यांमध्ये पाहिले, की माझे काळीज आतल्या आत उलटे फिरल्यासारखा भास झाला.

"तुम्हाला आनंद झाला?" तिने विचारले.

"मी?" माझ्या तोंडून एवढा शब्द कसाबसा उमटला.

"तुमचं तिकीट मला विका," माझ्या कानांशी बेलोवझोरोव अचानक बरळला. "मी तुम्हाला शंभर रूबल देईन."

त्या शिलेदाराकडे मी एवढ्या तुच्छतेने कटाक्ष फेकला, की त्यामुळे खूष होऊन झिनैदाने टाळ्या वाजविल्या आणि लूशिन उद्गारले: "शाब्बास!"

"पण" लूशिन पुढे म्हणाले, "खेळाचा संचालक ह्या नात्यानं मी नियमांच्या काटेकोर पालनाचा आग्रह धरतो. मस्ये वोल्देमार, एका गुडघ्यावर खाली वाका! तो आमचा रिवाज आहे."

झिनैदा माझ्यासमोर उभी राहिली. जणू मला अधिक व्यवस्थित पाहता यावे म्हणून तिने आपले डोके एका बाजूला थोडे कलते ठेवले आणि अत्यंत गंभीरपणे आपला हात माझ्यापुढे धरला. माझी दृष्टी धुंदकारली. एका गुडघ्यावर वाकण्याऐवजी मी दोन्ही गुडघ्यांवर खाली पडलो आणि झिनैदाच्या

हाताच्या बोटांना माझ्या ओठांनी एवढ्या विचित्रपणे स्पर्श केला, की तिच्या एका नखाचा माझ्या नाकाच्या शेंड्यावर ओरखडा निघाला.

"ठीक," मला वर उठायला मदत करीत लूशिन म्हणाले.

दंडाचा खेळ पुढे चालू राहिला. झिनैदाने मला स्वतःजवळ बसवून ठेवले. कोणकोणत्या शिक्षा तिने शोधून काढल्या होत्या! एक शिक्षा तिच्या स्वतःच्याच वाट्याला आली. "पुतळा" म्हणून उभे राहण्याची शिक्षा तिला मिळाली होती. बेढब निर्मात्स्कीला तिने स्वतःचा चबुतरा बनविले. तिने त्याला पालथे झोपायला लावले आणि खांद्यांमध्ये डोके खुपसायला सांगितले. सतत हास्याचा खळखळाट चालू होता. प्रतिष्ठित उच्चवर्गीय घरात गंभीर एकाकी वातावरणात माझा प्रतिपाळ झालेला होता आणि ह्या अशा गोंधळ-गडबडीत, स्वच्छंद, बेभान मौज-मजेत, अनोळख्यांशी अतर्क्य जवळीकीत, माझे डोके फिरले तर त्यात नवल नव्हते! एखाद्या मद्यप्यासारखा मी धुंद बनलो होतो. खोलीतील इतर कुणाहीपेक्षा अधिक मोठ्याने हसायला आणि बोलायला मी सुरुवात केली. शेजारच्या खोलीत म्हातारी प्रिन्सेस एका अधिकाऱ्याबरोबर सल्ला-मसलत करीत बसली होती. माझ्या गोंगाटामुळे तीसुद्धा आमच्या खोलीत चौकशीला आली. पण मी एवढा मजेत होतो की, काहींच्या टोमण्यांकडे अथवा तिरस्काराच्या नजरांकडे मी पूर्ण दुर्लक्ष केले. झिनैदा सतत माझ्याकडे खास लक्ष देत होती आणि स्वतःपासून अजिबात दूर जाऊ देत नव्हती. मला एक शिक्षा मिळाली की, मी तिला अगदी चिकटून बसायचे, एकाच रेशमी रुमालात आम्हा दोघांची डोकी एकत्र बांधायची आणि मी तिला **माझे गपित** सांगायचे. आमची दोन डोकी अचानक जेव्हा एका सुगंधी, घुसमटणाऱ्या पारदर्शी धूसरतेत गुरफटली गेली, जेव्हा ह्या धूसरतेमधून तिचे मुलायम आणि निकट असलेले डोळे चमकले, तिचा उबदार श्वास जाणवला, तिचे दात चमकले व तिच्या केसांच्या टोकांनी मला गुदगुल्या केल्या, तेव्हाच्या माझ्या संवेदना मला आठवतात. मी गप्प होतो. तिने गूढ आणि लबाड स्मित केले. शेवटी कुजबुजली : "मग, कसं काय?" मी केवळ लाजलो, हसलो आणि मान फिरविली तेव्हा माझा श्वास घुसमटला. दंडाच्या खेळाचा आम्हाला लौकरच कंटाळा आला व दोरीच्या तुकड्याच्या एका खेळाकडे आम्ही वळलो. अनवधानाच्या भरात तिच्याकडून माझ्या नखांवर जोरात रपाटा बसला तेव्हा मला काय सुख झाले म्हणून सांगू! नंतर पुन्हा मी लोकर गोळा करण्याचा बहाणा केला आणि तिने मुद्दाम माझ्या हातांना स्पर्श करण्याचे टाळून मला चिडविले.



त्या संध्याकाळी आम्ही मजे-मजेचे खेळ खेळलो! पियानो वाजविला, गाणी म्हटली, नाचलो. जिप्सींच्या छावणीचे आम्ही नाटक केले, निर्मात्स्कीला अस्वलाचा पोषाख घालायला लावला व खारट पाणी प्यायला लावले. काऊंट मालेवस्कीने आम्हाला सर्व प्रकारच्या पत्त्यांच्या जादू दाखविल्या. शेवटी त्याने पत्ते पिसून डावाची पाने वाटली आणि स्वतःकडे सर्व एक्के घेऊन दाखविले. ह्या करामतीबद्दल लूशिनने त्याचे "मनःपूर्वक अभिनंदन" केले. मैदानोवने आपल्या 'मारेकरी' कवितेमधील काही ओळी म्हणून दाखविल्या (त्या काळी ही रोमँटिक चळवळ कळसाला पोहोचली होती). काळ्या वेष्टनात आणि लालभडक मोठ्या अक्षरांमध्ये हे पुस्तक प्रसिद्ध करण्याचा त्याचा इरादा होता. अधिकाऱ्याच्या गुडघ्यांच्या टोप्या आम्ही चोरल्या आणि त्याला त्या परत देण्यापूर्वी कझाचोक नाचायला लावले. म्हाताऱ्या वोनीफातीच्या डोक्यावर बाईची टोपी ठेवण्यात आली आणि झिनैदाने स्वतः-च्या डोक्यावर पुरुषी टोपी घातली... आम्ही केलेल्या सर्व गोष्टींचे **वर्णन** करणे अशक्य होईल. बहुतेक सारा वेळ बेलोवझोरोव मात्र एका कोपऱ्यात आठ्या घालून दुर्मुखला बसून राहिला होता... अधूनमधून त्याचे डोळे लालभडक बनायचे, त्याचा चेहरा संतापाने लालबुंद व्हायचा. असे भासायचे की, कोणत्याही क्षणी तो आमच्या अंगावर धावून येईल आणि ढलप्यांप्रमाणे आम्हाला उधळून टाकील. पण तरुण प्रिन्सेस बोटाने दटावून त्याच्याकडे नजर टाकायची आणि तो परत आपल्या कोपऱ्यात जाऊन बसायचा.

शेवटी आम्ही दमलो. म्हातारी प्रिन्सेस तिच्या भाषेत सांगायचे म्हणजे अजून खेळायला तयार होती आणि जरी ती थकली होती व विश्रांती घेऊ इच्छित होती, तरी गोंगाटाला तिची हरकत नव्हती. अकरा वाजल्यानंतर जेवण आले. जुने सुके चीझ आणि डुकराच्या खिम्याचे थंड समोसे जेवणात होते. मला ते फार आवडले. मदिरेची फक्त एकच बाटली होती आणि ती फार चमत्कारिक दिसत होती. तिचा रंग काळपट होता व फुगीर मान होती. खुद्द मदिरेला लाल रंगाची चव होती. मात्र कुणीच तिला हात लावला नाही. आनंदाने थकल्या-भागल्या मनःस्थितीत मी तेथून बाहेर पडलो. मला निरोप देताना झिनैदाने माझा हात घट्ट दाबला आणि पुन्हा एकदा आपले गूढ स्मित केले.

माझ्या तापल्या चेहऱ्यावर रात्रीचा जड, ओलसर निःश्वास जाणवला. वादळी वातावरण होते. आकाशामधून जाताना काळ्या मेघांचे आकार हळूहळू वाढत होते. त्यांच्या अस्पष्ट कडा सतत बदलत होत्या. झाडांच्या

काळ्या शेंड्यांमध्ये झुळूक अस्वस्थपणे थरथरली आणि दूर कुठेतरी, आकाशाच्या दुसऱ्या बाजूला, रागाचे पोकळ ध्वनी करीत मेघ स्वत:शीच गडगडल्याचा भास झाला.

मागील दाराने मी माझ्या खोलीत गेलो. माझा नोकर खाली झोपला होता आणि त्याला ओलांडून मला जावे लागले. तो जागा झाला, त्याने मला पाहिले आणि सांगितले की, माझी आई परत माझ्यावर नाराज झाली होती आणि मला घरी बोलावून आणणार होती, पण माझ्या वडिलांनी तिला तसे करू दिले नव्हते. (माझ्या आईला 'गुड-नाईट' केल्याशिवाय आणि तिचे आशीर्वाद घेतल्याशिवाय यापूर्वी कधीही मी झोपी गेलो नव्हतो). पण आता त्यावर काही इलाज नव्हता.

माझे मीच कपडे उतरवून झोपी जाईन असे नोकराला सांगून मी मेणबत्तीवर फुंकर मारली... पण ना मी कपडे उतरविले ना बिछान्यावर अंग टाकले.

मी खुर्चीत बसलो आणि भारल्यागत खूप वेळपर्यंत तसाच बसून राहिलो... मला जाणवणारी भावना नवी होती, अतिमधुर होती! काहीही हालचाल न करता मी स्तब्ध बसून होतो, भोवताली पहात होतो, खोल श्वास घेत होतो, कसलीतरी आठवण झाल्यामुळे अधूनमधून आवाज न करता खुदकन हसत होतो. अथवा मी प्रेमात पडलोय, प्रेम हे असे असते असा विचार येताच आतमध्ये थंड पडत होतो. झिनैदाचा चेहरा माझ्या डोळ्यांसमोर हळुवारपणे तरळत होता. तो कधीच दृष्टीआड होत नव्हता. तिचे ओठ गूढ स्मित करीत होते, आपल्या डोळ्यांच्या कोपऱ्यांमधून ती माझ्याकडे पहात होती : प्रश्नार्थक, विचारमग्न, प्रेमळ... मला निरोप देतेवेळी पहात होती तशी. सरतेशेवटी मी उठलो, अत्यंत काळजीपूर्वक माझ्या बिछान्याकडे गेलो. कपडे न उतरवताच मी उशीवर डोके टेकले. जणू माझ्यात काठोकाठ भरलेली भावना किंचित हालचालीने सांडेल अशी मला भीती वाटत होती...

मी बिछान्यावर आडवा झालो, पण डोळे मात्र मिटले नाही. लौकरच माझ्या लक्षात आले की, माझ्या खोलीत अंधुक पडछाया हळूच शिरत होत्या. मी उठून बसलो आणि खिडकीकडे पाहिले. तावदानांच्या गूढ पांढुरक्या पार्श्वभूमीवर तिची चौकट ठळकपणे उठून दिसत होती. "वादळ" मी स्वत:शी म्हणालो आणि खरेच ते वादळ होते. पण कुठेतरी दूर होते आणि इतके दूर होते की, मेघांचा गडगडाट माझ्या कानांपर्यंत पोहोचत नव्हता. फक्त आकाशात सतत विजांचा चमचमाट चालला होता. पण चमचमाटापेक्षा



त्या विजा थरथरत आणि आचके देत होत्या... मरणाऱ्या पक्ष्याच्या पंखाप्रमाणे. मी बिछान्यामधून उठलो आणि खिडकीपाशी जाऊन दिवस उजाडेपर्यंत उभा राहिलो...

विजा चमकणे एक क्षणभरही थांबले नव्हते. रशियन ग्रामनिवासी अशा रात्रीला "चिमणीची रात्र" म्हणतात. वाळूच्या मूक पट्ट्याकडे, न्येस्कूचनी बागेतील दाटलेल्या सावल्यांकडे आणि विजेच्या प्रत्येक मंद चकचकाटाबरोबर थरथरल्याचा भास होणाऱ्या दूरच्या इमारतींच्या फिकट पिवळ्या दर्शनी कमानींकडे टक लावून पहात राहिलो. विद्युल्लतांचा तो मूक, संयत चमचमाट जणू माझ्या मनातील गूढ, मूक ऊर्मींना प्रतिसाद देत होता. दिवसाचा आरंभ होत होता. पहाटेची लाली फुटू लागली होती. सूर्याच्या आगमनाबरोबर विजांची चमचम अधिक फिकट आणि तुटक बनली. त्यांच्या थरथरण्यामधील अंतर वाढत गेले आणि सरतेशेवटी आगामी दिवसाच्या शांत, गद्य प्रकाशात त्या अदृश्य झाल्या...

माझ्यातील विजाही नाहीशा झाल्या. मला कमालीचा थकवा जाणवत होता... स्तब्धता जाणवत होती... पण माझ्या मनावर झिनैदाची प्रतिमा मात्र दिमाखाने भिरभिरत राहिली. मात्र ती प्रतिमा आता शांत भासत होती. लव्हाळ्यांमधून अवतरणाऱ्या हंसाप्रमाणे तिने स्वत:ला असुंदर परिसरापासून अलग केले आणि मला झोप लागली तसा पुन्हा एकदा तिच्यासमोर मी भक्तीभावाने साष्टांग दंडवत घातला...

हे लीन भावनांनो, मंद ध्वनींनो, खोल खळबळलेल्या अंत:करणाच्या स्निग्धते आणि पवित्रते, पहिल्या प्रेमाच्या विरघळणाऱ्या आनंदा... आता तुम्ही कुठे आहात?

८

दुसऱ्या दिवशी सकाळी चहासाठी मी खाली आलो तेव्हा माझी आई मला रागे भरली, पण माझ्या अपेक्षेपेक्षा कमी. उलट मी संध्याकाळ कशी घालविली याची हकीकत तिने मला सांगायला लावली. बहुतेक तपशील गाळून आणि सर्व निवेदन शक्य तितके निष्पाप भासविण्याचा प्रयत्न करून मी थोडक्यात तिला वर्णन केले.

"पण तरीही ती माणसं तेवढीशी योग्य नाहीत," माझ्या आईने आपले मत प्रदर्शित केले. "आणि त्यांच्याभोवती घुटमळत राहणं तुझ्या

दृष्टीनं ठीक नाही. तुला परीक्षेची तयारी करायची आहे."

ह्या काही शब्दांपलिकडे माझ्या अभ्यासाविषयीच्या आईच्या चिंता जाणार नाहीत याची मला पूर्ण जाणीव असल्यामुळे तिच्याशी वाद घालण्याचा त्रास मी घेतला नाही. पण सकाळच्या चहानंतर, माझ्या वडिलांनी मला हाताला धरून बाहेर बागेत नेले आणि झासेकिनांच्या घरी मी पाहिलेल्या सगळ्या गोष्टी मला सांगायला लावल्या.

माझ्या वडिलांचा माझ्यावर विलक्षण प्रभाव होता आणि आमचे संबंध अगदीच विचित्र होते. माझ्या शिक्षणात ते काडीमात्र रस घेत नसत, पण माझ्या जिव्हारी लागेल असे कधीही काही बोलत नसत. माझ्या स्वातंत्र्याचा ते मान राखत आणि खरे सांगायचे तर माझ्याशी अदबीनेही वागत... पण मला त्यांनी कधीही फारसे जवळ जाऊ दिले नाही. माझे त्यांच्यावर प्रेम होते, त्यांचा मी चाहता होतो, मर्दानी गुणांचा मी त्यांना आदर्श मानीत होतो आणि मी त्यांची खरोखर पूजा केली असती, पण मला मुद्दाम हाताच्या अंतरावर दूर राखण्यात येत होते ही जाणीव मला सतत बोचत रहायची. जेव्हा त्यांना इच्छा होई तेव्हा अवघ्या एका शब्दाने, एका हालचालीने, माझ्यात असीम विश्वास निर्माण करण्याची त्यांच्यात कुवत होती. अशा क्षणांना माझे अंतःकरण फुलून जायचे आणि एखाद्या बुद्धिमान मित्रापाशी अथवा प्रेमळ शिक्षकापाशी बोलावे तसा मी बडबड करायचा... आणि नंतर तेवढ्याच आकस्मिकपणे ते मला बाजूला सारीत, आणि पुन्हा एकदा मला दूर केल्याची जाणीव होई – अत्यंत प्रेमळपणे आणि हळुवारपणे... पण तरीही ते दूर सारणे असे.

काही वेळा ते आनंदाने झपाटले जात आणि मग एखाद्या मुलासारखे माझ्याबरोबर खिदळत व बागडत (जोरदार शारीरिक हालचालींची त्यांना आवड होती); आणि एकदा – फक्त एकदा! – त्यांनी मला एवढे प्रेमाने कुरवाळले की, मी जवळजवळ रडलो... पण त्यांचा हा आनंद आणि हळुवार वागण्याच्या त्यांच्या लहरी, अशा दोन्ही गोष्टी कोणत्याही खुणा मागे न ठेवता नाहीशा होत व आमच्यामध्ये जे काही घडून गेलेले असायचे त्यावर भिस्त ठेवून भविष्याच्या कोणत्याही आशा धरणे मला शक्य होत नसे. ते सारे जणू स्वप्नासारखे भासे. काही वेळा माझ्या हृदयाचे जोरदार स्पंदन सुरू होईपर्यंत मी त्यांच्या बुद्धिमान, देखण्या, नितळ मुद्रेकडे टक लावून पहात रहायचा आणि सर्वस्वाने मी त्यांच्याकडे ओढला जायचा... आणि जणू काही माझ्या अंतर्मनात काय चाललेले असायचे हे जाणून माझा



गाल ते सहजपणे कुरवाळायचे व एक तर खोलीबाहेर जायचे आणि कसल्यातरी कामात गुंतून घ्यायचे अथवा एकदम गोठायचे. तसे गोठणे केवळ त्यांनाच जमत होते व मग मीही तात्काळ संकोचायचा आणि गोठायचा. माझ्या मूक, तरीही पूर्णतः हेतुप्रधान प्रार्थनांपायी त्यांच्या माझ्याबरोबर प्रेमळ वागण्याच्या लहरी कधीच निर्माण झाल्या नव्हत्या. त्या लहरी त्यांना अचानक येत.

नंतरच्या आयुष्यात जेव्हा मी माझ्या वडिलांच्या स्वभावाविषयी विचार केला तेव्हा मी अशा निष्कर्षाला आलो की, माझ्याशिवाय आणि आमच्या घरगुती जीवनाशिवाय विचार करायला त्यांच्यापाशी आणखी गोष्टी होत्या. त्यांचे हृदय पूर्णतः अगदी वेगळ्या गोष्टीत गुंतले होते आणि त्या गोष्टीचा ते मनमुराद आनंद उपभोगीत होते. एकदा ते मला म्हणाले होते: "तुला जे घेता येईल ते घे, पण स्वतः कधीही शरण जाऊ नकोस. पूर्णपणे स्वतःचे राहणे ह्यालाच आयुष्य म्हणतात." दुसऱ्या एका प्रसंगी, एक तरुण लोकशाहीवादी ह्या नात्याने मी त्यांच्या उपस्थितीत स्वातंत्र्याचा पुरस्कार करू लागलो (त्या दिवशी ते त्यांच्या एका "प्रेमळ" मनःस्थितीत होते व अशा वेळी त्यांच्यासमोर मन मानेल तसे एखाद्याला बोलता येत असे).

"स्वातंत्र्य," त्यांनी तो शब्द परत उच्चारला. "आणि माणसाला स्वातंत्र्य देणारी एकमेव गोष्ट कोणती तुला माहीत आहे?"

"कोणती?"

"निर्धार, त्याचा स्वतःचा निर्धार आणि हा निर्धार त्याला सामर्थ्यही देईल जे इतर कोणत्याही स्वातंत्र्यापेक्षा अधिक चांगलं असेल. तुला काय हवं ते जाणून घ्यायला शीक, म्हणजे तू स्वतंत्र राहशील आणि इतरांवर अधिकार गाजवू शकशील."

जगणे हे माझ्या वडिलांचे पहिले आणि आद्य उद्दिष्ट होते आणि ते जगले! कदाचित त्यांना आधीच जाणीव झाली असावी की, ज्याला ते "जीवन" म्हणत, त्याचा उपभोग फार काळ त्यांना घ्यायला मिळणार नाही. वयाच्या बेचाळीसाव्या वर्षी ते वारले.

झासेकिनांच्या घरी मी दिलेल्या भेटीचे पूर्ण वर्णन माझ्या वडिलांना मी सादर केले. बाकावर बसून आणि हातातील चाबकाच्या टोकाने वाळूमध्ये रेघोट्या काढीत काहीशा अर्धवट अवधानाने त्यांनी माझे बोलणे ऐकून घेतले. एक-दोनदा ते हसले; माझ्याकडे तीक्ष्ण, मिस्कील कटाक्ष त्यांनी टाकला; त्रोटक प्रश्न करून आणि शेरे मारून मला पुढे बोलायला प्रेरणा दिली. आरंभी झिनैदाचे नांवसुद्धा घ्यायचे धाडस मी केले नाही, पण

लौकरच माझा संयम सुटला आणि तिचे गुणगान मी करू लागलो. माझे वडील स्वतःशीच गालातल्या गालात हसत होते. मग विचारात गढून ते ताठ बसले आणि बाकावरून उठले.

मला आठवले की, घरातून बाहेर जाताना त्यांनी आपल्या घोड्यावर खोगीर चढवायची आज्ञा केली होती. ते निष्णात घोडेस्वार होते आणि श्री. रेरी यांनी आपले कसब दाखविण्याच्या खूप पूर्वी त्यांनी अत्यंत नाठाळ घोड्यांना वठणीवर आणले होते.[15]

"पापा, मी तुमच्याबरोबर येऊ?" मी विचारले होते.

"नको," ते म्हणाले होते आणि त्यांच्या मुद्रेवर नेहमीचा स्नेहल परकेपणा उमटला होता. "तुला पाहिजे तर एकटा जाऊ शकतोस; आणि मोतद्दाराला सांग, मी स्वारी करणार नाही."

माझ्याकडे पाठ फिरवून ते झरझर चालत निघून गेले. फाटकामधून बाहेर पडून अदृश्य होईपर्यंत मी त्यांचा डोळ्यांनी पाठलाग केला. कुंपणावरून त्यांची टोपी सरकत जात असलेली मला दिसली. नंतर ते झासेकिनांच्या घरात गेलेले मी पाहिले.

तेथे ते तासापेक्षा कमी वेळ होते. नंतर थेट शहरात गेले आणि घरी केवळ संध्याकाळी परतले.

दुपारच्या जेवणानंतर मी स्वतःच झासेकिनांच्या घरी गेलो. म्हातारी प्रिन्सेस एकटीच दिवाणखान्यात बसल्याचे मला आढळले. मला पाहताच तिने विणण्याच्या सुईच्या टोकाने आपल्या टोपीच्या आतमधील डोके खाजविले आणि तिच्या अर्जाची नक्कल मी करून देईन का, अशी अचानक मला विचारणा केली.

"आनंदानं," खुर्चीच्या टोकावर बसत मी उत्तरलो.

"मात्र अक्षर मोठं काढा," पूर्ण खरडलेला एक कागद माझ्या हाती ठेवीत प्रिन्सेस म्हणाली. "आणि आजच्या आज तुम्ही मला हे काम पूर्ण करून देऊ शकाल?"

"हो, मी आजच देईन."

शेजारच्या खोलीच्या दाराची किंचित फट उघडली आणि तिच्यामधून झिनैदाचा फिकट, विचारमग्न चेहरा डोकावला. तिने आपले केस निष्काळजीपणे मागे विंचरले होते. टपोऱ्या थंड डोळ्यांनी तिने माझ्याकडे कटाक्ष टाकला व शांतपणे दार बंद केले.

"झीना! ए झीना!" तिच्या आईने हाक मारली. पण झीनाने उत्तर



दिले नाही. त्या म्हातारीचा अर्ज मी माझ्यासोबत घरी घेऊन गेलो आणि संध्याकाळचा सगळा वेळ त्या अर्जाची नक्कल करण्यात घालविला.

९

माझा "नाद" त्या दिवसापासून सुरू झाला. नोकरीची कारकीर्द सुरू करणाऱ्या माणसासारख्या माझ्या भावना असाव्यात असे मला वाटते. मी इतःपर नुसता तरुण पोरगा राहिलो नव्हतो; मी प्रेमिक बनलो होतो. त्या दिवसापासून माझा नाद सुरू झाला असे मी म्हटले, पण त्याचबरोबर त्या दिवसापासून माझ्या यातनाही सुरू झाल्या, असे मी पुढे म्हटले पाहिजे. झिनैदापासून दूर असताना मी झुरायचा. कशावरही माझे लक्ष केंद्रित होईना. सबंध दिवसभर मी फक्त तिचाच विचार करीत बसायचा... तिच्यापासून मी दूर असताना झुरायचा, पण तिच्या संगतीतही मला शांतता लाभायची नाही. मला मत्सर वाटायचा, स्वतःच्या नगण्यतेची मला जाणीव होती. मी मूर्खासारखा उदास बसायचा आणि तितक्याच मूर्खपणे तिच्यासमोर लोटांगणे घालायचा. पण एक दुर्दम्य शक्ती मला तिच्याकडे खेचायची आणि दरवेळी, तिच्या खोलीचा उंबरठा ओलांडताना हटकून माझ्या हृदयात हर्षभरली कळ उमटायची. झिनैदाला लौकरच समजून चुकले की, मी तिच्या प्रेमात पडलो होतो व खरोखरीच ही गोष्ट लपवून ठेवण्याचा विचारच माझ्या मनाला शिवला नाही. माझ्या ह्या प्रेमबाधेची ती थट्टा करायची. आलटून पालटून मला मूर्ख बनवायची, माझे लाड करायची, माझा छळ करायची. दुसऱ्या व्यक्तीच्या अत्युच्च आनंदाचे अथवा गहन दुःखाचे संपूर्ण आणि निर्विवाद कारण असणे, एकमेव उगमस्थान असणे ही खूप मधुर बाब आहे व झिनैदाला मी तिच्या हातातल्या मेणासारखा सापडलो होतो. पण मी काही एकटाच तिच्या प्रेमात नव्हतो. तिच्या घराला भेट देणारे सर्व पुरुष तिच्यासाठी तळमळत होते आणि ती सर्वांना आपल्या पायांशी बांधून होती. त्यांच्यात आळीपाळीने आशा आणि गैरसमज निर्माण करण्यात तिला मजा वाटायची. आपल्या करंगळीभोवती त्यांना फिरविण्यात तिला आनंद वाटायचा (लोकांना एकमेकांवर आपटणे असा शब्दप्रयोग ती ह्याला वापरायची), पण तिला प्रतिकार करण्याचे कुणाच्याही मनात येत नसे. सारेजण आनंदाने तिच्या इच्छेपुढे मान तुकवीत. तिच्या जोमदार आणि सुंदर व्यक्तिमत्वात धूर्तपणाचा आणि अविचारीपणाचा, कृत्रिमतेचा आणि साधेपणाचा, सौम्यतेचा आणि पाशवी वृत्तींचा मुग्ध संयोग घडला होता. तिच्या प्रत्येक उक्तीत

आणि कृतीत, तिच्या सर्व हालचालींमध्ये, एक सूक्ष्म, हलकासा डौल वावरताना भासायचा. सर्वत्र एक विशिष्ट ताकद खेळत असायची. आणि सतत बदलणारी तिची मुद्राही सारखी खेळताना भासायची. अगदी निमिषार्धात तो उपहास, विचारीपणा आणि जोम व्यक्त करायची. वारा सुटलेल्या सूर्यप्रकाशित दिवशी ढगांच्या सावल्या जशा हलकेपणाने व वेगाने एकमेकींचा पाठलाग करताना दिसतात त्याप्रमाणे, तिच्या डोळ्यांमधून आणि ओठांवर अत्यंत परस्परविरोधी भावनांची पाठशिवण चाललेली दिसायची.

तिच्या प्रत्येक चाहत्याची तिला गरज होती. "माझा पशू" किंवा काही वेळा केवळ "माझा" असे ती ज्याला म्हणायची तो बेलोवझोरोव तिच्यासाठी पेटत्या ज्वालांमध्ये घुसायला तयार होता. आपल्या बौद्धिक क्षमतेवर अथवा इतर गुणांवर त्याचा विश्वास नव्हता, पण तरीही तो तिला सतत लग्नाची मागणी घालीत होता व इतर लोक तितकेसे याबाबतीत गंभीर नाहीत असे सुचवीत होता. तिच्या काव्यविषयक ओढीला मैदानोवकडून प्रतिसाद मिळत होता. बहुतेक लेखकांप्रमाणे जरी तो स्वभावाने थंड होता, तरी तो तिचा चाहता होता असे तिला – आणि स्वतःलाही – प्रामाणिकपणे पटवून देत होता, काव्याच्या अखंड लोंढ्यांमधून तिचे गुण गात होता. ही कवने तो तिला म्हणून दाखवी तेव्हा त्या उन्मादात एकाच वेळी खोटेपणा व प्रामाणिकपणा यांचा संयोग झालेला असायचा. आणि त्याच्याबद्दल काही प्रमाणात सहानुभूती वाटूनही ती त्याला काहीशा उपहासाने वागवायची. त्याच्यावर तिचा फारसा विश्वास नव्हता आणि त्याचे काव्याचे महापूर ऐकून झाले म्हणजे ती त्याला पूष्कीनच्या कविता म्हणायला लावायची. तिच्या भाषेत सांगायचे तर वातावरण स्वच्छ करण्यासाठी! चमत्कारिक स्वभावाचा डॉक्टर लूशिन, ज्याचे शब्द दुष्टपणाचे भासत, तिला अधिक चांगले समजून घ्यायचा आणि इतर सर्वांपेक्षा तिच्यावर जास्त प्रेम करायचा. मात्र तिच्या तोंडावर आणि तिच्या माघारीही तो तिची निंदा करायचा. ती त्याचा आदर राखायची, पण मुळीच दया दाखवीत नसे. तोसुद्धा तिच्या मुठीत होता हे त्याला दाखवून देण्यात तिला एक दुष्ट समाधान मिळायचे. "मी छचोर आहे, मला हृदय नाही, स्वभावानंच मी नटी आहे," एकदा माझ्यासमोर ती त्याला म्हणाली होती. "ठीक आहे तर! आता तुमचा हात माझ्यासमोर धरा आणि मी त्याच्यात टाचणी खुपसते; ह्या तरुण माणसासमोर तुमचा अपमान होईल, तुम्हाला वेदना होईल आणि तरीही मस्ये सत्यवादी, तुम्ही हसण्याचा चांगुलपणा दाखवाल!" लूशिनचा चेहरा



शरमेने लाल झाला, त्याने तोंड फिरविले आणि आपला ओठ चावला, पण शेवटी तिच्यासमोर आपला हात धरला. तिने त्या हातावर टाचणी खुपसली आणि तो चक्क हसला... आणि त्याच्या हाताच्या मांसात खोलवर टाचणी खुपशीत तीसुद्धा हसली. असे करताना ती त्याच्या डोळ्यांमध्ये रोखून पहात होती आणि तिच्या चेहऱ्यापासून आपली नजर दूर वळविण्याचा त्याचा व्यर्थ प्रयत्न चालला होता...

काऊंट मालेवस्कीबरोबरचे तिचे संबंध मात्र मला मुळीच उलगडत नव्हते. तो देखणा होता, दक्ष आणि बुद्धिमान होता, पण त्याच्यात काहीतरी संशयास्पद होते, खोटे होते आणि माझ्यासारख्या सोळा वर्षांच्या पोरालासुद्धा ते जाणवत होते. झिनैदाच्या हे कसे लक्षात येत नव्हते याचे मला सतत नवल वाटायचे. पण कोण जाणे – कदाचित हा खोटेपणा तिच्या ध्यानात आला होता व तरीसुद्धा तिला पर्वा वाटत नव्हती! तिचा चुकीचा प्रतिपाळ, तिच्या विचित्र ओळखी आणि सवयी, तिच्या आईची सतत उपस्थिती, घरामधील दारिद्र्य आणि अव्यवस्था, ह्या मुलीला लाभलेल्या स्वातंत्र्यापासून ते तिच्या भोवतालच्या लोकांवर तिचे वर्चस्व असल्याच्या जाणीवेपर्यंतच्या सर्व गोष्टी... यांमुळे तिच्या स्वभावात अर्धवट तिरस्कारयुक्त दुर्लक्षाची आणि नैतिक दुष्टाव्याची छटा निर्माण झाली होती. त्यांच्या घरात काहीही घडले, मग घरात साखर संपली असे वोनीफाती येऊन सांगो, अथवा कुचाळकीची एखादी घाणेरडी बातमी उजेडात येवो, अथवा तिचे पाहुणे एकमेकांमध्ये भांडणे करोत, ती फक्त आपल्या कुरळ्या बटांना झटका द्यायची आणि म्हणायची: "मूर्खपणा!" स्वतःच्या मनावर ह्या गोष्टींचा परिणाम करून घ्यायची तिची इच्छा नव्हती.

एखाद्या धूर्त कोल्ह्यासारखा मालेवस्की जेव्हा जेव्हा हळूच तिच्यापाशी जायचा, तिच्या खुर्चीमागे उभे राहून लाळ घोटू लागायचा, आत्मतुष्टपणे आणि हांजीखोरपणे गालातल्या गालात हसून तिच्या कानांमध्ये हळूच कुजबुजू लागायचा तेव्हा तेव्हा ती आपल्या हातांची घडी घालून त्याच्याकडे गंभीरपणे बघू लागायची, स्मित करून माना डोलवू लागायची, तेव्हा मात्र माझे रक्त उकळू लागायचे.

"काऊंट मालेवस्कींचं स्वागत तुम्हाला का करावसं वाटतं?" एकदा मी तिला विचारले.

"त्यांची छोटी मिशी इतकी गोड आहे," ती उत्तरली. "पण अर्थात तुम्हाला ते समजायचं नाही."

"मी त्यांच्या प्रेमात पडलेय असं तर तुम्हाला वाटत नाही ना?"

दुसऱ्या एका वेळी ती मला म्हणाली. "छे:, अशा माणसावर मी कधीही प्रेम करू शकणार नाही, ज्या माणसाकडं मी तुच्छतेनं पाहते! माझा निर्धार मोडू शकेल अशी ताकद असलेला कुणीतरी मला हवाय! पण असा माणूस मला कधीच भेटणार नाही, देवाच्या कृपेनं! कुणाच्याही पंजात मी सापडणार नाही, अगदी मुळीच नाही!"

"म्हणजे तुम्ही कधीच कुणावर प्रेम करणार नाही?"

"मग तुमच्याबद्दल काय? तुमच्यावर मी प्रेम करत नाही?" आपल्या हातमोजाचा माझ्या नाकावर हलकासा आघात करीत तिने टोमणा मारला.

खरेच, माझी चेष्टा करून झिनैदा स्वत:ची खूप करमणूक करून घ्यायची. तीन आठवडेपर्यंत मी रोज तिला भेटत होतो आणि त्या काळात तिने माझे आयुष्य अगदी केविलवाणे बनवून टाकले होते. आमच्या घरी ती फारशी येत नसे आणि त्याचे मला दु:खही नव्हते, कारण जेव्हा जेव्हा ती यायची, तेव्हा तेव्हा खानदानी दिमाखात वावरायची व मला लाजल्यासारखे व्हायचे. माझ्या आईसमोर माझे खरे रूप उघडकीला येईल म्हणून मी घाबरत होतो. माझ्या आईला झिनैदा मुळीच आवडत नव्हती आणि आमच्याकडे ती कडक नजरेने लक्ष ठेवून वागायची. पण वडिलांना मी तितकासा भीत नव्हतो. ते माझ्याकडे दुर्लक्ष करीत आणि तिच्याशी क्वचित बोलत. पण जेव्हा ते बोलत तेव्हा नेहमी चतुराईचे आणि अर्थपूर्ण बोलत. अभ्यास आणि वाचन मी सोडून दिले. माळरानातील भटकंती आणि घोड्यावरच्या रपेटी यांनाही मी रजा दिली. पाय बांधलेल्या किड्यासारखा मी माझ्या आवडत्या जोड-इमारतीभोवती घोटाळू लागलो. जर शक्य असते तर मी तेथेच कायमचा राहिलो असतो... पण माझी आई नापसंती व्यक्त करायची आणि काहीवेळा खुद्द झिनैदाच मला पिटाळून लावायची. जेव्हा ती असे करायची तेव्हा मी स्वत:ला माझ्या खोलीत कोंडून घेत असे, अथवा बागेच्या अगदी दूरच्या टोकाला जाऊन बसत असे. तेथे झाडांची कलमे राखण्याच्या एका उंच, विटांच्या बांधणीच्या इमारतीच्या ढासळलेल्या भिंतीवर चढायचा आणि रस्त्याकडे तोंड करून, पाय लोंबते सोडून, मूढ नजरेने तासन्तास समोर पहात भिंतीवर बसून रहायचा. धुळकट खाजकुयल्यांवर पांढरी फुलपाखरे सुस्तपणे बागडत होती. जवळच्या फुटक्या विटेवर एक नखरेबाज छोटी चिमणी अलगद बसली आणि पुन:पुन्हा मान वळवून व शेपटी फुलवून जोरजोराने चिवचिवत राहिली. अजूनही माझ्याकडे संशयाने पाहणारे कावळे भोजाच्या झाडाच्या भुंड्या शेंड्यावर बसून अधूनमधून ओरडत होते.



भोजाच्या पातळ फांद्यांमधून उन्हाचा आणि वाऱ्याचा खेळ चालला होता. काहीवेळा दोन्स्कोय मठाच्या घंटांचा धीरगंभीर नाद माझ्या कानांपर्यंत पोहोचायचा आणि एक अवर्णनीय संवेदना माझ्या हृदयात काठोकाठ दाटून यायची. दु:ख आणि आनंद, भावी काळाचे चिंतायुक्त विचार, जीवनाची आसक्ती आणि जीवनाची भीती... ह्या सगळ्या गोष्टी त्या संवेदनेत सामावलेल्या असायच्या. पण त्या वेळी मला यातले काहीही समजत नव्हते आणि माझ्या अंतर्मनात जे काही शिजत होते त्याचे नेमके नांव सांगणे मला शक्य होत नव्हते. आणि जर ते सांगायचा प्रयत्न केलाच असता, तर त्या सर्व गोष्टींना एकच नांव मला सापडले असते – झिनैदा.

आणि एखाद्या मांजराने उंदराला खेळवावे त्याप्रमाणे झिनैदा मला सारा वेळ खेळवीत होती. ती माझ्याशी चावटपणाने वागायची आणि मी तात्काळ विरघळायचा, माझ्या मनात खळबळ सुरू व्हायची. किंवा अचानक ती मला दूर सारायची आणि तिच्या जवळ जाण्याची अथवा तिच्याकडे नजर उचलून पाहण्याचीसुद्धा मला हिंमत व्हायची नाही.

मला आठवते की, ओळीने अनेक दिवसपर्यंत माझ्याशी ती दुराव्याने वागली होती. मी अगदी हताश बनलो होतो आणि घाबरत घाबरत तिच्या घरात प्रवेश करून म्हाताऱ्या प्रिन्सेसच्या जवळ राहण्याचा प्रयत्न करीत होतो. त्या काळात म्हातारी खूप वाईट मन:स्थितीत होती तरीही. तिची आर्थिक परिस्थिती खूपच ढासळली होती आणि स्थानिक पोलीस ठाण्यावर दोनदा जाऊन आपल्या परिस्थितीचा खुलासा करणे तिला भाग पडले होते.

एकदा, परिचित बागेच्या कुंपणाजवळून जात असताना झिनैदा माझ्या दृष्टीला पडली. आपल्या हातांवर मागे रेलून ती गवतावर स्तब्ध बसली होती. मी गुपचूप दूर निघून जाण्याचा बहाणा केला, पण तिने अचानक मान वर केली व करडेपणाने मला खूण केली. मी जमिनीला खिळलो. तिच्या खुणेचा नक्की अर्थ मला समजला नव्हता. तिने पुन्हा खूण केली. मी तावडतोब कुंपणावरून उडी मारली आणि धावत आनंदाने तिच्यापाशी गेलो. पण तिने मला नजरेनेच थोपविले व जेथे ती बसली होती तेथून दोन पावले अंतरावरील वाटेवर माझे लक्ष वेधले. गोंधळून आणि ओशाळून मी वाटेच्या कडेशी खाली वाकलो. तिचा चेहरा एवढा फिकट पडला होता, तिच्या मुद्रेवरील प्रत्येक अवयवामधून एवढे तीव्र दु:ख उमटत होते, एवढा प्रचंड थकवा जाणवत होता की, माझे अंत:करण अगदी पिळवटले. न राहवून मी विचारले:

"काय झालं?"

झिनैदाने आपला हात लांब केला, गवताचे एक पाते उपटले व त्याला चघळून स्वतःपासून दूर फेकले.

"तुमचं माझ्यावर खूप प्रेम आहे ना?" शेवटी तिने मला विचारले. "आहे की नाही?"

मी उत्तर दिले नाही. तसे करण्याची गरज नव्हती.

"होय," अजूनही माझ्याकडे पहात ती म्हणाली, "तुमचं माझ्यावर प्रेम आहे हे मला माहीत आहे. तेच डोळे," विचारमग्न होत आणि आपल्या हातांनी स्वतःचा चेहरा झाकून घेत ती पुढे म्हणाली. "मला सगळ्याचा वीट आलाय," ती अस्फुट म्हणाली. "जगाच्या टोकाला जाण्याची माझी इच्छा आहे. मला इतःपर हे सहन होत नाही, सोसवत नाही... काय वाढून ठेवलंय माझ्या नशीबात?... अरे देवा, किती जड जातंय मला, किती कठीण!"

"कशामुळं?" घाबरटपणे मी विचारले.

उत्तरादाखल झिनैदाने केवळ आपले खांदे उडविले. तसाच गुडघ्यांवर वाकून मी तिच्या गहिऱ्या दुःखाकडे टक लावून पहात होतो. तिने उच्चारलेला प्रत्येक शब्द माझ्या काळजात रुतून बसला होता. तिला दुःखमुक्त करण्यासाठी त्या क्षणी मी स्वतःच्या प्राणांचेही बलिदान केले असते. मी तिच्याकडे पाहिले, पण कशामुळे ती एवढी दुःखी झाली होती याचे कारण मला अद्याप उमजेना. अनावर दुःखापायी ती बाहेर बागेत कशी धावली असेल आणि नेम लागलेल्या पक्ष्याप्रमाणे गवतावर धाडकन कशी कोसळली असेल, ह्याचे चित्र मी कल्पनेने स्वतःसमोर उभे केले. सभोवार सर्वत्र हिरवेगार होते, प्रकाशाने उजळलेले होते. वाऱ्याची झुळूक पानांना हलवीत होती, अधूनमधून झिनैदाच्या डोक्यावरील रासबेरीच्या लांब फांदीला झोके देत होती.

दूरवर कबूतरांचे घुमणे चालू होते आणि विरळ गवतावर मधमाशा खूप खालून उडत गुणगुणत होत्या. वरती निळे आकाश प्रेमळ भासत होते, पण मला मात्र फार उदास वाटत होते...

"मला कुठलीतरी कविता म्हणून दाखवा," हाताच्या एका कोपरावर स्वतःच्या भार पेलीत झिनैदा हळूच मला म्हणाली. "तुम्ही कविता म्हणता तेव्हा मला ऐकायला खूप आवडतं. तुम्ही गाता हे खरं, पण हरकत नाही, ते फार उमदं वाटतं. 'जॉर्जियाच्या डोंगरात' म्हणा. मात्र आधी खाली बसा."



मी खाली बसलो व 'जॉर्जियाच्या डोंगरात' म्हणून दाखविली.

"'प्रेम न करणं त्याच्या ताकदीबाहेरचं आहे', [16] झिनैदाने शेवटची ओळ परत म्हटली. "एवढ्यासाठी आपल्याला कविता आवडते. जे वास्तवात नसतं त्याबद्दल ती आपल्याला सांगते आणि अशा गोष्टींना केवळ अधिक चांगलंच नव्हे, तर वास्तव गोष्टींपेक्षा जास्त वास्तव भासवते... 'प्रेम न करणं त्याच्या ताकदीबाहेरचं आहे'—खरंच, इच्छा आहे, पण जमत नाही!" पुन्हा ती गप्प झाली आणि नंतर अचानक दचकून उभी राहिली. "चला! मैदानोव तिथं माझ्या आईबरोबर बसले आहेत. आपली कविता घेऊन ते माझ्यापाशी आले आणि मी बाहेर निघून गेले. त्यांचीही मनःस्थिती चांगली नाही... पण इलाज नाही! एक दिवस तुम्हाला सारं समजेल... आत्ता मात्र माझ्यावर रागावू नका!"

माझा हात पटकन दाबून झिनैदा पुढे धावली. जोड-इमारतीकडे आम्ही एकत्रच परत गेलो. नुकतीच प्रसिद्ध झालेली 'मारेकरी' ही आपली कविता मैदानोव वाचून दाखवू लागला, पण माझे तिकडे लक्ष नव्हते. रटाळ आवाजात तो आपल्या लांबलचक ओळी रेकत होता, घसरगाडीच्या खळखळणाऱ्या घंटांप्रमाणे ताल पोकळ आणि मोठमोठ्यांदा बडवीत होता; दरम्यान झिनैदाचा चेहरा मी बारकाईने न्याहाळीत होतो आणि माझ्यापाशी ती जे काही म्हणाली होती त्याचा रहस्यभेद करू पहात होतो.

> किंवा तुझ्या छुप्या प्रतिस्पर्ध्याने
> अचानक मात तर केली नाही ना?

मैदानोव अचानक गेंगाण्या आवाजात ओरडला आणि माझे डोळे झिनैदाच्या डोळ्यांना भिडले. तिने आपले डोळे खाली झुकविले आणि तिचा चेहरा किंचित आरक्त बनला. तिची लाली पाहताच भीतीने मी बधीर झालो. पूर्वी मी मत्सरी होतो, पण ती कुणाच्या प्रेमात पडेल हा विचार कधीही मनाला शिवला नव्हता. "देवा! ती प्रेमात पडलीय!"

## १०

माझा खरा छळ तेव्हा सुरू झाला. विचार करून करून माझ्या मेंदूचा भुगा झाला. जमेल तेवढ्या प्रमाणात मी झिनैदावर सतत पाळत ठेवू लागलो.

तिच्यात काहीतरी बदल घडून आला होता व ते स्पष्ट दिसत होते. आता ती एकटीच दूर फिरायला जात असे. काहीवेळा ती आपल्या पाहुण्यांना भेटायला बाहेरसुद्धा येत नसे आणि तास-तासभर स्वतःच्या खोलीत कोंडून घेत असे. तिच्या स्वभावाशी हे विसंगत होते. एकाएकी माझी बुद्धी तीव्र बनली अथवा निदान मला तसे वाटू लागले. "तो तर नव्हे? किंवा आता तो नव्हे?" मी सतत स्वतःला प्रश्न विचारीत होतो. तिच्या एका चाहत्यापासून दुसऱ्या चाहत्याकडे माझे संशय अधीरपणे पालटत होते. काऊंट मालेवस्की (जरी ही कबुली झिनैदापाशी देताना मी लाजलो असतो) माझ्या दृष्टीने सर्वात धोकेबाज होता.

माझे वागणे निःसंशयपणे अचूक नव्हते आणि माझे रहस्यमय वागणे कुणाच्याही सहज लक्षात येत होते. डॉ. लूशिन यांनी लौकरच मला आरपार पाहिले. पण अलिकडे त्यांच्यातसुद्धा खूप बदल झाला होता. ते वाळले होते आणि त्यांचे हसणे नेहमीसारखेच चालू असले, तरी त्या हसण्यात आता पोकळपणा जाणवत होता, कडवटपणा जाणवत होता व ते हसणे तुटक बनले होते. त्यांच्या पूर्वीच्या किंचित उपहासाच्या आणि खोट्या दुष्टाव्याच्या जागी आता भेदरट त्रासिकपणा आला होता व त्याला दाबून टाकणे त्यांना जमत नव्हते.

"तरुण गृहस्था, इथं तुम्ही वारंवार येण्याचं कारण काय?" झासेकिनांच्या दिवाणखान्यात एकदा आम्ही दोघेच असताना त्यांनी मला प्रश्न केला. (तरुण प्रिन्सेस अद्याप फिरून परतली नव्हती, पण तिची आई पोटमाळ्यावर मोलकरणीला कर्कश्य आवाजात रागे भरीत असलेली आम्हाला ऐकू येत होते.) "तुमच्या ह्या तरुण वयात अभ्यास करायचा असतो, काम करायचं असतं. पण तुम्ही हे काय चालवलंय?"

"मी घरी काम करत नाही हे तुम्हाला कसं कळणार?" आढ्यतेचा आव आणून मी उत्तरलो, पण माझा गोंधळ मला लपविता आला नाही.

"कुठलं करताय काम! छेः, छेः, तुम्ही सध्या कामाचा विचार करत नाही. तुमच्याशी मी वाद घालणार नाही... तुमच्या वयात ते स्वाभाविकच आहे. पण तुमची निवड दुर्दैवी आहे. हे घर कोणत्या प्रकारचं आहे हे तुम्हाला दिसत नाही का?"

"मला तुमचं बोलणं समजत नाही," मी म्हणालो.

"समजत नाही? हे आणखीच वाईट! तुम्हाला सावध करणं मी माझं कर्तव्य समजतो. माझ्यासारखे जुनाट ब्रह्मचारी इथं आले तर ते ठीक आहे.



आम्ही पक्के मुरलेले आहोत. आम्हाला कशानंच इजा होत नाही. पण तुमची कातडी अजून नाजुक आहे. माझ्यावर विश्वास ठेवा, इथली हवा तुम्हाला अपायकारक आहे. तुम्हाला संसर्गाची बाधा होईल."

"म्हणजे?"

"म्हणजे काय ते सांगतो. तुमची सध्याची अवस्था निकोप आहे असं वाटतं तुम्हाला? हे योग्य आहे? सध्या ज्यातून तुम्ही जात आहात ते तुमच्या दृष्टीनं हिताचं आहे? काय?"

"कशामधून जातोय मी?" मी विचारले. मात्र अंतःकरणाच्या खोल कप्प्यांमध्ये मला जाणवले की डॉक्टरांचे म्हणणे बरोबर होते.

"अरे तरुण माणसा, भल्या माणसा!" शब्दांवर जोर देत, जणू काही त्यांच्यामध्ये माझ्या दृष्टीने काहीतरी भयंकर अपमानकारक सामावले होते, डॉक्टर पुढे बोलू लागले. "मुत्सद्देगिरी हा तुमचा प्रांत नव्हे. तुमचा चेहरा अद्याप तुमच्या अंतःकरणाचा आरसा आहे आणि देवाचे त्याबद्दल आभार मानले पाहिजेत. पण बोलून उपयोग काय? मीसुद्धा इथं घोटाळत राहिलो नसतो जर मी..." (डॉक्टरांनी आपले दात रगडले) "जर मी स्वतः तसाच मूर्ख नसतो. मात्र एका गोष्टीचं मला नवल वाटतं. तुमच्यासारखा बुद्धिमान माणूस इथं जे काही चाललंय त्याबद्दल अज्ञ कसा राहतो?"

"काय चाललंय?" तात्काळ सावध होऊन मी विचारले.

डॉक्टरांनी माझ्याकडे सहानुभूतीचा विचित्र कटाक्ष टाकला.

"मी तरी थोरच," ते जणू स्वतःशी उद्गारले. "त्याला हे सांगणं फार आवश्यक आहे. एका शब्दात म्हणजे," आपला आवाज उंचावून ते म्हणाले, "मी पुन्हा सांगतो: इथलं वातावरण तुमच्या दृष्टीनं फार वाईट आहे. तुम्हाला ते आवडत असेल, पण म्हणून काय झालं? उष्णतागृहात छान वास येतो, पण तिथं कायमचं राहणं शक्य नाही. माझं ऐका, परत हातात कैदानोव घ्या!"

त्याच क्षणाला म्हातारी प्रिन्सेस दिवाणखान्यात आली आणि डॉक्टरांपाशी तिने दातदुखीची तक्रार केली. नंतर झिनैदा अवतरली.

"पहा," तिची आई म्हणाली, "चांगली खरडपट्टी काढा हिची, डॉक्टर. सारा दिवस बर्फाचं पाणी पिते. तिची छाती कमकुवत आहे, तेव्हा असं वागणं बरं का?"

"कशाला करता असं?" डॉक्टरनी विचारले.

"काय अपाय होईल मला त्यामुळं?"

"अपाय? तुम्हाला थंडीची बाधा होईल आणि मराल!"

"खरंच? अगदी खरं? तर मग माझी काही हरकत नाही."

"अस्सं आहे तर," डॉक्टर पुटपुटले.

तिची आई खोलीमधून निघून गेली.

"होय, असं आहे," झिनैदा म्हणाली. "सरतेशेवटी, आयुष्य एवढं मजेचं आहे? जरा सभोवती पहा... काय चांगलं आहे? मला काहीच समजत नाही, जाणवत नाही असं वाटतं का तुम्हाला? बर्फाचं पाणी पिण्यामुळं मला आनंद मिळतो आणि तुम्ही येऊन गंभीरपणं खात्री देता की, माझं आयुष्य मी धोक्यात घालू नये! क्षणाच्या आनंदासाठी असं करू नये! मग सुखाबाबत तर बोलायलाच नको."

"अस्सं," लूशिन म्हणाले. "लहरी आणि स्वातंत्र्य... ह्या शब्दांमध्ये तुमची गोळाबेरीज आहे... तुमचा संपूर्ण स्वभाव त्यांच्यात सामावलाय."

झिनैदा कसनुशी हसली.

"प्रिय डॉक्टर, तुम्ही काळाच्या मागं आहात. तुमचं निरीक्षण वाईट आहे, तुम्ही कालबाह्य आहात. तुमचा चष्मा डोळ्यांवर चढवा, म्हणजे तुम्हाला दिसेल की आता मी लहरींच्या मनःस्थितीत नाही. तुम्हा सर्वांना मूर्ख बनविण्यात आणि त्या बदल्यात स्वतः मूर्ख ठरण्यात मनस्वी करमणूक आहे, पण स्वातंत्र्याबाबतीत... मस्ये वोल्देमार," आपले छोटे पाऊल आपटीत ती अचानक म्हणाली, "उगीच चेहरा लांब करू नका! माझी करुणा केलेली मला सहन होत नाही!" ती वेगाने चालत निघून गेली.

"तरुण गृहस्था, वातावरण तुमच्या दृष्टीनं फार वाईट आहे, फार वाईट!" डॉ. लूशिन परत म्हणाले.

## ११

त्या संध्याकाळी झासेकिनांकडे नेहमीचे पाहुणे जमले. त्यांच्यात मीसुद्धा होतो.

संभाषण मैदानोवच्या कवितेकडे वळले. झिनैदाने त्याच्या कवितेची मनःपूर्वक प्रशंसा केली.

"पण मी सांगू का?" ती म्हणाली. "जर मी कवी असते, तर अगदी वेगळे विषय निवडले असते. कदाचित हा वेडगळपणा असेल, पण माझ्या



डोक्यात अगदी विचित्र विचार येतात, विशेषतः मला जेव्हा झोप येत नाही, पहाट फुटण्याच्या जरा आधी, सारं आकाश गुलाबी आणि राखाडी रंगांचं बनतं तेव्हा... उदाहरणार्थ, मी... पण तुम्ही मला हसणार तर नाही ना?"

"नाही, नाही!" एकाच वेळी आम्ही सगळे ओरडलो.

"मी वर्णन केलं असतं," हातांची घडी घालून दूर नजर लावीत ती बोलू लागली, "रात्रीच्या वेळी संथ प्रवाहावरून जाणाऱ्या एका मोठ्या होडीत तरुण मुलींचा जथा बसलाय. चंद्र प्रकाशतोय, त्या सगळ्याजणींचे पोषाख शुभ्र आहेत, त्यांच्या गळ्यांमध्ये पांढऱ्या फुलांच्या माळा आहेत आणि त्या स्तोत्रासारखं काहीतरी गाणं म्हणताहेत."

"समजलं, समजलं, बोला पुढं," हेल काढीत स्वप्नाळूपणे मैदानोव म्हणाला.

"अचानक – किनाऱ्यावरून गोंधळ, हसणं, मशाली आणि खंजिरीचा आवाज... बॅकसपंथीयांचा एक घोळका धावत, गात, ओरडत येतोय. श्रीमान कवी, हे चित्र रंगवणं तुमचं काम... फक्त मशाली खूप लालभडक दिसाव्यात आणि त्यांच्यातून भयानक धूर निघावा... बॅकसपंथीयांचे डोळे त्यांच्या माळांखाली चमकताहेत आणि माळा काळ्या आहेत. व्याघ्रचामरं, प्याले आणि सोनं, खूप खूप सोनं विसरू नका."

"सोनं कुठं ठेवणार?" आपल्या सरळ केसांना झटका देत, आपल्या नाकपुड्या फुगवीत मैदानोवने विचारले.

"कुठं? त्यांच्या खांद्यांवर, हातांवर, पायांवर, सगळीकडं! जुन्या काळी बायका सोन्याची कडी पायात घालत म्हणे! बॅकसपंथी होडीतल्या मुलींना साद घालतात. मुली गाणं म्हणायच्या थांबल्यात – त्या पुढं म्हणू शकत नाहीत – पण त्या स्तब्ध बसल्यात. किनाऱ्याकडं त्यांची होडी तरंगत येते. आणि अचानक त्यांच्यातली एक मुलगी हळूच उठते... इथं कुशल वर्णन केलं पाहिजे: तिची हळूच उठण्याची तऱ्हा, चांदणं, तिच्या सख्यांमध्ये माजलेली घबराट... होडीच्या एका बाजूनं ती बाहेर उतरते, बॅकसपंथी तिच्याभोवती गर्दी करतात आणि तिला रात्रीमध्ये, काळोखात घेऊन जातात... मला धूर दिसतोय, धुराचे लोट, गोंधळ... आणि त्यातून बॅकसपंथीयांच्या किंचाळ्या आणि किनाऱ्यावर पडलेली तिची शुभ्र माला..."

झिनैदा बोलायची थांबली. "ती प्रेमात पडलीय!" मी स्वतःशी परत म्हणालो.

"बस्स, एवढंच?" मैदानोवने विचारले.

"एवढंच!" ती उत्तरली.

"हा दीर्घ कवितेचा विषय नाही," आढ्यतेने तो म्हणाला, "पण भावगीतासाठी मी हा विषय वापरीन."

"रोमँटिक शैलीत?" मालेवस्कीने विचारले.

"अर्थात रोमँटिक शैलीत, बायरनच्या[17]."

"मला बायरनपेक्षा विक्तर ह्यूगो जास्त आवडतो," तरुण उमरावाने बेफिकीरपणे ठोकून दिले, "तो जास्त रंजक आहे."

"विक्तर ह्यूगो पहिल्या दर्जाचा लेखक आहे," मैदानोव म्हणाला, "आणि माझा मित्र तोन्कोशेयेवनं आपल्या 'एल-त्रोवादोर'[18] स्पॅनिश कादंबरीत–"

"ते उलट्या प्रश्नचिन्हांचं पुस्तक?" झिनैदाने मध्येच थांबवून विचारले.

"होय, ती स्पॅनिश पद्धत आहे. मी सांगणार होतो की तोन्कोशेयेव–"

"आता तुम्ही परत अभिजात साहित्य आणि सौंदर्यवादी साहित्य यांच्याबद्दलचा वाद सुरू करणार," झिनैदा परत एकदा त्याला अडवीत म्हणाली. "त्यापेक्षा काहीतरी खेळू..."

"दंडाचा खेळ?" लूशिनने विचारले.

"नको, मला त्याचा वीट आलाय. उपमांचा खेळ खेळू..." (हा खेळ झिनैदाने स्वतः शोधून काढला होता. एक वस्तू निवडली जायची आणि प्रत्येकाने तिला उपमा शोधून काढायची. ज्याची उपमा सर्वात चांगली ठरेल त्याला बक्षीस मिळायचे.)

ती खिडकीपाशी चालत गेली. सूर्य नुकताच मावळला होता. आकाशात खूप उंचपर्यंत लांब किरमिजी ढग पसरले होते.

"ते ढग कसे आहेत?" झिनैदाने विचारले आणि कुणाच्या उत्तराची वाट न पाहता म्हणाली: "मला ते क्लिओपात्राच्या सोनेरी पडावाच्या किरमिजी शिडांसारखे वाटतात, अँथनीच्या भेटीला ती निघाली होती तेव्हा.[19] मैदानोव, अगदी अलिकडंच त्याबद्दल तुम्ही मला सांगितलं होतं, आठवतं?"

आणि आम्ही सर्वांनी 'हॅम्लेट' मधील पोलोनियसप्रमाणे तेथल्या तेथे ठरविले की, ढग खरोखरीच त्या शिडांप्रमाणे भासत होते आणि त्याहून चांगली उपमा दुसऱ्या कुणालाही सुचणे शक्य नव्हते.

"अँथनीचं वय तेव्हा काय होतं?" झिनैदाने विचारले.

"कदाचित खूप तरुण असावा," मालेवस्की उत्तरला.



"होय, तो तरुण होता," मैदानोव ठामपणे म्हणाला.

"माफ करा," लूशिन म्हणाले, "तो चाळीसपेक्षा मोठा होता."

"चाळीसपेक्षा मोठा!" लूशिनकडे झटकन कटाक्ष फेकीत झिनैदा उद्‌गारली.

त्यानंतर लौकरच मी घरी गेलो. "ती प्रेमात पडलीय," नकळतपणे मी पुटपुटलो, "पण ती कुणाच्या प्रेमात पडलीय?"

## १२

दिवस उलटले. झिनैदा अधिकच विचित्र आणि अनाकलनीय बनली. एकदा मी तिच्या खोलीत गेलो तेव्हा ती वेताच्या खुर्चीवर बसली होती आणि आपले डोके तिने टेबलाच्या कठीण कडेशी गच्च दाबून धरले होते. ती सरळ बसली तेव्हा तिचे गाल अश्रूंनी भिजलेले मी पाहिले.

"अरेच्चा! तुम्ही होय," दुष्ट स्मित करीत ती म्हणाली. "इकडं या!"

मी तिच्यापाशी गेलो. तिने माझ्या डोक्यावर आपला हात ठेवला आणि माझ्या केसांची बट पकडून ती पिरगाळू लागली.

"दुखतंय!" शेवटी मी म्हणालो.

"अस्सं, दुखतं का? आणि मला यातना होत नाहीत असं वाटतं?" ती म्हणाली.

"अगबाई!" माझ्या केसांचा झुबका मुळांपासून उपटलेला पाहून अचानक ती ओरडली. "पहा, मी काय केलं! बिच्चारे मस्ये वोल्देमार!"

केसांचा तो पुंजका काळजीपूर्वक सरळ करीत तिने आपल्या बोटाभोवती गुंडाळला व त्याची अंगठी बनविली.

"तुमचे केस माझ्या लॉकेटमध्ये ठेवून ते लॉकेट मी गळ्यात घालत जाईन," ती म्हणाली. तिचे डोळे आसवांनी चमकत होते. "कदाचित त्यामुळं तुम्हाला थोडं समाधान लाभेल... आता जा!"

मी परतलो तेव्हा घरात अप्रिय प्रसंग घडला होता. माझी आई माझ्या वडिलांपाशी कसलातरी खुलासा विचारीत होती. कशाबद्दलतरी ती त्यांना दोष देत होती आणि ते नेहमीप्रमाणे थंड व सभ्य वागले, थोड्याच वेळात बाहेर निघून गेले. माझी आई काय म्हणाली ते मी ऐकू शकलो नाही, शिवाय मला इतर गोष्टींचा विचार करायचा होता. मला एवढेच आठवते

की, त्या खुलाशानंतर तिने मला स्वतःच्या खोलीत बोलावून घेतले आणि प्रिन्सेसच्या घरी होणाऱ्या माझ्या सतत वाऱ्यांबद्दल नाखुषी व्यक्त केली. तिच्या मते प्रिन्सेस ही "काय वाट्टेल ते करू शकणारी बाई" होती. मी आईच्या हाताचे चुंबन घेतले (संभाषणाला पूर्णविराम द्यायचा असला म्हणजे मी नेहमी ह्याचा अवलंब करीत असे) आणि माझ्या खोलीत निघून गेलो. झिनैदाच्या अश्रूंनी मी पुरता गोंधळून गेलो होतो. त्यांचा अर्थ काय लावायचा हे मला माहीत नव्हते आणि मी स्वतःच रडण्याच्या बेतात होतो. माझ्या वयाला सोळा वर्षे झाली असली तरी अद्याप मी केवळ मूलच होतो. इतःपर मालेवस्कीचा विचार मी करीत नव्हतो. मात्र दर दिवसागणिक बेलोवझोरोव जास्त जास्त जंगली बनत होता, लांडग्याने कोकराकडे पहावे तसा तुकतुकीत काऊंटकडे टक लावून पहात होता. खरे म्हणजे मी कशाचाच आणि कुणाचाच विचार करीत नव्हतो. तर्क करण्यात मी गुंतून गेलो आणि एकांतस्थळे निवडू लागलो. मोडक्या हरित-गृहाविषयी मला विशेष आकर्षण निर्माण झाले. त्याच्या उंच भिंतीवर मी चढायचा आणि स्वतःची खूप कीव करीत दुःखी-कष्टी मनाने बसून रहायचा. ह्या उदास संवेदना मला खूप आवडायच्या! त्यांच्यात मी मनसोक्त डुंबायचा!

एक दिवस मी भिंतीवर बसून दूरवर पहात होतो आणि चर्चच्या घंटेचे टोल ऐकत होतो... अचानक माझी त्वचा थरथरल्याची मला जाणीव झाली... ती वाऱ्याची झुळूक नव्हती आणि शहाराही नव्हता. कुणीतरी माझ्या नजीक असल्याची ती भावना होती... मी खाली पाहिले. फिकट राखी रंगाचा फ्रॉक घालून आणि एका खांद्यावर गुलाबी छत्री टाकून खाली रस्त्यावरून झिनैदा लगबगीने चालली होती. तिनेही मला पाहिले आणि आपल्या गवती टोपीची कडा वर फिरवीत व आपले मखमाली डोळे माझ्यावर उंचावीत ती थांबली.

"तिथं वर काय करताय?" विचित्र स्मित करीत तिने विचारले. "ए!" ती म्हणाली. "तुमच्या प्रेमाची मला नेहमी खात्री देता... ठीक, जर तुमचं खरंच माझ्यावर प्रेम असेल तर रस्त्यावर उडी मारा!"

तिच्या तोंडून हे शब्द बाहेर पडले न पडले तोच मागून धक्का दिल्याप्रमाणे मी खाली उडालो. भिंत सुमारे चौदा फूट उंच होती. मी पायांवर खाली पडलो, पण धक्का एवढा जबरदस्त होता की, मला उभे राहता आले नाही आणि क्षणभर शुद्ध हरपून मी खाली कोसळलो. मला परत शुद्ध आली तेव्हा डोळे न उघडताही झिनैदाचे सान्निध्य मला जाणवले.



"माझ्या लाडक्या!" माझ्यावर ओणवे होऊन ती म्हणत होती. तिच्या आवाजात चिंता आणि प्रेमळपणा होता. "असं कसं वागलास, असं कसं माझं ऐकलंस? तुला ठाऊक आहे, माझं प्रेम आहे तुझ्यावर! .. उभा रहा रे!"

तिच्या वक्षःस्थळांची धपधप मला अगदी नजीक जाणवत होती, तिच्या हातांचा स्पर्श डोक्याला जाणवत होता आणि मग... आह्... आणि मग! .. तिच्या मुलायम, ताज्या ओठांनी माझ्या चेहऱ्यांवर चुंबनांचा वर्षाव केला... त्यांनी माझ्या ओठांनासुद्धा स्पर्श केला... पण माझ्या मुद्रेवरून झिनैदाच्या एव्हाना ध्यानात आले असावे की, इतःपर मी बेशुद्धीत नव्हतो, कारण एकदम उठत ती म्हणाली:

"चला, उठा बघू, वात्रट कुठले! तिथं धुळीत लोळू नका वेड्यासारखं!"

मी उभा राहिलो.

"माझी छत्री द्या," झिनैदा म्हणाली, "पाहिलंत, कुठं टाकली मी! आणि असं माझ्याकडं पाहू नका... काय हा वेडेपणा! लागलं का तुम्हाला? मला वाटतं तुम्हाला खाजकुयल्या टोचल्या! बघू नका ना असं माझ्याकडं! अगबाई, ह्याला काहीच समजत नाही, हा काहीच उत्तर देत नाही," जणू स्वतःशीच ती पुढे म्हणाली. "मस्ये वोल्देमार, आता घरी जा, तुमचे कपडे स्वच्छ झाडा, आणि माझा पाठलाग करू नका. नाही तर मी रागावेन आणि पुन्हा कध्धी..."

वाक्य पूर्ण न करताच झपझप चालत ती निघून गेली. मी रस्त्याच्या कडेशी बसून राहिलो, कारण माझे गुडघे अजून थरथर कापत होते. माझ्या हातांना खाजकुयल्या टोचल्या होत्या, माझी पाठ दुखत होती, माझे डोके गरगरत होते, पण त्यावेळेसारखे भाग्य मला परत कधीही अनुभवायला मिळाले नाही. सर्व अवयवांमधून गोड वेदना गेल्यासारखे मला वाटले. शेवटी उन्मादाने उड्या मारून आणि किंचाळ्या फोडून त्या सुखाला मी वाट करून दिली. खरेच, मी अजून लहान मूल होतो.

## १३

तो सबंध दिवस मला खूप अभिमान आणि आनंद वाटत होता. झिनैदाच्या चुंबनांच्या संवेदना माझ्या चेहऱ्याला अजून इतक्या ठळकपणे जाणवत होत्या, तिने उच्चारलेला प्रत्येक शब्द मी इतक्या थरथरत्या उन्मादाने



8—2188

आठवत होतो, अचानक मला लाभलेल्या भाग्याची आठवण मनात एवढ्या प्रेमाने जपत होतो की, ह्या सर्व नव्या संवेदनांचे उगमस्थान असणाऱ्या झिनैदाला परत भेटायलासुद्धा मी घाबरत होतो. नशीबाकडून आणखी मागण्यासारखे काही नाही, जणू "शेवटचा एक श्वास घेऊन मरण्याची" माझी वेळ झाली होती, असे मला वाटत होते. पण दुसऱ्या दिवशी मात्र मी जेव्हा झिनैदाच्या घराकडे निघालो तेव्हा मला कमालीचे अवघडल्यासारखे वाटत होते. आपण रहस्य राखू शकतो हे दाखविण्याच्या इच्छेने प्रेरित होऊन मी नम्र अदबीने वागण्याचा प्रयत्न केला, पण त्या बुरख्याखाली माझे अवघडलेपण लपविण्याचा यत्न व्यर्थ ठरला. झिनैदाने नेहमीप्रमाणे माझे स्वागत केले, कोणतीही भावनावेगाची खूण तिने दाखविली नाही. फक्त तिने बोटाने मला दटावले आणि मला कुठे खरचटले होते का, अशी पृच्छा केली. माझी अदवशीरता आणि गूढता क्षणात पळाली व त्याबरोबरच माझे अवघडलेपणही. अर्थात मी विशेष देखाव्याची अपेक्षा केली नव्हती, पण तरीही झिनैदाच्या शांत स्वागताचा माझ्यावर थंड पाण्याच्या तुषारस्नाना-सारखा परिणाम घडला. तिच्या दृष्टीने मी केवळ एक मूलच होतो हे माझ्या ध्यानात आले आणि मी कमालीचा खिन्न झालो! झिनैदा येरझाऱ्या घालीत होती, ज्या ज्या वेळी माझ्यावर तिची नजर पडायची त्या त्या वेळी एक ओझरते स्मित करीत होती, पण विचार मात्र कुठेतरी दूर भरकटत होते हे मला दिसत होते. "कालच्या प्रकरणाचा मी स्वतःच उल्लेख करावा का?" मी विचार केला. "माझ्या संशयांना कायमचा पूर्णविराम देण्यासाठी ती एवढ्या घाईघाईनं कुठं निघाली होती ते विचारावं का?.." पण तो विचार मी झटकून टाकला आणि खोलीच्या एका अंधाऱ्या कोपऱ्यात मुकाट बसून राहिलो.

बेलोवझोरोव आत आला आणि त्याला पाहून मला खरोखरीचा आनंद झाला.

"तुम्हाला घेऊन जाऊ शकेल असा स्वारीचा शांत घोडा अजून मला सापडला नाही," तो उग्र स्वरात म्हणाला. "फ्रैताग[20] मला एक घोडा देतोय, पण त्याचा स्वभाव कसा आहे मला माहीत नाही. मला भीती वाटते."

"कशाची तुम्हाला भीती वाटते?" झिनैदाने विचारले. "ह्याचा कृपा करून खुलासा कराल काय?"

"कशाला भिती? अहो, तुम्हाला नीट घोड्यावर बसता येत नाही.



समजा, काही घडलं तुम्हाला तर? देव करो आणि तसं न होवो! आणि अचानक ही घोड्यावरून रपेट करण्याची इच्छा का झाली?"

"तो तुमचा प्रश्न नाही मस्ये पशू. पण अर्थात मी प्योत्र वासिल्येविचना विचारू शकेन... (माझ्या वडिलांचे नांव होते प्योत्र वासिल्येविच. जणू काही तिला मदत करण्यास ते सज्ज होते अशा विश्वासाने ज्या सहज आणि बेफिकीरपणे तिने ते उच्चारले त्याचे मला आश्चर्य वाटले.)

"अस्सं," बेलोवझोरोव म्हणाला, "म्हणजे त्यांच्याबरोबर तुम्हाला घोड्यावरून रपेट करायला जायचंय!"

"मी त्यांच्याबरोबर जाईन अथवा दुसऱ्या कुणाबरोबर जाईन! त्याच्याशी तुमचा काहीही संबंध नाही. पण तुमच्याबरोबर मात्र नक्की नाही."

"माझ्याबरोबर नाही," बेलोवझोरोवने तिची पुनरुक्ती केली. "जशी तुमची इच्छा. ठीक आहे, मी तुमच्यासाठी एक घोडा मिळवून देतो."

"आणि तो घोडाच असेल, गाय नसेल ह्याची खात्री करून घ्या. मला दौड करायचीय हे मी तुम्हाला आधीच सांगत्येय."

"दौडा खुशाल! मालेवस्कीबरोबर जाणार आहात वाटतं?"

"शूर सैनिकमहाराज, मी मालेवस्कीबरोबर का जाऊ नये? हं, हं आता थंड व्हा! असं रागीट डोळ्यांनी पाहू नका! तुम्हालासुद्धा मी घेऊन जाईन. आता मालेवस्कीची किंमत माझ्या दृष्टीनं काय आहे हे तुम्हाला ठाऊक आहे, छीः!" तिने आपल्या मानेला झटका दिला.

"माझ्या सांत्वनासाठी केवळ तुम्ही असं म्हणताय," बेलोवझोरोव कुरकुरला.

झिनैदाने त्याच्याकडे किलकिल्या डोळ्यांनी पाहिले.

"आणि तुमचं त्यामुळं सांत्वन झालं? अहो... सैनिकमहाराज..!" दुसरा शब्द जणू सुचेना अशा रीतीने तिने शेवटचा शब्द उच्चारला. "आणि मस्ये वोल्देमार, तुम्ही येणार आमच्याबरोबर?"

"मी... मला खूप माणसांबरोबर रहायला आवडत नाही..." माझे डोळे वर उचलण्याची हिंमत न करता मी पुटपुटलो.

"अस्सं, तुम्हाला गुजगोष्टी करायला आवडतात? ठीक, प्रत्येकाची आपली आपली आवड!" तिने सुस्कारा टाकला. "तर मग बेलोवझोरोव, तुम्ही जा आणि काय करता येतं ते पहा. मला उद्या घोडा हवाय!"

"आणि पैसे कुठून येणार?" म्हाताऱ्या प्रिन्सेसने मध्येच विचारले.

झिनैदाने कपाळाला आठ्या घातल्या.

"मी तुमच्यापाशी ते मागणार नाही. बेलोवझोरोव माझ्यावर विश्वास ठेवतील."

"विश्वास... विश्वास," म्हातारी प्रिन्सेस दात आवळून म्हणाली आणि अचानक उंच स्वरात ओरडली:

"दून्याष्का!"

"आईसाहेब, मी तुम्हाला भेट म्हणून धंटा दिलीय!" मुलीने आपल्या आईची कानउघाडणी केली.

"दून्याष्का!" म्हातारी परत ओरडली.

बेलोवझोरोवने रजा घेतली. मी त्याच्याबरोबर निघून गेलो... मला थांबवून धरण्याचा प्रयत्न झिनैदाने केला नाही.

## १४

दुसऱ्या दिवशी सकाळी मी लौकर उठलो, झाडाची फांदी तोडून एक छडी बनविली आणि गावाच्या वेशीबाहेर फिरायला गेलो. मी स्वतःला बजाविले की, मी बाहेर जाईन व माझ्या दुःखाला झटकून टाकण्याचा प्रयत्न करीन. दिवस छान होता. स्वच्छ ऊन पडले होते आणि फारसे गरम होत नव्हते. जमिनीवरून ताज्या हवेच्या झुळुका वाहात होत्या, झाडा-झुडुपांना डोलवीत होत्या, पण कशालाही विस्कटून टाकीत नव्हत्या. टेकड्यांवरून आणि रायांमधून खूप वेळपर्यंत मी भटकलो. मला आनंदी वाटले नाही, कारण दुःखाला स्वतःला वाहून टाकण्याच्या निश्चयाने मी घराबाहेर पडलो होतो. पण यौवनाचा, सुंदर वातावरणाचा, ताज्या हवेचा, जलद चालण्याच्या सुखाचा, दाट गवतावर एकटेच पडून राहण्याच्या चैनीचा – ह्या सर्व गोष्टींचा परिणाम घडलाच होता. त्या अविस्मरणीय शब्दांच्या, त्या चुंबनांच्या विचाराने पुन्हा एकदा माझे मन व्यापून गेले होते. माझ्यापाशी निर्धार आणि धैर्य ह्या दोन्ही गोष्टी होत्या हे झिनैदा नाकबूल करू शकणार नव्हती, ह्या विचाराने मला समाधान वाटत होते... "माझ्यापेक्षा ती इतरांना अधिक पसंत करते... ठीक आहे! पण इतर फक्त आपण काय करू ते बोलतात, तर मी प्रत्यक्ष वागलो! आणि तिच्यासाठी मी काय करू शकीन याच्या तुलनेत जे केलं ते काहीच नव्हे..."

माझ्या कल्पनांच्या भराऱ्यांना मी मोकाट सोडले. शत्रूंच्या तावडीतून मी तिला वाचवतोय, मी नखशिखांत रक्ताने माखलोय, अंधारकोठडीतून



तिला मुक्त करतोय, तिच्या पायांपाशी मी मरतोय, अशी मी कल्पना केली. दिवाणखान्यात भिंतीवर टांगलेल्या चित्राची, मालेक-आदेल मातिल्दाला घोड्यावरून घेऊन जात असलेल्या चित्राची, मला आठवण झाली.[21] मग माझे लक्ष एका मोठ्या ठिपकेवाल्या सुतारपक्ष्याकडे गेले. एका सडपातळ भोजवृक्षाच्या बुंध्यावर तो धडपडत चढला आणि एखादा डबल-बास वाजविणारा वादक आपल्या वाद्यामागे बसून दोन्ही बाजूंना डोकावून पाहतो त्याप्रमाणे त्या सुतारपक्ष्याने प्रथम एका बाजूला व नंतर दुसऱ्या बाजूला घाबरून डोकावून पाहिले.

नंतर मी गायलो 'ते नव्हते हिम पांढरे...' त्यातून पुढे मला त्यावेळी लोकप्रिय असलेल्या एका पोवाड्याची आठवण झाली: 'वाट तुझी मी पाहतो, पश्चिमवारा झुळझुळतो;'[22] नंतर खोम्याकोवच्या शोकांतिकेमधील येर्माकने[23] ताऱ्यांना उद्देशून केलेले भाषण ओरडून म्हणायला मी आरंभ केला. काहीतरी भावनाप्रधान धर्तीचे शोधून काढायचा मी प्रयत्न केला आणि "हे झिनैदा, झिनैदा!" अशा ओळीने अखेर होणारी एक कविता रचण्याचाही यत्न केला. पण त्यातून काहीही निष्पन्न झाले नाही. आणि आता दुपारच्या जेवणाची वेळ होत आली होती. मी एका दरीमधून खाली उतरलो. तेथून वळणावळणाची वाळूची अरुंद वाट गावाकडे जात होती. ह्या वाटेवरून मी चालत होतो तेवढ्यात पाठीमागून घोड्यांच्या टापा मला ऐकू आल्या. मागे वळून पाहताच नकळतपणे मी थांबलो आणि डोक्यावरची टोपी उतरविली, कारण ते घोडेस्वार म्हणजे झिनैदा आणि माझे वडील होते. एकमेकांशेजारून ते चालले होते. खोगीरावरून झुकून माझे वडील तिला काहीतरी सांगत होते, त्यांचा हात घोड्याच्या मानेवर विसावला होता. त्यांच्या चेहऱ्यावर स्मित विलसत होते. झिनैदा मुकाटपणे त्यांचे ऐकत होती. तिचे डोळे कमालीचे खाली झुकले होते व ओठ गच्च आवळलेले होते. प्रथम मी त्या दोघांनाच तेवढे पाहिले, पण काही सेकंदांनंतर माझ्या दृष्टीला बेलोवझोरोव पडला. वाटेच्या वळणावर तो लपला होता. काळ्याकुळकुळीत घोड्यावर तो स्वार झाला होता आणि शिलेदाराचा गणवेष व केसाळ कातडी किनार लावलेला अंगरखा त्याने परिधान केला होता. त्याचा उमदा घोडा आपल्या मानेला झटके देत होता, फुरफुरत होता, थयथया नाचत होता. त्याचा स्वार एकाच वेळी त्याला टाच मारीत होता व लगामही खेचून धरीत होता. मी वाट सोडून बाजूला झालो. माझ्या वडिलांनी लगाम हाती धरला आणि त्यांच्याकडे मंद कटाक्ष टाकणाऱ्या झिनैदापासून ते बाजूला झाले... आणि

ती दोघे माझ्या जवळून दौडत निघून गेली. बेलोवझोरोव आपल्या तलवारीचा खडखड आवाज करीत त्यांच्या पाठोपाठ दौडत गेला... "तो खेकड्यासारखा लाल झालाय," माझ्या मनात विचार आला, "आणि ती – ती एवढी फिकट का दिसत होती? सबंध सकाळभर घोडदौड करूनही फिकट?"

मी भरभर पावले टाकू लागलो आणि जेवणाच्या वेळी घरी पोहोचलो. माझ्या वडिलांनी एव्हाना कपडे बदलले होते आणि हात-तोंड धुवून ताज्या-तवान्या चेहऱ्याने माझ्या आईशेजारच्या खुर्चीवर बसून ते तिला आपल्या मृदु संथ आवाजात «Journal des Дébats»[24] नियतकालिकामधील लेख वाचून दाखवीत होते. माझी आई विमनस्कपणे ऐकत होती. मी तेथे अवतरताच तिने तात्काळ मला प्रश्न केला की, एवढा सारा वेळ मी काय करीत होतो आणि पुढे तिने शेरा मारला की, कुठेतरी, कुणाच्यातरी संगतीत घोटाळणाऱ्या माणसांबद्दल तिला चीड होती. मी एकटाच फिरायला गेलो होतो असे सांगायचे माझ्या अगदी ओठांवर आले होते, पण माझ्या वडिलांकडे कटाक्ष टाकताच मी माझी जीभ आवरून धरण्याचे ठरविले.

## १५

पुढील पाच-सहा दिवसांमध्ये झिनैदा क्वचितच मला दिसली. तिने आजारी असल्याची सबब सांगितली, तरीही तिच्या घरी येणारी नेहमीची मंडळी थांबली नव्हती. "कामावर जाणे" असा शब्दप्रयोग ते सगळे लोक वापरीत. एकटा मैदानोव त्यांच्यात अपवाद होता. उत्साहाला काही कारण नसले म्हणजे तात्काळ तो खिन्न आणि उदास बनायचा. लालबुंद चेहऱ्याचा आणि गळ्यापर्यंत बटणे लावलेला बेलोवझोरोव आपल्या कोपऱ्यात दुर्मुखला बसायचा. काऊंट मालेवस्कीच्या निमुळत्या चेहऱ्यावर सतत तुच्छ स्मित विलसत असायचे. झिनैदाच्या मर्जीतून तो खरोखरीच उतरला होता आणि कधी नव्हे एवढ्या तत्परतेने म्हाताऱ्या प्रिन्सेसच्या मदतीला सज्ज होता. घोडागाडी भाड्याने मागवून तो चक्क तिला गव्हर्नर-जनरलकडे घेऊन गेला होता. पण ती भेट अयशस्वी ठरली होती. एवढेच नव्हे तर खुद्द मालेवस्कीच्या दृष्टीने अप्रिय ठरली होती. तोफखान्यामधील काही अधिकाऱ्यांबरोबर घडलेल्या कुठल्यातरी प्रसंगाबाबत त्याला आठवण करून ताकीद देण्यात आली व त्या वेळी आपल्या बचावासाठी केवळ अनुभव नसल्याची सबब त्याला



सांगावी लागली होती. लूशिन दिवसातून एक-दोन भेटी देत, पण कधीही फार वेळ थांबत नसत. मागील वेळी झालेल्या चर्चेपासून मला त्यांची काहीशी भीती वाटत होती व त्याचवेळी त्यांच्याकडे मी मनापासून आकर्षित झालो होतो. एकदा ते माझ्याबरोबर न्येस्कूचनी बागेत फिरायला आले. वेगवेगळ्या झाडांची आणि फुलांची नांवे व वैशिष्ट्ये समजावून सांगण्याचा चांगुलपणा त्यांनी दाखविला. पण अचानक बोलणे थांबवून त्यांनी आपल्या भुवईवर बोटाचा प्रहार केला आणि कसलाही संदर्भ नसता उद्गारले: "किती मूर्ख मी! तिला केवळ चंचल समजलो! स्वार्थत्यागाचा आनंद मानणारी माणसं अजून या जगात आहेत म्हणायची!"

"काय म्हणायचंय तुम्हाला?" मी विचारले.

"तुम्हाला मी काहीही सांगू इच्छित नाही." धारदार आवाजात लूशिन उत्तरले.

झिनैदा मला टाळीत होती. माझे दर्शन तिला नकोसे झाले होते ही गोष्ट माझ्या ध्यानात आली होती. अंतःप्रेरणेने ती माझा चेहरा पाहणे टाळायची. आणि हेच सहन करणे मला कठीण जात होते. पण यावर दुसरा काही उपाय नव्हता आणि तिच्या दृष्टीआड राहण्याचा मी प्रयत्न करीत होतो, तिला फक्त दूरवरून पहात होतो, पण त्यात मला नेहमीच यश येत नव्हते. तिच्या मनात अद्याप काहीतरी गोंधळ चालू होता. तिचा चेहरा बदलला होता, तिचे पूर्ण व्यक्तिमत्व बदलून गेले होते. एका उबदार, स्तब्ध सायंकाळी तिच्यामधील हा बदल मला प्रकर्षाने जाणवला. विस्तारलेल्या एल्डर झुडुपाखालील एका सखल बाकावर मी बसलो होतो. माझे ते आवडते ठिकाण होते. तेथून झिनैदाच्या खोलीची खिडकी मी पाहू शकत असे. मी तेथे बसलो होतो तेव्हा माझ्या डोक्यावरील काळवंडणाऱ्या पानांमध्ये एक छोटा पक्षी उडत येऊन बसला. एक राखाडी मांजर पाठीची कमान करून हळूच बागेत शिरले, रातकिड्यांची किरकिर नुकतीच सुरू झाली होती. वातावरण नितळ होते, पण एव्हाना उजेड नाहीसा झाला होता. खिडकी उघडेल अशा आशेने मी तिच्याकडे टक लावून पहात बसलो होतो. आणि खरोखरीच, लौकरच खिडकी सताड उघडली व झिनैदाची आकृती तियचात अवतरली. तिने शुभ्र पोषाख केला होता आणि खुद्द ती – तिचा चेहरा, तिचे खांदे आणि हात – त्या पोषाखाइतकीच पांढरी दिसत होती. कपाळाला आठ्या घालून समोर टक लावून पहात खूप वेळपर्यंत निःस्तब्धपणे ती तेथे उभी होती. ती असे पहात असलेली मला कधी दिसली नव्हती.

मग तिने आपले हात घट्ट आवळले, नंतर आपल्या ओठांपर्यंत व त्यानंतर कपाळापर्यंत ते उंचावले आणि अचानक बोटे रुंद पसरून तिने आपल्या कानांमागील केसांना मागे उडविले, डोके गदगदा हलविले, एकदा निर्धारपूर्वक मानेला झटका दिला आणि धाडदिशी खिडकी बंद केली.

तीन दिवसांनंतर बागेत ती माझ्यासमोर आडवी आली. मी तोंड फिरवून वळणार तोच तिने मला थांबविले.

"तुमचा हात द्या मला," पूर्वीच्या स्नेहल आवाजात ती म्हणाली. "आपण दोघांनी युगानुयुगं छान गप्पा मारल्या नाहीत."

मी तिच्याकडे पाहिले. तिचे डोळे स्निग्ध तेजाने उजळले होते. एक गूढ स्मित तिच्या चेहऱ्यावर उमटले होते.

"अजूनही तुमची प्रकृती बरी नाही का?" मी विचारले.

"छेः, छेः, ते संपलं," गुलाबाचे एक छोटे फूल तोडीत ती म्हणाली. "मला अजून थोडा थकवा आहे, पण तोही जाईल."

"आणि तुम्ही परत पूर्वीसारख्या व्हाल?" मी विचारले.

झिनैदाने फूल आपल्या तोंडावर धरले आणि त्या फुलाच्या पाकळ्यांचे प्रतिबिंब तिच्या गालांवर उमटल्याचा मला भास झाला.

"का, मी बदललेय?"

"होय," मी शांतपणे उत्तरलो.

"मी तुमच्याशी फार भयानक वागले... मला माहीत आहे," झिनैदा म्हणाली, "पण तुम्ही ते मनाला लावून घ्यायचं नव्हतं... माझा इलाज नव्हता... पण बोलून फायदा काय?"

"मी तुमच्यावर प्रेम करू नये अशी तुमची इच्छा आहे!" अचानक आलेल्या ऊर्मीत मी लहरीपणाने बोलून टाकले.

"तुम्ही माझ्यावर प्रेम करावं असं मला वाटतं, पण पूर्वीसारखं नाही."

"मग कसं?"

"आपण मित्र म्हणून राहू." झिनैदाने गुलाबाचे फूल माझ्या नाकासमोर धरले. "तुमच्यापेक्षा मी वयानं खूप मोठी आहे. तुमची मी मावशी असू शकले असते, किंवा मोठी बहीण! आणि तुम्ही..."

"आणि तुमच्या दृष्टीनं मी एक लहान बाळ..."

"अर्थात तुम्ही लहान बाळ आहात, पण मला खूप आवडणारं गोड, छान आणि बुद्धिमान! मी सांगू तुम्हाला? आजपासून मी तुम्हाला माझा खाजगी कारभारी म्हणून नेमते. आणि ह्या कारभाऱ्यानं आपल्या राणीला



कधीही सोडायचं नसतं हे लक्षात ठेवा. हा तुमच्या नव्या पदाचा बिल्ला," माझ्या कोटावर गुलाब अडकवीत ती पुढे म्हणाली. "तुमच्याविषयीच्या आमच्या सदिच्छेचं प्रतीक!"

"यापूर्वी तुम्ही मला सदिच्छेची दुसरी प्रतीकं दाखवली आहेत," मी पुटपुटलो.

"अग बाई," झिनैदा उद्गारली, "काय विलक्षण स्मरणशक्ती! ठीक आहे, आत्ता एक द्यायला माझी मुळीच हरकत नाही..."

आणि माझ्यावर झुकून तिने माझ्या कपाळावर एक विशुद्ध, शांत चुंबन उमटविले.

मी तिच्याकडे नुसते पाहिले, तेवढ्यात वळून ती म्हणाली: "कारभारी, माझ्या पाठोपाठ चला". आणि ती तिच्या घराकडे गेली. स्तंभित मनःस्थितीत मी तिच्या पाठोपाठ गेलो. "ही सौम्य, शहाणी मुलगी म्हणजेच मला माहीत असलेली झिनैदा आहे, हे खरं असू शकेल?" माझ्या मनात विचार आला. आता तिची चालसुद्धा अधिक शांत वाटत होती, तिची आकृती अधिक आदरणीय आणि अधिक डौलदार भासत होती...

देवा रे! तिच्याबद्दलच्या माझ्या प्रेमभावना एका नव्या जोमाने किती प्रचंड भडकून उठल्या!

## १६

जेवणानंतर नेहमीचे पाहुणे जोड-इमारतीत एकत्र जमले आणि तरुण प्रिन्सेस त्यांच्या स्वागताला आपल्या खोलीतून बाहेर आली. त्या पहिल्या, अविस्मरणीय सायंकाळप्रमाणेच, ते सगळे पूर्ण संख्येने तेथे हजर होते. निर्मात्स्कीसुद्धा रखडत आला होता. यावेळी मैदानोव सर्वात पहिला आला होता व त्याने एक नवी कविता आणली होती. आम्ही परत दंडाचा खेळ खेळलो, पण पूर्वीचा दांडगेपणा त्यात नव्हता, मूर्खपणा आणि गोंगाट नव्हता... आमच्या वागण्यामधील जिप्सी प्रवृत्ती नाहीशी झाली होती. झिनैदाने वातावरणाला एक नवा सूर लावून दिला. तिचा कारभारी ह्या नात्याने मी तिच्या शेजारी बसलो होतो. इतर शिक्षांमध्ये तिने आणखी एक शिक्षा सुचविली की, ज्याच्या चिठ्ठीवर खूण असेल त्याने आपले स्वप्न कथन करायचे. पण त्यातून काहीच निष्पन्न झाले नाही. ती स्वप्ने एक तर कंटाळवाणी ठरली (बेलोवझोरोवला स्वप्न पडले होते की, त्याने आपल्या

घोड्याला कार्प मासा खाऊ घातला होता आणि त्या घोड्याचे डोके लाकडी होते), अथवा खोटी होती आणि रचून सांगितलेली होती... मैदानोवने तर चक्क अद्भुत कथा सांगितली: तिच्यात धडगी होती, सारंगी वाजविणारे देवदूत होते, बोलणारी फुले होती... दूरच्या संगीताचे ध्वनी होते... झिनैदाने त्याला अडविले.

"जर रचूनच सांगायचं असलं," ती म्हणाली, "तर कधीही न घडलेलं असं काहीतरी प्रत्येकाला सांगू दे."

पुन्हा एकदा बेलोवझोरोववर सुरुवात करण्याची पाळी आली.

तो तरुण शिलेदार पुरता भांबावला. "मला काहीच सुचत नाही," तो उद्गारला.

"मूर्खपणा!" झिनैदा ओरडली. "कल्पना करा, तुम्ही विवाहित किंवा तत्सम काहीतरी आहात आणि तुमच्या बायकोला तुम्ही कसं वागवाल ते आम्हाला सांगा. तुम्ही तिला कोंडून घालाल?"

"होय."

"आणि तुम्ही स्वतःला तिच्याबरोबर कोंडून घ्याल?"

"अर्थातच."

"ठीक. पण समजा तिला त्याचा कंटाळा आला आणि तिनं तुम्हाला फसवलं तर?"

"मी तिला ठार मारीन."

"आणि ती पळून गेली तर?"

"मी तिचा पाठलाग करीन आणि तिला ठार मारीन."

"ठीक. आता समजा, मी तुमची पत्नी असते तर तुम्ही काय केलं असतं?"

बेलोवझोरोव क्षणभर गप्प झाला.

"तर मी स्वतःला ठार मारलं असतं."

झिनैदा हसली.

"तुमची गोष्ट फारशी मोठी दिसत नाही," ती म्हणाली.

पुढची पाळी झिनैदावर आली. छताकडे पहात तिने विचार केला.

"ऐका," सरतेशेवटी ती म्हणाली. "तर मी ही अशी गोष्ट रचलीय. कल्पना करा: एक सुंदर राजवाडा, उन्हाळ्यातील रात्र आणि अप्रतीम बॉलनृत्य. तरुण राणी आपल्या पाहुण्यांचं स्वागत करतेय. सगळीकडं सोनं,



संगमरवर, बिलोरी झुंबरं, रेशीम, दिवे, रत्नं, फुलं, धूप... मनःपूत वैभव दिसतंय."

"तुम्हाला वैभव आवडतं ना?" लूशिननी मध्येच विचारले.

"वैभव सुंदर असतं," तिने प्रतिटोमणा मारला, "आणि सौंदर्य मला आवडतं."

"अति-लावण्याहून?" त्यांनी विचारले.

"तुम्ही फारच चतुर आहात बाई! तुम्हाला काय म्हणायचंय ते मला समजत नाही. आता अडथळा आणू नका. तर सुरेख बॉलनृत्य चाललंय. सर्व तरुण, देखण्या, शूर पाहुण्यांची गर्दी उसळलीय आणि ते सगळे राणीच्या आकंठ प्रेमात पडलेले आहेत."

"त्या पाहुण्यांमध्ये स्त्रिया नाहीत?" मालेवस्कीने विचारले.

"नाहीत... थांबा हं... हो, आहेत."

"आणि सगळ्या सामान्य रूपाच्या?"

"सगळ्या मोहक आहेत, पण सगळे पुरुष राणीच्या प्रेमात आहेत. ती उंच आणि सडपातळ आहे... तिच्या काळ्या केसांवर तिनं सोन्याचा छोटा मुगुट बसवलाय."

मी झिनैदाकडे पाहिले. त्या क्षणी ती आम्हा कुणाहीपेक्षा जास्त उंच भासली. तिचे शुभ्र कपाळ, तिच्या रेखीव भुवया एवढ्या बुद्धिमान आणि प्रभावी दिसत होत्या की, माझ्या मनात विचार आला: "तू स्वतःच ती राणी आहेस!"

"प्रत्येकजण तिच्याभोवती दाटी करतोय," झिनैदा पुढे सांगत होती, "तिच्यावर स्तुतीसुमनं उधळणारी भाषणं करतोय."

"म्हणजे तिला स्तुती आवडते?" लूशिननी विचारले.

"शीः, तुमची कमाल आहे बाई! सगळा वेळ अडथळा आणताय... कुणाला आवडत नाही स्तुती?"

"आता शेवटचाच एक प्रश्न," मालेवस्की म्हणाला, "ह्या राणीला नवरा आहे?"

"मी त्याबद्दल विचार केला नाही. छेः, तिला नवऱ्याची गरजच काय?"

"अर्थात," मालेवस्की म्हणाला, "तिला नवऱ्याची गरजच काय?"

«Silence!» भयानक फ्रेंच बोलणारा मैदानोव किंचाळला.

«Merci!» झिनैदाने त्याचे आभार मानले. "तर स्तुतीपर भाषणं

आणि संगीत ऐकत राणी बसून राहिलीय, पण आपल्या एकाही पाहुण्याकडं ती पहात नाही. छतापासून फरशीपर्यंत उघडलेल्या सहा उंच खिडक्या आहेत आणि त्यांच्या पलिकडे प्रचंड ताऱ्यांनी खच्चून भरलेलं काळं आकाश आणि प्रचंड झाडांनी भरलेलं अंधारं उद्यान दिसतंय. राणी त्या उद्यानाकडं नजर टाकते. तिथं झाडांमध्ये, अंधारात एक शुभ्र कारंजं दिसतंय आणि खूप उंच... एखाद्या भुताप्रमाणं उंच. लोकांच्या बोलण्याच्या आवाजांमधून आणि संगीतामधूनही राणीला त्या कारंजातून उडणाऱ्या पाण्याचा मंद ध्वनी ऐकू येतोय. खिडकीमधून बाहेर पाहताना तिच्या मनात विचार येतो: 'सभ्य गृहस्थहो, तुम्ही सारे थोर आहात, सूज्ञ आहात, श्रीमंत आहात, तुम्ही माझ्या भोवती घोळका करता, माझ्या तोंडून बाहेर पडलेला प्रत्येक शब्द आपल्या अंतःकरणात जपून ठेवता, माझ्या पायांशी मरायला तुमच्यापैकी प्रत्येकजण तयार आहे, तुम्ही सारे माझ्या मुठीत आहात... पण तिथं, कारंजापाशी, सप सप आवाज करणाऱ्या पाण्यापाशी, ज्याच्यावर मी प्रेम करते, ज्याची माझ्यावर सत्ता चालते, तो माझी वाट पहात उभा आहे. त्याच्यापाशी ना उंची वस्त्रं आहेत, ना अलंकार. त्याला कुणीही ओळखत नाही, पण तो माझी वाट पहात उभा आहे आणि मी त्याच्यापाशी जाणार हे त्याला ठाऊक आहे. आणि मी जाणार. जर त्याच्यापाशी जाण्याची माझी इच्छा असेल, त्याच्याबरोबर राहण्याची, त्या उद्यानाच्या अंधारात, जिथं झाडं सळसळताहेत आणि कारंजामधून पाणी थुई थुई उडतंय तिथं त्याच्या-समोर स्वतःला गमावून बसण्याची माझी इच्छा असेल, तर कोणतीही शक्ती मला प्रतिबंध करायला पुरेशी सामर्थ्यवान नाही..."

झिनैदा एकदम बोलायची थांबली.

"ही... खरंच निव्वळ रचलेली गोष्ट आहे?" मालेवस्कीने धूर्तपणे विचारले.

झिनैदाने त्याच्याकडे साधी नजरसुद्धा टाकली नाही.

"सभ्य गृहस्थहो, जर आपण त्या पाहुण्यांमध्ये असतो आणि तो सुदैवी पुरुष कारंजापाशी उभा आहे हे आपल्याला माहीत असतं," लूशिन अचानक म्हणाले, "तर आपण काय केलं असतं?"

"थांबा, थांबा!" झिनैदाने अडविले. "तुमच्यापैकी प्रत्येकजण कसा वागला असता हे मी सांगते. तुम्ही बेलोवझोरोव, त्याला द्वंद्वाचं आव्हान दिलं असतं; मैदानोव, तुम्ही त्याच्यावर एक चटकदार कविता लिहिली असती... छेः, छेः, तुम्ही तसं केलं नसतं, तुम्हाला चुटकेवजा कविता



लिहिता येत नाहीत; तुम्ही बार्ब्येप्रमाणे[25] त्याच्यावर लांबलचक रचना केली असती आणि 'टेलीग्राफ'[26] मध्ये छापली असती. निर्मात्स्की, तुम्ही त्याच्याकडून उसने पैसे घेतले असते, नाही, उलट तुम्ही त्याला जबर व्याजानं कर्ज दिलं असतं; आणि डॉक्टर... तुम्ही" ती थांबली... "तुम्ही काय केलं असतं हे मला माहीत नाही."

"दरबारचा डॉक्टर ह्या नात्यानं," लूशिन उत्तरले, "मी राणीला सल्ला दिला असता की, मनोरंजन करण्याच्या मनःस्थितीत नसताना तिनं बॉलनृत्याचा कार्यक्रम करू नये."

"तुमचा सल्ला कदाचित योग्य ठरला असता. काऊंट, तुम्ही काय केलं असतं?"

"मी?" दुष्ट स्मित करीत काऊंट म्हणाला.

"तुम्ही त्याला विषारी चॉकलेट दिलं असतं."

मालेवस्कीने तोंड वाकडे केले व धूर्त नजर टाकली. पण पुढच्याच क्षणी तो खो खो हसत सुटला.

"आणि तुम्ही, वोल्देमार..." झिनैदा पुढे म्हणाली, "पण मला वाटतं, एवढं हे पुरे झालं. आता दुसरा काहीतरी खेळ खेळू."

"मस्ये वोल्देमार यांनी एकनिष्ठ कारभारी ह्या नात्यानं, राणी उद्यानात पळाली असती तेव्हा तिच्या झग्याचं मागचं टोक धरलं असतं," कुत्सितपणे मालेवस्की म्हणाला.

माझा चेहरा शरमेने लाल झाला. पण माझ्या खांद्यावर हात ठेवून उठून उभे रहात, काहीशा कापऱ्या आवाजात झिनैदा म्हणाली: "तुम्हाला उर्मटपणानं वागण्याचा अधिकार मी कधीही दिलेला नाही काऊंट, आणि म्हणून मी तुम्हाला माझं घर सोडून जाण्याची विनंती करते." तिने दाराकडे बोट दाखविले.

"खरंच, प्रिन्सेस," पांढराफटक पडत मालेवस्की पुटपुटला.

"प्रिन्सेसचं म्हणणं अगदी योग्य आहे!" बेलोवझोरोवही उठत म्हणाला.

"शपथ, माझ्या कधी मनातही आलं नव्हतं," मालेवस्की पुढे म्हणाला, "माझ्या शब्दांमध्ये तसा काही अर्थ होता असं मला वाटत नाही... अपमान करण्याचा माझा मुळीच हेतू नव्हता... मला क्षमा करा."

झिनैदाने त्याच्याकडे एक भेदक कटाक्ष टाकला आणि थंड हास्य केले.

"तुमची इच्छा असेल तर थांबा," हात किंचित झटकत ती म्हणाली.

15-Aug-13 / 18:28:56

"मस्ये वोल्देमारचा आणि माझा थोडा तोल सुटला हे चुकलं. तुम्हाला दंश करायला आवडतं... खुशाल वागा तसं!"

"मी तुमची क्षमा मागतो," मालेवस्की परत म्हणाला. झिनैदाची ती कृती आठवून मी स्वतःला सांगितले की, खऱ्या राणीने याहून जास्त दिमाखाने अपराध्याला बाहेरची वाट दाखविली नसती.

ह्या प्रसंगानंतर आमचा खेळ फार वेळ पुढे चालू शकला नाही. प्रत्येकालाच काहीसे अवघडल्यासारखे वाटत होते. नुकताच झालेला छोटा नाट्यप्रवेश त्याला फारसा कारणीभूत नव्हता; काहीतरी सांगता न येण्यासारखी, पण दडपून टाकणारी भावना जास्त जबाबदार होती. कुणीही तिचा उल्लेख केला नाही, पण प्रत्येकाला ह्या भावनेची जाणीव होती व आपला शेजारी ती अनुभवतोय हे माहीत होते. मैदानोवने आपली कविता वाचली आणि मालेवस्कीने अतिरेकी उत्साहाने तिचे कौतुक केले.

"आपला चांगुलपणा दाखवायला आता तो किती अधीर झालाय!" लूशिन माझ्या कानात पुटपुटले.

लौकरच आम्ही आपापल्या घरी गेलो. झिनैदा अचानक विचारमग्न झाली होती आणि तिच्या आईने आपले डोके दुखत असल्याचा निरोप धाडला होता. निर्मात्स्कीने संधिवाताची तक्रार सांगितली.

खूप वेळपर्यंत मला झोप आली नाही. झिनैदाच्या गोष्टीने माझ्यावर मोठा परिणाम केला होता. "तिच्यात सूचकता होती काय?" मी स्वतःला प्रश्न केला. "आणि तसे असेल तर कोणती सूचकता तिला अभिप्रेत होती व कुणाला उद्देशून? आणि जर त्यात काही सत्य असतं, तर नक्कीच तिनं धाडस... छेः, छेः, हे अशक्य आहे," मी अस्फुटपणे उद्गारलो. मी सारखा ह्या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत होतो. उशीवर टेकलेले माझे गाल भाजत होते... झिनैदा गोष्ट सांगत होती तेव्हाची तिची मुद्रा मला आठवली... न्येस्कूचनी बागेत फिरत असताना लूशिनच्या तोंडून नकळत उमटलेला उद्गार मला आठवला... माझ्याशी वागताना तिच्यात अचानक झालेले बदल आठवले... आणि तर्क करून करून मी स्वतःला दमवून घेतले.

"कोण आहे तो?" अंधारात आगीच्या अक्षरांनी कोरावेत तसे हे शब्द सतत माझ्या डोळ्यांसमोर उभे होते. एक अभद्र मेघ खूप खाली माझ्यावर ओठंगला होता आणि कोणत्याही क्षणी त्यातून जलधारा कोसळू लागतील असे भासत होते. झासेकिनांच्या घरी मी अनेक विचित्र गोष्टी पाहिल्या



होत्या आणि अलिकडे मला त्यांची सवय झाली होती; अव्यवस्था, चरबीच्या मेणबत्त्यांचे अवशेष, तुटके काटे आणि सुऱ्या, दुर्मुखला वोनीफाती, कळकट मोलकरणी, म्हाताऱ्या प्रिन्सेसचे विचित्र वागणे, ह्या चक्रम घरातील कोणतीच गोष्ट आता मला चकित करीत नव्हती... पण झिनैदाबाबत आता जे अस्पष्ट तर्क माझ्या मनात येऊ लागले होते, त्यांची मात्र मला सवय होत नव्हती. माझी आई एकदा तिच्याबद्दल म्हणाली होती—साहसी! तो शब्द मला झोंबला होता. उशीत डोके खुपसून मी त्या शब्दापासून सुटका करू पहात होतो, मला त्याची चीड येत होती... आणि तरीही, तरीही, कारंजापाशी उभा असलेला तो सुदैवी पुरुष बनण्यासाठी मी काय वाट्टेल ते दिले असते!

माझ्या नसांमधून रक्त उसळत होते. "उद्यान... कारंजे..." मी विचार केला. "मी उद्यानात गेलो तर?" क्षणात कपडे करून मी बाहेर निसटलो. रात्र अंधारी होती. झाडांची अगदी अस्पष्ट कुजबुज चालली होती, वरून एक स्तब्ध शीतलता येत होती. भाजीच्या वाफ्यांमधून बडीशोपेचा गंध दरवळत होता. सगळ्या वाटांवरून मी फिरलो. माझ्या स्वतःच्या चोरपावलांचा आवाज मला एकाच वेळी सावध करीत होता आणि उत्साहित करीत होता. माझ्या काळजाचे ठोके ऐकण्यासाठी मी थांबलो... खूप जोरात धडधड चालू होती. शेवटी कुंपणापाशी येऊन तेथील सडपातळ मेखांना टेकून उभा राहिलो. अचानकपणे... अथवा माझ्या कल्पनेचा तो खेळ होता?.. एका स्त्रीची आकृती झटकन माझ्याजवळून गेली... श्वास रोखून मी अंधारात डोळे फाडफाडून पाहिले... काय होते ते? पावलांचा आवाज होता, अथवा परत माझ्याच काळजाची धडधड होती? "कोण आहे तिथं?" मी हळूच अडखळत म्हणालो. पुन्हा! ते घुसमटलेलं हसू होतं का? किंवा फांद्यांची सळसळ... अथवा माझ्या अगदी कानापाशी कुणीतरी उसासा टाकला? भीतीने मला झपाटले. "कोण आहे तिथं?" आणखीच हळू आवाजात मी परत विचारले.

क्षणभर वाऱ्याची हलकीशी झुळूक उमटली. आकाशात काहीतरी चमकले. उल्का! "झिनैदा आहे का?" मला विचारावेसे वाटले, पण शब्द माझ्या ओठांवरच विरले. आणि मध्यरात्रीला अनेकदा निर्माण होते तशी प्रगाढ स्तब्धता अचानक सर्वत्र पसरली. झुडुपांमधील नाकतोड्यांची किरकिरसुद्धा थांबली आणि खिडकी बंद केल्याचा आवाज कुठूनतरी आला. थोडा वेळ तेथे थांबून नंतर मी माझ्या खोलीत, माझ्या थंड बिछान्याकडे परतलो.

एक विलक्षण उत्तेजक मन:स्थिती मी अनुभवीत होतो. जणू भेटीचे संकेतस्थान मी ठरविले होते, पण तेथे मी एकटाच आढळलो होतो आणि दुसऱ्या कुणाच्या तरी सुखाच्या अगदी जवळून निघून गेलो होतो.

## १७

दुसऱ्या दिवशी झिनैदाचे अगदी ओझरते दर्शन मला घडले. ती आणि तिची आई घोडागाडीमधून कुठेतरी बाहेर गेल्या. लूशिनशी माझी भेट झाली, पण त्यांनी फक्त तुटक अभिवादन केले. मालेवस्कीही मला भेटला. त्या तरुण काऊंटने मला पाहून मानभावी हास्य केले आणि माझ्याशी मित्रत्वाच्या नात्याने तो बोलला. जोड-इमारतीमध्ये येणाऱ्या सगळ्या लोकांपैकी फक्त तो एकटाच आमच्या घरात शिरकाव करू शकला होता व माझ्या आईची त्याने मर्जी संपादन केली होती. माझ्या वडिलांना तो आवडला नव्हता आणि त्याच्याशी ते अपमानकारक सभ्यतेने वागायचे.

"ओहो, कारभारीमहाराज!" मालेवस्की म्हणाला. "तुम्हाला पाहून आनंद झाला! तुमच्या लावण्यवती राणीसाहेब काय करताहेत?"

त्या क्षणाला त्याच्या देखण्या, निकोप चेहऱ्याचा मला इतका तिटकारा वाटला आणि त्याची माझ्यावर रोखलेली नजर एवढी खट्याळ होती, की मी त्याला उत्तरच दिले नाही.

"अरेच्चा, अजून माझ्यावर राग धरलाय?" तो पुढे म्हणाला. "असं तुम्ही करू नये. तुम्हाला माहीत आहे की, मी तुम्हाला कारभारी म्हटलं नव्हतं आणि सर्वसाधारणपणं राण्यांना कारभारी असतात. पण तुम्ही आपल्या कर्तव्यांमध्ये काहीशी कसूर करताहात असं मला सांगावंसं वाटतं."

"माझी कर्तव्य?"

"हो. कारभाऱ्यानं आपल्या मालकिणीची बाजू कधीही सोडायची नसते. सारा वेळ ती काय करते हे कारभाऱ्याला माहीत असलं पाहिजे. तिच्या सर्व हालचालींवर त्याचं लक्ष पाहिजे," आपला आवाज हळू करीत तो पुढे म्हणाला. "दिवसा आणि रात्रीसुद्धा."

"म्हणजे? काय म्हणायचंय तुम्हाला?"

"काय म्हणायचंय? मला वाटतं, मला काय म्हणायचं ते स्पष्ट आहे. दिवसा... आणि रात्री. दिवसा तेवढं फारसं महत्त्वाचं नाही. दिवसा उजेड असतो आणि भोवती खूप माणसंही असतात. पण रात्री... तेव्हा तुम्ही



जास्त सावध राहिलं पाहिजे. माझा तुम्हाला सल्ला आहे की, रात्रीचं तुम्ही झोपू नका, तर अगदी डोळ्यात तेल घालून पहारा करा. उद्यान, रात्र, कारंजे... आठवण ठेवा. तिथं तुम्ही लक्ष ठेवलं पाहिजे. एक दिवस तुम्ही माझे याबद्दल आभार मानाल."

मालेवस्की हसला आणि त्याने माझ्याकडे पाठ फिरविली. बहुधा त्याने स्वत:च्या शब्दांना फारसे महत्त्व दिले नसावे, कारण प्रथम श्रेणीचा थापाड्या म्हणून त्याची ख्याती होती. मुखवट्यांच्या बॉलनृत्यांवेळी आपल्या खोटेपणाने लोकांना चकविण्यात तो प्रसिद्ध होता आणि हा खोटेपणा त्याचा दुसरा स्वभावच बनला होता. मला तो केवळ चिडवीत होता, पण त्याचा प्रत्येक शब्द माझ्या नसांमध्ये विषाच्या थेंबाप्रमाणे भिनत होता. माझ्या डोक्यात रक्त चढले. "अस्सं, तर हे असं आहे!" मी स्वत:शी म्हणालो. "बरोबर! मी उद्यानाकडं खेचला गेलो ते काही उगीच नव्हे! पण मी होऊ देणार नाही!" माझ्या छातीवर हात मारीत मी ओरडलो. मात्र मी काय होऊ देणार नाही हे नेमके सांगणे मला शक्य झाले नसते. "खुद्द मालेवस्की त्या उद्यानात मला सापडो," मी स्वत:ला बजाविले (कदाचित तो स्वत:चे रहस्य वरळून गेला होता: असला निर्लज्जपणा त्याच्या अंगी आहे) "अथवा दुसरा कुणी असो" (आमच्या बागेभोवतालचे कुंपण सखल होते व त्यावर चढून जाणे अवघड नव्हते), "जो कुणी असेल त्यानं पक्कं समजून असावं की गाठ माझ्याशी आहे! जगाला आणि त्या खोटारडीला (होय, मी तिला खोटारडी म्हटले!) मी दाखवून देईन की, सूड कसा घ्यायचा हे मला ठाऊक आहे!"

मी माझ्या खोलीत परत गेलो, माझ्या मेजाच्या कप्प्यामधून इंग्लिश बनावटीचा चाकू बाहेर काढला. काही दिवसांपूर्वीच मी तो विकत घेतला होता. त्याच्या धारदार पात्यांना मी स्पर्श केला व कपाळाला आठ्या घालून, अगदी थंड निर्धाराने तो चाकू माझ्या खिशात सरकविला. जणू काही अशा गोष्टींची मला चांगली सवयच होती! संतापाने माझे काळीज थाड थाड उडत राहिले आणि नंतर दगड बनले. सबंध दिवसभर भुवया जुळवून आणि घट्ट ओठ मिटून मी माझ्या खोलीत येरझाऱ्या घालीत होतो. माझ्या खिशातील चाकू गच्च धरून ठेवल्यामुळे एव्हाना चांगलाच गरम झाला होता. कुठल्यातरी भयानक प्रसंगाला तोंड देण्याची जणू मी पूर्वतयारी करीत होतो. ह्या संवेदना एवढ्या नव्या, एवढ्या अभूतपूर्व होत्या की त्यामुळे माझे खूप मनोरंजन झाले आणि मी एवढा उत्तेजित बनलो होतो की, झिनैदाचा

विचारच माझ्या मनाला शिवला नाही. स्वतःला मी कल्पनेत अलेको, तरुण जिप्सी, समजत होतो... "कुठं, सुंदर तरुणा? .. नीज इथं! .."[27] आणि नंतर: "तू रक्तानं माखला आहेस! अरे काय केलंस तू? .." "काही नाही!" किती क्रूर स्मित करीत मी तो शब्द परत उच्चारला: "काही नाही!" माझे वडील घरात नव्हते, पण सध्या सतत दबल्या चिडीने वावरणाऱ्या माझ्या आईला माझी अनर्थकारी अवस्था ध्यानात आली व रात्री जेवणाच्या वेळी तिने मला विचारले:

"उंदीर शोधणाऱ्या मांजरासारखा तू आज दिसतो आहेस! काय झालंय?"

उत्तरादाखल मी फक्त एक सौम्य स्मित केले. मनात विचार आला: "त्यांना समजलं असतं तर!" अकराचे टोले पडले. मी माझ्या खोलीत गेलो, पण कपडे उतरविले नाही. मध्यरात्र होण्याची मी वाट पहात होतो. अखेर बारा वाजले. "आता!" दात आवळून मी पुटपुटलो आणि बागेकडे निघालो. मात्र जाकीटाची बटणे लावण्याची आणि बाह्या वर सारण्याची खबरदारी मी घेतली.

दबा धरून बसण्याची जागा मी आधीच हेरून ठेवली होती. बागेच्या अगदी टोकाशी, आमच्या आणि झासेकिनांच्या आवाराला विभागणाऱ्या कुंपणाची दोन्ही आवारांना वेढणाऱ्या भिंतीमध्ये अखेर होत होती व तेथे एकच एक देवदाराचे झाड उभे होते. त्याच्या दाट उतरत्या फांद्यांच्या आडोशाला बसून रात्रीच्या अंधारात जेवढे दिसणे शक्य होते तेवढे भोवतालचे सर्व काही मी पाहू शकलो असतो. तेथे एक छोटी पाऊलवाट होती व मला ती नेहमी गूढ वाटायची. कुंपणाखालून नागमोडी वेढे घालीत ती वाट गेली होती व मेढयांवर चढून येणाऱ्या लोकांच्या पावलांखाली ह्या विशिष्ट स्थळी ती तुडविली गेली होती. पुढे ती अकाशियाच्या फुलांच्या ताटव्याकडे गेली होती. ह्या देवदाराच्या झाडापाशी पोहोचल्यानंतर मी त्याच्या बुंध्याला टेकलो आणि माझी टेहळणी सुरू केली.

आदल्या रात्रीप्रमाणेच ही रात्रही स्तब्ध होती. पण आकाशात फारसे ढग नव्हते आणि झुडुपांच्या व उंच फुलांच्या कडा जास्त ठळक दिसत होत्या. वाट पाहण्याची पहिली काही मिनिटे कंटाळवाणी गेली, अगदी भयाण वाटली. काहीही करायला मी सज्ज होतो. पण मी पुढे कसे वागायचे याबद्दल मनात अजून ठाम ठरत नव्हते. एकदम गर्जना करावी का: "कुठं निघालास? थांब! कबुली दे, नाही तर मरायला तयार हो!" अथवा



अंधारात सरळ चाकू खुपसायचा? प्रत्येक आवाज, प्रत्येक सळसळ, प्रत्येक फडफड मला आगळी वाटू लागली, महत्त्वाची वाटू लागली... पुढे झुकून झेप घेण्याच्या पवित्र्यात मी उभा राहिलो... पण अर्धा तास गेला; नंतर तास सरला. मी अधिक शांत आणि थंड झालो. जे मी करीत होतो ते व्यर्थ होते, मी मूर्ख ठरलो होतो, मालेवस्कीने माझी केवळ थट्टा केली होती, अशी जाणीव हळू हळू मला झाली. दबा सोडून मी बागेत एक चक्कर मारली. जणू माझ्यावर सूड म्हणून आसमंतात कुठेही कसलाही आवाज ऐकू येत नव्हता. सारे काही शांत होते. आमचा कुत्रासुद्धा अंगाची मुटकुळी करून बागेच्या फाटकापाशी झोपला होता. वनस्पती-रक्षणगृहाच्या पडक्या इमारतीच्या माथ्यावर मी चढलो, खाली दूरवर पसरलेल्या मैदानाकडे टक लावून पाहू लागलो, झिनैदाबरोबर झालेली माझी भेट आठवली आणि स्वप्नरंजनात रंगलो.

एकदम मी दचकलो... दार उघडल्याचा करकर आवाज झाला आणि पाठोपाठ फांद्या हलकेच तुटल्याचे मला भासले ... दोन झेपांमध्ये मी परत खाली आलो आणि जागच्या जागी थिजलो. बागेमध्ये जलद चोरपावलांचा आवाज स्पष्ट ऐकू येत होता... ती पावले माझ्या नजीक येत होती. "अखेर तो आला तर!" माझ्या मनात विचार चमकला. थरथरत्या हातांनी मी खिशामधून चाकू बाहेर काढला आणि तेवढ्याच कापऱ्या हाताने त्याचे पाते उघडले... माझ्या डोळ्यांसमोर काजवे चमकत होते, भीतीने आणि संतापाने माझे केस ताठ उभे झाले होते... जेथे मी उभा होतो त्याच स्थळी ती पावले येत होती... मी दबून बसलो... एका माणसाची आकृती अवतरली... बापरे! ते माझे वडील होते!

जरी त्यांनी काळ्या अंगरख्यात स्वतःला गुंडाळून घेतले होते आणि टोपी कपाळावर भुवयांपर्यंत खाली ओढून घेतली होती, तरी मी त्यांना तात्काळ ओळखले. माझ्याजवळून ते आवाज न करता गेले. मला कसलाच आडोसा नव्हता, पण त्यांचे माझ्याकडे लक्ष गेले नाही. कारण मी एवढा खाली वाकलो होतो की, जमिनीशी अगदी एकरूप झाल्यासारखा भासत होतो. एका क्षणात मत्सरी, रक्तपिपासू अथेल्लोचे शाळकरी मुलात रूपांतर घडले... माझ्या वडिलांचे अनपेक्षित पिशाच्चदर्शन पाहून मी एवढा घाबरलो होतो की, ते कोठून आले आणि कोणत्या दिशेला नाहीसे झाले ह्याचे प्रथम मला भानच राहिले नाही. जेव्हा सर्व शांत झाले आणि माझी गात्रे शिथिल झाली, तेव्हा कुठे मी स्वतःशी प्रश्न केला की, एवढ्या रात्री माझे वडील

बागेमध्ये काय करीत होते? भीतीच्या धक्क्यापायी मी माझा चाकू गवतात टाकला होता, पण आता तो शोधायची मला लाज वाटत होती. माझे मन तात्काळ ठिकाणावर आले होते. मात्र घरी परतताना, एल्डरच्या झुडुपाखालील माझ्या बाकड्यापाशी मी गेलो आणि झिनैदाच्या खिडकीकडे नजर टाकली. रात्रीच्या आकाशातून पडलेल्या फिकट प्रकाशामुळे त्या खिडकीची छोटी, किंचित बहिर्गोल तावदाने मंद निळी चमकत होती. एकदम त्यांचा रंग बदलला... आणि त्यांच्या पाठीमागे... मी स्पष्टपणे पाहिले... कुठल्यातरी फिक्या रंगाचा एक पडदा सावधपणे आणि हलकेच खाली सोडण्यात आला... शेवटी तो खिडकीच्या चौकटीला टेकला व तेथे निःस्तब्ध ओठंगून राहिला.

"ह्या सर्व गोष्टींचा अर्थ काय?" मी माझ्या खोलीत परतलो तेव्हा नकळतपणे मोठ्यांदा मी उद्गारलो. "स्वप्न, अकस्मात घडलेला प्रसंग, अथवा?..." माझ्या मनात शिरलेले नवे संशय एवढे नवीन आणि विचित्र होते, की त्यांना मान्य करायचा मला धीरच होत नव्हता.

## १८

दुसऱ्या दिवशी मी जागा झालो तेव्हा माझे डोके सपाटून दुखत होते. आदल्या दिवशीची उत्तेजकता नाहीशी झाली होती. तिच्या जागी मला कधीही माहीत नसलेली वेदनादायी गोंधळलेपणाची आणि उदासीनतेची भावना आली होती. जणू माझ्या अंतरंगातील कशाचा तरी मृत्यू घडत होता.

"अर्धा मेंदू काढून टाकलेल्या सशासारखे काय दिसताय?" त्या दिवशी आमची योगायोगाने भेट घडली तेव्हा लूशिन म्हणाले.

न्याहरीच्या मेजावर माझ्या आईकडे आणि वडिलांकडे मी चोरटे कटाक्ष टाकले. वडील नेहमीप्रमाणे शांत होते आणि आई नेहमीप्रमाणे संताप दाबून होती. माझे वडील काहीवेळा माझ्याशी एखादा प्रेमाचा शब्द बोलत, तशा शब्दाची मी अर्धवट अपेक्षा करीत होतो... पण यावेळी त्यांनी नेहमीप्रमाणे मला थंडपणे कुरवाळलेसुद्धा नाही. "मी झिनैदाला हे सगळं सांगावं का?..." माझ्या मनात विचार चालले होते. "आता कसलीच पर्वा नाही, कारण आमच्यामधलं सारं संपलंय!"

मी तिच्याकडे गेलो, पण तिला काही सांगणे तर दूरच, धड तिच्याशी



बोलण्याचीही संधी मला मिळाली नाही. म्हाताऱ्या प्रिन्सेसचा मुलगा, बारा वर्षांचा कॅडेट, पीटरबुर्गहून सुटीसाठी आला होता. झिनैदाने तात्काळ आपल्या भावाला माझ्या ताब्यात दिले.

"हा घ्या तुम्हाला साथी, वालोद्या!"* (तिने मला ह्या नांवाने यापूर्वी कधी संबोधिले नव्हते.) "त्याचंही नांव वालोद्या आहे. तुम्हाला तो आवडेल अशी आशा आहे. तो थोडा लाजाळू आहे, पण मनाचा चांगला आहे. त्याला न्येस्कूचनी बाग दाखवा, त्याच्याबरोबर फिरायला जा. थोडक्यात म्हणजे स्वतःच्या पंखाखाली त्याला घ्या. घेणार ना? तुम्ही स्वतः खूप तसेच दयाळू आहात!"

तिने माझ्या खांद्यावर प्रेमळपणे हात ठेवला आणि मी परत पूर्ण विरघळलो. ह्या मुलाच्या आगमनाने माझे परत मुलामध्ये रूपांतर घडले होते. मी त्या कॅडेटकडे मुकाटपणे पाहिले. तोसुद्धा गप्प राहून माझ्याकडे पहात होता. झिनैदा खो खो हसू लागली व तिने आम्हाला एकमेकांकडे ढकलले. "चला, मुलांनो, एकमेकांना मिठी मारा!"

आम्ही आज्ञा पाळली.

"तुम्हाला बाग बघायचीय?" मी त्या कॅडेटला विचारले.

"हो, कृपया दाखवा..." अस्सल कॅडेटप्रमाणे तो घोगऱ्या आवाजात उत्तरला.

झिनैदा परत हसली... त्या दिवशी तिच्या चेहऱ्याचा रंग जेवढा सुंदर दिसला तेवढा कधीही न पाहिल्याचे मला जाणवले. कॅडेट आणि मी निघालो. आमच्या बागेत एक जुना झोपाळा होता. त्याच्या अरुंद बैठकीवर बसायला मी कॅडेटला मदत केली आणि त्याला झोके देऊ लागलो. सर्व शक्तीनिशी दोर धरून तो स्तब्ध बसला होता. जाड कापडाचा नवा गणवेष त्याने परिधान केला होता व त्या गणवेषावर सोनेरी गोफाच्या रुंद पट्ट्या होत्या.

"तुम्ही कॉलर मोकळी का सोडत नाही?" मी विचारले.

"आम्हाला त्याची सवय आहे," घसा खाकरीत तो म्हणाला. त्याचे आपल्या बहिणीशी साम्य होते. विशेषतः त्याचे डोळे तिची आठवण करून देत होते. त्याच्याकडे पाहण्यात मला आनंद वाटत होता, पण जुने दुःख काळीज कुरतडत होते. "आज मी नुसतं लहान मूल आहे," मी स्वतःला सांगितले, "पण काल..." मी जेथे चाकू टाकला होता त्या जागेची मला आठवण झाली आणि तो शोधायला मी तेथे गेलो. मला तो सापडला.

---

* व्लादीमिरचे लाडके रूप. –अनु.

कॅंडेटने माझ्याकडून तो मागून घेतला, एका वनस्पतीचा जाड देठ तोडला आणि त्याची शिट्टी बनवून तो ती फुंकू लागला. अथेल्लोनेही ती शिट्टी थोडीशी वाजविली.

पण संध्याकाळी मात्र गरीब बिचारा अथेल्लो झिनैदाच्या मिठीत ढसाढसा रडला. बागेतील एका कोपऱ्यात तो खिन्न बसलेला तिला आढळला तेव्हा तिने त्याला त्याच्या उदासीनतेचे कारण विचारले होते. माझी आसवे एवढ्या जोरात वाहू लागली की, ती चांगलीच घाबरली.

"काय झालं वालोद्या? काय घडलं?" ती सतत विचारीत राहिली आणि उत्तर मिळत नाही व मी रडायचा थांबत नाही असे पाहून तिने माझ्या ओल्या गालाचे चुंबन घ्यायचा प्रयत्न केला. पण मी मान फिरविली व हुंदके देत देत अस्फुट म्हणालो :

"मला माहीत आहे सगळं! कशाला तुम्ही माझ्याशी खेळलात? माझ्या प्रेमाची तुम्हाला कशाला गरज होती?"

"होय, माझा खूप दोष आहे वालोद्या," झिनैदा म्हणाली. "मी दोषी आहे हे मला ठाऊक आहे," आणि तिने आपले हात एकत्र गुंफले. "माझ्यात खूप काही वाईट, काळंकुट्ट, पापी आहे... पण आता तुमच्या भावनांशी मी खेळत नाही. मला खरंच तुमचा लळा आहे, कशाबद्दल याची तुम्हाला कल्पना येणार नाही... पण... तुम्हाला काय माहीत आहे?"

काय सांगणार मी तिला? ती माझ्यासमोर उभी होती, माझ्याकडे पहात होती आणि मी तिचा होतो, सर्वस्वी तिचा होतो. जेव्हा जेव्हा ती माझ्याकडे पहायची तेव्हा तेव्हा मी नखशिखांत तिचा व्हायचा... त्यानंतर पंधरा मिनिटांनी कॅंडेटबरोबर आणि झिनैदाबरोबर मी शर्यती धावत होतो, आता मी रडत नव्हतो, हसत होतो, पण हसण्यामुळे सुजलेल्या पापण्यांमधून अश्रू सांडले. माझ्या गळ्याभोवती टायऐवजी झिनैदाची रिबन मी बांधली होती आणि तिच्या कमरेला विळखा घालून मी तिला पकडले तेव्हा आनंदाने आरोळी ठोकली. तिला हवे त्याप्रमाणे माझ्याशी ती वागू शकत होती.

१९

माझ्या अयशस्वी निशा-मोहीमेनंतरच्या आठवड्यात माझ्या भावनांचा तपशीलवार अहवाल द्यायचा असे म्हटले, तर कुठून आरंभ करावा तेच समजणार नाही. तो फार चमत्कारिक, झपाटलेला काळ होता. भावनांचा



कल्लोळ माजलेला होता. विचार, संशय, आशा, आनंद, यातना अशा अत्यंत परस्परविरोधी भावनांच्या वेड्या आवर्तात मी भोवंडत होतो. मी माझ्या काळजात डोकावून पहायला भीत होतो, जर सोळा वर्षांचा मुलगा आपल्या स्वतःच्या काळजात डोकावून पाहण्यास समर्थ असतो असे मानले तर! कोणत्याही गोष्टीचा गंभीरपणे विचार करायला घाबरत होतो. दिवसभराचा वेळ कसाबसा धांदलीत घालविण्याचा मी प्रयत्न करीत होतो. पण मला झोप मात्र छान लागत होती. येथे माझे बालिश चांचल्य माझ्या मदतीला येत होते. माझ्यावर प्रेम केले जात होते अथवा नाही ते जाणून घेण्याची माझी इच्छा नव्हती आणि माझ्यावर प्रेम केले जात नव्हते हे मान्य करण्याची माझी इच्छा नव्हती. माझ्या वडिलांना मी टाळीत होतो, पण झिनैदाला मी टाळू शकत नव्हतो... तिचे अस्तित्व मला ज्वालेप्रमाणे भस्मसात करीत होते... आणि जळणे व विरघळून जाणे जोवर प्रिय वाटत होते तोवर कोणती आग जाळत आणि वितळवून टाकीत होती याची मला कुठे पर्वा होती? येणारा प्रत्येक अनुभव घेऊन मी स्वतःशीच लपंडाव खेळीत होतो. स्मृतींना मी कोंडून घातले होते आणि माझ्या नशीबात पुढे काय ठेवले होते तिकडे मी डोळेझाक करीत होतो... ही उन्मना अवस्था फार काळ टिकू शकली नसती... एका विद्युत आघाताने ह्या सर्व गोष्टींची अचानक अखेर केली आणि माझ्या जीवनाचा प्रवाह एकदम बदलून टाकला.

एके दिवशी खूप लांब फिरून जेवायच्या वेळी मी घरी आलो तेव्हा मला चकित करणारी बातमी समजली की, मी एकटाच जेवणार होतो; माझे वडील बाहेर गेले होते आणि माझ्या आईची प्रकृती नीट नव्हती, तिला जेवण्याची इच्छा नव्हती व तिने स्वतःला आपल्या शय्यागृहात कोंडून घेतले होते. काहीतरी अघटित घडल्याचे आमच्या नोकरांच्या चेहऱ्यांवरून मला समजत होते... त्यांना प्रश्न करण्याचे मला साहस झाले नाही, पण त्यांच्यात माझा एक मित्र होता – फिलिप नांवाचा. ह्या तरुण नोकराला कवितेचे खूप वेड होते, तो गिटार उत्तम वाजवायचा. मी त्याच्याकडे चौकशी केली. मला समजले की, माझ्या आई-वडिलांमध्ये जोरदार भांडण झाले होते (मोलकरणींच्या खोलीत त्यातील प्रत्येक शब्द ऐकू येत होता; संभाषण प्रामुख्यानं फ्रेंच भाषेत घडले होते, पण माशा नांवाची (मारीया – अनु.) एक मोलकरीण पॅरिसहून आलेल्या एका शिंपीणीकडे पूर्वी पाच वर्षे काम करीत असल्यामुळे तिला ते सर्व समजले होते); माझ्या आईने माझ्या वडिलांवर आरोप केले होते की, त्यांनी तिच्याशी प्रतारणा केली होती,

शेजारच्या तरुण मुलीशी प्रकरण चालू ठेवले होते ; माझ्या वडिलांनी प्रथम आरोप धुडकावून लावले होते, पण नंतर संतापून रागाच्या भरात "तिच्या वयाच्या बाईनं" वगैरे काहीतरी वाईट उद्गार काढले होते व त्यामुळे माझ्या आईला रडू कोसळले होते ; माझ्या वडिलांनी म्हाताऱ्या प्रिन्सेसला कसलीतरी प्रॉमिसरी नोट दिल्याचा माझ्या आईने उल्लेख केला होता व म्हाताऱ्या आणि तरण्या प्रिन्सेसबद्दल कठोर उद्गार काढले होते, त्यामुळे चिडून जाऊन माझे वडील माझ्या आईला अपमानास्पद बोलले होते.

"ह्या सगळ्याची सुरुवात झाली," फिलिपने अखेरीस म्हटले, "एका निनांवी पत्रामुळे! ते कुणी लिहिलं हे कुणालाही माहीत नाही. म्हणून सगळ्या गोष्टी बाहेर आल्या, एरवी तसं कधीही घडलं नसतं."

"म्हणजे... तसं काही घडत होतं?" मी कसेबसे विचारले. माझे हात-पाय गार पडले होते व माझ्या आतमध्ये कुठेतरी थरथर सुरू झाली होती. फिलिपने सूचक डोळे मिचकावले.

"अर्थात! अशा गोष्टी लपवून ठेवता येत नाहीत. यावेळी तुमचे वडील खूप काळजी घेऊन वागत होते, पण कधी बग्गी आणायची असते, तर कधी... नोकरांशिवाय चालत नाही."

मी फिलिपला जायला सांगितले आणि माझ्या बिछान्यावर अंग टाकले. मला रडू कोसळले नाही अथवा निराशेने घेरले नाही. ते सर्व कसे आणि केव्हा घडले असा प्रश्न मी स्वतःला विचारला नाही. खूप पूर्वीच मला ही गोष्ट कशी समजली नाही, असा प्रश्नही मी स्वतःला विचारला नाही. माझ्या वडिलांविरुद्ध मी किंचितही कुरकुरलो नाही... आत्ता जे काही मला समजले होते ते माझ्या दृष्टीने फार होते. अचानक गौप्यस्फोटामुळे मी पुरता चिरडून गेलो होतो... सारे संपले होते. माझी सारी फुले मुळांपासून उखडली गेली होती, माझ्याभोवती कुस्करून विखुरली होती.

## २०

शहरात परत जाण्याचा इरादा दुसऱ्या दिवशी माझ्या आईने जाहीर केला. माझे वडील सकाळी तिच्या शय्यागृहात गेले आणि तिच्याशी बराच वेळपर्यंत बोलत राहिले. ते काय म्हणाले हे कुणीच ऐकले नाही, पण माझ्या आईचे रडणे थांबले. ती शांत झाली आणि आपली न्याहरी तिने मागविली, मात्र आपल्या खोलीमधून ती बाहेर आली नाही, अथवा आपला शहरात



परतण्याचा निर्णयही तिने बदलला नाही. सारा दिवसभर मी भटकत होतो हे मला आठवते, पण बागेत मात्र गेलो नाही आणि जोड-इमारतीच्या दिशेने तर साधा कटाक्षसुद्धा टाकला नाही. त्या संध्याकाळी एका विलक्षण असाधारण प्रसंगाला मी साक्षी राहिलो : काऊंट मालेवस्कीच्या दंडाला धरून माझ्या वडिलांनी त्याला हॉलमध्ये आणले आणि एका नोकराच्या उपस्थितीत थंडपणे म्हणाले : "काही दिवसांपूर्वी आपल्या स्वारीला एका घराचं बाहेरचं दार दाखवण्यात आलं होतं ; आणि आता कुठल्याही खुलाशांच्या भानगडीत न पडता, आपल्याला सांगण्यास मला सन्मान वाटतो की, इथं पुन्हा येण्याचा आपण कधी प्रयत्न केलात, तर मी तुम्हाला खिडकीमधून बाहेर फेकून देईन. तुमचं हस्ताक्षर मला आवडत नाही." काऊंट शरमेने खाली झुकला, त्याने कराकरा दात खाल्ले, खांदे उडविले व तो नाहीसा झाला.

शहरात, अर्बात रस्त्यावरील आमच्या घरात, परत जाण्याची तयारी सुरू झाली. माझ्या वडिलांना बहुधा दाचावर आणखी राहण्याची इच्छा नसावी. पण कोणत्याही निंदास्पद प्रसंगापासून माझ्या आईला परावृत्त करण्यात त्यांना यश आले. सर्व काही शांतपणे, घाई-गडबड न करता करण्यात आले. माझ्या आईने तर प्रिन्सेसला आपल्या शुभेच्छा कळविल्या व प्रकृती किंचित बरी नसल्यामुळे निरोप घेण्याला येऊ शकत नाही म्हणून खेद व्यक्त केला. मी झपाटल्यासारखा फिरत होतो. मनात फक्त एकच इच्छा होती... ह्या सर्व गोष्टींची लौकरात लौकर अखेर व्हावी. एक विचार मात्र माझ्या मनातून हलत नव्हता – माझे वडील स्वतंत्र पुरुष नसताना आणि कुणाशीही, उदाहरणार्थ बेलोवझोरोवशी, ती लग्न करू शकली असती याची उत्तम जाणीव असताना, ही तरुण मुलगी, तीसुद्धा एक प्रिन्सेस, अशी कशी वागली? आपल्या पूर्ण भवितव्याचा नाश करायला तिला भीती वाटली नाही? माझ्या मनात विचार आला : "हेच खरं प्रेम, खरा आवेग, खरी निष्ठा!" आणि लूशिनचे शब्द मला आठवले : "स्वतःच्या आत्म त्यागात आनंद मानणारी माणसं आहेत म्हणायची!" ह्या काळात एकदा जोड-इमारतीच्या एका खिडकीपाशी काहीतरी फिकट माझ्या दृष्टीला पडले... "झिनैदाचा चेहरा तर नव्हता?" मी नवल करीत राहिलो... आणि खरेच तसे होते. मला संयम धरवेना. निरोपाचा शब्द न बोलता तिच्यापासून दूर जाण्याची कल्पना मला सहन होत नव्हती. संधी साधून मी जोड-इमारतीचा रस्ता धरला.

म्हाताऱ्या प्रिन्सेसने आपल्या नेहमीच्या निष्काळजी आणि कळकट पद्धतीने दिवाणखान्यात माझे स्वागत केले.

"तुमची माणसं इतक्या लौकर कशी परत चालली?" आपल्या दोन्ही नाकपुड्यांमध्ये तपकीर कोंबीत तिने विचारले. मी तिच्याकडे पाहिले आणि माझ्या छातीवरील ओझे दूर झाले. फिलिपच्या तोंडून बाहेर पडलेला प्रॉमिसरी नोट हा शब्द मला सतत छळत होता. तिला कसलाही संशय आला नव्हता, अथवा त्यावेळी मला निदान तसे भासले. दुसऱ्या खोलीमधून झिनैदा तेथे आली. तिने काळा पोषाख केला होता. तिचा चेहरा फिक्ट दिसत होता आणि तिने केस मोकळे सोडले होते. तिने मुकाटपणे माझा हात आपल्या हाती घेतला व तेथून मला घेऊन गेली.

"मी तुमचा आवाज ऐकला," ती म्हणाली, "आणि ताबडतोब बाहेर आले. आम्हाला सोडून जाणं एवढं सोपं वाटलं, दुष्ट मुला?"

"मी तुमचा निरोप घ्यायला आलोय, प्रिन्सेस," उत्तरादाखल मी म्हणालो, "आणि कदाचित कायमचा. आम्ही शहरात परत निघालोय हे तुम्ही ऐकलंत?"

झिनैदाने माझ्याकडे शोधक नजरेने पाहिले.

"होय, ऐकलं. आल्याबद्दल आभार. मला वाटायला लागलं होतं, आता मी तुम्हाला परत कधीच पाहणार नाही. शक्य असलं तर प्रेमानं माझी आठवण करा. काहीवेळा मी तुम्हाला छळलंय हे मला माहीत आहे, पण तुम्हाला वाटते तशी मी नाही."

ती बाजूला वळली व खिडकीच्या चौकटीला टेकली.

"खरंच मी तशी नाही. माझ्याबद्दल तुमचं वाईट मत आहे हे मला माहीत आहे."

"माझं?"

"होय, तुमचं... तुमचं!"

"माझं?" मी दुःखाने परत म्हटले आणि तिच्या अनिवार्य, अवर्णनीय मोहकतेच्या प्रभावाखाली पूर्वीप्रमाणेच माझे काळीज गलबलून उठले. "मी? माझ्यावर विश्वास ठेवा झिनैदा अलेक्सान्द्रोवना, तुम्ही काहीही केलं असलंत, माझा कितीही छळ केला असलात, तरी माझ्या आयुष्याच्या अखेरपर्यंत मी तुमच्यावर प्रेम करीत राहीन, तुमची पूजा करीत राहीन!"

ती गर्रकन मागे वळली आणि दोन्ही हात पसरून माझ्या गळ्याभोवती तिने मिठी मारली. अत्यंत आवेगाने आणि ठामपणे तिने माझे चुंबन घेतले.



निरोपाचे ते प्रदीर्घ चुंबन कुणाला उद्देशून होते, केवळ परमेश्वरच जाणे, पण त्याची मधुरता मी अधीरपणे प्यायलो. त्याची कधीही पुनरावृत्ती होणार नाही हे मला ठाऊक होते.

"अच्छा... चलतो..." मी पुनःपुन्हा म्हणत होतो.

तिने मोठ्या कष्टाने स्वतःला माझ्यापासून दूर केले आणि खोलीतून ती निघून गेली. मीही निघून गेलो. तेथून निघून जाताना माझ्या मनात ज्या भावना होत्या त्यांचे वर्णन करण्यास मी असमर्थ आहे. ह्या सगळ्यातून परत एकदा जाणे मला आवडणार नाही, पण तरीही, जर मी तो प्रसंग हुकविला असता तर स्वतःला दुर्दैवी मानले असते.

आम्ही शहरात परतलो. भूतकाळाला झटकून परत नव्याने कामाला आरंभ करायला मला बराच वेळ लागला. माझी जखम सावकाश बरी झाली. पण माझ्या वडिलांविरुद्ध मी मनात आकस धरला नाही. उलट, माझ्या दृष्टीने ते अधिकच मोठे ठरले. मानसशास्त्रज्ञांना खुशाल त्यातील विरोधाभास उलगडत बसू दे. एक दिवस मी बुलेवार्दवरून चालत जात असताना अचानक लूशिन यांची गाठ पडली व मी खूप आनंदलो. त्यांचे मोकळे आणि प्रामाणिक वागणे मला आवडायचे. शिवाय त्यांनी माझ्यात जाग्या केलेल्या आठवणींमुळे मला ते प्रिय होते. मी धावतच त्यांच्यापाशी गेलो.

"अहा!" आपल्या भुवया जुळवीत ते उद्गारले. "तुम्ही होय? तरुण गृहस्था, एकदा नीट बघून घेतो! अजून थोडे पिवळट आहात, पण तुमच्या डोळ्यांमधला तो उदास भाव निघून गेलाय! आता माणसासारखे दिसता, पाळलेल्या कुत्र्याच्या पिल्लासारखे नव्हे! छान. कसे आहात? काम करताय?"

मी सुस्कारा टाकला. खोटे बोलायची माझी इच्छा नव्हती आणि सत्य सांगायची लाज वाटत होती.

"हरकत नाही," लूशिन पुढे म्हणाले, "हिंमत सोडू नका! सुरळीत जगणं आणि भावनांच्या भरात वाहवत न जाणं हे सर्वात महत्त्वाचं! कारण वाहून जाण्यात चांगलं काय? लाटेनं कुठंही नेलं तरी ते वाईटच. माणूस निदान दगडावर उभा असला तरी चालेल, पण स्वतःच्या दोन पायांवर. मी नुसता खोकत फिरतोय... आणि बेलोवझोरोव... त्याच्याबद्दल तुम्ही ऐकलंत?"

"काय घडलं? मी नाही ऐकलं."

"संपूर्ण नाहीसा झालाय. कॉकेशसमध्ये गेला असं म्हणतात. तरुण

गृहस्थ, हा तुम्हाला धडा ठरेल! आणि हे सारं घडतं याचं कारण वेगळ केव्हा व्हायचं, जाळं केव्हा तोडायचं ते लोकांना समजत नाही. तुम्ही त्यातून सहीसलामत बाहेर पडलेले दिसता! पुन्हा एकदा अडकणार नाही अशी दक्षता घ्या! अच्छा!"

"मी परत कधीही अडकणार नाही," मनाशी मी म्हणालो. "तिला मी परत कधीही पाहणार नाही." पण झिनैदाला पुन्हा एकदा पाहणे माझ्या दैवात होते.

## २१

माझ्या वडिलांना दररोज घोड्यावरून रपेट करण्याची सवय होती. लांब सडपातळ मानेचा आणि लांब पायांचा सुरेख इंग्लिश जातीचा पिंगट घोडा त्यांच्यापाशी होता. कमालीचे नाठाळ आणि आवरता न येण्याजोगे ते जनावर होते. त्याचे नांव होते: इलेक्ट्रिक. फक्त माझे वडीलच त्याला काबूत ठेवू शकत. एक दिवस माझे वडील अत्यंत छान मन:स्थितीत माझ्या खोलीत आले. अलिकडे त्यांच्या बाबतीत ही क्वचित गोष्ट ठरली होती. घोड्यावरून रपेट करायला ते निघाले होते व बुटांना त्यांनी आऱ्या लावल्या होत्या. मला बरोबर घेऊन जा, अशी मी त्यांच्यापाशी विनवणी केली.

"त्यापेक्षा आपण बेडूकउड्या खेळलेलं जास्त चांगलं," माझे वडील उत्तरले. "तुझ्या छोट्या जर्मन तट्टावरून तू माझ्या जोडीनं येऊ शकणार नाहीस."

"मी नक्की येईन. मीसुद्धा आऱ्या लावतो."

"चल तर!"

आम्ही निघालो. माझे केसाळ काळे तट्टू होते. त्याचे पाय भक्कम होते आणि ते दमदार होते. इलेक्ट्रिकच्या दुडक्या चालीची बरोबरी करायला त्याला धावावे लागत होते हे खरे, पण मी मागे पडलो नाही. माझ्या वडिलांसारखा स्वार मी कधीही पाहिला नाही. त्यांची बैठक इतकी सहज, इतकी ऐटबाज होती आणि घोड्याला ती जाणवायची असे भासायचे. आपल्यावरील स्वाराचा घोड्याला अभिमान वाटायचा. बुलेवार्दांमधून आम्ही फिरलो, थोडा वेळ 'देवीच्ये पोल्ये' वर घालविला, अनेक कुंपणांवरून उड्या घेतल्या (आरंभी उडी घ्यायला मी घाबरत होतो, पण माझ्या वडिलांना



घाबरट लोकांचा राग होता, म्हणून घाबरण्याचे मी बंद केले होते), मस्क्वा नदी दोनदा ओलांडली आणि आम्ही घरी परत निघालो असे मला वाटू लागले होते, कारण माझा घोडा दमलेला दिसतोय असा उद्गार माझ्या वडिलांच्या तोंडून निघाला होता. पण एकदम त्यांनी माझ्यापासून जोरात वळण घेतले आणि क्रीमस्की पायउताराकडे निघाले. नदीतीरावरून त्यांनी आपला घोडा दौडत नेला. मी त्यांच्या पाठोपाठ दौडलो. जुन्या ओंडक्यांच्या एका उंच ढिगापाशी आम्ही पोहोचलो तेव्हा त्यांनी अलगदपणे इलेक्ट्रिकवरून खाली उडी घेतली, मलाही घोड्यावरून खाली उतरण्याची खूण केली, आपल्या घोड्याचे लगाम माझ्या हाती फेकले आणि ओंडक्यापाशी वाट पहात थांबायला सांगितले. मग एका अरुंद गल्लीत ते वळले आणि माझ्या दृष्टीआड झाले. मी नदीतीरावर घोड्यांचे लगाम धरून येरझाऱ्या घालू लागलो. इलेक्ट्रिक सारखा डोक्याला झटके देत होता, सगळे शरीर गदगदा हलवीत होता, फुरफुरत होता, खिंकाळत होता. मी त्याला रागे भरत होतो. जेव्हा जेव्हा मी स्तब्ध उभा रहायचा तेव्हा तेव्हा तो जमीन उकरायचा, किंचाळायचा आणि माझ्या तट्टाच्या मानेला चावायचा. थोडक्यात म्हणजे लाडावलेल्या खानदान घोड्यासारखा तो वागत होता आणि तसा तो होताच खानदान. अजूनही माझे वडील परत आले नव्हते. नदीतून अप्रिय दमट वास उमटत होता. झिमझिम पाऊस आवाज न करता पडत होता, त्या कंटाळवाण्या राखाडी ओंडक्यांवर छोटे छोटे काळे ठिपके उमटवीत होता. त्या ओंडक्यांभोवती चकरा मारून मला वीट आला होता. मी खूप कंटाळलो आणि मला उदास वाटू लागले. तरीही माझे वडील अद्याप परत आले नव्हते. तेवढ्यात तेथे एक पोलीस अवतरला. ओंडक्यांसारख्याच राखाडी दिसणाऱ्या त्या फिन्निश माणसाने डोक्यावर प्रचंड भांड्यासारखी टोपी घातली होती व त्याच्या हातात भाले-कुऱ्हाड होती. (आता मस्क्वा नदी-च्या तीरावर तो पोलीस काय करीत होता?) माझ्यापाशी तो आला आणि आपला म्हातारा, सुरकुत्यांचे जाळे उमटलेला चेहरा माझ्याकडे वळवून त्याने विचारले:

"ह्या घोड्यांना धरून तुम्ही इथं काय करता आहात, छोटे मालक? मी धरतो तुमच्या घोड्यांचे लगाम."

मी त्याला उत्तर दिले नाही. त्याने थोडी तंबाखू माझ्यापाशी मागितली. त्याच्या कटकटीतून सुटण्यासाठी (शिवाय माझी अधीरता असह्य होऊ लागली होती), माझे वडील गेले होते त्या दिशेने मी काही पावले टाकली. नंतर

मी गल्लीपर्यंत गेलो, कोपऱ्यावर वळलो... आणि एकदम थांबलो. सुमारे चाळीस पावले अंतरावर, एका छोट्या लाकडी घराच्या उघड्या खिडकीपाशी माझे वडील माझ्या पाठमोरे उभे होते. खिडकीच्या चौकटीशी ते झुकले होते आणि आतमध्ये, पडद्यामागे अर्धवट झाकली गेलेली, काळ्या पोषाखातील एक स्त्री बसली होती. माझ्या वडिलांशी बोलणारी ती स्त्री म्हणजे झिनैदा होती.

मी अवाक् झालो. अर्थातच हे मी अपेक्षिले नव्हते. तात्काळ पाठ फिरवून जायचे ही माझी पहिली प्रतिक्रिया होती. "जर वडिलांनी मागं पाहिलं तर मी खलास!" माझ्या मनात आले. पण कुतूहलाहून जोरदार, मत्सराहूनही जोरदार, भीतीपेक्षा जोरदार अशा एका विलक्षण भावनेने मला जागच्या जागी खिळवून टाकले. मी टक लावून पहात राहिलो आणि त्यांचे शब्द पकडण्यासाठी कान टवकारले. माझे वडील कसलातरी आग्रह धरीत होते आणि झिनैदा कबूल होत नव्हती असे दिसले. मला अजून तिचा चेहरा दिसतो–दुःखी, गंभीर, सुंदर. निष्ठा, कष्टीपणा आणि प्रेम ह्यांचे अवर्णनीय मिश्रण तिच्या चेहऱ्यावर उमटले होते. एक प्रकारची घोर निराशा त्यावर होती. मला त्याला दुसरा शब्द सापडत नाही. ती एखाद-दुसरा शब्दच उच्चारीत होती, नजर कधीही वर उचलत नव्हती, केवळ नम्रपणे आणि हट्टीपणाने स्मित करीत होती. केवळ त्या स्मितावरून मी झिनैदाला ओळखू शकलो असतो. माझ्या वडिलांनी खांदे उडविले व टोपी सरळ केली... त्यांचा संयम सुटत चालल्याची ती हमखास खूण होती... मग मला शब्द कळले: «Vous devez vous Séparer de cette...»* झिनैदा उठून उभी राहिली आणि तिने आपला हात पुढे धरला... एक अघटित प्रसंग माझ्या डोळ्यांसमोर घडला: माझे वडील आपल्या हातातील ज्या चाबकाने आत्तापर्यंत आपल्या कोटाच्या किनारीवरील धूळ उडवीत होते, त्याच चाबकाचा त्यांनी तिच्या उघड्या दंडावर सपकन फटकारा मारला. मी मोठ्या प्रयासाने तोंडातून उमटणारी किंचाळी दाबून धरली, पण झिनैदा फक्त दचकली, मुकाटपणे तिने माझ्या वडिलांकडे पाहिले, आपला दंड सावकाशपणे उचलून स्वतःच्या ओठांवर टेकविला आणि त्या तांबड्या वळाचे चुंबन घेतले. चाबूक फेकून माझे वडील पोर्चच्या पायऱ्यांकडे धावले आणि घरात घुसले... झिनैदा खिडकीपासून दूर वळली व हात पसरून धावली...

---

*आपण हे सोडलं पाहिजे...–अनु.



मी माघारी फिरलो. भीतीने आणि आश्चर्ययुक्त दुःखाने माझे अंतःकरण भरले होते. गल्लीच्या टोकापर्यंत मी धावत गेलो. इलेक्ट्रिकचा लगाम माझ्या हातून जवळ जवळ सुटला होता. नदीच्या किनाऱ्यावर मी परतलो. माझ्या मनात विचारांचा प्रचंड गोंधळ माजला होता. एरवी अत्यंत थंड आणि अलिप्त वागणाऱ्या माझ्या वडिलांना आकस्मिक रागाचे झटके येत असत हे मला पूर्वी ठाऊक होते, पण तरीही आत्ता जे काही मी पाहिले होते ते समजून घेणे मला अशक्य ठरले... झिनैदाचे वागणे, पाहणे, स्मित... ह्या गोष्टी माझ्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत मी विसरू शकणार नाही हे मला ठाऊक होते. अचानकरीत्या माझ्यासमोर उलगडलेला तिच्या प्रतिमेचा हा नवा पैलू माझ्या स्मृतीवर कायमचा कोरला गेला होता हे मला ठाऊक होते. भकास नजरेने मी नदीकडे पहात होतो. माझ्या गालांवरून ओघळणाऱ्या अश्रूंचे मला भान नव्हते. "त्यांनी तिला मारलं," मी स्वतःशी पुनःपुन्हा बोलत राहिलो, "तिला मारलं, तिला मारलं..."

"चल, माझा घोडा दे," पाठीमागून माझ्या वडिलांचा आवाज आला.

यांत्रिकपणे मी त्यांच्या हाती लगाम दिले. इलेक्ट्रिकच्या पाठीवर ते उडी मारून बसले. खूप वेळ वाट पाहून गारठलेला घोडा एकदम मागे सरकला आणि नंतर त्याने तेवढ्याच वेगाने पुढे झेप घेतली. पण माझ्या वडिलांनी त्या जनावराच्या कुशीत आरी खुपसून आणि मानेवर बुक्क्या मारून लौकरच त्याला ताळ्यावर आणले... "अरेच्चा–माझ्यापाशी माझा चाबूक नाही!" ते तोंडातल्या तोंडात म्हणाले.

मला त्या चाबकाच्या फटकाऱ्याची आठवण झाली आणि अंगातून शहारा गेला.

"तुमच्या चाबकाचं काय केलंत?" थोड्या वेळानंतर मी वडिलांना विचारले.

उत्तर न देता ते पुढे दौडले. मी त्यांना गाठले. त्यांच्या चेहऱ्याला मी सामोरे गेलेच पाहिजे असे मला वाटले.

"वाट बघून कंटाळलास का?" दात आवळीत वडिलांनी विचारले.

"थोडासा. पण तुमचा चाबूक कुठं हरवलात तुम्ही?" मी नेटाने विचारले.

माझ्या वडिलांनी माझ्याकडे एक तीव्र कटाक्ष फेकला.

"मी तो हरवला नाही," ते म्हणाले, "मी तो फेकून दिला!"

ते विचारमग्न झाले आणि त्यांनी डोके खाली झुकविले... आणि त्यांचा कठोर चेहरा किती सीमेपर्यंत दयाळू व कनवाळू बनू शकतो हे मी प्रथमच आणि कदाचित शेवटचेच पाहिले.

पुन्हा त्यांनी घोड्याला टाच दिली आणि यावेळी मी त्यांना गाठू शकलो नाही. त्यांच्यानंतर पंधरा मिनिटांनी मी घरी पोहोचलो.

"ह्याला म्हणतात प्रेम!" त्या रात्री माझ्या टेबलाशी बसलो असताना मी पुन्हा एकदा स्वतःला बजाविले. माझ्या टेबलावर पुस्तकांचा आणि वह्यांचा ढिगारा हळूहळू वाढत होता. "किती तीव्र भावना! मारणारा हात कितीही प्रिय असला तरी कुणीही प्रहार स्वीकारणार नाही, कुणालाही साहजिकच संताप येईल, असे वाटेल! पण प्रेम करणारी व्यक्ती हेसुद्धा सहन करू शकते असं दिसतं... आणि मी... मला वाटलं..."

गेल्या महिन्यात माझे विचार बरेच परिपक्व बनले होते आणि खूप खळबळ व यातना सोसलेले माझे प्रेम मला क्षुद्र, बालिश, नगण्या वाटू लागले होते. मला अज्ञात अशा गोष्टींविषयी मी केवळ संदिग्ध तर्क बांधू शकत होतो. एखाद्या अपरिचित सुंदर, पण कठोर चेहऱ्याप्रमाणे ती गोष्ट मला भीतीदायक वाटत होती, अंधारात जिचा व्यर्थ शोध घेतला जातो अशी...

त्या रात्री मला खूप विचित्र आणि भयानक स्वप्न पडले. एका अंधाऱ्या, बैठ्या छताच्या खोलीत मी गेलो होतो... माझे वडील तेथे हातात चाबूक धरून पाय आपटीत उभे होते. झिनैदा एका कोपऱ्यात अंग चोरून बसली होती आणि तिच्या हातावर नव्हे तर भुवईवर लाल वळ उमटला होता. त्या दोघांच्या मागून बेलोवझोरोवची रक्ताने माखलेली आकृती उभी झाली. त्याने आपले फिक्कट ओठ उघडले आणि माझ्या वडिलांना रागारागाने धमक्या दिल्या...

दोन महिन्यांनंतर मी विद्यापीठात दाखल झालो आणि त्यानंतर सहा महिन्यांनी माझे वडील पीटरबुर्गमध्ये वारले (हृदयविकाराचा झटका). आम्ही नुकताच आमचा मुक्काम तेथे हलविला होता. त्यांच्या मृत्यूपूर्वी काही दिवस आधी मॉस्कोहून त्यांना एक पत्र आले होते व त्यामुळे त्यांना बराच मनस्ताप सहन करावा लागला होता. माझ्या आईपाशी जाऊन त्यांनी कसलीतरी मागणी केली होती... अक्षरशः ते रडले होते म्हणे!.. माझे वडील रडले! त्यांना झटका आला त्या दिवशी सकाळी त्यांनी मला फ्रेंचमधून पत्र लिहायला सुरुवात केली होती: "माझ्या मुला," त्यांनी लिहिले होते,



"स्त्रीच्या प्रेमापासून सावध रहा, त्या आनंदापासून, त्या विषापासून सावध रहा..." त्यांच्या मृत्यूनंतर माझ्या आईने बरीच मोठी रक्कम मॉस्कोला धाडली.

## २२

तीन-चार वर्षे उलटली. विद्यापीठाची पदवी नुकतीच मिळाली होती, पण पुढे काय करायचे, कोणता दरवाजा ठोठावायचा, ह्याबद्दल अद्याप मनाची निश्चिती झाली नव्हती. दरम्यान, मी नुसताच रिकामपणात वेळ घालवीत होतो. एका संध्याकाळी नाटकाच्या थिएटरवर मैदानोव भेटला. त्याचे लग्न झाले होते व एका सरकारी कचेरीत तो नोकरी करीत होता. पण त्याच्यात काहीही बदल झाल्याचे मला आढळले नाही. व्यर्थ उत्साहात आणि निराशेच्या अचानक झटक्यांमध्ये त्याचे मन अजूनही रमत होते.

"तुम्हाला ठाऊक आहे," तो मला म्हणाला, "मादाम दोल्स्काया इथं आहे."

"कोण ही मादाम दोल्स्काया?"

"तुम्ही विसरलात? पूर्वीची प्रिन्सेस झासेकिना, जिच्या प्रेमात आम्ही सगळे पडलो होतो, तुम्हीसुद्धा. दाचावर, न्येस्कूचनी बागेपाशी... आठवतं?"

"तिनं दोल्स्कीबरोबर लग्न केलं?"

"हो."

"आणि ती इथं आहे? थिएटरवर?"

"नाही. पण काही दिवसांपूर्वी ती पीटरबुर्गमध्ये आलीय. ती परदेशी चाललीय."

"आणि तिचा नवरा कसा आहे?"

"खूप छान माणूस आहे, श्रीमंतही आहे. मॉस्कोत आम्ही एकत्र काम करत होतो. तुम्हाला समजतं की, त्या प्रकरणानंतर... अर्थात तुम्हाला ते सारं ठाऊकच आहे" (मैदानोवने सूचक स्मित केले)... "नवरा शोधणं तिच्या दृष्टीनं फारसं सोपं नव्हतं. काही पुढच्या गोष्टी घडल्या होत्या... पण तिच्या कुवतीची बाई काय वाट्टेल ते जमवू शकते. जाऊन तिला भेटा. तुम्हाला पाहून खूप आनंद होईल तिला. आता ती पूर्वीपेक्षा जास्त सुंदर दिसतेय."

मैदानोवने मला झिनैदाचा पत्ता दिला. देमूत हॉटेलमध्ये ती उतरली होती.[28] माझ्या मनात जुन्या आठवणी खळबळून जाग्या झाल्या... दुसऱ्याच दिवशी माझ्या जुन्या प्रीतीदेवतेला भेटण्याचे मी स्वतःशी ठरविले. पण अनेक गोष्टी उद्‌भवल्या. एक आठवडा उलटला, आणखी एक आठवडा गेला. अखेर मी देमूत हॉटेलवर गेलो आणि मादाम दोल्स्कायाची चौकशी केली. चारच दिवसांपूर्वी, बाळंतपणात, अचानक ती वारल्याचे मला सांगण्यात आले.

माझ्या काळजावर कुणीतरी वार केल्यासारखे मला वाटले. मी तिला भेटू शकलो असतो, पण भेटलो नाही आणि आता कधीही भेटू शकणार नाही, हा कडवट विचार सर्व शक्तीनिशी माझे अंतःकरण पश्चात्तापाने होरपळून काढीत होता. "वारली!" हॉटेलच्या पोर्टरकडे भकास पहात मी परत हा शब्द उच्चारला. नंतर मुकाट रस्त्यावर गेलो आणि निश्चित दिशा न ठरविता वाट फुटेल तिकडे चालत जाऊ लागलो. पूर्ण भूतकाळ डोळ्यांसमोर उभा झाला होता. त्या तरुण, बुद्धिमान, उत्सुक जीवाचा असा अंत घडायचा होता! एवढ्या घाईने आणि खळबळाटाने ह्या नशीबाची त्याने आकांक्षा धरली होती! चिंतनात गढून मी तिचा प्रिय चेहरा आठवला... ते डोळे... ती झुलुपे ... सारे काही एका अरुंद लाकडी पेटीत बंद करण्यात आले होते... अद्याप जिवंत असलेल्या माझ्यापासून जवळच कोठेतरी ओल्या मातीत तो देह विसावला होता... कदाचित माझ्या वडिलांपासून काही हातांच्या अंतरावर... ह्या सर्व गोष्टी माझ्या मनात येऊन गेल्या, त्यांच्यावर मन केंद्रित करण्याचे मी प्रयत्न केले, पण :

> भावनाहीन ओठांनी मरणाची बातमी सांगितली
> आणि माझ्या भावनाहीन कानांनी ती ऐकली...[29]

हे शब्द माझ्या अंतःकरणात घुमत राहिले. अरे यौवना! यौवना! तू कशाचीही पर्वा करीत नाहीस; विश्वातील सगळी भांडारे जणू तुझ्या मालकीची असतात. दुःख हाच तुझ्या मनोरंजनाचा उगम असतो, विषाद तुला शोभून दिसतो! आत्मविश्वासाने आणि उद्धटपणे तू जाहीर करतोस : पहा, मी एकटा जगतोय! पण दिवस उडून चाललेत, त्यांची दखल न घेता नष्ट होत आहेत, त्यांच्या कसल्याही खुणा मागे उरल्या नाहीत. आणि



तुझ्यातले सर्व काही नाहीसे होतेय... सूर्यप्रकाशात वितळणाऱ्या मेणाप्रमाणे... हिमाप्रमाणे.... कदाचित, तुझ्या इच्छेनुसार हवी ती गोष्ट तू साध्य करू शकशील ह्यात तुझ्या मोहकतेचे रहस्य दडलेले नाही, तर साध्य न करण्यासारखे काहीही नाही ह्या तुझ्या विश्वासात ते सामावले आहे. आपल्या शक्तींची तू अविचाराने उधळपट्टी करतोस, त्या शक्तींचा दुसरा काही उपयोगच नाही असे तुला वाटते. म्हणून आमच्यापैकी प्रत्येकजण खात्रीपूर्वक म्हणतो : "माझा वेळ मी जर व्यर्थ दवडला नसता, तर मी खूप काही केले असते!"

माझेच उदाहरण घ्या : माझ्या अपेक्षा कशावर आधारल्या होत्या, कसली आशा मी उराशी बाळगली होती, कोणते उज्ज्वल भवितव्य मी गृहीत धरीत होतो, म्हणून माझ्या पहिल्या प्रेमाच्या पिशाच्चाचा निरोप घेताना मी उसासासुद्धा टाकला नाही, क्षणाचे दुःख मला झाले नाही?

आणि मी ज्या आशा धरल्या होत्या, त्यातील काय खरे झाले? आता माझ्या वाटेवर संध्या-छाया पडू लागल्या आहेत अशा वेळी, त्या वासंतिक पहाटेच्या अल्पकालीन वादळाच्या आठवणीपेक्षा दुसरे अधिक तेजस्वी, अधिक मौल्यवान असे माझ्या दृष्टीने काय आहे?

पण कळसाला पोहोचण्याची पराकाष्ठा मी निष्कारण का करतोय? त्या अविचारी यौवनाच्या दिवसांमध्येसुद्धा थडग्यापासून मला येणाऱ्या दुःखी हाकांकडे मी दुर्लक्ष केले नव्हते. झिनैदाच्या मृत्यूची बातमी ऐकल्यानंतर काही दिवसांनी, मी स्वतःहून, एका अनिवार्य ऊर्मीपुढे मान तुकवून, माझ्याच इमारतीत राहणाऱ्या एका गरीब स्त्रीच्या मृत्युशय्येपाशी मी हजर राहिल्याचे मला आठवते. फाटक्या चिरगुटांखाली, दोन कठीण लाकडी फळ्यांच्या शय्येवर आणि पोत्याच्या उशीवर ती यातनांनी तळमळत आयुष्याशी झगडत होती. तिचे जीवन म्हणजे अखंड दारिद्र्याविरुद्धचा कडवा संघर्ष होता. तिला कोणताही आनंद माहीत नव्हता, सुखाचा गोडवा कधी चाखला नव्हता... मृत्यूचे स्वागत करायला ती उत्सुक असावी, त्यात तिला तिची शांती आणि मुक्ती दिसली असावी. तरीही, तिचे जर्जर शरीर जोवर तगून होते, तिच्याभोवती विळखा घातलेल्या थंड हाताखाली तिची छाती कष्टाने जोवर वर-खाली होत होती, तिच्यामध्ये शक्तीचा शेवटचा अवशेष जोवर शिल्लक होता, तोपर्यंत ती म्हातारी सतत क्रूस-चिन्हे करीत होती आणि पुटपुटत होती : देवा, माझ्या पापांना क्षमा कर..." आणि तिच्या

डोळ्यांमध्ये दिसणारी मृत्यूबद्दलची धास्ती, भीती तेव्हाच नाहीशी झाली, जेव्हा तिची शुद्धीची शेवटची ठिणगी विझली... मला आठवते, त्या म्हातारीच्या मृत्युशय्येपाशी, मला झिनैदाची अतीव करुणेने स्मृती आली आणि तिच्यासाठी, माझ्या वडिलांसाठी, माझ्यासाठी –प्रार्थना करण्याची इच्छा मनात उसळली.

१८६०



# वसंतामधील जलधारा

वसंतामधील जलधारांनी
जणू चित्र भिजल्यासारखी,
धुंद मजेची वर्षे सरली
धुंद सुखाचे दिवस सरले!

**एका जुन्या प्रेमगीतामधून**

आपल्या अभ्यासिकेत तो परतला तेव्हा रात्रीचा एक वाजून गेला होता. मेणबत्त्या पेटविण्यासाठी आलेल्या नोकराला त्याने घालवून दिले व दोन्ही हातांमध्ये आपला चेहरा झाकून त्याने आपले अंग शेकोटीजवळच्या आराम-खुर्चीत धप्पदिशी झोकून दिले.

एवढा शारीरिक आणि मानसिक थकवा यापूर्वी त्याला कधीही जाणवला नव्हता. छान स्त्रियांच्या आणि सुसंस्कृत पुरुषांच्या संगतीत त्याने सारी संध्याकाळ घालविली होती. त्या स्त्रियांपैकी बऱ्याचजणी सुंदर होत्या, जवळजवळ सगळे पुरुष बुद्धिमान अथवा गुणी म्हणून प्रसिद्ध होते व संभाषणामध्ये त्यानेही आपल्या बुद्धिमत्तेची चमक दाखविली होती... पण तरीही, प्राचीन रोमन लोकांनी ज्याबद्दल तक्रार केली होती ती «taedium vitae» ची भावना एवढ्या प्रकर्षाने त्याला कधी पूर्वी जाणवली नव्हती; जीवनाचा वीट आणणाऱ्या भावनेने यापूर्वी त्याला एवढ्या जोरदारपणे कधी घुसमटून टाकले नव्हते. त्याचे वय जर आहे त्याहून थोडे कमी असते तर दुःखापायी, कंटाळ्यापायी आणि चिडीपायी तो रडला असता. कडू दवण्यासारखा उग्र आणि जळजळणारा कडवटपणा त्याच्या अंतःकरणात दाटत होता. शारदीय काळोख्या रात्रीप्रमाणे, काहीतरी तिरस्करणीय आणि दडपून टाकणारे सर्व दिशांनी त्याला घेरून टाकीत होते. ह्या काळोखापासून आणि कडवटपणापासून कशी सुटका करून घ्यायची हे त्याला समजत नव्हते. झोपेची आशा करण्यात अर्थ नव्हता. तो येणार नाही हे त्याला नक्की ठाऊक होते.

तो विचारांमध्ये गुंतला... सावकाशपणे, सुस्तपणे, कडवटपणे.

मानवजातीच्या सर्व पोकळ डौलाचा, दिखाऊपणाचा, क्षुल्लक खोटेपणाचा

त्याने विचार केला. त्याने माणसाच्या सर्व वयांचा एकापाठोपाठ आढावा घेतला (तो स्वतः बावन्नपेक्षा थोडा मोठा होता) आणि त्यातील एका मध्येही त्याचे मन रमले नाही. नेहमी तेच चिरंतन अर्थहीन उद्योग, तोच शक्तीचा व्यर्थ व्यय, तीच स्वतःची अंशतः खरी आणि अंशतः खोटी फसवणूक... काहीही करून मन दुसरीकडे गुंतविण्याचा प्रयत्न! .. आणि अचानक, वज्राघाताप्रमाणे माणसावर म्हातारपण येऊन कोसळते... मग प्रत्येक गोष्टीमागे सतत वाढत जाणारी मृत्यूबद्दलची कुरतडणारी भीती आणि मग... अगाध विवर! परिस्थिती अधिक वाईट झाली नाही तर ठीकच, पण अंतापूर्वी दुबळेपणा व यातना निःसंशय येणार, लोखंडावर गंज चढतो तशा! .. कवींनी वर्णन केलेल्या महाप्रलयी लाटा त्याला जीवनाच्या महासागरात दिसल्या नव्हत्या... त्याने काढलेल्या चित्रात तो शांत, निवांत सागर होता, निःस्तब्ध होता आणि काळ्या तळापर्यंत पारदर्शी होता; तो स्वतः एका छोट्याशा होडीत बसला होता आणि त्या काळोख्या तळाच्या फटीत मोठ्या माशांप्रमाणे भासणारे हिडीस राक्षस दिसत होते. ही जीवनापासून वेगळी न होणारी दुःखे होती–आजारपण, संकटे, वेड, दारिद्र्य, आंधळेपणा... त्याने अधिक लक्षपूर्वक डोकावून पाहिले आणि अचानक त्या भोवतालच्या अंधकारातून एक राक्षस अवतरला! तो वर वर येत होता, अधिकाधिक स्पष्ट दिसत होता, त्याचे किळसवाणेपण ठळकपणे जाणवत होते... आणखी एक मिनिट आणि त्याने होडी उलटवून टाकली असती. पण अचानक परत तो अंधुक बनला, दूर गेला, तळाशी त्याने बुडी मारली व तेथे आपल्या पंखासारख्या अवयवांची किंचित थरथर करीत पडून राहिला... पण ठरलेली वेळ येईल आणि होडीला उलटवून टाकील.

त्याने आपल्या मानेला एक झटका दिला, ताडकन तो उभा राहिला, खोलीत त्याने एक-दोनदा येरझाऱ्या घातल्या आणि मग टेबलापाशी जाऊन त्याने एकामागून एक कप्पे उघडले आणि त्यातील कागदपत्रे तो उस्कटीत राहिला. त्या कप्प्यांमध्ये बरीच जुनी पत्रे होती व त्यांपैकी बहुतेक स्त्रियांनी लिहिलेली होती. त्याला नक्की काय शोधायचे होते हे सांगणे त्याचे त्यालाच जमले नसते, पण त्या उद्योगामागे एकच हेतू त्याच्या मनात होता... त्याला दडपून टाकणाऱ्या विचारांपासून मन दुसरीकडे वळवायचे. हाती मिळतील ती काही पत्रे त्याने चाळली (त्यातील एका पत्राला एक सुकलेले फूल एका विटलेल्या फितीने बांधलेले होते), उगीचच खांदे उडविले आणि शेकोटीकडे नजर टाकीत त्याने ती पत्रे बाजूला ठेवली. कदाचित तो सर्व उपरा कचरा



जाळून टाकण्याचा त्याचा इरादा असावा. एका खणातून दुसऱ्या खणात घाईघाईने हात खुपशीत असताना अचानक त्याचे डोळे विस्फारले व सावकाशपणे त्याने एक जुन्या धाटणीची अष्टकोनी पेटी बाहेर काढून तिचे झाकण उघडले. त्या पेटीत, पिवळट पडलेल्या कागदी रुमालाच्या दोन घड्यांखाली एक छोटा रत्नजडित क्रूस होता.

ह्या क्रूसाकडे तो अनेक मिनिटेपर्यंत चकित डोळ्यांनी पहात राहिला... आणि अचानक त्याच्या तोंडून अस्फुट चीत्कार उमटला. त्याच्या मुद्रेवरून किंचित विषादाची, किंचित आनंदाची भावना उमटून गेली. एखादा माणूस जेव्हा आपल्या एकेकाळच्या खूप प्रिय व्यक्तीला बऱ्याच काळानंतर अनपेक्षितपणे भेटतो आणि ती व्यक्ती काळाच्या ओघात बदलली असली तरी पूर्वीसारखीच त्याच्यासमोर उभी राहते, तेव्हा त्या माणसाच्या मुद्रेवर असा भाव उमटलेला दिसतो.

तो उठला आणि शेकोटीपाशी गेला. परत तो आरामखुर्चीत बसला आणि परत त्याने आपल्या हातांमध्ये आपला चेहरा झाकून घेतला... "आजच कशाला? इतके दिवस सोडून आजच का?" त्याने स्वतःला प्रश्न केला आणि फार फार पूर्वी घडलेल्या घटना त्याला आठवल्या.

त्याला आठवले ते हे...

पण आधी त्याचे आणि त्याच्या वडिलांचे नांव सांगितले पाहिजे– द्मित्री पावलोविच. त्याचे आडनांव होते सानिन.

तर त्याला आठवले ते हे:

## १

१८४० चा उन्हाळा. सानिनचा बावीसावा वाढदिवस नुकताच साजरा झाला होता आणि इटलीहून रशियाला परतताना वाटेत तो फ्रँकफुर्टमध्ये थांबला होता. त्याची थोडीशी इस्टेट होती आणि जवळच्या नातेवाईकांचा फारसा गोतावळा नसलेला तो एक स्वतंत्र तरुण होता. एका दूरच्या नातेवाईकाच्या मरणामुळे त्याला काही हजार रूबल मिळाले होते व सरकारी नोकरीत शिरण्यापूर्वी, अंमलदारीच्या जोखडाला सरतेशेवटी खांद्यावर घेण्यापूर्वी–ज्याच्याविना त्याला स्वतःचा उदरनिर्वाह भागविणे शक्य नव्हते– ते पैसे परदेश-प्रवासात खर्च करण्याचे त्याने ठरविले होते. सानिनने आपले इरादे तंतोतंत अंमलात आणले होते. त्याने एवढ्या कुशलपणे सर्व बेत पार

पाडले होते की, फ्रँकफूर्टमध्ये ज्या दिवशी त्याचे आगमन झाले तेव्हा पीटर-बुर्गला परत जाण्यापुरतेच पैसे त्याच्या खिशात उरले होते. १८४० साली युरोपात रेलमार्ग फारसा अस्तित्वात नव्हता आणि प्रवासी टप्पे-गाडीतून प्रवास करीत. सानिनने एका "बेइवागेन" मध्ये आपली जागा आरक्षित केली होती, पण रात्री अकरापर्यंत टप्पे-गाडी निघणार नव्हती आणि त्याच्या-पुढे भरपूर मोकळा वेळ पडला होता. सुदैवाने हवा छान होती आणि त्यावेळी ख्यातनाम असलेल्या "श्वेत हंस" पथिकाश्रमात भोजन उरकून शहरावर नजर टाकायला सानिन बाहेर पडला. दान्नेकरची आरीआद्ना[31] तो पहायला गेला, पण त्याला ती फारशी आवडली नाही. ग्योथेच्या घराला[32] त्याने भेट दिली, पण ग्योथेच्या 'वेर्तेर' शिवाय तोवर त्याने काहीच वाचले नव्हते आणि तोसुद्धा फ्रेंच अनुवाद. माईन नदीच्या काठाने तो फिरला. सभ्य प्रवाशाला अनुरूप असा कंटाळा त्याला आला होता. सरतेशेवटी, संध्याकाळी सहाच्या सुमारास, थकल्या शरीराने आणि धूळभरल्या बुटांनी, फ्रँकफूर्टमधील एका अत्यंत अप्रसिद्ध रस्त्यावर आपण उभे असल्याचे त्याला स्वतःला आढळले. ह्या रस्त्याचा त्याच्या स्मरणशक्तीवर पुढे दीर्घकाळपर्यंत ठसा राहणार आहे. त्या रस्त्यावरील काही तुरळक घरांपैकी एका घराच्या दर्शनी भागावर एक पाटी होती व 'इटालीचा मिठाईवाला जिओवानी रोझेल्ली' याचे तेथे दुकान असल्याची माहिती त्या पाटीवर लिहिलेली होती. ग्लासभर लेमोनेड पिण्यासाठी सानिन त्या दुकानात शिरला, पण साध्यासुध्या काऊंटर-मागे चिटपाखरूसुद्धा नव्हते. केमिस्टच्या दुकानातील फडताळांची आठवण करून देणारी रंगीत फडताळे तेथे होती व चकचकीत कागदाची लेबले लावलेल्या काही बाटल्या त्या फडताळांवर उभ्या होत्या. तसेच कुरकुरीत बिस्कीटे, चॉकलेट आणि गोळ्या यांनी भरलेल्या काही बरण्या त्या फडता-ळांवर उभ्या होत्या. पण डोळ्यांची उघडझाप करणाऱ्या आणि घुर्रर्र आवाज करणाऱ्या, खिडकीजवळील उंच वेताच्या स्टुलाच्या बैठकीमधून आपल्या पंजांची नखे आत-बाहेर काढणाऱ्या एका भुऱ्या रंगाच्या मांजराविना तेथे कुणीही नव्हते. कोरीव काम केलेल्या पालथ्या लाकडी पेटीशेजारी फरशीवर किरमिजी लोकरीचा एक मोठा चेंडू पडला होता आणि सायंकालीन सूर्याची तिरपी किरणे त्यावर पडल्यामुळे तो रत्नमण्यासारखा लाल दिसत होता. आतील खोलीमधून अस्पष्ट आवाज येत होते. सानिनने दारावरच्या घंटेचा किणकिणाट थांबेपर्यंत वाट पाहिली आणि "कुणी आहे का?" असे आवाज उंचावून तो विचारणार, तेवढ्यात शेजारच्या खोलीचे दार उघडले आणि सानिनने जे काही पाहिले त्याने त्याचा श्वासच अडकला!



## २

आपल्या उघड्या खांद्यांवर काळ्या केसांच्या बटा मोकळ्या सोडलेली सुमारे एकोणीस वर्षांची एक मुलगी वेगाने पुढील खोलीत आली. तिचे उघडे हात पसरलेले होते. सानिनला पाहताच ती त्याच्याकडे धावली, त्याचा हात तिने पकडला व आपल्यामागे त्याला खेचत घेऊन निघाली. जाता जाता धापा टाकीत ती म्हणत होती: "लौकर, लौकर, वाचवा त्याला!" तिचे ऐकण्याची इच्छा नव्हती म्हणून नव्हे, पण केवळ आश्चर्यापोटी, सानिन त्या मुलीपाठोपाठ ताबडतोब गेला नाही. एका जागी खिळल्याप्रमाणे तो उभा राहिला. असे सौंदर्य त्याने यापूर्वी आपल्या आयुष्यात कधीही पाहिले नव्हते. त्याच्याकडे वळून ती उद्गारली: "चला, चला ना!" आणि तिच्या आवा-जात एवढी निराशा दाटलेली होती, तिच्या नजरेत, तिच्या फिकट गालाशी आवळून धरलेल्या थरथरणाऱ्या मुठीत, तिच्या हाताच्या हालचालीत एवढी निराशा दाटलेली होती की, त्यानंतर मात्र आणखी एका क्षणाचा विलंब न लावता, उघड्या दारामधून तो तिच्या पाठोपाठ धावला.

त्या मुलीपाठोपाठ तो ज्या खोलीत गेला त्या खोलीमध्ये, जुन्या धाटणी-च्या घोड्याच्या केसांपासून बनविलेल्या दिवाणावर सुमारे चौदा वर्षांचा एक मुलगा निजलेला होता. त्या मुलाचे त्या मुलीशी विलक्षण साम्य होते. बहुधा तो तिचा भाऊ असावा. त्याचा चेहरा मरणांतिक पांढराफटक पडला होता. मेणासारखी अथवा प्राचीन संगमरवरासारखी पिवळट छटा त्याच्या पांढुरक्या चेहऱ्यावर उमटली होती. त्याचे डोळे मिटलेले होते; कोरीव दगडासारख्या त्याच्या कपाळावर त्याच्या दाट केसांची छाया पडली होती. त्याच्या स्तब्ध भुवया कोरीव होत्या. त्याच्या निळसर ओठांमधून त्याचे आवळलेले दात दिसत होते. त्याचा श्वास थांबलेला भासत होता. त्याचा एक हात खाली फरशीपर्यंत लोंबत होता, तर दुसरा हात त्याच्या कपाळावर आडवा पडला होता. त्या मुलाच्या अंगावर पूर्ण पोषाख होता. त्याच्या जाकीटाची बटणे गच्च लावलेली होती. घट्ट बांधलेल्या टायच्या गाठीने त्याचा गळा आवळलेला होता.

मोठ्यांदा विव्हळत ती मुलगी त्या मुलाकडे धावली. "तो मेला! तो मेला!" ती उद्गारली... "अवघ्या एका मिनिटापूर्वी तिथं बसून तो माझ्याशी बोलत होता आणि एकदम खाली पडला आणि तिथं निपचित पडून राहिला... देवा रे... त्याच्यासाठी आपण काहीच करू शकणार

नाही का? आईसुद्धा बाहेर गेलीय. पान्तालीओने, ए पान्तालीओने, डॉक्टर कुठं आहेत?" पुढे एकदम ती इटालियन भाषेत म्हणाली: "तू डॉक्टरांकडं गेला होतास ना?"

"सीनोरा, मी स्वत: गेलो नाही, मी लुईझाला पाठवलं," दारामधून एक घोगरा आवाज आला व कमानदार पायांचा एक छोटचा चणीचा म्हातारा लंगडत खोलीत आला. त्याच्या अंगात काळ्या बटणांचा जांभळा फ्रॉक-कोट होता, लांब पांढरा टाय होता, आखूड नानकीन तुमान होती व निळे लोकरी गुडघ्यांपर्यंतचे पायमोजे होते. त्याच्या राखाडी पांढुरक्या रंगाच्या केसांच्या झुबक्याखाली त्याचा छोटुकला चेहरा जवळजवळ दिसतच नव्हता. डोक्यावर सर्वत्र पिंजारलेल्या आणि मानेवर वेण्या पडलेल्या ह्या केसांमुळे तो म्हातारा एखाद्या तुरेवाल्या कोंबड्यासारखा दिसत होता. हे साधर्म्य आणखीच ठळकपणे जाणवण्याचे कारण म्हणजे त्याच्या झिंज्यांमधून फक्त टोकदार नाक व गोल पिवळ्या डोळ्यांची जोडी तेवढी दिसत होती.

"लुईझा तिथं जास्त लौकर पोहोचेल, मला धावता येत नाही," म्हातारा पुढे इटालियन भाषेत बोलत राहिला. जोडे-बुटांमधील त्याच्या पायांची सारखी चाळवाचाळव चालली होती. "मी थोडं पाणी घेऊन आलोय."

आपल्या गाठाळलेल्या, क्षीण बोटांमध्ये त्याने पाण्याच्या बाटलीची लांब मान गच्च पकडून धरली होती.

"पण डॉक्टर येण्यापूर्वीच एमिल मरणार!" सानिनकडे आपले हात पसरीत ती मुलगी उद्गारली. "अहो, O mein Herr! तुम्ही त्याच्यासाठी काही करू शकणार नाही का?"

"त्याचं रक्त वाहू दिलं पाहिजे, त्याला झटका आलाय," ती तरुणी ज्याला पान्तालीओने म्हणून संबोधत होती तो म्हातारा म्हणाला.

सानिनला वैद्यकशास्त्राचे जरी काहीही ज्ञान नव्हते तरी एक गोष्ट त्याला खात्रीने ठाऊक होती – चौदा वर्षांच्या मुलांना झटका येत नाही.

"त्याला घेरी आलीय, हा झटका नाही," पान्तालीओनेला उद्देशून सानिन म्हणाला. "तुमच्यापाशी ब्रश आहेत?"

म्हाताऱ्याने चेहरा वर उचलला: "काय?"

"ब्रश, ब्रश," सानिन प्रथम जर्मनमध्ये, नंतर फ्रेंचमध्ये म्हणाला. "ब्रश," आपल्या कोटावर ब्रश फिरविण्याचा मूकाभिनय करीत तो परत म्हणाला.



सरतेशेवटी त्याला काय म्हणायचे होते ते म्हाताऱ्याच्या ध्यानात आले.

"हं, हं, ब्रश! Spazzette अर्थात आमच्याकडं आहेत!"

"असतील तेवढे आणा! आपण त्याच्या अंगातला कोट काढू आणि त्याचं अंग चोळू!"

"छान... Benone त्याच्या डोक्यावर पाणी ओतायला नको?"

"नको! नंतर! आता लौकरात लौकर मला ब्रश आणून द्या."

पान्तालीओनेने बाटली खाली फरशीवर ठेवली, तो खोलीबाहेर धावत गेला आणि दुसऱ्याच क्षणी दोन ब्रश घेऊन परत आला. एक ब्रश केसांचा होता आणि दुसरा कपडे साफ करण्याचा. त्याच्या पाठोपाठ कुरळ्या केसांचे एक छोटे कुत्रे शेपूट जोरजोराने हलवीत आत आले. म्हाताऱ्याकडे, त्या मुलीकडे आणि सानिनकडेसुद्धा ते चौकसपणे पहात होते. जणू हा गोंधळ कशासाठी चाललाय हे त्याला जाणून घ्यायचे होते.

... निपचित पडलेल्या मुलाच्या अंगातील कोट सानिनने झटपट उतरविला, त्याची कॉलर सैल केली, त्याच्या हाताच्या बाह्या वर सरकविल्या – आणि आपल्या हातातील ब्रशने त्या मुलाची छाती व हात सर्व ताकदीनिशी चोळायला आरंभ केला. पान्तालीओनेने केसांचा ब्रश घेतला व सानिन-एवढ्याच उत्साहाने तो त्या मुलाच्या बुटांवर आणि विजारीवर चोळू लागला. ती मुलगी दिवणाच्या शेजारी गुडघे टेकून बसली व आपल्या हातांमध्ये आपले डोके गच्च दाबून डोळ्यांची पापणी न लवविता आपल्या भावाच्या चेहऱ्याकडे टक लावून पाहू लागली.

सानिन जेव्हा ब्रश चोळीत होता तेव्हा तो तिच्याकडे तिरपे कटाक्ष टाकीत होता. देवा रे... किती लावण्यमयी तरुणी होती!

३

तिचे नाक वाजवीपेक्षा जरा जास्त लांब होते, पण सरळ धारदार होते. तिच्या वरच्या ओठावर किंचित काळसर लव होती. पण तिच्या चेहऱ्याची त्वचा मऊ आणि अपारदर्शी होती. हस्तीदंताशी किंवा फिकट अंबराशी तिची तुलना करता आली असती. तिच्या केसांच्या चकचकीत लाटा पालाझ्झो-पिट्टीमधील आल्लोरीच्या ज्यूडिथप्रमाणे[33] होत्या. विशेषत: तिचे काळसर राखाडी डोळे – बाहुल्यांभोवती काळी कडा असलेले – विलक्षण सुंदर होते... आत्तासुद्धा, जेव्हा त्यांचे तेज भीतीने व दुःखाने मंदावले होते तरीही...

नकळतपणे सानिनचे विचार नुकताच तो ज्या वैभवशाली देशाला सोडून आला होता त्या देशाकडे वळले होते... पण इटलीतसुद्धा ह्या सौंदर्यासमान त्याला कुणी भेटले नव्हते. त्या तरुणीचा श्वासोच्छ्वास अनियमितपणे चालला होता, जणू आपल्या प्रत्येक श्वासागणिक ती आपल्या भावाचा श्वासोच्छ्वास सुरू होण्याची वाट पहात होती.

सानिनने चोळण्याचे काम चालू ठेवले होते, पण त्याचे डोळे केवळ त्या तरुणीला पहात नव्हते. पान्तालीओनेच्या खाशा आकृतीनेही त्याचे लक्ष वेधून घेतले होते. म्हातारा पुरता थकून गेला होता आणि धापा टाकीत होता. ब्रशाच्या प्रत्येक हालचालीबरोबर तो उडी मारीत होता आणि केविलवाणेपणाने कण्हत होता. घामाने ओली झालेली त्याच्या केसांची एक मोठी बट इकडून तिकडे उडत होती. एखाद्या मोठ्या वनस्पतीची मुळे पाण्याने धुवून उघडी पडावी तसे त्याचे केस दिसत होते.

"निदान त्याचे बूट काढा," सानिन त्याला सांगण्याच्या बेतात होता...

इतक्या असाधारण घडामोडींमुळे बावरलेले ते छोटे केसाळ कुत्रे आपल्या पुढील पंजावर दबा धरून भुंकू लागले.

«Tartaglia — canaglia!» म्हातारा फिस्कारला.

पण तेवढ्यात त्या तरुणीचा चेहरा पालटला. तिच्या भुवया उंचावल्या, तिचे डोळे अधिक मोठे झाल्याचे भासले आणि तिच्या चेहऱ्यावर आनंद उजळला...

सानिनने वळून पाहिले... त्या मुलाच्या गालांवर परत लाली येत होती, त्याच्या पापण्या किंचित हलू लागल्या होत्या, त्याच्या नाकपुड्या थरथरत होत्या. अजूनही आवळलेल्या त्याच्या दातांमधून त्याने हवा आत ओढली व एक सुस्कारा टाकला...

"एमिल!" मुलगी ओरडली. «Emilio mio!»

टप्पोरे काळे डोळे सावकाशपणे उघडले. अजून ते भकासपणे पहात होते, पण आता फिकट स्मित हळूच त्यांच्यात शिरले. तसेच फिकट स्मित त्याच्या पांढुरक्या ओठांवरही उमटले. मग त्याने आपला लोंबता हात हलविला आणि झटकन आपल्या छातीवर ठेवला.

"एमिलिओ," ती मुलगी परत उद्‌गारली व उठून उभी राहिली. तिच्या मुद्रेवरील भाव एवढा ठळक, एवढा तीव्र होता की, जणू कोणत्याही क्षणी ती एकदम रडणार अथवा खो खो हसू लागणार असे भासत होते.

"एमिल! काय झालं? एमिल!" दारापलिकडून आवाज आला आणि



नेटका पोषाख केलेली, रुपेरी केसांची व काळसर वर्णाची एक स्त्री झपाझपा पावले टाकीत खोलीत आली. तिच्या पाठोपाठ एक वयस्क गृहस्थ आत आला व त्याच्या मागून मोलकरणीचे डोके डोकावले आणि अदृश्य झाले.

मुलगी त्या लोकांना भेटायला धावली.

"आई, त्याला वाचवलं, तो जिवंत राहिला!" त्या स्त्रीला घट्ट मिठी मारीत मुलगी ओरडली.

"पण झालं तरी काय?" स्त्रीने परत विचारले. "मी घरी आले आणि पाहते तो दारात डॉक्टर आणि लुईझा!"

काय घडले ती हकीकत मुलीने आपल्या आईला सांगायला सुरुवात केली आणि डॉक्टर आपल्या पेशंटकडे वळले. तो मुलगा हळूहळू शुद्धीवर येत होता व त्याच्या ओठांवर सदैव स्मित खेळत होते. आपणामुळे माजलेल्या घबराटीची त्याला शरम वाटत असल्याचे भासत होते.

"अच्छा, तुम्ही त्याला ब्रशांनी चोळत होतात," सानिनला आणि पान्तालीओनेला उद्देशून डॉक्टर म्हणाले. "तुम्ही छान कामगिरी बजावलीत. खरंच, अगदी उत्तम कल्पना... आता आणखी दुसरे कोणते उपाय योजायचे ते आपण बघू..."

डॉक्टरांनी पेशंटची नाडी पाहिली. "हं! तुमची जीभ दाखवा!"

ती बाई त्या मुलावर चिंताग्रस्त मुद्रेने ओणवी झाली. त्याने आणखीच रुंद स्मित केले. तिच्याकडे त्याचे डोळे वळले व तो लाजला.

आपण त्या लोकांमध्ये आता अडथळा ठरू अशा जाणीवेने सानिन बाहेर दुकानात गेला. पण रस्त्याकडील दाराच्या मुठीवर त्याचा हात पडला न पडला तोच ती तरुणी परत त्याच्यासमोर अवतरली आणि तिने त्याला थांबविले.

"तुम्ही निघालात?" तिने विचारले व त्याच्या चेहऱ्याकडे प्रेमळपणे पाहिले. "मी तुम्हाला अडवून धरत नाही, पण संध्याकाळी इथं परत यायचं तुम्ही मला वचन दिलं पाहिजे. आम्ही तुमचे फार फार ऋणी आहोत. तुम्ही नसतात तर कदाचित माझा भाऊ जगला नसता. तुमचे आभार मानायची आमची इच्छा आहे–आईची इच्छा आहे. तुमच्याबद्दलची माहिती तुम्ही आम्हाला सांगितली पाहिजे, आमच्याबरोबर मौज केली पाहिजे..."

"पण आज रात्री मी बर्लिनला जातोय," सानिन चाचरत म्हणाला.

"तुमच्यापाशी भरपूर वेळ आहे," तरुणी उत्साहाने म्हणाली. "एक तासाच्या अवधीत या आणि आमच्याबरोबर कपभर चॉकलेट प्या. वचन देणार? मला त्याच्यापाशी परत गेलं पाहिजे. येणार ना?"

करण्यासारखे सानिनपाशी काय राहिले होते?

"मी येईन," तो म्हणाला.

त्या सुंदरीने त्याचा हात झटकन दाबला आणि ती भुर्रदिशी निघून गेली – दुसऱ्या क्षणी आपण रस्त्यावर असल्याचे त्याला आढळले.

४

दीड तासानंतर सानिन जेव्हा मिठाईवाल्याच्या दुकानात परतला तेव्हा घरच्या माणसाप्रमाणे त्याचे तेथे स्वागत झाले. एमिलला जेथे मसाज करण्यात आला होता त्या दिवाणावरच तो अद्याप बसून होता. डॉक्टरांनी त्याला काही औषध लिहून दिले होते व "भावनिक संवेदनांसंबंधी खूप काळजी घ्यायला" सांगितली होती, कारण पेशंट घाबरट वृत्तीचा होता व हृदय-विकार जडण्याची शक्यता होती. त्याला पूर्वी असे फेफऱ्याचे झटके वारंवार आलेले होते, पण असा प्रदीर्घ आणि जोरदार झटका कधी आला नव्हता. आता तो धोक्यापलिकडे गेल्याचे डॉक्टरांनी जाहीर केले होते. आजारामधून बऱ्या होणाऱ्या माणसाप्रमाणे एमिलने आता एक ढगळ अंगरखा घातला होता. त्याच्या आईने त्याच्या गळ्याभोवती निळा लोकरी मफलर गुंडाळला होता. पण एमिल मजेत दिसत होता. अगदी छान उत्सवी. आणि एकूण वातावरणच उत्सवी होते. दिवाणाशेजारी, स्वच्छ रुमाल पसरलेल्या एका गोल मेजावर एका चिनी मातीच्या प्रचंड पात्रात भरलेल्या चॉकलेटचा गंध दरवळत होता. त्याभोवती कप होते, सरबत भरलेली काचपात्रे होती, बिस्कीटे आणि सुरळीदार गोड पाव होते व फुलेसुद्धा होती. जुन्या चांदीच्या शमादानांच्या जोडीत सहा सडपातळ मेणबत्त्या जळत होत्या. दिवाणाच्या एका बाजूला उंच पाठीची एक आरामखुर्ची प्रेमळपणे हात पसरून उभी होती. त्या आरामखुर्चीत सानिनला बसविण्यात आले. त्या दिवशी त्याच्या परिचयाची झालेली मिठाईवाल्याच्या घरची सर्व माणसे तेथे हजर होती. तार्तालिया केसाळ कुत्रा आणि एक बोकासुद्धा हजर होते. सगळे कमालीचे आनंदी दिसत होते. कुत्रा मजेने शिंकत होता. फक्त बोका निर्विकार दिसत होता. पूर्वीप्रमाणेच डोळ्यांची उघडझाप करीत होता आणि तोंडाची वेडीवाकडी हालचाल करीत होता. सानिनला स्वतःबद्दलची माहिती त्या सर्वांना सांगावी लागली. तो कोठून आला, त्याचे नांव काय वगैरे सांगावे लागले. तो रशियन होता असे जेव्हा त्याने सांगितले तेव्हा बायकांनी किंचित आश्चर्य



व्यक्त केले व बारीकसे चीत्कारही त्यांच्या तोंडून उमटले. पण त्या दोघींनी घाईघाईने स्वतःला सावरले आणि एकाच वेळी बोलत त्याच्या जर्मन भाषेची त्या प्रशंसा करू लागल्या. मात्र त्याची इच्छा असल्यास त्याने फ्रेंचमध्ये बोलायला हरकत नाही असे त्यांनी सांगितले, कारण त्या दोघींना फ्रेंच समजत होते व उत्तम बोलता येत होते. सानिनने ह्या संधीचा अर्थातच फायदा घेतला. "सानिन! सानिन!" रशियन नांव उच्चारायला एवढे सोपे असेल असे त्या दोघींना कधी वाटले नव्हते. त्याचे पहिली नांव – दिमित्री – तेसुद्धा छान होते. वयस्क बाई म्हणाली की, तिच्या तारुण्यात तिने «Demetrio e Polibio»[34] नामक एक सुंदर ऑपेरा ऐकला होता, पण तिला त्या "देमेत्रिओ" पेक्षा "दिमित्री" खूपच अधिक आवडला होता. अशा प्रकारे सानिनने सुमारे तासभर गप्पा मारल्या. त्या दोघींनी आपल्या बाजूने आपल्या खाजगी आयुष्यांचे तपशील त्याच्यासमोर उघड केले. एकूण संभाषणावर त्या रुपेरी केसांच्या बाईचे, आईचे, वर्चस्व होते. तिचे नांव लेओनोरा रोझेल्ली होते, तिचा नवरा जिओवान्नी बात्तिस्ता रोझेल्ली पंचवीस वर्षांपूर्वी फ्रँकफूर्टमध्ये मिठाईवाला म्हणून स्थायिक झाला होता व त्याच्या मरणानंतर ती विधवेचे जीवन जगत होती, असे सानिनला समजले. जिओवान्नी बात्तिस्ता मूळ व्हिसेन्झाचा होता, तो तापट डोक्याचा आणि उग्र माणूस असला तरी मनाचा चांगला होता व अस्सल रिपब्लिकनवादी होता. एवढे सांगून मादाम रोझेल्लीने त्याचे तैलचित्र दाखविले. दिवाणाच्या वरती ते टांगलेले होते. मादाम रोझेल्लीने एक उसासा टाकीत सांगितले की, चित्रकारसुद्धा एक रिपब्लिकन होता आणि मूळ व्यक्तीशी चित्राचे फारसे साम्य नव्हते. दिवंगत जिओवान्नी बात्तिस्ता चित्रामध्ये एखाद्या उग्र चेहऱ्याच्या लुटारूसारखा दिसत होता, रिनाल्दो रिनाल्दीनोसारखा.[35] मादाम रोझेल्ली स्वतः "प्राचीन आणि सुंदर पार्मा शहरची होती, जेथे अजरामर कोर्रेजिओच्या भित्तीचित्रांनी वैभवशाली चर्चचा घुमट नटलेला होता."[36] पण जर्मनीत प्रदीर्घ मुक्काम केल्यामुळे आता ती पूर्ण ट्यूटन बनली होती. खेदाने मान हलवीत पुढे तिने सांगितले की, **एक** मुलगी आणि **एक मुलगा** (त्या दोघांकडे तिने आळीपाळीने बोट दाखविले) यांच्याविना आता तिचे दुसरे कुणी उरले नव्हते. मुलीचे नांव होते जेम्मा आणि मुलाचे एमिल. ती दोघेही चांगली, आज्ञाधारक मुले आहेत, विशेषतः एमिल. ("आणि मी ऐकत नाही वाटतं?" मुलीने मध्येच विचारले. – "हे, तूसुद्धा रिपब्लिकन आहेस!" आईने प्रतिटोला मारला.); अर्थात तिच्या नवऱ्या-

च्या हयातीत होता तसा आता चांगला धंदा राहिला नव्हता. तो मिठाई बनविण्यात कसबी होता... («Un grand' uomo!» – कठोर मुद्रा करीत पान्तालीओने आग्रहपूर्वक म्हणाला.) पण देवाची कृपा आहे, तिला तक्रार करायला जागा नाही!

५

जेम्मा आपल्या आईचे बोलणे ऐकत होती. ऐकत असताना स्मित करीत होती, उसासे टाकीत होती, आईच्या खांद्यावर हळू थोपटत होती, नापसंतीदर्शक बोट हलवीत होती आणि अधूनमधून सानिनकडे कटाक्ष फेकीत होती. थोड्या वेळानंतर ती उठली, आपल्या आईभोवती तिने हातांची मिठी घातली आणि तिच्या मानेचे चुंबन घेऊन तिने तिला खिदळायला लावले.

पान्तालीओनेचीसुद्धा सानिनला ओळख करून देण्यात आली. एकेकाळी तो ऑपेरामध्ये बॅरीटोन गायक होता, पण रंगमंच सोडून त्याला बरीच वर्षे लोटली होती आणि रोझेल्ली कुटुंबाचा तो एक घटक बनला होता. कुटुंबाचा स्नेही आणि सेवक यांच्या दरम्यान त्याचे स्थान होते. जर्मनीत खूप वर्षे राहूनही त्याचे जर्मन भाषेचे ज्ञान वाईट होते. जर्मन भाषेतील काही शिव्या तेवढ्या त्याला येत व त्या शिव्यांचासुद्धा तो व्याकरणदृष्ट्या खून पाडीत असे. «Ferroflucto spiccebubbio»* हा शब्दप्रयोग जवळ जवळ प्रत्येक जर्मन माणसाला उद्देशून तो वापरीत असे. इटालियन मात्र तो निर्दोष बोलत असे, कारण सिनिगालियाचा तो रहिवासी होता, जेथे lingua toscana in bocca romana** अद्याप ऐकू येत होती.

एमिलिओ सुस्त गुंगीत होता. एखाद्या संकटापासून नुकतीच सुटका झालेला अथवा आजारातून बरा होणारा माणूस ज्या संवेदना अनुभवतो, त्यांचा तो आनंद लुटीत होता. कुटुंबात तो सर्वांत लाडका होता हे उघड जाणवत होते. सानिनचे त्याने लाजत लाजत आभार मानले, पण बहुतेक सारा वेळ सरबत पिण्यात आणि मिठाई खाण्यात तो गुंतला होता. उत्तम

* हलकट डांबीस. (जर्मन Verfluchte Spitzbube चा विपर्यास.) – सं.

** तोस्काना भाषा रोमनांच्या ओठांवर.



चॉकलेटचे दोन कप पिणे आणि बरीचशी बिस्कीटे खाणे सानिनला भाग पडले. त्याने एक बिस्कीट संपवले न संपवले तोच जेम्मा दुसरे त्याच्यासमोर धरायची आणि नाकारणे अशक्य व्हायचे. लौकरच तेथे तो रूळला आणि वेळ कमालीच्या वेगाने पसार झाला. त्यांना कितीतरी गोष्टी तो सांगू इच्छित होता – खुद्द रशियाबद्दल, रशियन हवामानाबद्दल, रशियन समाज आणि रशियन शेतकऱ्याबद्दल – आणि विशेषतः कझाकांबद्दल. शिवाय १८१२ च्या युद्धाची माहिती, पहिला प्योत्र, क्रेमलीन, रशियन गाणी, चर्चच्या घंटा. आमच्या असीम, दूरच्या मायभूमीबद्दल त्या दोघा बायकांना पुसटशी-सुद्धा माहिती नव्हती. मादाम रोझेल्लीने, अथवा तिला नेहमी ज्या नांवाने हाक मारीत त्या फ्राऊ लेनोरेने जेव्हा सानिनला विचारले की, गेल्या शतकात पीटरबुर्गमध्ये उभारलेले बर्फाचे घर अजून अस्तित्वात आहे का, तेव्हा तो आश्चर्याने थक्क झाला. तिच्या दिवंगत नवऱ्याच्या संग्रहातील एका पुस्तकामध्ये «Bellezze delle arti» ('कलेतील सुंदरता') त्याबद्दल एक रंजक लेख तिने नुकताच वाचला होता. "म्हणजे रशियात उन्हाळा कधीच नसतो असं तुम्हाला म्हणायचंय?" ह्या सानिनच्या प्रश्नावर फ्राऊ लेनोरेने मान्य केले की, या क्षणापर्यंत तिची अशी धारणा होती की, रशिया ही चिरंतन हिमभूमी आहे, तेथे प्रत्येकजण केसाळ कोटांमध्ये वावरत आहे आणि सगळे पुरुष लष्करी आहेत... मात्र कमालीचे आतिथ्यशील आणि शेतकरीसुद्धा अगदी आज्ञाधारक. तिला आणि तिच्या मुलीला अधिक अचूक माहिती देण्याचा सानिनने प्रयत्न केला. रशियन संगीताचा विषय निघाला तेव्हा रशियन गाणे गाण्याची त्याला तात्काळ विनंती करण्यात आली. खोलीतील कोपऱ्यात उभ्या असलेल्या पियानोकडे त्याचे लक्ष वेधण्यात आले. त्याच्या पांढऱ्या पाट्यांऐवजी काळ्या होत्या व काळ्यांऐवजी पांढऱ्या होत्या. फारशा आग्रहाची वाट न पाहता त्याने गाणे म्हणून दाखवायला मान्यता दिली. उजव्या हाताची दोन बोटे आणि डाव्या हाताची तीन (अंगठा, मधले बोट व करंगळी) यांच्या साह्याने पियानोची साथ घेऊन उंच, अनुनासिक स्वरात "साराफान"चे* पहिले कडवे त्याने म्हटले व नंतर "पो उलीत्से मस्तोवोय"** हे गाणे म्हटले. त्याच्या आवाजाची आणि संगीताची त्या दोघींनी स्तुती केली. पण रशियन

* खांदे उघडे ठेवणारा रशियन स्त्रियांचा पोषाख – अनु.

** मस्तोवोयच्या रस्त्यावरून.

भाषेची मृदुता आणि नादमधुरता त्यांना विशेष आवडली. गाण्यातील शब्दांचा अनुवाद करण्याचा त्यांनी आग्रह धरला. सानिनने त्यांची इच्छा पूर्ण केली, पण शब्दांचा केवळ अनुवाद त्याच्या श्रोत्यांच्या मनात रशियन कवितेची उच्च कल्पना ठसवू शकणार नाही हे जाणून प्रथम त्याने पुष्कीनची 'भाग्याचा अविस्मरणीय क्षण' ही कविता मूळ रशियनमध्ये म्हणून दाखविली, नंतर तिचा अनुवाद सांगितला व नंतर ग्लीन्काच्या संगीतरचनेवर गाऊन दाखविली. यावेळी बायकांना स्फुरण चढले होते. फ्राऊ लेनोरेला रशियन आणि इटालियन भाषांमध्ये असाधारण साधर्म्य आढळले. पुष्कीन (ज्याचा उच्चार ती पूस्सेकिन असा करीत होती) आणि ग्लीन्का ही नांवेच तिच्या कानांना परिचित भासत होती. आता त्यांना गाण्याचा आग्रह करण्याची सानिनची पाळी आली व त्यांनीही फारसे आढेवेढे न घेता मान्यता दिली. फ्राऊ लेनोरे पियानोपाशी बसली व तिने आणि जेम्माने मिळून अनेक duettini आणि stornelli म्हणून दाखविली. आई एकेकाळी चांगली गात असावी आणि मुलीचा आवाज दुबळा असला तरी मधुर होता.

६

पण सानिनला जेम्माच्या आवाजापेक्षा खुद्द जेम्माचेच जास्त कौतुक होते. त्यांच्या किंचित मागे, एका बाजूला तो बसला होता आणि त्याने स्वतःला बजाविले की, कुठल्याही ताडाच्या झाडाची त्या काळी लोकप्रिय असलेल्या रशियन कवी बेनेदिक्तोवच्या कवितांमधीलसुद्धा[37] तिच्या कमनीय सडपातळ आकृतीशी तुलना करणे शक्य नव्हते. भावनाप्रधान ओळी म्हणताना जेव्हा तिने आपले डोळे छताकडे रोखले तेव्हा त्याला वाटले की, खुद्द स्वर्गालाही हा कटाक्ष सहन करणे शक्य झाले नसते. दाराच्या खांबाशी टेकून उभा असलेला, रुंद टायमागे हनुवटी आणि तोंड जवळ जवळ झाकून गेलेला व जाण्याच्या थाटात ऐकणारा म्हातारा पान्तालीओने, तोसुद्धा त्या मुलीच्या सुंदर चेहऱ्याकडे पाहून डहुळला. वस्तुतः त्याला तो चेहरा पाहण्याची सवय झाली असली पाहिजे. आपल्या मुलीबरोबर duettino संपविल्यानंतर फ्राऊ लेनोरे म्हणाली की, एमिलचा आवाज अगदी रुप्यासारखा खणखणीत होता, पण आता त्याचे आवाज फुटण्याचे वय झाले होते (आणि खरोखरीच तो सतत फुटक्या खर्जात बोलत होता) व म्हणून त्याला गाण्याला मनाई केलेली होती. पण पाहुण्याच्या सन्मानार्थ पान्तालीओनेने जुन्या आठवणींना



उजाळा दिला तर? पान्तालीओनेने तात्काळ असमाधानी मुद्रा केली; कपाळाला आठ्या घातल्या, आपल्या केसांमधून हात फिरविला आणि म्हटले की, खूप काळापूर्वी त्याने हे सगळे सोडून दिले होते, मात्र त्याच्या तरुणपणी तो चांगला गात होता; शिवाय जेव्हा खरे, अभिजात गाणे अद्याप अस्तित्वात होते त्या काळातील तो होता. ह्या पिढीच्या किंचाळ्यांशी त्या काळाची तुलना करणे त्याला मान्य नव्हते. खऱ्या गाण्याच्या पठडीच्या जमान्याचा त्याला अभिमान होता. त्याला, वारेझेच्या पान्तालीओने चिप्पातोला याला, एकदा मोदेनामध्ये सत्कारार्थ पुष्पहार अर्पण करण्यात आला होता व त्याचवेळी थिएटरमध्ये पांढरी कबूतरे उडविण्यात आली होती. जाता जाता सांगायचे म्हणजे त्यावेळी तेथे प्रिन्स तार्बूस्स्की नांवाचा एक रशियन होता «il principe Tarbusski» त्याच्याबरोबर पान्तालीओनेची घनदाट मैत्री होती, मेजवानीच्या वेळी तो त्याला सतत रशियाला येण्याचे निमंत्रण द्यायचा, सोन्याच्या पर्वतांचे आश्वासन द्यायचा, पर्वतांचे! पण इटली सोडण्याचा, दान्तेची भूमी सोडण्याचा – il paese del Dante! – विचार त्याला सहन झाला नाही. नंतर अर्थात संकटे कोसळली, त्याने पुरेशी सावधगिरी बाळगली नव्हती... या ठिकाणी म्हातारा बोलायचा एकदम थांबला. त्याच्या डोळ्यांच्या पापण्या खाली झुकल्या, त्याने एक-दोन खोल निःश्वास टाकले आणि पुन्हा एकदा गाण्याच्या अभिजात युगाविषयी, सुप्रसिद्ध मध्यस्वर गायक गार्सियाविषयी बोलायला त्याने आरंभ केला.[38] गार्सियाबद्दल त्याच्या मनात अपार आदर होता.

"काय माणूस होता!" मोठ्यांदा तो म्हणाला. "त्या थोर गार्सियानं – «il gran Garcia» – आजच्या फडतूस मध्यस्वर गायकांप्रमाणं – tenoracci – कृत्रिम तारस्वरात गाऊन कधीही स्वतःला कमीपणा आणला नाही. त्याचे सगळे स्वर छातीतून उमटायचे, छातीतून – voce di petto, si!" म्हाताऱ्याने आपल्या सदऱ्याच्या झालरीवर आपली कृश छोटी मूठ आपटली. "आणि कसला ताकदीचा नट! ज्वालामुखी signori miei, (सभ्य गृहस्थहो,) ज्वालामुखी, un Vesuvio! त्याच्याबरोबर 'अथेल्लो' मध्ये गाण्याचा आनंद आणि मान मला मिळाला होता, dell' illustrissimo maestro Rossini च्या ऑपेरात. गार्सिया अथेल्लो होता आणि मी इयागो – आणि जेव्हा तो ह्या शब्दांपाशी आला..." या ठिकाणी पान्तालीओनेने पवित्रा घेतला आणि घोगऱ्या, कापऱ्या, पण तरीही नाट्यपूर्ण आवाजात तो गायला:

L'i... ra da ver... so da ver... so il fato
Io più no... no... no... non temerò! *

"सगळं नाट्यगृह हादरलं, signori miei! पण मी नेट धरला आणि त्याच्या पाठोपाठ गायलो :

L'i... ra da ver... so da ver... so il fato
Temèr più non davro! **

"आणि अचानक तो उसळला, विद्युल्लतेप्रमाणं, वाघाप्रमाणं : Morrol.. ma vendicato... ***

"किंवा «Matrimonio segreto»[39] Pria che spunti–मधल्या सुप्रसिद्ध आरायात जेव्हा तो I cavalli di galoppo ह्या शब्दांपाशी आल्यानंतर il gran Garcia गायला senza posa cacciera—केवळ अफाट! –Com'è stupendo! **** तो..." म्हातारा कुठल्यातरी असाधारण fioritura ला गाऊ लागला, पण दहाव्या स्वरावर थबकला, त्याने आपला घसा खाकरून साफ केला आणि हात झटकीत तो पुटपुटला : "कशाला छळता मला ?" जेम्मा ताडकन खुर्चीतून उठली व टाळ्या वाजवीत "ब्राव्हो! ब्राव्हो!" ओरडत निवृत्ती-अवस्थेमधील बापड्या इयागोकडे धावली आणि त्याच्या खांद्यांवर तिने आपल्या दोन्ही हातांनी प्रेमळपणे थापट्या मारल्या. एकटा एमिल निष्ठुर हसला. पण फार पूर्वी La Fontaine याने लिहून ठेवलेय : Cet âge est sans pitié–ह्या वयाला दया माहीत नसते.

सानिनने त्या म्हाताऱ्या गायकाचे सांत्वन करण्याचा प्रयत्न केला आणि त्याच्याशी इटालियन भाषेत बोलायला आरंभ केला (गेल्या प्रवासात त्याने थोडी इटालियन भाषा ग्रहण केली होती). «Paese del Dante, dove

---

* दैवाच्या रागाला भिणार नाही मी... नाही... नाही...

** दैवाच्या रागाला भिऊन चालणार नाही मी.

*** मरीन, पण सूड घेईन.

**** किती सुरेख !



il si suona.» * हे वाक्य आणि त्याच्या जोडीला «Lasciate ogni speranza» एवढ्यापुरतेच ह्या तरुण प्रवाशाचे इटालियन कवितेबद्दलचे ज्ञान मर्यादित होते. पण त्याच्या ह्या प्रयत्नांनी पान्तालीओनेचे मुळीच सांत्वन झाले नाही. त्याने आपली हनुवटी टायमध्ये आणखीच खोल खुपसली व कष्टी नजरेने तो एकटक पहात बसला. आता तो जास्तच पक्ष्याप्रमाणे दिसत होता–एखाद्या चिडलेल्या पक्ष्याप्रमाणे–डोमकावळा किंवा घारीसारखा. नंतर, एखाद्या लाडावलेल्या मुलाला शोभेल असे किंचित लाजून एमिल आपल्या बहिणीकडे वळला व पाहुण्याचे मनोरंजन करण्याची तिची खरोखरी इच्छा असली तर माल्तझची एखादी नाट्यछटा तिने वाचून दाखविणे सर्वात उत्तम, कारण ती त्यांचे वाचन फार छान करते, असे म्हटले. जेम्मा हसली व आपल्या भावाच्या हातावर चापटी मारीत उद्गारली : "नेहमी याच्या डोक्यातून काहीतरी असलं निघतं!" पण तरीही ती पटकन आपल्या खोलीत गेली, एक छोटे पुस्तक हाती घेऊन परतली व मेजापाशी दिव्याजवळ बसली. तिने एकदा सभोवार पाहिले, बोट वर केले, जणू "कृपया शांतता राखा" म्हणण्यासाठी–ही अगदी ठराविक इटालियन लकब–आणि वाचनाला आरंभ केला.

## ७

माल्तझ हा लेखक एकोणीसाव्या शतकाच्या चौथ्या दशकात फ्रँकफुर्टमध्ये रहात होता व स्थानिक बोलभाषेत हलक्याफुलक्या नाट्यछटा लिहीत होता. स्थानिक विनोदाचे नमुने त्याच्या लेखनात आढळत. तो विनोद गहिरा नसला तरी मजेदार आणि रंजक असे. जेम्मा खरोखरीच एखाद्या कसलेल्या नटीप्रमाणे वाचत होती. प्रत्येक व्यक्तिरेखेची वैशिष्ट्ये तिने व्यक्त केली, आपल्या इटालियन रक्तापासून वारसा मिळालेली मूकाभिनयाची सर्व शक्ती पणाला लावून शेवटपर्यंत तिने प्रत्येक भूमिकेचा तोल राखला. एक अर्धवट वेडसर नगराध्यक्ष सादर करण्याची वेळ आली तेव्हा आपल्या खास आवाजाची अथवा सुंदर चेहऱ्याची पर्वा न करता तिने अत्यंत हास्यास्पद मुद्रा केल्या, डोळे पिचके केले, नाकाला चुण्या पाडल्या, बोबडे बोलली, खिंकाळली...

---

* दान्तेच्या देशात सतत 'हो' ऐकू येतो.

वाचत असताना ती स्वत: कधीही हसत नव्हती, पण जेव्हा तिचे श्रोते हास्याचा कल्लोळ उडवून तिच्या वाचनात अडथळा आणीत (एकट्या पान्तालीओनेचा अपवाद वगळून, ज्या क्षणाला quel ferroflucto Todesco* चा प्रश्न निघायचा त्या क्षणाला तो पळ काढायचा), तेव्हा ती पुस्तक आपल्या मांडीवर टाकायची आणि डोके मागे झुकवून खळखळा हसायची. तिच्या काळ्या केसांच्या मऊ बटा तिच्या मानेवर व गदगदा हलणाऱ्या खांद्यांवर नाच करायच्या. खोलीतील हास्यकल्लोळ विरताच ती परत पुस्तक उचलायची आणि योग्य ती मुद्रा धारण करून गंभीरपणे वाचन पुढे चालू करायची. सानिन तिच्या कौतुकात हरवून गेला. हा अभिजात सुंदर चेहरा एवढ्या सहजतेने विनोदी मुद्रा करू शकत होता याचे त्याला सर्वात जास्त आश्चर्य वाटले होते. तरुण मुलींच्या भूमिका सादर करण्यात, तथाकथित «Jeunes premières» सादर करण्यात, जेम्माला फारसे यश येत नव्हते. आणि प्रेमप्रसंग तर अजिबातच जमत नव्हते. तिला स्वत:ला ह्याची जाणीव होती व म्हणून असे प्रसंग सूक्ष्म उपहासाच्या छटेने ती वाचत होती. जणू त्या सर्व पवित्र शपथांमध्ये आणि अलंकारिक भाषणांमध्ये तिचा विश्वास नव्हता. शिवाय लेखकानेही शक्य तेथे अशा भाषणांना टाळले होते.

संध्याकाळ कशी सरली ते सानिनच्या ध्यानातच आले नाही आणि जेव्हा घड्याळाने दहाचे टोल दिले तेव्हा कुठे त्याला आपल्या पुढील प्रवासाची आठवण झाली. दंश झाल्याप्रमाणे त्याने एकदम उडी मारली.

"काय झालं?" फ्राऊ लेनोरेने विचारले.

"आज रात्री मला बर्लिनला जायचंय – टप्पे-गाडीत मी माझी जागासुद्धा राखून ठेवलीय."

"किती वाजता गाडी निघते?"

"साडे-दहा."

"मग तुम्हाला उशीर झालाच आहे," जेम्मा म्हणाली. "थांबा... मी पुढं वाचते."

"तुम्ही सगळे पैसे दिलेत का फक्त जागा राखण्यापुरते पैसे दिलेत?" फ्राऊ लेनोरेने चौकशी केली.

"सगळे पैसे दिलेत," दु:खाने सानिन विव्हळला.

---

*कुठल्यातरी नतद्रष्ट जर्मनाचा...



जेम्माने त्याच्याकडे डोळे किलकिले करून पाहिले आणि ती हसली. त्याबद्दल तिची आई तिला रागे भरली.

"ह्या तरुण माणसाचे पैसे निष्कारण खर्च झालेत आणि तू हसतेस!"

"काही बिघडत नाही!" जेम्मा म्हणाली. "त्यामुळं ते काही मोडून पडत नाहीत आणि आपण शिकस्तीनं त्यांचं सांत्वन करू. थोडं लेमोनेड घ्या."

सानिन ग्लासभर लेमोनेड प्यायला आणि जेम्मा परत माल्तझ वाचू लागली. पूर्वीप्रमाणेच मंडळी झकास रंगली.

घड्याळाने बाराचे ठोके दिले. सानिन निरोप घ्यायला उठला.

"आता तुम्ही काही दिवस फ्रँकफुर्टमध्ये घालवले पाहिजेत," जेम्मा म्हणाली. "एवढी घाई करायचं तुम्हाला काही कारण नाही. दुसऱ्या कोणत्याही शहरात इथल्याहून जास्त छान असणार नाही." ती थोडी थांबली. "खरंच असणार नाही," स्मित करीत ती पुढे म्हणाली.

सानिन काहीच उत्तरला नाही. मात्र मनाशी तो म्हणाला की, त्याला आवडो वा नावडो, पण त्याचे पाकीट रिकामे झाल्यामुळे त्याला फ्रँकफुर्टमध्ये राहणे भागच होते. बर्लिनमधील मित्राला कर्ज देण्याची विनंती करणारे पत्र लिहून, त्याच्या उत्तराची त्याला वाट पहावी लागणार आहे.

"खरंच, रहा ना," फ्राऊ लेनोरे म्हणाली. "आम्ही जेम्माच्या भावी पतीशी तुमची ओळख करून देऊ. श्रीयुत कार्ल क्लूबेर यांच्याशी. आज दुकानात त्यांना काम आहे म्हणून ते येऊ शकले नाहीत... त्सेईलवर शहरातलं सर्वात मोठं कापडाचं आणि रेशमी कापडाचं दुकान कदाचित तुम्ही पाहिलं असेल... त्या दुकानाचे ते प्रमुख आहेत. तुमची ओळख झाली तर त्यांना खूप आनंद होईल."

ह्या माहितीने का कुणास ठाऊक, पण सानिन काहीसा खिन्न बनला. "भाग्यवान पुरुष!" त्याच्या डोक्यात विचार चमकला. जेम्माकडे त्याने कटाक्ष टाकला तेव्हा तिच्या डोळ्यांमध्ये त्याला उपहासाचा भाव आढळला. तो निरोप घेऊ लागला.

"उद्यापर्यंत? तुम्ही उद्या येणार ना?" फ्राऊ लेनोरेने विचारले.

"उद्यापर्यंत," जेम्मा म्हणाली. तिच्या स्वरात प्रश्न नव्हता तर ठाम होकार होता.

"उद्यापर्यंत," सानिन उत्तरला.

एमिल, पान्तालीओने व तार्तालिया त्याला सोडायला रस्त्याच्या कोपऱ्या-

पर्यंत गेले. जेम्माच्या वाचनाबद्दल आपली नापसंती व्यक्त न करण्याचा मोह पान्तालीओनेला आवरला नाही.

"तिला शरम वाटली पाहिजे! तोंडं वेडीवाकडी करते, खिदळते — una carricatura! मीरोप किंवा क्लीतेम्नेस्त्राची भूमिका तिनं करावी[40] — काहीतरी भव्य, करुणरसात्मक. पण कुठल्यातरी फडतूस जर्मनची नक्कल करण्यात ती रमते. मीसुद्धा करू शकेन ते — मेर्त्स, केर्त्स, स्मेर्त्स," हनुवटी पुढे काढून व बोटे पसरून घोगरट आवाजात तो पुढे म्हणाला.

तार्तालिया त्याच्यावर भुंकला आणि एमिलला हसू कोसळले. म्हातारा एकदम वळला आणि परत गेला.

काहीशा मूढ मनःस्थितीतच सानिन "श्वेत हंस" मध्ये परतला (तेथे दर्शनी दालनात त्याने आपले सामान ठेवले होते). त्याच्या कानांमध्ये जर्मन-फ्रेंच-इटालियन संभाषणातील शब्द घणघणत होते.

"तिचं लग्न ठरलंय!" पथिकाश्रमातील आपल्या साध्याशा खोलीतील बिछान्यावर पडता पडता तो पुटपुटला. "पण किती सुंदर आहे! आणि मी कशाला थांबून राहिलो?"

मात्र दुसऱ्या दिवशी त्याने आपल्या बर्लिनच्या मित्राला पत्र धाडले.

८

दोन गृहस्थ भेटायला आलेत असे सांगत पथिकाश्रमाचा नोकर सानिन-पाशी आला तेव्हा त्याने अद्याप पोषाखही केलेला नव्हता. त्या दोन गृहस्थांपैकी एक होता एमिल आणि दुसरा — भव्य शरीरयष्टीचा उमदा तरुण — होता हेर कार्ल क्लूबेर, लावण्यवती जेम्माचा भावी पती.

हेर क्लूबेरपेक्षा अधिक सुसंस्कृत, प्रतिष्ठित, गंभीर आणि आदबशीर दुकानदार आख्ख्या फ्रँकफुर्टमध्ये एकाही दुकानात आढळला नसता. त्याच्या डामडौलाशी आणि व्यवसायाशी पूर्णतया अनुरूप असा त्याचा नेटका पोषाख होता. अर्थात तो थोडासा इंग्लिश धर्तीमाणे पारंपारिक, आणि अलिप्तपणा दाखवणारा होता हे खरे (त्याने इंग्लंडात दोन वर्षे घालविली होती) — पण तरीही त्याचे डौलदार वागणे मुग्ध करणारे होते. पहिल्याच दृष्टिक्षेपात स्पष्ट होत होते की, हा देखणा, काहीसा कठोर वाटणारा, अत्यंत सुसंस्कृत आणि स्वच्छ तरुण वरिष्ठांपुढे नमणारा व कनिष्ठांना हुकूम ठोकणारा होता आणि आपल्या दुकानाच्या काऊंटरमागे उभा असताना ग्राहकांच्या मनात



हमखास आदर निर्माण करणारा होता. त्याच्या अतिस्वाभाविक प्रामाणिकते-विषयी कधीही किंचितही संदेह येणे शक्य नव्हते. ह्याची खात्री पटायला त्याची कडक कॉलर नुसती पाहिली तरी पुरे होते. आणि त्याचा आवाज अपेक्षेप्रमाणेच होता — मृदु, खंबीर घुमारा असलेला, पण खूप मोठा नव्हे आणि त्याच्या स्वरांमध्ये नाजुकपणाची झाक असलेला. दुकानातील मदतनी-सांना हुकूम देण्यासाठी असा आवाज अगदी योग्य होता: "किरमिजी रंगाची लीऑनची ती मखमल दाखवा!" अथवा "बाईसाहेबांना खुर्ची आणून द्या!"

स्वतःची ओळख करून देऊन श्री. क्लूबेरने संभाषणाचा आरंभ केला. आपले शरीर किंचित झुकवून, पायांची चपळ हालचाल करून व आदबीने टाचा जुळवून त्याने अशा काही थाटात स्वतःचा परिचय करून दिला की, एखाद्याला हमखास वाटले असते: "ह्या माणसाची अंतर्वस्त्रे आणि त्याचे आत्मिक गुण प्रथम दर्जाचे असले पाहिजेत!" सानिनपुढे त्याने नम्रपणाची खात्री देणारा धरलेला त्याचा उजवा उघडा हात (डावा, नमदी हातमोजात गुरफटलेला होता, आरशाच्या पृष्ठभागासारखी गुळगुळीत उंच टोपी त्यात धरलेली होती व त्या टोपीच्या खळग्यात दुसरा हातमोजा पडला होता) — सर्व विश्वासांवर कळस करणारा होता — प्रत्येक नख म्हणजे कलाकुसरीचा अप्रतीम नमुना होता. अत्यंत सुरेख जर्मन भाषेत त्याने नमूद केले की, त्याच्या भावी नातेवाईकाला, त्याच्या भावी पत्नीच्या भावाला, एवढी मदत करणाऱ्या परदेशी सद्‌गृहस्थाबद्दल आपला आदर आणि कृतज्ञभाव व्यक्त करण्याच्या इच्छेने तो आला होता. हे बोलत असताना त्याने आपला टोपी धरलेला डावा हात एमिलच्या दिशेने हलविला. एमिल लाजल्यासारखा झाला व तोंडात बोट धरून खिडकीकडे वळला. परदेशी सद्‌गृहस्थांना जर आपला काही उपयोग झाला तर आपण स्वतःला भाग्यवान समजू असे श्री. क्लूबेरने पुढे सांगितले. सानिनने आपल्या अडखळत्या जर्मनमध्ये उत्तर दिले की, त्यालाही खूप आनंद झाला होता, त्याची कामगिरी अगदी क्षुल्लक होती व त्याने पाहुण्यांना बसायला सांगितले. श्री. क्लूबेरने त्याचे आभार मानले आणि विजेच्या वेगाने आपल्या कोटाच्या शेपट्या पसरून तो खुर्चीत स्थानापन्न झाला. पण एवढ्या अलगदपणे तो बसला होता आणि एवढ्या असुरक्षित भावनेने थांबला होता की, हे समजणे अगदी सोपे होते: "केवळ शिष्टाचारापायी हा गृहस्थ बसलाय, पण क्षणात तो इथून भर्रकन निघून जाईल." आणि खरेच तो तात्काळ पसार झाला. नृत्यमुद्रेप्रमाणे त्याने पायांची चाळवाचाळव केली आणि म्हटले की, दुर्दैवाने त्याला तेथे अधिक

काळ थांबणे शक्य नव्हते, दुकानात लौकर जाणे त्याला भाग होते–धंदा प्रथम–पण, दुसऱ्या दिवशी रविवार असल्याने, फ्राऊ लेनोरे आणि फ्रॉलीन जेम्मा यांच्या संमतीने, सोदेनच्या छोट्या सहलीची व्यवस्था त्याने केली होती व परदेशी सद्गृहस्थांना त्या सहलीला येण्याचे निमंत्रण देण्याचा मान त्याला लाभला होता आणि आपल्या उपस्थितीने सहलीला शोभा आणण्यास ते नकार देणार नाहीत, अशी आशा बाळगण्याचे धाडस केले होते. आपल्या उपस्थितीने सहलीला शोभा आणण्यास सानिनने मान्यता दिली आणि श्री. क्लूबेर परत निघाला. जाताना त्याने आदरणीय वचनांचा पुनःपुन्हा उच्चार केला. हिरव्या वाटाण्याच्या रंगाची त्याची विजार प्रसन्नपणे झळकत होती आणि त्याच्या अत्यंत सुबक नव्या बुटांच्या तळव्यांची करकर तेवढीच प्रसन्न भासत होती.

९

सानिनने बसायला सांगितले होते तरी अद्याप खिडकीशी उभा राहिलेला एमिल, त्याचा भावी नातेवाईक निघून जाताच चटकन टाचेवर वळला. लाजत, लहान मुलाप्रमाणे तोंडाचा चंबू करीत, आणखी थोडा वेळ थांबले तर चालेल का असे त्याने सानिनला विचारले. "आज मला खूपच बरं वाटतंय," तो पुढे म्हणाला, "पण डॉक्टर म्हणतात मी काम करायचं नाही."

"थांबा ना! तुमची मला मुळीच अडचण वाटत नाही," सानिन तात्काळ उद्गारला. काहीही न करण्यासाठी सबब सापडली म्हणजे आनंदित होणाऱ्या अस्सल रशियनाचा आनंद त्याला झाला होता.

एमिलने त्याचे आभार मानले आणि लौकरच तो त्याच्याबरोबर रुळला व त्याच्या खोलीत मोकळेपणाने वावरू लागला. सानिनच्या वस्तू त्याने न्याहाळून पाहिल्या, जवळ जवळ प्रत्येक वस्तू सानिनने कुठे विकत घेतली आणि त्या वस्तूचा उपयोग काय, याबद्दल चौकशी केली. सानिनला दाढी करायला त्याने मदत केली व त्याचवेळी शेरा मारला की, सानिनने मिशा राखायला पाहिजे होतं. आपली आई, बहीण, पान्तालीओने यांच्याबद्दल, एवढेच नव्हे तर तार्तालिया कुत्र्याबद्दल, एकूण त्यांच्या जीवनपद्धतीबद्दल, असंख्य तपशीलवार गोष्टी त्याने सानिनला विश्वासात घेऊन सांगितल्या. त्याचा पूर्वीचा लाजरेपणा पूर्ण नाहीसा झाला होता. त्याला अचानक सानिनचे



अनिवार आकर्षण वाटू लागले. त्याचे कारण आदल्या दिवशी सानिनने त्याचा जीव वाचविला होता म्हणून नव्हे, तर सानिन खरेच छान माणूस होता. आपली सर्व गुपिते त्याने सानिनला तात्काळ सांगून टाकली. आई त्याला दुकानदार बनवू इच्छित होती, पण त्याला मात्र **खात्रीने वाटत होते** की तो जन्मजात कलाकार आहे, गायक आहे, संगीतकार आहे, रंगभूमी हा त्याचा जीवितव्यवसाय आहे, पान्तालीओनेसुद्धा त्याला उत्तेजन देत आहे, असे त्याने भर देऊन सांगितले. पण श्रीयुत क्लूबेर आईच्या बाजूने आहे आणि आईवर त्याचा फार प्रभाव आहे. वस्तुतः त्याला दुकानदार बनविण्याची कल्पना श्री. क्लूबेरच्याच डोक्यातून निघाली होती. व्यापारी असण्याहून दुसरे अधिक गौरवशाली काहीही नाही अशी क्लूबेरची धारणा होती. कापड आणि मखमल विकायची, आपल्या गिऱ्हाईकांना फसवायचे, त्यांच्याकडून Narren- oder Russen-Preise (मूर्खांची किंवा रशियनांची किंमत) उकळायची–हेच त्याचे ध्येय होते! *[41]

"आता माझ्याबरोबर घरी जायची वेळ झाली!" सानिनने पोषाख करताच व बर्लिनला पत्र लिहून पुरे करताच एमिल उद्गारला.

"अजून फार लौकर होईल," सानिन म्हणाला.

"काही हरकत नाही," त्याला बिलगत एमिल म्हणाला. "चला! आपण प्रथम टपाल कचेरीत जाऊ आणि तिथून आमच्याकडं. तुम्हाला पाहून जेम्माला खूप आनंद होईल! आमच्याबरोबर तुम्ही न्याहरी घ्या... माझ्याबद्दल, माझ्या भवितव्याबद्दल आईशी बोला..."

"ठीक आहे तर," सानिन म्हणाला आणि ते दोघे निघाले.

१०

त्याला पाहून जेम्माला खरोखरीच आनंद झाल्याचे दिसले व फ्राऊ लेनोरेने त्याचे प्रेमाने स्वागत केले. आदल्या दिवशी त्याने त्यांच्यावर आपली चांगली छाप पाडली होती हे उघड होते. एमिलने सानिनच्या कानात हळूच

---

*पूर्वी आणि अर्थातच आताही, मे महिन्यात रशियन प्रवाशांच्या झुंडी फ्रँकफुर्टमध्ये येताच सर्व दुकानांमधील किंमती चढायच्या आणि त्यांना «Russen» (रशियनांच्या) अथवा –अरेरे! «Narren-Preise» (मूर्खांच्या) किंमती म्हणून ओळखले जाई–लेखकाची टीप.

सांगितले : "बघा, विसरू नका हं!" आणि न्याहरीची तयारी करायला सांगायला तो पळाला. न विसरण्याचे सानिनने त्याला आश्वासन दिले.

फ्राऊ लेनोरेला बरे वाटत नव्हते. तिला अर्धशिशीचा त्रास होत होता, म्हणून ती आरामखुर्चीत स्वस्थ पडून होती. जेम्माने सैलसर पिवळा झगा घातला होता व कमरेशी काळा कातडी पट्टा बांधला होता. तीसुद्धा थकलेली आणि किंचित फिकट दिसत होती. तिच्या डोळयांखाली काळी वर्तुळे उमटली होती, पण तरीही त्या डोळ्यांमधील तेज मुळीच कमी झालेले नव्हते. तिच्या फिकटपणामुळे तिच्या चेहऱ्याला एक गूढ आणि मोहक अशी अभिजात रेखीवता प्राप्त झाली होती. आज सानिनला तिच्या हातांचे डौलदार सौंदर्य जाणवले. आपल्या काळ्या, चकचकीत बटा नीट करण्यासाठी तिने जेव्हा हात वर उचलले तेव्हा राफाएलच्या Fornarina प्रमाणे[42] असलेल्या तिच्या लांबसडक, सडपातळ आणि सुघड बोटांवरून नजर दुसरीकडे हलविणे त्याला अशक्य ठरले.

त्या दिवशी खूप गरम होत होते. न्याहरीनंतर सानिन जायला उठला, पण अशा दिवशी करण्यासारखी सर्वोत्तम गोष्ट म्हणजे माणसाने आहे त्या ठिकाणीच थांबावे, असे त्याला सांगण्यात आले. त्याने ह्या गोष्टीला मान्यता दिली. तो थांबला. आपल्या यजमानीणींबरोबर मागील खोलीत तो जेथे बसला होता तेथे छान आणि थंड होते. अकाशियाच्या झुडुपांची दाटी झालेल्या एका छोट्या बागेच्या दिशेला त्या खोलीच्या खिडक्या होत्या. सोनेरी फुलांनी खच्चून भरलेल्या दाट वेलींमध्ये असंख्य मधमाशांची आणि गांधीलमाशांची गुणगुण चालली होती. खिडक्यांच्या अर्धवट झाकलेल्या झडपांमधून व खिडक्यांवर सोडलेल्या पडद्यांमधून त्यांचा अखंड गुंजारव खोलीपर्यंत ऐकू येत होता. बाहेरील हवेत वाढणारा दमट उष्मा त्यावरून समजत होता व बंद खोलीतील गारवा त्यामुळे अधिकच ताजातवाना भासत होता.

आदल्या दिवशीप्रमाणेच सानिन खूप बोलला, पण रशियाबद्दल आणि रशियन जीवनाबद्दल नव्हे. आपल्या तरुण मित्राला खूष करण्याच्या हेतूने – ज्याला न्याहरीनंतर थेट श्री. क्लूबेरकडे खतावण्या लिहिण्याच्या सरावासाठी धाडण्यात आले होते – कला आणि व्यापार यांच्यातील तुलनात्मक फायद्या-तोट्यांकडे त्याने संभाषणाचा ओघ वळविला. फ्राऊ लेनोरेने व्यापाराची बाजू घेतली तेव्हा त्याला मुळीच आश्चर्य वाटले नाही. तशी त्याने अपेक्षाच केली होती. पण जेम्माही आईशी सहमत झाली.



"तुम्ही जर कलाकार असाल – विशेषत: गायक," आपल्या हाताची खालच्या दिशेने जोरदार हालचाल करीत ती ठासून म्हणाली, "तर तुम्ही अगदी वरच्या पदाला असलं पाहिजे. दुसरं काहीही चालणार नाही. आणि तुम्ही तिथवर पोहचाल अथवा नाही हे कुणाला माहीत?"

पान्तालीओनेही चर्चेत सामील झाला होता (त्याच्या प्रदीर्घ सेवेमुळे व वयामुळे त्याला आपल्या मालकांच्या उपस्थितीत बसण्याची मुभा होती; शिवाय इटालियन माणसे शिष्टाचारांबाबत फारशी काटेकोर नसतात). अर्थातच पान्तालीओने कलेच्या बाजूचा होता. पण खरे सांगायचे तर त्याचे युक्तिवाद काहीसे दुबळे होते. सर्वांत महत्त्वाची गोष्ट d'un certo estro d'inspirazione – स्फूर्तीमधून निर्माण होणारी विशिष्ट प्रवृत्ती – असे दाखवायला त्याने आरंभ केला. फ्राऊ लेनोरेने उत्तर दिले की, त्याच्यापाशी नि:संशयपणे ही «estro» होती आणि तरीही...

"मला शत्रू होते," पान्तालीओने कडवटपणे म्हणाला.

"आणि तुझ्या एमिलला जरी ही «estro» असली तरी शत्रू कशावरून होणार नाहीत?" (सर्वांना विदित आहे की, इटालियन माणसं एकेरी संबोधनावर फार सहजपणे येतात).

"ठीक आहे, बनवा त्याला सौदागर," पान्तालीओने रागाने म्हणाला. "पण जिओवान बात्तिस्ता असं वागले नसते, जरी ते स्वत: मिठाईवाले होते."

"जिओवान बात्तिस्ता, माझा नवरा, विचारी माणूस होता – आणि आपल्या तारुण्यात जर तो थोडासा संतापी डोक्याचा होता..."

पण म्हाताऱ्याने पुढे ऐकण्याचे साफ नाकारले आणि "अरेरे, जिओवान बात्तिस्ता" असे खेदाने पुन:पुन्हा म्हणत तो तेथून निघून गेला. जेम्मा उद्गारली की, जर एमिलच्या अंत:करणात देशभक्तीच्या भावना खदखदत असतील आणि इटलीच्या मुक्तीसाठी आपले सर्वस्व पणाला लावण्याची त्याची इच्छा असेल, तर उदात्त आणि पवित्र ध्येयासाठी खात्रीशीर भवितव्याचा होम करणे ग्राह्य ठरेल, पण रंगभूमीसाठी मात्र नव्हे! या ठिकाणी फ्राऊ लेनोरे अस्वस्थ बनली आणि तिने आपल्या मुलीला विनविले की, आपल्या भावाला तिने बहकवू नये व स्वत: कट्टर रिपब्लिकन आहे त्यावरच समाधान मानावे. एवढे बोलून फ्राऊ लेनोरे कण्हली व "फुटायच्या बेतात" आलेल्या आपल्या डोक्यातील वेदनांबद्दल तक्रार करू लागली. (पाहुण्याला आदर दाखविण्यापायी फ्राऊ लेनोरे आपल्या मुलीशी फ्रेंचमध्ये बोलत होती.)

जेम्मा तावडतोब आपल्या आईची शुश्रूषा करू लागली, तिच्या कपाळावर हळुवार फुंकरी घालू लागली. प्रथम तिने आपल्या आईच्या कपाळावर यू-दी-कोलन चोळले, तिच्या गालाचा हळूच पापा घेऊन उशीवर अलगद तिचे डोके ठेवले, तिला बोलायला मनाई केली व परत तिचे चुंबन घेतले. नंतर सानिनकडे वळून अर्धवट थट्टेच्या आणि अर्धवट गंभीर स्वरात आपल्या आईबद्दल ती बोलू लागली. तिच्या सौंदर्याची स्तुती करू लागली. "पण ती सुंदर होती असं मी का म्हणते–आत्ताही ती सुंदर आहे! पहा तिच्याकडं, किती सुंदर डोळे आहेत तिचे!"

जेम्माने झटकन आपल्या खिशामधून एक पांढरा रुमाल काढला आणि आपल्या आईचा चेहरा त्याने झाकला. मग त्या रुमालाची किनार सावकाशपणे खेचत फ्राऊ लेनोरेचे कपाळ भुवया आणि डोळे तिने उघडे केले. क्षणभर ती थांबली आणि आपल्या आईला तिने डोळे उघडायला सांगितले. फ्राऊ लेनोरेने तिची आज्ञा पाळली. जेम्माने कौतुकभरला चीत्कार काढला (फ्राऊ लेनोरेचे डोळे खरेच फार सुंदर होते) आणि आपल्या आईच्या चेहऱ्याच्या खालच्या व कमी प्रमाणबद्ध भागावरील रुमाल पटकन खेचून घेऊन परत तिची चुंबने घेतली. फ्राऊ लेनोरे हसली व डोके वळवून लटक्या जोराने आपल्या मुलीला तिने दूर ढकलले. जेम्माने आपल्या आईशी मस्ती करण्याचा बहाणा केला, पण त्याचवेळी ती तिला कुरवाळीत होती. ते कुरवाळणे कपटी मांजराप्रमाणे फ्रेंच धर्तीचे नव्हते, तर इटालियन डौलाचे होते व त्यात नेहमीच सुप्त सामर्थ्याची जाणीव असते.

आपल्याला थकवा झाल्याचे शेवटी फ्राऊ लेनोरेने सांगितले... तिने तेथेच आरामखुर्चीत डुलकी काढावी असा जेम्माने तात्काळ सल्ला दिला व "रशियन सद्गृहस्थ आणि मी छोट्या उंदरांप्रमाणं गप्प बसू–Comme des petites souris" अशी खात्री दिली. उत्तरादाखल फ्राऊ लेनोरेने स्मित केले, आपले डोळे मिटले, एक-दोनदा उसासा टाकला आणि तिला हलकीशी गुंगी आली. तिच्या शेजारी जेम्मा गुपचूप लवंडली आणि स्तब्ध राहिली. जेव्हा सानिन किंचित हालचाल करायचा तेव्हा आपल्या ओठांवर बोट ठेवून "शूः" अशी हलकीच ताकीद देत त्याच्याकडे तिरपा कटाक्ष टाकायची. आपल्या दुसऱ्या हाताचा तिने आईच्या उशीखाली आधार दिला होता. शेवटी त्याचीही तंद्री लागली. जणू मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणे, आपल्यासमोरील चित्राच्या कौतुकात रममाण होऊन तो स्तब्ध बसून राहिला. जुन्या हिरव्या प्यालांमधील ताज्या, पूर्ण उमललेल्या गुलाबांच्या लाल आभेने ती अर्धवट



अंधारी खोली अधूनमधून उजळून उठली होती; हातांची नीटस घडी घालून उशीच्या हिमशुभ्र चौकटीत निद्रिस्त स्त्रीचा प्रेमळ, थकलेला चेहरा दिसत होता; यौवनाने मुसमुसलेली, कमालीची सावध अशी तरुणी–तीसुद्धा प्रेमळ, चतुर, विशुद्ध, तशीच शब्दातीत सुंदर, तिचे गहिरे, काळेभोर डोळे, त्यांच्या खाली आलेले सावट आणि तरीही तेजस्वी दिसणारे... हे सर्व काय होते? स्वप्न? परीकथा? आणि तो स्वतः येथे कसा आला होता?

## ११

रस्त्याकडील दारावरची घंटा किणकिणली. केसाळ टोपी व लाल बंडी घातलेला एक शेतकरी मुलगा दुकानात शिरला. सकाळपासून दुकानात एकही गिऱ्हाईक आले नव्हते. "पाहिलंत आमचा धंदा कसा चाललाय" असे फ्राऊ लेनोरेने न्याहरीच्या वेळी सुस्कारा टाकीत सानिनला म्हटले होते. घंटेच्या आवाजाने तिला आत्ता जाग आली नाही. उशीखालचा आपला हात काढण्यास घाबरणारी जेम्मा हळूच सानिनला कुजबुजली: "माझ्यासाठी जरा दुकानात जा आणि तिथं लक्ष द्या."

सानिन तात्काळ चोरपावलांनी चालत दुकानात गेला. शेतकरी मुलाने पाव पौंड पेपरमिंटाच्या गोळ्या मागितल्या.

"त्याच्याकडून किती पैसे घ्यायचे?" सानिनने दबल्या आवाजात दारातून विचारले.

"सहा क्रेईत्सर," तिने तशाच दबल्या स्वरात सांगितले.

सनिनने पाव पौंड गोळ्या तोलल्या, मग एक कागद शोधला, त्याची सुरळी बनविली, त्या सुरळीत गोळ्या भरल्या, सुरळी सुटून गोळ्या विखुरल्या, परत त्याने सुरळी बनविली, परत गोळ्या सांडल्या व सरतेशेवटी पुडी बांधून त्याने ती गिऱ्हाईकाच्या हवाली केली आणि पैसे घेतले... तो मुलगा आपल्या पोटाशी आपल्या टोपीचा चोळामोळा करून चकित मुद्रेने सानिनकडे पहात होता, तर मागील खोलीत जेम्मा आपल्या तोंडावर हात ठेवून हास्याच्या फुटू पाहणाऱ्या उकळ्या दाबीत होती. पहिले गिऱ्हाईक जाते न जाते तोच दुसरे आले व त्या पाठोपाठ तिसरे गिऱ्हाईक दुकानात आले. "माझ्या हाताला यश दिसतंय," सानिनच्या मनात विचार आला. दुसऱ्या गिऱ्हाईकाने ग्लासभर सरबत मागितले, तर नंतरच्याने अर्धा पौंड मिठाई मागितली. चमच्यांचा उत्साहाने खडखडाट करीत, बशा इकडेतिकडे

सरकवीत, खोक्यांमध्ये आणि बरण्यांमध्ये पटकन आपली बोटे खुपशीत सानिनने गिऱ्हाईकांच्या मागण्या पूर्ण केल्या. पुढे असे आढळले की, त्याने सरबत स्वस्तात विकले होते, पण मिठाईची किंमत दोन क्रेईत्सरनी जास्त घेतली होती. जेम्माला हसू आवरत नव्हते आणि सानिनलाही अवर्णनीय आनंद जाणवत होता. त्याच्या चित्तवृत्ती अतिप्रफुल्लित झाल्या होत्या. अशा प्रकारे उघड्या दारामधून मिस्कील नजरेने ही रमणीय तरुणी त्याच्याकडे पहात असताना, खिडकीपुढील चेस्नट झाडांच्या भरघोस पालवीमधून घुसून सबंध खोलीत माध्यान्हीची हिरव्या छटेची सोनेरी किरणे भरून टाकणारा उन्हाळी सूर्य तळपत असताना आपण चिरंतन काळपर्यंत सरबत आणि मिठाई विकत काऊंटरमागे उभे राहू शकू, असे त्याला भासले. त्याच्या हृदयात एक मधुर सुस्ती भरली होती, एक मुक्त आनंद भरला होता, यौवनाची पहिली ऊर्मी उमटली होती.

चौथ्या गिऱ्हाईकाने कपभर कॉफी मागितली. आता मात्र पान्तालीओनेला बोलाविणे भाग होते (एमिल अद्याप श्री. क्लूबेरच्या दुकानातून परतला नव्हता). सानिन आत गेला आणि जेम्मापाशी परत बसला. फ्राऊ लेनोरे अजूनही झोपली होती याचे तिच्या मुलीला अतीव समाधान वाटत होते. "आईची अर्धशिशी तिच्या झोपेत नाहीशी होते," ती म्हणाली.

सानिनने तिला आपले "सौदे" सांगितले – अर्थात दबत्या आवाजात. अत्यंत गंभीरपणे त्याने मिठाईच्या पदार्थांच्या किंमती विचारून घेतल्या. जेम्मानेही तेवढ्याच गंभीरपणे सर्व किंमती सांगितल्या. त्या दोघांनाही आतून हसू फुटत होते, जणू आपण मनोरंजक विनोदी नाटिका वठवतोय याची त्यांना पुरेपूर जाणीव होती. अचानक रस्त्यावर कुणीतरी «Der Freischütz» मधील[43] लकेर वाजविली: «Durch die Felder, durch die Auen» (मैदानांमधून, खोऱ्यांमधून – अनु.) ते भरदार स्वर स्तब्ध वातावरणात थरथरत घुमले. जेम्मा दचकली... "तो आईला जागं करणार!" सानिन ताबडतोब धावत रस्त्यावर गेला, त्या पेटीवाल्याने आणखी दळण दळू नये म्हणून त्याच्या हाती काही चिल्लर नाणी कोंबली व त्याला तेथून दूर पाठविले. सानिन परतला तेव्हा जेम्माने मानेची हालचाल करून त्याचे आभार मानले व खिन्न स्मित करून अगदी हलक्या आवाजात वेबेरचे मधुर गीत गुणगुणायला आरंभ केला. त्या गीतात पहिल्या प्रेमाच्या सर्व अद्भुतांचे मॅक्स वर्णन करतो. सानिनला «Der Freischütz» माहीत आहे का, असे नंतर तिने विचारले. वेबेर त्याचा आवडता आहे का, अशी पृच्छा करून



पुढे ती म्हणाली की, तो स्वतः इटालियन असूनही त्या प्रकारचे संगीत तिला सर्वात जास्त आवडत आहे. वेबेरकडून संभाषणाचा ओघ काव्याकडे आणि सौंदर्यवादाकडे वळला व तेथून त्या काळात व्यापक प्रमाणात वाचल्या जाणाऱ्या हॉफमानकडे[44] वळला.

दरम्यान फ्राऊ लेनोरे झोपलेलीच होती, एवढेच नव्हे तर किंचित घोरत होती. झडपांमधून सूर्यकिरणांचे अरुंद पट्टे घुसले होते व त्यांचा नकळतपणे, पण अखंडपणे प्रवास चालला होता. फरशीवरून फर्निचरवर, तेथून जेम्माच्या पोषाखावर आणि पुढे फुलांच्या पानांवर व पाकळ्यांवर.

## १२

जेम्माला हॉफमान फारसा आवडत नव्हता असे दिसले. उलट तिला तो रटाळ वाटत होता. त्याच्या कथांमधील उत्तरेकडील धूसर अद्भुत धारणा तिच्या दक्षिणी तेजस्वी प्रवृत्तीला परकी भासत होती. "त्या नुसत्या परीकथा आहेत, मुलांसाठी लिहिलेल्या!" तुच्छपणे ती उद्गारली. हॉफमानमध्ये काव्याचा अभाव होता याचीही तिला अंधुक जाणीव होती. पण एक कथा मात्र तिला फार आवडली होती, मात्र तिचे शीर्षक तिला आठवत नव्हते. कमाल म्हणजे त्या कथेचा फक्त आरंभ तिला आवडला होता – अखेर तिने एक तर वाचली नव्हती अथवा विसरून गेली होती. एक तरुण एका अतिशय सुंदर ग्रीक मुलीला भेटतो – हो, मिठाईच्या दुकानात. त्या मुलीचा एक गूढ, दुष्ट म्हातारा सगळीकडे पाठलाग करीत असतो. तो तरुण प्रथमदर्शनीच त्या मुलीच्या प्रेमात पडतो. तिने त्याच्याकडे एवढ्या केविलवाणेपणाने पाहिलेले असते, जणू आपल्याला मुक्त कर अशी विनवणी तिच्या नजरेत असते. क्षणभरासाठी तो बाहेर जातो, आणि जेव्हा परत मिठाईच्या दुकानात येतो तेव्हा तेथे ना ती मुलगी असते ना तो म्हातारा! तिच्या शोधात तो घाईघाईने निघतो, त्यांचे माग त्याला सतत आढळतात, त्यांचा तो सारखा पाठलाग करतो, पण त्यांना कधीही गाठू शकत नाही. ती सुंदर रमणी कायमची अदृश्य होते, पण तिची आर्जवी नजर तो विसरू शकत नाही. त्याला नेहमी एक विचार छळत राहतो की, आपल्या संपूर्ण आयुष्याचे सुख आपण कदाचित हातून निसटू दिले.

हॉफमानच्या कथेची अखेर कदाचित नेमकी अशी नसावी, पण अशा प्रकारे कथा संपलेली होती आणि जेम्माच्या स्मरणात राहिली होती.

"मला वाटतं," ती म्हणाली, "आपल्याला भासतं त्यापेक्षा अशा भेटी आणि असे विरह खूप वारंवार घडत असतात."

सानिन गप्प झाला... पण एक-दोन मिनिटांनंतर त्याने संभाषणाचा ओघ श्री. क्लूबेरकडे वळविला. त्याने प्रथमच क्लूबेरचा उल्लेख केला होता. त्या क्षणापर्यंत त्याचा विचार त्याच्या मनातही आला नव्हता.

आता गप्प राहण्याची जेम्माची पाळी होती. नजर टाळून आपल्या तर्जनीचे नख कुरतडत ती विचारमग्नपणे बसून राहिली. मग तिने आपल्या भावी पतीची स्तुती केली, दुसऱ्या दिवशी त्याने आयोजित केलेल्या सहलीचा उल्लेख केला, सानिनकडे एक ओझरता कटाक्ष फेकला आणि परत मौन धारण केले.

संभाषणासाठी विषय शोधायला सानिनने आपल्या मेंदूला बराच ताण दिला.

गोंगाट करीत एमिल खोलीत घुसला आणि फाऊ लेनोरे झोपेतून जागी झाली... एमिलच्या आगमनामुळे सानिनला सुटका झाल्यासारखे वाटले.

फाऊ लेनोरे खुर्चीतून उठली. जेवण तयार असल्याची वर्दी पान्तालीओनेने दिली. कुटुंबाचा स्नेही, एकेकाळचा ऑपेरा गायक, नोकर असलेला पान्तालीओने स्वयंपाक्याची भूमिकाही पार पाडीत होता.

## १३

जेवणानंतरही सानिन तेथे बसून राहिला. त्याला जाऊ न देण्याच्या सबबीला भयानक उकाडा उपयोगी पडला. आणि उष्मा कमी झाला तेव्हा अकाशियाच्या वेलींच्या सावलीत बागेत बसून कॉफी पिण्यासाठी त्यांनी त्याला बोलाविले. सानिनने निमंत्रण स्वीकारले. त्याला खूप छान वाटत होते. जीवनाच्या स्तब्ध, एकसुरी, संथ प्रवाहात एक सुप्त माधुर्य दडलेले असते आणि त्याच्या तो आनंदाने आहारी गेला. चालू दिवसापासून त्याचे काही मागणे नव्हते, उद्याची त्याला क्षिती नव्हती आणि कालच्या दिवसाचा त्याला विसर पडला होता. जेम्मासारख्या तरुणीच्या केवळ सान्निध्यात राहणे हेसुद्धा खूप मोलाचे होते. लौकरच तिचा त्याला निरोप घ्यावा लागणार आहे आणि कदाचित तो कायमचा निरोप ठरणार आहे. पण उलान्दच्या प्रेमगीतात म्हटल्याप्रमाणे जीवनाच्या संथ प्रवाहावरून एकाच जादूच्या होडीतून त्यांचा प्रवास चालला होता[45]—तेव्हा, मुशाफिरा, लूट मजा आणि सुखी हो!



सुखी मुशाफिराला सर्व काही मोहक आणि आनंददायी वाटत होते. फाऊ लेनारे त्याला आपल्याबरोबर आणि पान्तालीओनेबरोबर «Tresette» खेळायला बोलाविले. फारसा अवघड नसलेला तो इटालियन पत्त्याचा डाव त्याला शिकविला व काही क्रेइत्सर त्याच्याकडून जिंकून घेतले—आणि त्याचा त्याला आनंद वाटला. एमिलच्या विनंतीवरून पान्तालीओनेने तार्तालियाला सगळे खेळ करून दाखवायला लावले. तार्तालियाने काठीवरून उड्या मारल्या, तो "बोलला" (म्हणजे, भुंकला), शिंकला, त्याने नाकाने दरवाजा बंद करून दाखविला, आपल्या मालकाची झिजलेली चप्पल आणून दिली आणि सरतेशेवटी डोक्यावर जुनी उभट टोकदार लष्करी टोपी घालून, सम्राट नेपोलियनचा विश्वासघात केल्यानंतर पश्चात्तापाने पोळणाऱ्या मार्शल बेर्नादोत्तची भूमिका करून दाखविली. अर्थात नेपोलियनची भूमिका पान्तालीओनेने वठविली आणि सुरेख वठविली हे सांगणे न लगे; त्याने आपल्या छातीवर हातांची घडी घातली, तुरेवाली टोपी डोळ्यांवर खेचली आणि फ्रेंच भाषेत तो उमंटपणे आणि कठोरपणे बोलला. पण त्याचे फ्रेंच म्हणजे, अरे बापरे! तार्तालिया आपल्या पायांमध्ये शेपटी घालून मालकाच्या पायाशी अंगाची मुटकुळी करून बसला. त्याच्या डोक्यावर ठेवलेल्या टोपीआडून तिरकस नजरेने वर पहात राहिला. ज्या ज्या वेळी नेपोलियन आवाज चढवायचा, त्या त्या वेळी बेर्नादोत्त[46] आपल्या मागील पायांवर उभा रहायचा. «Fuori, traditore!»* शेवटी नेपोलियन किंचाळला. अखेरपर्यंत त्याने आपले फ्रेंच राष्ट्रीयत्व कायम ठेवायला पाहिजे होते हे भावनेच्या भरात तो विसरून गेला आणि बेर्नादोत्तने दिवाणाखाली धूम ठोकली. मात्र लगेच तो परतला व आनंदाने भुंकू लागला. जणू नाटक संपले हे त्याला सांगायचे होते. प्रेक्षक मनापासून हसले. सानिनची तर हसून हसून मुरकुंडी वळली.

जेम्माचे हास्य अखंड, आनंदी होते व मधून मधून ती अत्यंत मजेदार कर्कश्य चीत्कार काढीत होती... अहाहा, तिचे हसणे! त्या चीत्कारांसाठी केवळ सानिनने तिची चुंबने घेतली असती!

अखेरीस रात्र झाली. त्याच्या जाण्याची वेळ झाली. वारंवार निरोप घेऊन, प्रत्येकाशी "उद्यापर्यंत" असे पुनःपुन्हा म्हणून (एमिलने आणि त्याने तर चक्क एकमेकांचे चुंबन घेतले), सानिन आपल्या पथिकाश्रमात परतला. त्या तरुणीच्या वेगवेगळ्या प्रतिमा त्याच्या नजरेसमोर तरळत होत्या:

---

* चालता हो, विश्वासघातक्या!

हसणारी, दु:खी, शांत आणि बेफिकीरसुद्धा. पण ह्या सर्व प्रतिमा आकर्षक होत्या. तिचे डोळे काहीवेळा दिवसाप्रमाणे सताड उघडे, तेजस्वी आणि आनंदी दिसायचे ; काहीवेळा त्यांच्यावर तिच्या पापण्यांचे अर्धवट आच्छादन पडल्यावर रात्रीप्रमाणे खोल आणि काळे दिसायचे. हे डोळे सतत त्याच्यासमोर येत होते, इतर सर्व प्रतिमांना आणि संकल्पनांना पुसून टाकीत होते व ती भावना फार विलक्षण मधुर होती.

श्रीमान क्लूबेरविषयी आणि फ्रँकफुर्टमध्ये राहण्याबद्दलच्या त्याच्या स्वत:च्या कारणांविषयी – थोडक्यात म्हणजे आदल्या दिवशी त्याला छळणाऱ्या सर्व गोष्टींविषयी – आता तो क्षणभरही विचार करीत नव्हता.

## १४

आता सानिनबद्दल काही शब्द सांगणे आवश्यक आहे.

पहिली गोष्ट म्हणजे तो अत्यंत आकर्षक तरुण होता. उंच, सडपातळ, प्रसन्न आणि किंचित धुंदकारलेली मुद्रा, प्रेमळ निळे डोळे, सोनेरी केस, श्वेत-गुलाबी कांती. त्याहून महत्त्वाचे म्हणजे चेहऱ्यावर अत्यंत साधा आणि चिंतामुक्त भाव, विश्वास निर्माण करणारा आणि प्रांजल. प्रथमदर्शनी काहीसा मूर्ख वाटणारा. पूर्वीच्या काळी मान्यवर, उच्चवर्गीय कुटुंबांमधील अशा मुद्रेची मुले तात्काळ "पप्पांची लाडकी" म्हणून ओळखली जात. विरळ जंगले असलेल्या स्तेपभूमीत, आमच्या असीम ग्रामीण प्रदेशात जन्मलेली आणि जोपासलेली छान सभ्य मुले ; डुलती चाल, किंचित बोबडे उच्चार, त्याच्याकडे नुसती नजर टाकली तर बालसुलभ स्मित... सरतेशेवटी ताजेपणा आणि निकोप प्रकृती – आणि सर्वस्वी मृदुता – ह्या सर्व गोष्टींची गोळाबेरीज म्हणजे सानिन. दुसरी गोष्ट म्हणजे तो मूर्ख नव्हता आणि काही ज्ञान त्याने प्राप्त केले होते. परदेश-प्रवास करूनही त्याने आपले ताजेपण राखले होते. त्या काळात सर्वोत्तम तरुणांना ग्रासणाऱ्या काही चिंता त्यानेही अनुभवल्या होत्या.

आमच्या लेखकांनी "नव्या प्रकारांच्या माणसांचा" शोध घेण्याचा व्यर्थ प्रयत्न केल्यानंतर, अलिकडच्या काळात अशा काही तरुणांची व्यक्तिचित्रे रेखाटण्यास प्रारंभ केला आहे जे पीटरबुर्गला आयात केलेल्या फ्लेन्सबुर्ग कालवांसारखे कोणत्याही परिस्थितीत ताजेतवाने राहू इच्छितात. आता उपमाच देत आहोत तर आम्ही असे म्हणू की, आमच्या काळ्या जमिनी-



मधील फळबागांमध्ये नुकतेच कलम केलेल्या कोवळ्या सफरचंदाच्या झाडासारखा तो होता, अथवा, जुन्या काळातील गृहस्थाच्या स्टड-फार्मवरील तीन वर्षे वयाच्या, चांगल्या पोसलेल्या, चकचकीत, घट्ट खुरांच्या व नुकतेच गाडीला जुंपलेल्या शिंगरासारखा होता. सानिनला ज्यांनी नंतरच्या काळात पाहिले, जेव्हा आयुष्याने त्याच्यावर वेडेवाकडे ओरखाडे काढले होते आणि त्याचा यौवनपूर्ण गोंडसपणा नाहीसा झाला होता, त्यांना त्याच्यात अगदी वेगळ्याच माणसाचे दर्शन घडले.

दुसऱ्या दिवशी, सानिन अद्याप बिछान्यातच असताना, सणा-सुदीचा पोषाख केलेला एमिल त्याच्या खोलीत घुसला. त्याच्या हातात छडी होती, पोमेड लावून केस चापूनचोपून बसविलेले होते. अवघ्या मिनिटाच्या आत श्री. क्लूबेर तेथे घोडागाडीसह हजर होईल, हवा सुरेख राहण्याची चिन्हे आहेत, सगळे सहलीला जायला सज्ज झाले होते, पण आई येणार नाही, कारण तिची डोकेदुखी परत सुरू झाली होती, एवढी माहिती त्याने पुरविली. सानिनला त्याने तयार होण्याची घाई केली व एकही क्षण वाया घालवू नये म्हणून बजाविले. आणि खरोखरीच श्री. क्लूबेर हजर झाला तेव्हा सानिनची आन्हिके आटपली नव्हती. दारावर टिचक्या मारून तो खोलीत आला, नम्र झुकून त्याने अभिवादन केले व सानिनला हवा तेवढा वेळ आपली थांबण्याची तयारी आहे असे सांगून, आपल्या गुडघ्यांवर आपली टोपी हलकेच ठेवून, तो खुर्चीवर बसला. त्या श्रीमंत दुकानदाराने झकपक पोषाख केला होता, सुगंधी द्रव्यांचा त्याला घमघमाट येत होता. त्याच्या प्रत्येक हालचालीबरोबर सूक्ष्म सुगंधांचा भपकारा येत होता. प्रशस्त उघड्या बग्गीमधून तो आला होता. लान्दो नांवाने ओळखल्या जाणाऱ्या त्या घोडा-गाडीला दोन उंच, भक्कम, पण फारसे सुंदर नसलेले घोडे जोडलेले होते. पंधरा मिनिटांच्या अवधीनंतर सानिन, श्री. क्लूबेर आणि एमिल मोठ्या डौलाने ह्या बग्गीतून मिठाईवाल्याच्या घराच्या दर्शनी भागात येऊन ठेपले. फ्राऊ लेनोरेने सहलीला जाण्यास ठाम नकार दिला. जेम्मा आपल्या आईला सोबत म्हणून घरात राहू इच्छित होती. पण तिच्या आईने तिला जबरीने सहलीला धाडले.

"मला कुणाचीही गरज नाही," फ्राऊ लेनोरेने खात्री पटविण्याचा प्रयत्न केला. "मी झोप काढीन. पान्तालीओनेलासुद्धा मी तुमच्याबरोबर पाठवलं असतं, पण दुकान बघायला दुसरं कुणी नाही."

"आम्ही तार्तालियाला नेऊ?" एमिलने विनवून विचारले.

"अर्थात, खुशाल न्या."

तार्तालिया तात्काळ आनंदाने पुढील पेटीच्या आसनावर चढून बसला व स्वतःचे अंग चाटू लागला. अशा प्रकारच्या सहलींची त्याला सवय होती हे उघड दिसत होते. जेम्माने भली मोठी गवती टोपी घातली होती. त्या टोपीला तपकिरी फितीची किनार होती. टोपीची कडा पुढील भागात खाली वळविल्यामुळे तिच्या चेहऱ्याचे उन्हापासून रक्षण होत होते. त्या कडेची सावली नेमकी तिच्या ओठांपाशी संपत होती. तिचे ओठ गुलाबाच्या भरघोस फुलाच्या पाकळ्यांप्रमाणे गुलाबी आणि नितळ नाजूक दिसत होते. तिचे दात लहान मुलाप्रमाणे लाजरे चमकत होते. मागील आसनावर सानिनशेजारी जेम्मा बसली. श्री. क्लबेर आणि एमिल त्यांच्या समोर बसले. खिडकीपाशी फ्राऊ लेनोरेची पांढुरकी आकृती उमटली. जेम्माने तिला हातरुमाल हलवून दाखविला आणि घोडे दुडक्या चालीने निघाले.

## १५

सोदेन हे छोटे गाव फ्रँकफुर्टपासून अर्ध्या तासाच्या अंतरावर आहे. ताऊनुस टेकड्यांच्या पायथ्याशी रमणीय स्थळी ते वसले आहे. कमकुवत छात्यांच्या माणसांना उपयोगी पडणारे खनिज पाण्याचे झरे तेथे आहेत, म्हणून ते रशियात प्रसिद्ध आहे. फ्रँकफुर्टची माणसे सर्वसाधारणपणे तेथे मनोरंजनासाठी जातात, कारण सोदेनमध्ये फार सुंदर उद्यान आहे व अनेक Wirtschaften आहेत, जेथे उंच लिंबोणींच्या आणि मेपलच्या झाडांखाली बीयर व कॉफीचा आनंद लुटता येतो. फ्रँकफुर्ट ते सोदेन हा रस्ता माईन नदीच्या उजव्या किनाऱ्यालगत जातो आणि त्याच्या कडेशी फळांची झाडे उभी आहेत. उत्तम राजरस्त्यावरून बग्गी धावत असताना जेम्मा व तिचा भावी पती यांच्यातील संबंधांकडे सानिन चोरून दृष्टिक्षेप टाकीत होता. त्या दोघांना एकत्र तो प्रथमच पहात होता. ती पूर्ण शांत आणि सावरून बसली होती, मात्र नेहमीपेक्षा जास्त अलिप्त आणि गंभीर होती. तो प्रेमळ शिक्षकाप्रमाणे भासत होता. स्वतःला व आपल्या ताब्यातील मुलांना अपायकारक नसलेली, किंचित मौज लुटू देणारा. जेम्माकडे तो काही खास लक्ष पुरवीत नव्हता असे सानिनला आढळले. फ्रेंच लोक ज्याला «empressement» म्हणतात ते. त्यांचा मामला निश्चित झाला असे श्री. क्लबेर मानून चालला



होता हे उघड होते व म्हणून तो विशेष गडबड करीत नव्हता अथवा चिंता करीत नव्हता. पण लीनतेने वागणे तो क्षणभरही विसरला नव्हता. जेवणापूर्वी सोदेनभोवतालच्या जंगलउतारांवरून व दऱ्या-खोऱ्यांमधून फिरतानाही, निसर्गामधील सौंदर्याचा आस्वाद घेतानाही, ह्या निसर्गाशी तो तसाच नम्रतेने वागला होता. काही क्षणांना मात्र त्या लीनतेत औपचारिक कठोरता जाणवली होती. उदाहरणार्थ, एका विशिष्ट ओढ्याच्या खोऱ्यामधून जाणाऱ्या प्रवाहाबाबत त्याने शेरा मारला होता की, तो फारच सरळ होता व त्याऐवजी त्याने काही रमणीय वळणे घ्यायला हवी होती. तसेच फिंच पक्ष्याचे लकेरी मारणे त्याला एकसुरी वाटले होते व आवडले नव्हते. जेम्माने थकल्याचे मुळीच दाखविले नाही, उलट ती खूप मजेत दिसत होती. पण सानिनला मात्र इतःपर त्याच्या ओळखीची जेम्मा आढळेना. म्हणजे तिच्या चेहऱ्यावर कसले सावट आले होते असे मुळीच नव्हे; तिचे सौंदर्य यापूर्वी एवढे कधीही खुलले नव्हते. पण ती अंतर्मुख झाल्याचे भासत होते. आपली छत्री उघडून व हातमोजे घालून धीरगंभीरपणे, मंद पावले टाकीत, खानदान घराण्यातील तरुणीप्रमाणे ती चालत होती व अत्यंत कमी बोलत होती. एमिलसुद्धा काहीसा ताणाखाली दिसला आणि सानिन अर्थातच अधिक ताणलेल्या मनःस्थितीत होता. इतर गोष्टींच्या जोडीला, संभाषण जर्मन भाषेत चालले असल्यामुळे त्याला जास्तच अवघडल्यासारखे होत होते. एकटा तार्तालिया पूर्ण मजेत वावरत होता. त्याच्या वाटेत येणाऱ्या कोकीळांवर तो जोराने धावून जात होता, भुंकत होता; खड्ड्यांवरून, खुंटांवरून आणि उन्मळून पडलेल्या झाडांवरून उड्या मारीत होता; पाण्यात बेधडक धावत जात होता, घाईघाईने लपालपा पाणी पीत होता, स्वतःचे अंग झटकीत होता, केकाटत होता आणि दुसऱ्याच क्षणी आपली लाल जीभ खांद्यापर्यंत लांब बाहेर काढून तीरासारखा धावत होता. आपल्या पाहुण्यांच्या मनोरंजनार्थ जेवढे काही करणे श्री. क्लूबेरला आवश्यक वाटले होते तेवढे त्याने सर्व केले. विशाल पसरलेल्या एका ओक वृक्षाच्या छायेत त्याने सर्वांना बसायला बोलाविले, आपल्या खिशामधून «Knallerbsen, oder Du sollst und wirst lachen» (उपरोधिक लेख, अथवा तू हसलेच पाहिजेस आणि हसशील) नांवाचे छोटे पुस्तक काढले आणि त्या पुस्तकातील भयानक विनोदी गोष्टी मोठ्यांदा वाचायला त्याने आरंभ केला. सुमारे डझनभर विनोद त्याने वाचले, पण त्यांच्यातून फारशी गंमत निर्माण झाली नाही. औपचारिकतेपायी एकट्या सानिनने हसण्याचा प्रयत्न केला आणि श्रीयुत क्लूबेर स्वतः माफक हसला, तसेच प्रत्येक विनो-

दाच्या अखेरी त्याने लीन हास्य केले. बारा वाजण्याच्या सुमारास ते सगळे सोदेनमधील एका सर्वोत्तम उपहारगृहात आले.

जेवण सांगण्याची वेळ आली होती.

चारही बाजूंनी बंद असलेल्या ग्रीष्म-वाटिकेत त्यांनी जेवण घ्यावे, «im Gartensalon» मध्ये जेवावे, असे श्री. क्लूबेरने सुचविले. पण येथे जेम्माने अकस्मात बंड पुकारले. आपण खुल्या जागीच जेवणार, उपहारगृहाच्या दर्शनी भागातील बागेमधील एका छोट्या टेबलावर जेवणार, असे तिने सांगितले. तेच ते चेहरे सदासर्वकाळ बघून तिला म्हणे कंटाळा आला होता व काही नवे चेहरे पाहण्याची तिची इच्छा होती. काही टेबलांपाशी एव्हाना नव्याने आगमन झालेल्या पाहुण्यांचे घोळके बसलेले होते.

"आपल्या भावी पत्नीची लहर" पूर्ण करण्यासाठी श्री. क्लूबेर जेव्हा प्रमुख वेटरशी सल्लामसलत करायला गेला, तेव्हा आपली नजर खाली झुकवून व ओठ गच्च आवळून जेम्मा स्तब्ध उभी राहिली होती. सानिन तिच्याकडे रोखून आणि प्रश्नार्थक नजरेने पहात होता याची तिला जाणीव होत होती व त्याच गोष्टीचा तिला संताप येत होता. शेवटी श्री. क्लूबेर परत आला. अर्ध्या तासात जेवण तयार होईल असे त्याने सांगितले व दरम्यान चेंडू फेकून दांड्या उडविण्याचा खेळ खेळण्याचा प्रस्ताव मांडला. त्यामुळे भूक चांगली लागेल असे पुढे म्हणाला, खी-खी! चेंडू फेकण्यात तो प्रवीण होता. लाकडी चेंडू फेकण्यापूर्वी तो वीराचा पवित्रा घ्यायचा, आपले पिळदार स्नायू दाखवायचा, रुबाबात हाताला झटका द्यायचा व एका पायावर स्वतःचा तोल सांभाळायचा. आपल्या परीने तो व्यायामबाज होता आणि त्याचे शरीर चांगले बांधीव होते. त्याचे हात पांढरेशुभ्र व सुरेख होते आणि सोनेरी कलाबतूची नक्षी विणलेल्या भारी हिंदुस्थानी रेशमी रुमालावर त्या हातांना तो पुशीत होता.

जेवणाची वेळ झाली आणि तो सगळा कंपू आपल्या टेबलापाशी गेला.

१६

जर्मन जेवण कसे असते हे कुणाला ठाऊक नाही? कणकेचे गोळे घातलेले आणि दालचिनी शिंपडलेले पाणचट सूप, बुचाप्रमाणे कोरडे असलेले व पांढऱ्या चरबीचे तुकडे चिकटलेले उकडलेले मांस, पातळ कापलेले बटाटे, जाडजूड बीटरूट, चघळल्याप्रमाणे दिसणारे शेंगट, केपरच्या कळ्यांचे तोंडी



लावणे व शिरका ओतलेला निळसर वाम मासा, जेलीबरोबर वाढलेले मटण आणि हमखास देण्यात येणारे «Mehlspeise» – आंबट लाल चटणीबरोबरचे एक प्रकारचे पुडिंग. पण बीयर आणि मदिरा मात्र सुरेख! सोदेनच्या उपहारगृहाचा मालक आपल्या गिऱ्हाईकांची नेमक्या अशाच जेवणाने सरबराई करीत होता. जेवण ठीक पार पडले. त्यात फारसा जिवंतपणा नव्हता हे खरे आणि श्रीमान क्लूबेरने "आपल्याला सर्वात जे आवडतं त्याला!" Was wir lieben! असे बोलून अभीष्टचिंतनपर पेयपान केले तेव्हाही कुणी फारसा उत्साह दाखविला नाही. सर्व काही अत्यंत सभ्य आणि आदरणीय होते. जेवणानंतर कॉफी आली. पातळ, तांबूस रंगाची, अस्सल जर्मन कॉफी. खऱ्याखुऱ्या सभ्य माणसाला अनुसरून श्रीमान क्लूबेरने सिगार ओढण्याआधी जेम्माची परवानगी विचारली. पण अनपेक्षितरीत्या एक असभ्य नसली तरी अप्रिय घटना घडली.

शेजारच्या एका टेबलापाशी माईन्झ शिबंदीमधील काही अंमलदार बसले होते. त्यांच्या कटाक्षांवरून आणि कुजबुजण्यावरून स्पष्ट होते की, जेम्माच्या सौंदर्याने त्यांच्यावर परिणाम घडविला होता. त्यांच्यातील एकजण, तो बहुधा फ्रँकफुर्टला येऊन गेला असावा, तिच्याकडे असे काही पहात होता की जणू त्याने पूर्वी तिला पाहिले होते. ती कोण होती हे त्याला माहीत असावे. एकदम तो हातात ग्लास घेऊन उठला – ती लष्करी माणसे बरेच मद्यपान करीत होती आणि त्यांच्या टेबलावर बाटल्यांची रांग उभी होती – आणि जेम्मा बसली होती त्या टेबलापाशी आला. तो अत्यंत उमदा, सोनेरी केसांचा तरुण होता व त्याचा चेहरा प्रसन्न आणि खरोखरीच आकर्षक होता. पण मदिरेचा अतिरेक झाल्याने त्याचा चेहरा विस्कटल्याप्रमाणे दिसत होता, गालाचे स्नायू थरथरत होते, तांबारलेले डोळे गरगरा फिरत होते. आरंभी त्याच्या मित्रांनी त्याला आवरण्याचा प्रयत्न केला, पण लौकरच त्यांनी तो नाद सोडला – उलट पुढे काय घडते याबद्दल ते उत्सुक होते.

थोड्या झुकांड्या खात तो अंमलदार जेम्मासमोर येऊन थांबला आणि उगाचच मोठ्यांदा ओरडला – वस्तुतः त्याच्या आवाजाने त्याला दगा दिला होता व त्याच्या अंतर्यामीचा संघर्ष उघडा पडला होता – : "सबंध फ्रँकफुर्टमधल्या, सर्व जगामधल्या सर्वात सुंदर कॉफीवाल्या मुलीच्या आरोग्यासाठी मी पितो!" (येथे त्याने ग्लासामधील उरलेली दारू एका घोटात पिऊन टाकली), "आणि तिच्या ईश्वरी बोटांनी तोडलेलं हे फूल मी माझं बक्षीस म्हणून घेतो!" जेम्माच्या बशीशेजारी पडलेले गुलाबाचे फूल त्याने उचलले.

प्रथम ती चकित झाली व घाबरून तिचा चेहरा पांढराफटक पडला... मग भीतीच्या जागी तिच्या मुद्रेवर तिरस्काराची भावना उमटली. अचानक ती नखशिखांत लाजली. तिचा उपमर्द करणाऱ्या माणसावर रोखलेले तिचे डोळे क्षणात संतापाने चमकत होते, क्षणात कष्टी बनत होते, तर क्षणात त्यांच्यात तिटकारा मावत नव्हता. ह्या नजरेने तो अंमलदार काहीसा वरमला. काहीतरी पुटपुटून, झुकून अभिवादन करून तो आपल्या मित्रांपाशी परतला. त्यांनी हसून व उपहासाने टाळ्या वाजवून त्याचे स्वागत केले.

श्रीमान क्लूबेर एकदम ताडकन उभा राहिला व डोक्यावर टोपी ठेवीत सभ्य, पण फारशा मोठ्या आवाजात नव्हे, उद्गारला : "छे: ! कहर झाला! स्वच्छंदी वागण्याचा कहर झाला!" त्याच वेळी त्याने कठोर आवाजात वेटरला हाक मारली व तात्काळ बिल देण्याची मागणी केली... एवढ्यावरच तो थांबला नाही, तर त्याने बग्गी मागविली आणि पुढे पुस्ती जोडली की, सभ्य माणसांना उपहारगृहामध्ये जाणे अशक्य ठरेल, कारण त्यांचा उपमर्द होण्याचा धोका होता. ह्या शब्दांसरशी, धपापत्या उराने स्वस्थ बसलेल्या जेम्माने आपली नजर श्रीमान क्लूबेरकडे वळविली... अंमलदाराकडे ज्या स्थिर दृष्टीने तिने पाहिले होते त्याच दृष्टीने... एमिल संतापाने थरथर कापत होता.

"उठा, माझ्या फ्रॉलीन", श्रीमान क्लूबेर अद्याप कठोर आवाजात बोलत होता. "इथं थांबणं तुमच्या दृष्टीनं इष्ट नाही. आपण आतल्या भागात जाऊ."

जेम्मा मुकाट्याने उठली. त्याने आपला कोपर पुढे धरला, तिने त्याच्या दंडावर आपला हात ठेवला आणि ऐटीत पावले टाकीत तो तिला उपहार-गृहाच्या आतील भागात घेऊन गेला. जेथे ते जेवले होते तेथून जेवढा अधिक दूर तो जात होता, तेवढा त्याचा ऐटबाजपणा व मग्रूरपणा वाढत होता. बिचारा एमिल त्यांच्या पाठोपाठ गेला.

पण श्रीमान क्लूबेर जेव्हा वेटरला बिलाचे पैसे देत होता – शिक्षा म्हणून त्याने वेटरला मुळीच टिप दिली नव्हती – तेव्हा सानिन झपझप पावले टाकीत अंमलदार बसले होते त्या टेबलापाशी गेला होता व ज्याने जेम्माचा अपमान केला होता त्या अंमलदाराला उद्देशून ( ह्या क्षणाला तो अंमलदार ते गुलाबाचे फूल आपल्या मित्रांना आळीपाळीने हुंगायला देण्यात गुंतला होता ) फ्रेंच भाषेत स्पष्टपणे म्हणाला :

"महाशय, आत्ता आपण जे काही वर्तन केलंत ते प्रामाणिक माणसाला



शोभणारं नव्हतं, तुमच्या गणवेषाला शोभणारं नव्हतं आणि मी तुम्हाला सांगायला आलोय की, असभ्य रीतीनं तुमचं पालनपोषण घडलंय!"

तो तरुण ताडकन उठला, पण वयाने किंचित मोठ्या असलेल्या दुसऱ्या अंमलदाराने आपल्या हाताच्या इशाऱ्याने त्याला रोखले व परत खाली बसायला लावले. मग सानिनकडे वळून तोसुद्धा फ्रेंचमध्ये म्हणाला :

"आपण कोण? ह्या तरुणीचे नातेवाईक, भाऊ अथवा भावी पती?"

"मी तिला अगदी परका आहे," सानिन ओरडला. "मी रशियन आहे. पण असल्या उमट वर्तनावेळी मी केवळ बघ्याची भूमिका घेऊन स्वस्थ बसू शकत नाही. हे माझं कार्ड आणि हा माझा पत्ता. अंमलदार महाशय मला शोधून काढू शकतील."

असे बोलून सानिनने आपले ओळखपत्र टेबलावर भिरकाविले आणि त्याच वेळी एका अंमलदाराने आपल्या बशीत ठेवलेले जेम्माचे गुलाबाचे फूल झटकन उचलून घेतले. तरुण अंमलदाराने परत उठण्याचा प्रयत्न केला, पण त्याच्या साथीदाराने त्याला थोपवून म्हटले : "शांत रहा डॉनहॉफ!" नंतर तो उठला, ताठ उभे राहून त्याने सलाम ठोकला आणि अत्यंत आदरपूर्वक आवाजात सानिनला म्हणाला की, दुसऱ्या दिवशी सकाळी त्यांच्या रेजिमेंटचा एक अधिकारी सानिनच्या खोलीवर येण्याचा बहुमान प्राप्त करील. सानिनने किंचित मान झुकवून संमती दर्शविली आणि घाईघाईने तो आपल्या बरोबरी-च्या माणसांकडे परतला.

सानिनची अनुपस्थिती अथवा अंमलदारांबरोबर सानिनचे झालेले संभाषण, या दोन्ही गोष्टींकडे श्रीमान क्लूबेरने आपले लक्ष नसल्याचे भासविले. बग्गीला घोडे जोडणाऱ्या गाडीवानावर त्यांच्या मंद हालचालींबद्दल तो उखडला. जेम्माही सानिनशी काही बोलली नाही, एवढेच नव्हे तर त्याच्याकडे तिने साधा कटाक्षही टाकला नाही. पण तिच्या आकुंचित भुवया, तिचे फिकट आवळलेले ओठ, तिची स्तब्धता, ह्या गोष्टी तिच्या मनातील खळबळ दाखवीत होत्या. सानिनबरोबर बोलू इच्छिणारा, त्याला प्रश्न विचारू पाहणारा, एकटा एमिल होता. सानिन अंमलदारांपाशी गेलेला व त्यांना त्याने काहीतरी पांढरे – कागदाचा कपटा – दिलेले एमिलने पाहिले होते... कदाचित ती चिठ्ठी अथवा कार्ड असावे असा त्याने तर्क केला होता... त्या बिचाऱ्या मुलाच्या काळजाचे ठोके जलद पडत होते, त्याचे गाल गरम झाले होते, सानिनच्या गळ्याभोवती आपले हात टाकून रडायच्या तो बेतात होता, अथवा त्याच क्षणाला सानिनबरोबर जाऊन त्या पाशवी

अंमलदारांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडवायची त्याची इच्छा होती. पण त्याने ती ऊर्मी दाबली होती व आपल्या उदात्त रशियन मित्राची प्रत्येक हालचाल लक्षपूर्वक पाहण्यावर त्याने स्वतःचे समाधान मानले होते.

अखेरीस गाडीवानाने बग्गीला घोडे जोडले आणि सर्व मंडळी बग्गीत बसली. तार्तालियापाठोपाठ एमिल उडी मारून पेटीच्या आसनावर बसला. त्याला तेथे अधिक बरे वाटत होते आणि आता त्याला मनापासून तिटकारा वाटणाऱ्या क्लूबेरला पाहणे आपोआप टळणार होते.

घरी परतताना वाटेत सारा वेळ श्रीमान क्लूबेर बडबडत होता... तो एकटाच बोलत होता. कुणीही त्याचे बोलणे खोडून काढले नाही, पण कुणीही त्याच्याशी सहमतही झाले नाही. बंद ग्रीष्म-वाटिकेत जेवणाचा प्रस्ताव त्याने मांडला होता तेव्हा त्याचे न ऐकण्यात मोठी चूक झाली होती यावर त्याचा मुख्य रोख होता. त्याचे ऐकले असते तर पुढील अप्रिय गोष्टी टळल्या असत्या असे त्याचे म्हणणे होते. मग त्याने काही कठोर टीकात्मक शेरे मारले, अर्थात त्यांना किंचित उदारमतवादाची झाक होती. सरकार अंमलदारांचे कसे फाजील लाड करीत आहे, त्यांच्या शिस्तीकडे लक्ष देत नाही, समाजातील नागरी घटकांबद्दल योग्य आदर बाळगत नाही, त्यामुळे समाजात असंतोष वाढत आहे व तो क्रांतीच्या नजीक जाऊन पोहोचला आहे, ह्याचे शोचनीय उदाहरण (या ठिकाणी त्याने एकाच वेळी सहानुभूतीपर आणि कठोर सुस्कारा टाकला), ह्याचे शोचनीय उदाहरण फ्रान्सने दिले होते. मात्र पुढे हे सांगण्यास तो विसरला नाही की, त्याला स्वतःला सरकारबद्दल आदर आहे आणि तो कधीही क्रांतिकारक होणार नाही, मात्र असे स्वैराचारी वर्तन पाहिल्यानंतर त्याबद्दल आपली नापसंती व्यक्त न करणे त्याला अशक्य ठरले होते... या ठिकाणी त्याने नीती-अनीतीबद्दल, प्रतिष्ठेबद्दल आणि आत्मप्रतिष्ठेबद्दल चार प्रचलित मुक्ताफळे उधळली.

जेवणापूर्वीच्या फिरण्यावेळीसुद्धा जेम्मा श्री. क्लूबेरवर काहीशी नाराज होती व म्हणून तिने स्वतःला सानिनपासून दूर ठेवले होते आणि त्याच्या संगतीत ती काहीशी संकोचून गेली होती. पण आताच्या क्लूबेरच्या वटवटीमुळे मात्र तिच्या मुद्रेवर शरमेच्या खुणा स्पष्ट दिसू लागल्या. प्रवासाच्या अखेरीस तिला खूपच त्रास होऊ लागला, पण पूर्वीप्रमाणेच सानिनशी बोलण्याचे तिने टाळले. मात्र असा एक क्षण आला ज्यावेळी अचानक तिने त्याच्याकडे विनवणीचा कटाक्ष टाकला... सानिनला श्रीमान क्लूबेरचा जेवढा संताप आला होता, त्याहून जेम्माची त्याला दया जास्त आली होती. त्या दिवसभरात जे काही घडले होते त्याचा त्याला मनातून मात्र खूप आनंद झाला होता, जरी दुसऱ्या दिवशी आव्हान त्याची वाट पाहणे शक्य होते.



शेवटी ती पीडादायी सहल संपुष्टात आली. मिठाईवाल्याच्या घरासमोर जेम्माला बग्गीमधून खाली उतरायला मदत करताना सानिनने मुकाटपणे त्याने प्राप्त केलेले गुलाबाचे फूल तिच्या हातात ठेवले. ती लाजून लाल झाली, त्याचा हात तिने दाबला व तात्काळ गुलाब कुठेतरी लपविला. वस्तुतः नुकतीच संध्याकाळ होत होती, पण घरात जाण्याची त्याची इच्छा नव्हती. अथवा तिनेही त्याला घरात येण्याचे आमंत्रण दिले नाही. शिवाय, पान्तालीओनेने बाहेरच्या दारात येऊन सांगितले की, फ्राऊ लेनोरे अंथरुणात निजून होती. एमिलिओने सानिनचा लाजरा निरोप घेतला. सानिनने त्याला थक्क केले होते. सानिनचे वर्तन पाहून तो अगदी थंड पडला होता. क्लूबेरने सानिनला पथिकाश्रमापर्यंत पोहोचविले आणि यथासांग निरोप घेतला. सदैव तोल राखणारा तो जर्मनसुद्धा किंचित अवघडला. खरे म्हणजे प्रत्येकालाच अवघडल्यासारखे झाले होते.

पण सानिनने ही अवघडलेपणाची भावना पटकन झटकून टाकली. तिच्या जागी एक अस्पष्ट, पण प्रसन्न, उल्हसित करणारी भावना निर्माण झाली होती. मनातील सर्व विचारांना पळवून लावून, स्वतःवरच खूष होऊन शीळ घालीत तो खोलीत येरझाऱ्या घालीत होता.

## १७

दुसऱ्या दिवशी सकाळी आन्हिके आटोपल्यानंतर सानिन स्वतःशी म्हणाला : "मी दहा वाजेपर्यंत त्या अधिकाऱ्याची वाट पाहीन आणि त्याला काय सांगायचं असेल ते सांगू दे. नंतर मात्र त्याला माझा शोध घ्यावा लागेल." पण जर्मन लोक लौकर उठणारे आहेत आणि घड्याळात जेमतेम नऊ वाजले न वाजले तोच नोकराने सानिनला येऊन निरोप दिला की, सेकंड लेफ्टनंट व्हॉन रिख्तेर त्याला भेटू इच्छित आहे. सानिनने घाईघाईने अंगात कोट चढविला व भेटू इच्छिणाऱ्या गृहस्थांना खोलीत घेऊन यायला नोकराला सांगितले. आपल्या पाहुण्याचे पोरसवदा रूप पाहून सानिन चकित झाला. आपल्या दाढीहीन चेहऱ्यावर जास्तीत जास्त पोक्तपणाचा आव आणण्याचा श्रीमान व्हॉन रिख्तेरने प्रयत्न केला, पण त्यात त्याला मुळीच

यश आले नाही. आपले अवघडलेपण लपविणेही त्याला अशक्य ठरले. खुर्चीवर बसताना आपल्या तलवारीत त्याचा पाय अडकला व तो जवळ जवळ कोलमडलाच. अडखळत, चाचरत त्याने सानिनला मोडक्या फ्रेंचमध्ये निरोप दिला की, त्याचा मित्र बॅरन व्हॉन डॉनहॉफ याने आदल्या दिवशीच्या अपमानकारक शब्दांबद्दल श्रीमान व्हॉन झानिन यांच्याकडून माफीची मागणी केली होती; आणि माफी मागण्यास जर श्रीमान व्हॉन झानिननी नकार दिला, तर बॅरन व्हॉन डॉनहॉफ यांनी समाधान मागितले होते. सानिनने उत्तर दिले की, माफी मागण्याचा त्याचा मुळीच इरादा नाही, पण समाधान करण्याची त्याची तयारी आहे. मग श्रीयुत व्हॉन रिख्तेरने अजूनही अडखळत विचारले की, आवश्यक त्या प्राथमिक गोष्टी बोलण्याचा मान तो कुणाला देऊ इच्छित आहे व ह्या वाटाघाटीची जागा आणि वेळ कुठे आहे. सानिनने उत्तर दिले की, श्रीयुत व्हॉन रिख्तेर यांनी आणखी दोन तासांनंतर परतावे दरम्यान सानिन आपला साहाय्यक शोधील. ("आता कुठला सैतान शोधून काढू?" सानिनने स्वतःला विचारले.) श्रीयुत व्हॉन रिख्तेर उठला व निरोप घेऊ लागला... पण दारातच पश्चात्तापाचा झटका येऊन थांबला, सानिनकडे वळला आणि पुटपुटला की, त्याचा मित्र बॅरन व्हॉन डॉनहॉफला स्वतःशी कबूल करावे लागले होते की... काही मर्यादेपर्यंत... कालच्या घटनेला तो दोषी होता... म्हणून किंचित माफीवर – «des exghizes léchères» – समाधान मानायची त्याची तयारी होती. त्यावर सानिन उत्तरला की, कोणतीही माफी मागण्याचा त्याचा मुळीच इरादा नाही, ना किंचित ना प्रचंड, कारण त्याचा काही दोष आहे असे त्याला मुळीच वाटत नाही.

"तसं असेल तर," अधिकच लाजत व्हॉन रिख्तेर म्हणाला, "मैत्रीच्या बारांची देवघेव झाली पाहिजे – des goups de bisdolet à l'amiaple."

"मला नीटसं समजलं नाही," सानिन म्हणाला. "म्हणजे आम्ही हवेत पिस्तुलं उडवायची?"

"छेः, छेः, तसं नाही!" आता पुरताच शरमलेला सेकंड लेफ्टनंट चाचरला. "मला एवढंच वाटलं की, यात गुंतलेले लोक प्रतिष्ठित आहे तेव्हा... पण मी त्याबद्दल तुमच्या साहाय्यकाशी बोलीन –" एवढे बोलून तो निघून गेला.

लेफ्टनंट निघून जाताच सानिन मटकन खुर्चीत बसला व फरशीकडे टक लावून पाहू लागला. "काय आहे हे सगळं? माझ्या आयुष्यानं अचानक



किती वेगळं वळण घेतलं? माझा पूर्ण भूतकाळ, माझा पूर्ण भविष्यकाळ यांना एकाएकी व्यर्थता प्राप्त झालीय. फ्रँकफुर्टमध्ये एक द्वंद्वयुद्ध खेळणं एवढी एकच गोष्ट उरलीय." त्याला आपल्या एका वेड्या मावशीची आठवण झाली. ती सतत पुढील कडवी म्हणत नाचायची :

अरे माझ्या शिलेदारा!
लौकर ये भराभरा!
माझ्या प्रेमपाखरा!
नाच रे माझ्या मोरा!

त्याला एकदम हसू कोसळले व वेड्या मावशीप्रमाणे तो गाऊ लागला: "माझ्या प्रेमपाखरा! नाच रे माझ्या मोरा!"

"आता मला उद्योगाला लागलं पाहिजे. वेळ फारसा उरलेला नाही!" तो मोठ्यांदा उद्गारला व उडी मारून उठला तोच हाती चिठ्ठी धरून पान्तालीओने समोर उभा असलेला त्याला दिसला.

"मी दारावर बऱ्याच वेळा ठोकलं, पण तुम्ही उत्तर दिलं नाही. मला वाटलं तुम्ही बाहेर गेलात," म्हातारा पुटपुटला आणि त्याने चिठ्ठी पुढे धरली. "सिनोरीना जेम्मानं दिलीय."

सानिनने यांत्रिकपणे चिठ्ठी घेतली, उघडून तिच्यावर नजर फिरविली. जेम्माने लिहिले होते की, त्याला माहीत असलेल्या एका विशिष्ट गोष्टीपायी तिची मनःस्थिती खूप बिघडली आहे व त्याला ताबडतोब भेटू इच्छित आहे.

"सिनोरीना फार काळजीत पडलीय," त्या चिठ्ठीत काय लिहिले होते हे माहीत असलेला पान्तालीओने बोलू लागला. "तुम्ही काय करताय ते पहायला आणि तुम्हाला घेऊन जायला तिनं मला पाठवलंय."

त्या म्हाताऱ्या इटालियनाकडे सानिनने एक दृष्टिक्षेप टाकला व विचार केला. त्याच्या मनात अचानक एक कल्पना चमकून गेली. आरंभी त्याला ती अगदी अशक्य कोटीतील वाटली, वेडगळपणाची भासली...

"आणि तरीही... का असू नये?" त्याने स्वतःलाच विचारले.

"श्रीमान पान्तालीओने!" तो मोठ्यांदा म्हणाला.

म्हातारा दचकला, आपल्या टायमध्ये त्याने आपली हनुवटी खुपसली व सानिनकडे टक लावून पाहिले.

"काल काय घडलं ते तुम्हाला माहीत आहे?" सानिनने पुढे विचारले.

पान्तालीओने तोंडातल्या तोंडात बरळला व आपले केसाचे प्रचंड झुलूप त्याने मागे उडविले.

"होय."

(एमिलने घरी जाताच त्याला सर्व वृत्तांत सांगितला होता.)

"अच्छा, तुम्हाला माहीत आहे... तर मग... एक अधिकारी नुकताच मला भेटून गेला. त्या हरामखोरानं मला द्वंद्वयुद्धाचं आव्हान दिलंय. मी ते आव्हान स्वीकारलंय. पण मला साहाय्यक नाही. **तुम्ही** माझे साहाय्यक व्हाल?"

पान्तालीओने आणखीच दचकला. त्याच्या भुवया एवढ्या उंचावल्या की, त्याच्या कपाळावर लोंबणाऱ्या झुलुपात दिसेनाशा झाल्या.

"तुम्हाला खरंच लढलं पाहिजे?" अखेरीस त्याने इटालियनमध्ये विचारले. ह्या क्षणापर्यंत तो फ्रेंचमध्ये बोलत होता.

"होय, मला लढलंच पाहिजे. दुसरा कुठलाही मार्ग मला कायमचं लांच्छन ठरेल."

"हं! आणि मी तुमचा साहाय्यक व्हायला नकार दिला... तर तुम्ही दुसऱ्या कुणाला तरी शोधणार?"

"होय, नक्की."

पान्तालीओनेने आपली नजर खाली केली. "सिन्योर त्सानिनी, एक गोष्ट विचारायला परवानगी द्या. तुमच्या द्वंद्वामुळं एका व्यक्तीच्या प्रतिष्ठेला बाधा तर येणार नाही?"

"मला तसं वाटत नाही. पण काहीही असलं तरी दुसरा पर्याय नाही."

"हं ऽ!" पान्तालीओनेची हनुवटी आणखीच खोल खुपसली गेली. "आणि त्या ferroflucto cluberio चं काय?" चेहरा वर उचलीत अचानक तो उद्गारला.

"त्याचं काय? काहीही नाही."

"के! Chè"* पान्तालीओनेने संतापाने खांदे उडविले. "काही झालं तरी मी तुमचे आभार मानले पाहिजेत, असं मला वाटतं!" थोडे थांबून कापऱ्या स्वरात तो म्हणाला, "मला बहुमान दिल्याबद्दल, माझ्या ह्या अपमानास्पद अवस्थेतही एक सन्माननीय माणूस मानल्याबद्दल – Un

---

* – अनुवाद करता न येण्यासारखा इटालियन उद्गार – तुर्गेनेव यांची टीप.



galant' uomo असं वागून तुम्ही स्वत: अस्सल galant'uomo आहात हे सिद्ध केलंय. पण तुमच्या प्रस्तावाचा मला विचार केला पाहिजे."

"त्यासाठी अवधी नाही प्रिय श्रीमान चि... चिप्पा..."

"...तोला," म्हाताऱ्याने स्वत:चे नांव पूर्ण केले. "एक तास विचार करायला परवानगी द्या. माझ्या हितकर्त्याची मुलगी त्यात गुंतलीय... आणि मला त्यावर विचार केला पाहिजे... माझ्यावर बंधन आहे तसं... एका तासात – पाऊण तासाच्या आत माझा निर्णय मी तुम्हाला कळवितो."

"छान! मी वाट पाहतो."

"आणि आता... सिनोरीना जेम्माला मी काय उत्तर देऊ?"

सानिनने एक कागद उचलला व त्यावर लिहिले. "माझ्या प्रिय मैत्रिणी, काळजी करू नका. तीन तासांच्या अवधीत मी तुम्हाला भेटतो आणि सगळं काही सांगतो. तुमच्या सहानुभूतीबद्दल मन:पूर्वक आभार." ही चिठ्ठी त्याने पान्तालीओनेच्या हवाली केली.

म्हाताऱ्याने तो कागद काळजीपूर्वक आतील खिशात ठेवला आणि दाराकडे जाताना परत म्हणाला: "एका तासात!" पण एकदम मागे वळून तो धावत सानिनपाशी आला व त्याचा हात पकडून आपल्या अंगरख्याच्या झालरीवर दाबीत उद्गारला: "उदात्त तरुण! मोठ्ठं काळीज! (Nobil giovanoto! Gran cuore!) ह्या दुबळ्या म्हाताऱ्याला (a un vecchiotto) तुमच्या शूर हाताला दाबण्याची परवानगी द्या (la vostra valorosa destra!)." मग तो एक पाऊल मागे सरला, आपले दोन्ही हात त्याने वर उचलले आणि तो निघून गेला.

सानिन त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात राहिला... त्याने वर्तमानपत्र उचलले व वाचायला आरंभ केला. पण त्याचे डोळे उगीचच ओळींवरून फिरत होते, त्याला एक अक्षर समजत नव्हते...

## १८

एक तासानंतर सानिनकडे परत नोकर आला आणि त्याने एक जुने, डागाळलेले ओळखपत्र सानिनच्या हाती दिले. त्यावर अक्षरे कोरलेली होती: "वारेझेचा पान्तालीओने चिप्पातोला, श्रीमंत मोदेनाच्या उमरावांच्या दरबारचा गायक"; आणि त्या नोकराच्या पाठोपाठच खुद्द पान्तालीओने तेथे हजर झाला. आता त्याच्यात नखशिखांत बदल घडला होता. तांबस-

काळसर फ्रॉक-कोटात व पांढऱ्या, घट्ट विणीच्या सुती बंडीत त्याची स्वारी अवतरली होती : त्या बंडीवर मुलामेदार साखळी झोकात अडकवलेली होती. घट्ट काळ्या तुमानीवर एक जाडजूड मौल्यवान खड्याची मुद्रा खालपर्यंत लोंबत होती. त्याच्या उजव्या हातामध्ये सशाच्या केसांपासून बनविलेली काळी टोपी होती व त्याच्या डाव्या हातात जाड नमदी हातमोजांची एक जोडी होती. त्याचा टाय नेहमीपेक्षा अधिकच रुंद आणि उंच होता आणि "माजीर-अक्ष" ( oeil de chat ) खडा लावलेली पिन त्याच्या कडक खळीच्या अंगरख्यात खोवली होती. त्याच्या उजव्या तर्जनीत मोहोरवजा अंगठी होती. पेटत्या हृदयाला दोन हात पकडीत आहेत असा शिक्का त्या अंगठीवर कोरलेला होता. म्हाताऱ्याच्या कपड्यांमधून कोंदूस वास उमटत होता – कापूर आणि कस्तुरीच्या मिश्रणासारखा. त्याचा चिंतातुर गांभिर्याचा पवित्रा पाहून अत्यंत पाषाणहृदयी प्रेक्षकही हेलावला असता. त्याला भेटण्यासाठी सानिन उठला.

"मी तुमचा साहाय्यक", कमरेपासून खाली वाकत आणि नर्तकांप्रमाणे पाय फाकवून बुटांच्या चवड्यांवर उभे रहात पान्तालीओने फ्रेंचमध्ये म्हणाला. "मी सूचनांसाठी आलोय. मरणांतिक लढाई करायची इच्छा आहे का तुमची?"

"कशाला मरणांतिक लढाई, प्रिय श्रीमान चिप्पातोला? काल मी उच्चारलेले शब्द मागे घेण्याचा माझा मुळीच इरादा नाही, पण मी रक्तपिपासू नाही. थांबा. माझ्या प्रतिस्पर्ध्याचा साहाय्यक एका मिनिटात इथं येईल. मी दुसऱ्या खोलीत जाईन, तोवर तुम्ही दोघं इथं अटी नक्की करा. माझ्यावर विश्वास ठेवा, तुमची सेवा मी कधीही विसरणार नाही आणि मी तुमचे मनःपूर्वक आभार मानतो."

"मान सर्वांत महत्त्वाचा!" पान्तालीओने उत्तरला व सानिनच्या सांगण्याची वाट न पाहता त्याने आरामखुर्चीत बसकण मारली. "जर तो ferroflucto spiccebubbio" फ्रेंच आणि इटालियन शब्दांची खिचडी करीत तो म्हणाला, "जर त्या व्यापारी क्लूबेरिओला आपलं कर्तव्य कशात आहे ते समजत नाही अथवा तो जर भित्रट आहे, तर त्याचा नायनाट होवो! तो अगदी भिक्कार प्राणी आहे! आता द्वंद्वाच्या अटींचं म्हणाल – तर मी तुमचा साहाय्यक आहे आणि तुमचं हित माझ्या दृष्टीनं परमपवित्र! जेव्हा मी पादुआमध्ये रहात होतो तेव्हा श्वेत-घोडदळाची एक रेजिमेंट तिथं मुक्कामाला होती आणि तिच्यातल्या बऱ्याच अंमलदारांबरोबर माझी घसट



जमली होती. त्यांची मानसंहिता मला उत्तम ठाऊक आहे. आणि ह्या प्रश्नांची मी अनेकदा चर्चा केली होती तुमच्या principe Tarbusski यांच्याबरोबर... तो दुसरा सहाय्यक लौकर येईल ना?"

"कुठल्याही क्षणी तो इथं येईल अशी माझी अपेक्षा आहे – अरेच्चा, तो आलाच पहा!" खिडकीमधून नजर टाकीत सानिन पुढे म्हणाला.

पान्तालीओने उठला, त्याने आपल्या घड्याळात पाहिले, आपले केसांचे झुलूप व्यवस्थित केले, आपल्या तुमानीच्या कडेची लोंबणारी पट्टी घाईघाईने बुटात खुपसली. पोरसवदा सेकंड लेफ्टनंटने तेथे प्रवेश केला. अजून तो लालबुंद आणि शरमिंदा दिसत होता.

सानिनने त्या दोघांची एकमेकांशी ओळख करून दिली – "श्रीमान रिख्तेर, सेकंड लेफ्टनंट! – श्रीमान चिप्पातोला, कलाकार!"

म्हाताऱ्याचा अवतार पाहून सेकंड लेफ्टनंटला थोडे आश्चर्य वाटले. त्या क्षणाला त्याच्या कानात जर कुणी हळूच सांगितले असते की, आत्ताच ओळख करून दिलेला "कलाकार" हा पाककलेतही निष्णात आहे, तर तो काय म्हणाला असता? पण द्वंद्वाच्या अटी ठरविण्याचे काम म्हणजे जणू आपले नित्याचे काम अशा थाटात वागण्याचा पान्तालीओनेने प्रयत्न केला. त्याच्या रंगभूमीवरील भूतकाळाच्या आठवणी येथे त्याच्या मदतीला आल्या यात काही शंका नाही आणि अस्सल नाटकी भूमिकेप्रमाणे त्याने साहाय्यकाचा बनाव पार पाडला. दोन्ही बाजू गप्प बसल्या असा एक क्षण आला.

ती शांतता पान्तालीओनेने प्रथम मोडली.

"सुरुवात करू या?" आपल्या रत्नमुद्रेशी खेळत त्याने विचारले.

"अर्थात," सेकंड लेफ्टनंट उत्तरला. "पण... एका मुख्य पक्षाची उपस्थिती..."

"सद्गृहस्थहो, मी तात्काळ इथून जातो!" सानिन उद्गारला. किंचित लवून तो शय्यादालनात गेला आणि आपल्यापाठी त्याने दार लावून घेतले.

बिछान्यावर अंग झोकून तो जेम्माचा विचार करू लागला... पण साहाय्यकांचे संभाषण बंद दारातून त्याच्यापर्यंत ऐकू येत होते. ते फ्रेंचमध्ये चालले होते. दोन्ही पक्ष त्या भाषेचा निर्दयपणे खून पाडीत होते, प्रत्येकजण आपापल्या परीने. पान्तालीओनेने परत पादुआच्या घोडदळाचा, «principe Tarbusski» चा उल्लेख आणला; सेकंड लेफ्टनंटने «exghizes léchères» आणि «goups à l'amiaple!» आणले. पण म्हातारा

कोणतीही exghizes ऐकायला तयार नव्हता! सानिनच्या दृष्टीने भयानक म्हणजे अचानक त्याने आपल्या समोरच्या वाटाघाटी करणाऱ्या माणसाला एक तरुण आणि निष्पाप कुमारिकेविषयी सांगायला आरंभ केला, जिच्या करंगळीची किंमत जगातील सर्व अंमलदारांपेक्षा भारी होती (oune zeune damigella innoucneta, qu'a ella usola dans soun péti doa vale piu que toutt le zouffissié del mondo!)... संतापाने तो पुन:पुन्हा उच्चारीत होता: "शरमेची बाब आहे! शरमेची बाब आहे! (E ouna onta, uona onta!)" प्रथम त्या सेकंड लेफ्टनंटने फारसे लक्ष दिले नाही, पण लौकरच त्या तरुणाच्या आवाजात रागाची धार जाणवू लागली व त्याने फाडदिशी सांगितले की, नीतीमत्तेवरील व्याख्यान ऐकायला तो तिथं आला नव्हता...

"तुमच्या वयात योग्य शब्द ऐकणं नेहमी हिताचं आहे!" पान्तालीओने उद्गारला.

सन्मान्य साहाय्यकांच्या चर्चेत वारंवार ठिणग्या उडत होत्या. तासभर चर्चा चालली होती, पण शेवटी पुढील अटी निश्चित झाल्या: "बॅरन व्हॉन डॉनहॉफ आणि श्रीमान सानिन यांनी दुसऱ्या दिवशी सकाळी दहा वाजता हानाऊच्या परिसरातील छोट्या राईत भेटायचे आणि वीस पावले अंतरावरून पिस्तुले झाडायची. साहाय्यकांनी इशारा दिल्यानंतर प्रत्येक पक्षाने दोनदा पिस्तुल झाडायचे. पिस्तुले एका चापाची असतील व दुनळी नसतील." श्रीमान व्हॉन रिख्तेर निघून गेला आणि चर्चेची फलश्रुती सांगण्यासाठी पान्तालीओनेने गंभीरपणे शय्यादालनाचे दार उघडले व तो उद्गारला: "«Bravo, Russo! Bravo, giovanotto!» तू विजयी होशील!"

काही मिनिटांनंतर ते दोघेही रोझेल्लीच्या दुकानाकडे निघाले. द्वंद्वाची बाब अत्यंत गुप्त राखायचे आश्वासन सानिनने पान्तालीओनेपासून घेतले. उत्तरादाखल म्हाताऱ्याने आपले बोट वर उचलले आणि डोळे किलकिले करीत दोनदा वेगाने दबत्या स्वरात म्हटले: «Segredezza!» (गुप्त!) तो एकदम तरुण झाल्याचे भासत होते. त्याची पावले जलद पडू लागली होती. ह्या असाधारण घटना जरी अप्रिय असल्या तरी त्यांनी त्याला ज्यावेळी त्याला आव्हाने मिळत होती व तो आव्हाने देत होता–अर्थात, रंगभूमीवर–त्या काळात मागे नेले. बॅरीटोन गायकांना आपल्या भूमिकांचा डौल मिरवण्यात आनंद वाटतो हे सर्वांना ठाऊकच आहे.



## १९

सानिनच्या स्वागताला एमिल धावतच आला. सानिनच्या आगमनाची तासाहून जास्त वेळपर्यंत तो वाट पहात होता. सानिनच्या कानात तो घाईघाईने कुजबुजला की, कालच्या अप्रिय घटनेविषयी त्याच्या आईला काहीही ठाऊक नव्हते आणि तिच्याविषयी पुसटसा उल्लेखही तिच्यासमोर करणे इष्ट नव्हते. पुढे त्याने सांगितले की, त्याला परत दुकानात पाठविण्यात येत होते... पण तेथे जाण्याचा त्याचा इरादा नव्हता, त्याऐवजी कोठेतरी तो दडून बसणार होता. अवघ्या काही सेकंदांच्या अवधीत ह्या सर्व गोष्टी सांगून अचानकपणे तो सानिनच्या खांद्याला बिलगला व उत्स्फूर्तपणे त्याचे चुंबन घेऊन रस्त्यावर पळत निघून गेला. सानिनची दुकानात जेम्माशी गाठ पडली. तिने काहीतरी सांगण्याचा प्रयत्न केला, पण तिला सांगणे जमले नाही. तिचे ओठ किंचित थरथरले व डोळे आकुंचित करून तिने आजूबाजूला भित्रे कटाक्ष टाकले. त्याने घाईघाईने तिचे सांत्वन करण्यासाठी खात्रीपूर्वक सांगितले की, काहीही न घडता मामला संपला होता!

"तुम्हाला भेटायला आज कुणी आलं नाही?" तिने विचारले.

"एकजण आला होता–आम्ही त्या गोष्टीवर चर्चा केली आणि... आणि अत्यंत समाधानकारक निष्कर्षाला आलो."

जेम्मा दुकानाच्या गल्ल्यापाशी गेली.

"तिचा माझ्यावर विश्वास बसलेला दिसत नाही," तो स्वत:शी म्हणाला... तरीही तो मागील खोलीत गेला. तेथे त्याला फ्राऊ लेनोरे आढळली.

तिचा डोकेदुखीचा त्रास आता कमी झाला होता, पण ती विषण्ण मन:स्थितीत होती. तिने त्याचे प्रेमाने स्वागत केले, पण त्याचवेळी त्याला इशारा दिला की, आज तिची संगत त्याला चांगली ठरणार नाही, कारण त्याचे मनोरंजन करण्याच्या मन:स्थितीत ती नाही. तो जेव्हा तिच्यापाशी बसला तेव्हा तिच्या डोळ्यांच्या पापण्या सुजलेल्या व लाल बनलेल्या त्याला दिसल्या.

"फ्राऊ लेनोरे, तुम्हाला काय झालंय? तुम्ही रडत तर नव्हतात?"

"शः! .." तिची मुलगी होती त्या खोलीच्या दाराकडे मानेने इशारा करीत ती दबत्या आवाजात उद्गारली. "तसं बोलू नका... मोठ्यांदा!"

"पण रडायला कारण काय झालं?"

"अहो काय सांगू श्रीमान सानिन, कारण माझं मलाच ठाऊक नाही."

"तुमच्या भावना कुणी दुखावल्या का?"

"छेः, छेः, नाही... मला एकाएकीच कष्टी वाटू लागलं. जिओवान बात्तिस्ता मला आठवला... माझं स्वतःचे तारुण्य आठवलं... आणि किती पटकन सारं संपलं. माझ्या मित्रा, मी आता म्हातारी होतेय... आणि ही कल्पनाच मला सहन होत नाही. मला सारं पूर्वीसारखंच वाटतंय... पण म्हातारपण—ते तिथं उभं आहे, तिथं उभं आहे!" फ्राऊ लेनोरेच्या डोळ्यांमध्ये आसवे गोळा झाली. "तुम्ही माझ्याकडं चकित होऊन पाहताय हे मला दिसतंय... पण माझ्या मित्रा, तुम्हीसुद्धा म्हातारे व्हाल आणि ही जाणीव किती कडू असते ते समजेल!"

सानिनने तिचे सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. तिच्या मुलांमध्येच तिच्या यौवनाने पुनर्जन्म घेतला होता अशी त्याने तिला आठवण करून दिली. ती स्वतःचे कौतुक करून घेऊ पहात होती असे म्हणून तिची थट्टासुद्धा करण्याचा प्रयत्न केला... पण तिने अत्यंत गंभीरपणे त्याला थट्टा बंद करण्याची विनवणी केली आणि त्याला आयुष्यात प्रथमच जाणीव झाली की, ह्या प्रकारच्या दुःखाचे, वयाच्या जाणीवेमधून निर्माण होणाऱ्या दुःखाचे, सांत्वन होत नाही अथवा त्यापासून मन दुसरीकडे वळविता येत नाही. ते दुःख निघून जाण्याची वाट पाहणे, एवढीच गोष्ट करता येते. त्याने tresette खेळण्याची सूचना मांडली—त्याहून चांगली कल्पना दुसरी कोणतीही नव्हती. तिने आनंदाने मान्यता दिली व ती थोडी उल्हसित झाल्याचे भासले.

जेवणापर्यंत सानिन तिच्याशी पत्ते खेळला आणि जेवणानंतरही परत खेळला. पान्तालीओनेही खेळात सामील झाला होता. त्याचे केसांचे झुलूप कपाळावर इतके खाली कधीही आले नव्हते, त्याची हनुवटी त्याच्या टायमध्ये इतकी खोलवर कधीही घुसली नव्हती. त्याच्या प्रत्येक हालचालीत एवढी तीव्र गंभीरता सामावली होती की, हा माणूस कोणत्या रहस्याला एवढ्या प्रयत्नांनी लपवून ठेवतोय, असा त्याच्याकडे पाहणाऱ्याला प्रश्न पडला असता.

पण—segredezza, segredezza!

सानिनबद्दलचा आपला प्रगाढ आदर शक्य त्या सर्व तऱ्हांनी सगळ्या दिवसभर व्यक्त करण्याचे प्रयास त्याने केले. निर्धारपूर्वक गांभिर्याने बायकांना टाळून त्याने टेबलावर सानिनला प्रथम जेवण वाढले. पत्त्यांच्या खेळात त्याने डाव सानिनला घेऊ दिला व त्याने उलटवला तेव्हा एका अक्षराने काही



बोलला नाही; काही संदर्भ नसताना त्याने जाहीर केले की, रशियन लोक सर्व जगात अत्यंत उदार मनाचे, शूर आणि खंबीर लोक आहेत.

"अरे लबाड म्हाताऱ्या!" सानिन स्वतःशी म्हणाला.

मादाम रोझेल्लीच्या अनपेक्षित मनःस्थितीचे सानिनला जेवढे आश्चर्य वाटले त्याहून अधिक आश्चर्य तिच्या मुलीने त्याच्याशी केलेल्या वर्तनाचे वाटले. तिने त्याला टाळले नाही, उलट, सारा वेळ ती त्याच्या अगदी जवळ बसून होती, तो बोलत होता तेव्हा त्याचे ऐकत होती, त्याच्याकडे पहात होती. पण त्याच्याशी संभाषण करण्याचे तिने निग्रहाने टाळले व जेव्हा जेव्हा तो तिला उद्देशून बोलायचा, तेव्हा तेव्हा ती शांतपणे उठायची व काही वेळा-पुरती खोलीबाहेर जायची. मग परत यायची आणि कुठल्यातरी कोपऱ्यात स्तब्ध बसून रहायची, जणू विचारात गढल्यासारखी आणि नवल करीत असल्यासारखी... सर्वात जास्त नवल करीत असल्यासारखी. तिचे विचित्र वागणे शेवटी फ्राऊ लेनोरेच्याही ध्यानात आले आणि एक-दोनदा तिने त्याचे कारणही विचारले.

"काही नाही," जेम्मा उत्तरली. "काहीवेळा मी अशी वागते हे तुला ठाऊक आहे."

"अगदी खरं!" तिच्या आईने मान्य केले.

अशा रीतीने संपूर्ण प्रदीर्घ दिवस संपला. तो दिवस फारसा उत्साहाचा नव्हता वा फारसा सुस्तीचाही नव्हता. ना उल्हासाचा ना कंटाळ्याचा. जर जेम्मा वेगळ्या रीतीने वागली असती, तर थोडासा देखावा करण्याचा मोह टाळणे सानिनला कदाचित अशक्य झाले असते—अथवा वियोगाच्या आदल्या दिवशी तो खिन्न होऊन बसला असता—कदाचित कायमचा वियोग घडणार होता. पण जेम्माशी धड बोलणेही त्याला शक्य झाले नव्हते, त्यामुळे कॉफीपूर्वी पंधरा मिनिटे पियानो छेडण्यातच त्याला समाधान मानावे लागले होते.

एमिल उशीरा घरी परतला आणि श्रीमान क्लूबेरविषयीचे प्रश्न टाळण्यासाठी लौकरच झोपायला गेला. सानिनची निरोपाची वेळ झाली.

जेम्माचा तो निरोप घेऊ लागला. काही कारणाने त्याला पुष्कीनच्या 'अनेगिन' मधील लेन्स्की व ओल्गा यांच्या वियोगाचा प्रसंग आठवला. त्याने तिचा हात घट्ट दाबला आणि तिच्या चेहऱ्याकडे निरखून पाहण्याचा प्रयत्न केला. पण तिने आपला चेहरा किंचित बाजूला फिरविला आणि आपली बोटे त्याच्या हातामधून सोडवून घेतली.

## २०

घराबाहेर तो पडला तेव्हा आकाश ताऱ्यांनी खच्चून भरले होते. अगणित तारका–लहान, मोठ्या, पिवळ्या, लाल, निळ्या, पांढऱ्या! सर्व तारे अखंडपणे चमकत होते, तेजाळत होते, चमचमत होते. चंद्राची उपस्थिती नव्हती, तरीही धूसर, छायाहीन संधिप्रकाशात प्रत्येक वस्तू ठळकपणे उठून दिसत होती. रस्त्याच्या अखेरच्या टोकापर्यंत सानिन चालत गेला... तावडतोब घरी जाण्याची त्याची इच्छा नव्हती. भरपूर भटकावे आणि शुद्ध हवेचा आनंद लुटावा, एवढीच गरज त्याला भासत होती. ज्या वाटेने तो चालत गेला त्याच वाटेने रोझेल्लीच्या दुकानापर्यंत परत आला. रस्त्याकडील एक खिडकी अचानक खाडकन उघडली व रिकाम्या काळ्या चौकोनात (खोलीत उजेड नव्हता) एका स्त्रीची आकृती अवतरली व त्याला आपल्या नांवाने कुणीतरी हाक मारल्याचा भास झाला:

"मस्ये दिमित्री!"

वेगाने तो खिडकीपाशी धावला... ती जेम्मा होती.

खिडकीच्या चौकटीमधून ती बाहेर ओणवी झाली होती.

"मस्ये दिमित्री," सावध ती बोलू लागली, "सबंध दिवसभर मी तुम्हाला एक वस्तू देऊ पाहतेय... पण मनाचा निर्धार होत नव्हता. आता तुम्हाला अचानक पाहिलं आणि तसं विधीलिखित होतं असं मला वाटलं..."

ह्या शब्दाशी जेम्मा नकळत थांबली. पुढे बोलणे तिला अशक्य झाले. त्या क्षणाला एक अघटित घटना घडली.

त्या प्रगाढ स्तब्ध वातावरणात, आकाशात एकही मेघ नसताना, वाऱ्याची एवढी जोरदार वावटळ उमटली की, जणू धरणीकंप होतोय असे भासले, ताऱ्यांचा पारदर्शी प्रकाश थरथरला आणि चमचमला, आणि खुद्द हवा गरगर फिरल्याचा भास झाला. वाऱ्याचा तो झोत उबदार होता, दमट होता. झाडांवर, घरांच्या छपरांवर आणि भिंतींवर, रस्त्यावर, त्याने आघात केला. सानिनची टोपी त्याने उडवून लावली व जेम्माचे केस पुरते विस्कटून टाकले. सानिनचे डोके खिडकीच्या चौकटीच्या पातळीशी समांतर होते. नकळतपणे तो चौकटीला चिकटला, तर जेम्माने आपल्या दोन्ही हातांनी त्याच्या खांद्यांचा आधार घेतला. तिची वक्षःस्थळे त्याच्या मस्तकाशी दाबली गेली. तो भयानक उत्पात एक मिनिटभर टिकला. नंतर, प्रचंड पक्ष्यांच्या कळपाने उड्डाण करावे त्याप्रमाणे तो झंझावात क्षीण होऊन नाहीसा झाला... आणि पुन्हा एकदा प्रगाढ स्तब्धता पसरली.



सानिनने आपले मस्तक उचलले तेव्हा त्याला अत्यंत सुंदर चेहरा दिसला. तो चेहरा खूप घाबरला होता, खूप उत्तेजित बनला होता. डोळे टप्पोरे होते, भीती उत्पन्न करणारे होते, अतिशय सुरेख होते. असे सौंदर्य त्याच्यासमोर उलगडले तेव्हा क्षणभर त्याच्या हृदयाचा ठोका थांबल्याचा भास झाला. त्याच्या छातीवर पडलेल्या रेशमी केसांच्या बटेला आपल्या ओठांशी धरून तो कसेबसे म्हणाला: "ओह्, जेम्मा!"

"काय होतं ते? वीज चमकली का?" अवकाशात नजर फिरवीत तिने विचारले. तिचे उघडे हात अद्याप त्याच्या खांद्यांवर विसावलेले होते.

"जेम्मा!" सानिन परत उद्गारला.

तिने एक उसासा टाकला व खोलीत मागे पाहिले. नंतर, चपळ हालचाल करून, कोमेजलेले गुलाबाचे फूल तिने आपल्या पोषाखाच्या दर्शनी भागातून बाहेर काढले व सानिनकडे फेकले.

"हे फूल तुम्हाला द्यायची माझी इच्छा होती..."

आदल्या दिवशी त्याने काबीज केलेला तो गुलाब त्याने ओळखला.

पण खिडकी धाडदिशी बंद झाली आणि काळ्या तावदानामागे काहीही दिसेनासे झाले. धूसर पांढरेपणसुद्धा दिसेनासे झाले...

टोपीविनाच सानिन आपल्या पथिकाश्रमात परतला... आपली टोपी हरवल्याचे त्याच्या ध्यानातसुद्धा आले नाही.

## २१

अगदी सकाळी सकाळी त्याला झोप लागली. आणि त्यात आश्चर्य नव्हते! त्या उन्हाळी वावटळीत, त्या ऐन झंझावाताच्या क्षणी त्याला जाणवले होते–जेम्मा सुंदर होती हे नव्हे, त्याला ती अत्यंत आकर्षक वाटली होती हेसुद्धा नव्हे, ते त्याला आधीच माहीत होते... पण तो... तिच्या संपूर्ण प्रेमात पडला होता. त्या वावटळीप्रमाणेच अचानकरीत्या त्याला प्रेमाची बाधा झाली होती. आणि आता हे वेडपट द्वंद्व! अत्यंत विषण्ण कुशंकांनी त्याचे मन भरून गेले. जरी तो ठार झाला नाही... ह्या मुलीविषयी, दुसऱ्या माणसाच्या भावी पत्नीविषयी, त्याला वाटणाऱ्या प्रेमातून काय निर्माण झाले असते? हा "दुसरा" जरी फारसा धोकादायक प्रतिस्पर्धी ठरला नाही आणि जेम्माचे त्याच्यावर जर प्रेम जडले, किंवा आधीच ती त्याच्यावर प्रेम करू लागली होती... तर काय? काय पण प्रश्न! असली लावण्यवती...

खोलीत त्याने येरझाऱ्या घातल्या, टेबलाशी बसून एका कागदावर त्याने काही ओळी खरडल्या... आणि तात्काळ त्या खोडून टाकल्या... जेम्माची त्याला आठवण झाली... तारकांच्या प्रकाशात अंधाऱ्या खिडकीच्या चौकटीत उभी असलेली, दमट वाऱ्याने केस विस्कटलेली जेम्माची आकृती त्याच्या नजरेसमोर उभी झाली. ग्रीक देवतेच्या पुतळ्याप्रमाणे रेखीव असे तिचे उघडे बाहू त्याला आठवले. तिच्या हातांचा सजीव दाब त्याला खांद्यांवर जाणवला... तिने खिडकीमधून त्याच्या दिशेने फेकलेले गुलाबाचे फूल त्याने हाती घेतले आणि गुलाबांच्या नेहमीच्या वासापेक्षा त्या सुकलेल्या पाकळ्यांमधून अधिक सुगंध उमटत होता असे त्याला भासले...

"आणि जर तो ठार झाला अथवा अपंग बनला तर?"

तो बिछान्यावर झोपला नाही, तण अंगावरील पूर्ण पोषाखासह दिवाणावरच त्याला डुलकी लागली.

कुणीतरी हलकेच त्याच्या खांद्याला स्पर्श केला...

त्याने डोळे उघडले तेव्हा पान्तालीओने समोर उभा असलेला त्याला दिसला.

"बाबीलोनच्या लढाईआधी झोपणाऱ्या सिकंदराप्रमाणं हा झोपलाय!" म्हातारा उद्‌गारला.

"का? किती वाजले?" सानिनने विचारले.

"पावणेसात; हानाऊला पोचायला दोन तास लागतील आणि आपण तिथं प्रथम पोचलं पाहिजे. रशियन नेहमी आपल्या शत्रूंच्या आधी जायचे. मी फ्रँकफुर्टमधली सर्वात उत्तम घोडागाडी भाड्यानं घेतलीय."

सानिन तोंड धुवू लागला.

"आणि पिस्तुलं?"

"तो ferroflucto Tedesso पिस्तुलं आणतोय. डॉक्टरसुद्धा आणतोय."

आदल्या दिवसाप्रमाणेच आपल्या चित्तवृत्ती उल्हसित ठेवण्याचा पान्तालीओनेचा आटापिटा चालला होता. पण जेव्हा तो घोडागाडीत सानिनशेजारी बसला, गाडीवानाने जेव्हा चाबूक उडविला व घोडे दुडक्या चालीत पळू लागले, तेव्हा मात्र भूतपूर्व गायकामध्ये आणि पादुआच्या घोडेस्वार पलटणीच्या मित्रामध्ये एकाएकी बदल घडून आला. तो अवघडलेला व काहीसा घाबरलेला दिसू लागला. वाईट बांधलेल्या भिंतीप्रमाणे त्याच्या अंतरंगातील काहीतरी कोसळून पडल्यासारखे वाटले.



"बापरे, आपण काय करतोय? Santissima Madonna?*" आपले केस मुळांपाशी पकडीत कर्कश्य आवाजात तो ओरडला. "मी महामूर्ख म्हातारडा, frenetico, काय करतोय?"

चकित होऊन सानिन हसला व पान्तलीओनेच्या कमरेभोवती आपल्या हातांची मिठी घालून एक फ्रेंच म्हण त्याने उद्‌धृत केली. «Le vin est tiré —il faut le boire.»**

"हो, हो," म्हातारा उत्तरला. "हा प्याला आपण तळापर्यंत पिऊ—पण तरीही मी महामूर्खच. मी मूर्ख माणूस आहे. सगळं काही छान आणि निवांत होतं... आणि एकदम—टा-टा-टा, त्रा-टा-टा!"

"सगळे ऑर्केस्ट्रा वाजवतात तसं—," बळेच स्मित करीत सानिन म्हणाला. "पण ही तुमची चूक नाही."

"मला माहीत आहे, माझी चूक नाही. भले! पण तरीही ही फारच भिसाडघाई झाली! Diavolo! Diavolo!"*** केसांचे झुलूप मागे उडवीत व सुस्कारा टाकीत पान्तालीओने म्हणाला.

घोडागाडी सतत पुढे धावत होती.

सकाळ रम्य होती. नुकत्याच जाग्या होणाऱ्या फ्रँकफुर्टचे रस्ते स्वच्छ आणि सुबक होते. खिडक्या चांदीच्या कागदाप्रमाणे चमचमत होत्या. वेशीबाहेर गेल्यानंतर त्यांना डोक्यावरच्या निळ्या, पण अजूनही फिक्या दिसणाऱ्या आकाशातील चंडोलांचा मोठा कलरव ऐकू आला. हमरस्त्याच्या वळणाशी एका उंच चिनाराच्या झाडामागून अचानक एक परिचित आकृती अवतरली, तिने त्यांच्या दिशेने काही पावले टाकली व ती थांबली. सानिनने परत पाहिले... बापरे! एमिल!

"म्हणजे? त्याला माहीत आहे?" सानिनने पान्तालीओनेकडे वळून विचारले.

"मी मूर्ख माणूस होतो असं मी तुम्हाला म्हटलं ना," बिचारा इटालियन विव्हळला. त्याच्या उंच स्वरात निराशा दाटली होती. "त्या

*पवित्र मडोना.

**मदिरेचे पैसे मोजलेत, तेव्हा ती प्यायली पाहिजे—अन.

***सैतान.

कारट्यानं सबंध रात्र मला सतावलं. शेवटी आज सकाळी मी त्याला सगळं सांगितलं."

"हा घे तुझा segredezza!" सानिन स्वतःशी म्हणाला.

एमिल उभा होता तेथपर्यंत घोडागाडी पोहोचली. सानिनने गाडीवानाला घोड्यांना थांबवण्याची आज्ञा केली आणि त्या "कारट्याला" जवळ यायला सांगितले. लटपटत्या पायांनी एमिल सानिनच्या जवळ गेला. तो खूप फिकट दिसत होता. त्याला हृदयविकाराचा झटका आला होता त्या दिवसाप्रमाणे. त्याला धड उभे राहवत नव्हते.

"इथं काय करता आहात?" सानिनने कठोर आवाजात त्याला विचारले. "घर सोडून यावेळी बाहेर का पडलात?"

"मला घेऊन चला ना तुमच्याबरोबर!" आपले हात जुळवून कापऱ्या आवाजात एमिलने विनवणी केली. हीव भरून खूप ताप चढावा त्याप्रमाणे त्याचे दात कडकडा वाजत होते. "मी लुडबूड करणार नाही! फक्त मला तुमच्याबरोबर न्या!"

"माझ्याबद्दल तुमच्या मनात किंचित जरी प्रेम अथवा आदर असेल," सानिन म्हणाला, "तर तुम्ही ताबडतोब घरी जाल अथवा श्रीमान क्लूबेर यांच्या दुकानी जाल, कुणालाही अक्षरानं काही सांगणार नाही आणि माझ्या परतीची वाट पहाल."

"तुमच्या परतीची!" दाटल्या आवाजात एमिल विव्हळला. "आणि तुम्ही जर..."

"एमिल!" गाडीवानाकडे इशाऱ्याचा कटाक्ष टाकून सानिन म्हणाला. "स्वतःला सावरा! घरी जा, एमिल, मी तुम्हाला विनंती करतो! माझं मित्राचं ऐका. तुमचं माझ्यावर प्रेम आहे म्हणता, तर घरी जा—माझ्या-खातर!"

त्याने आपले हात पसरले. हुंदके देत एमिल पुढे धावला, सानिनचे हात त्याने आपल्या ओठांवर दाबले, रस्त्यापासून बाजूला उडी घेतली आणि शेतांमधून फ्रॅंकफुर्टकडे धावायला आरंभ केला.

"आणखी एक उदात्त अंतःकरण," पान्तालीओने पुटपुटला. पण सानिनने विमनस्कपणे त्याच्याकडे पाहिले आणि म्हातारा कोपऱ्यात अंगाचे मुटकुळे करून बसला. त्याचा दोष होता हे त्याला माहीत होते. दर क्षणा-गणिक त्याचे आश्चर्य वाढत होते—खरेच तो साहाय्यक म्हणून वागणार होता? त्यानेच घोडागाडी मागविली होती, सर्व व्यवस्था पाहिली होती व सकाळी



सहा वाजता आपले निवांत निवासस्थान सोडले होते? यावर कळस म्हणून की काय, त्याच्या दुखऱ्या पायांमध्ये मंद ठणका जाणवत होत्या.

त्याला उल्हसित करणे आवश्यक होते याची सानिनला जाणीव झाली. त्याला उत्तेजित करायला सानिनला योग्य शब्द गवसले.

"मान्यवर सिन्योर चिप्पातोला, कुठं गेला तुमचा पुरातन उत्साह?" त्याने विचारले. "कुठं आहे तुमचा il antico valor?"

सिन्योर चिप्पातोला सावरून बसला आणि त्याने कपाळाला आठ्या घातल्या.

«Il antico valor?» खोल आवाजात तो ओरडला. «Non è ancora spento (अजून थोडा उरलाय) – il antico valor!»

स्वतःला सावरून परत आपल्या कारकीर्दीविषयी, ऑपेराविषयी, थोर गायक गार्सियाविषयी तो बोलू लागला. हानाऊला पोहोचेपर्यंत त्याचे पूर्णतया रूप पालटले होते. विचार केला म्हणजे जाणवते—शब्दाइतकी या जगात दुसरी कोणतीही गोष्ट अधिक प्रभावी नाही आणि अधिक निःष्प्रभ नाही.

## २२

ज्या राईमध्ये लढाई होणार होती ती हानाऊपासून सुमारे पाव मैल अंतरावर होती. पान्तालीओनेने भाकित केल्यानुसार, सानिन व पान्तालीओ-नेचे तेथे प्रथम आगमन झाले. राईच्या बाहेरच्या टोकाला थांबण्यास त्यांनी गाडीवानाला सांगितले आणि झाडांच्या दाट छायेमध्ये ते घुसले. सुमारे तासभर त्यांना वाट पहावी लागली.

वाट पाहणे सानिनला फारसे त्रासदायक वाटले नाही. अरुंद पाऊलवाटेवर तो फेऱ्या मारीत होता, पक्ष्यांचे गाणे ऐकत होता, पाकोळ्यांच्या भराऱ्या निरखीत होता आणि अशा परिस्थितीत सापडलेले बहुतेक रशियन ज्याप्रमाणे विचार न करण्याचा प्रयत्न करतात, तसे वागत होता. फक्त एकदाच त्याला विचाराने घेरले जेव्हा तो एका कोवळ्या लिंबोणीच्या झाडापाशी आला. ते झाड बहुधा आदल्या दिवशीच्या अचानक वादळात उन्मळून पडले होते. त्याची सर्व पाने कोमेजली होती व ते मरणाच्या पंथाला लागले होते. "हे काय? हा शकुन?" त्याच्या मनात विचार आला, पण पुढच्याच मिनिटाला तो शीळ घालीत होता, लिंबोणीच्या कोसळलेल्या बुंध्यावरून पलिकडे उडी

मारीत होता आणि पाऊलवाटेवरून झपझप पावले टाकीत होता. याउलट पान्तालीओने सतत कुरकुरत होता, जर्मनांना शिव्या घालीत होता, खोकत होता, आपली पाठ व आपले गुडघे चोळीत होता. त्या अस्वस्थ मनःस्थितीत त्याने चक्क जांभई दिली. त्यावेळी त्याची छोटी, सुकलेली मुद्रा फार मजेशीर दिसली. सानिनला त्याचे हे रूप पाहून जोरात हसू कोसळले.

सरतेशेवटी मऊ रस्त्यावरील चाकांचा आवाज त्यांच्या कानांपर्यंत पोहोचला. "ते येत आहेत!" स्वतःला सावरून सावधपणे उभे रहात पान्तालीओने म्हणाला. अर्थात क्षणभर त्याच्या अंगातून भीतीचा शहारा उमटला. पण तो लपविण्यासाठी त्याने 'ब-र्रं-र्रं' असा मोठ्यांदा चीत्कार काढला आणि ह्या सकाळी बरीच थंडी आहे असे म्हटले. गवतावर आणि पानांवर भरपूर दंव सांडले होते, पण राईच्या अंतर्भागात दमट उष्णता घुसू लागली होती.

झाडांच्या छायेखाली दोघे अंमलदार दृष्टीपक्षात आले. त्यांच्याबरोबर एक आडव्या बांध्याचा सुजऱ्या व झोपाळू चेहऱ्याचा माणूस होता. तो होता रेजिमेंटचा सर्जन. गरज पडली तर जवळ असावे म्हणून मातीचा खुजा भरून पाणी त्याने आणले होते. त्याच्या डाव्या खांद्यावर शस्त्रयेक्रिच्या उपकरणांची व मलमपट्ट्यांची पिशवी लटकत होती. अशा प्रकारच्या सफरींची त्याला खूप सवय असलेली दिसत होती. त्याच्या उत्पन्नाचा तो एक भाग होता—प्रत्येक द्वंद्वयुद्धातून त्याला आठ सोन्याची नाणी मिळत; प्रत्येक पक्षाकडून चार. श्रीमान व्हॉन रिख्तेर पिस्तुलांची पेटी धरून येत होता. श्रीमान व्हॉन डॉनहॉफने आपल्या हाती शिकारीच्या वेळेचा चाबूक गुंडाळून धरला होता. ऐट दाखविण्याचा त्यामागे हेतू असावा.

"पान्तालीओने," सानिन हळू आवाजात म्हाताऱ्याला म्हणाला, "जर... मी ठार झालो, तुम्हाला माहीत आहे, काहीही घडू शकेल, तर माझ्या आतल्या खिशामधून कागदाचा कपटा काढून घ्या, त्यात एक फूल गुंडाळलेलं आहे, ते सिनोरीना जेम्माला द्या. समजलं? वचन देता?"

म्हाताऱ्याने त्याच्याकडे एक कष्टी कटाक्ष टाकला व होकारार्थी मान हलविली... पण सानिनने त्याला जे करायला सांगितले होते ते त्याला समजले होते अथवा नाही हे केवळ परमेश्वरच जाणे.

प्रतिस्पर्ध्यांनी आणि साहाय्यकांनी प्रथेनुसार लवून अभिवादने केली. फक्त डॉक्टर अगदी निर्विकार होता. गवतावर बसून तो जांभया देत होता. जणू त्याला म्हणायचे होते: "शिलेदारी अदब दाखविण्याची मला गरज



नाही." श्रीमान व्हॉन रिख्तेरने श्रीमान "त्शिबादोला" यांना जागा निवडायला सांगितली. भावनावेगाने दाटलेल्या आवाजात (त्याच्या अंतरंगातील "भिंत" परत कोसळली होती) श्रीमान "त्शिबादोला" उत्तरला: "महाशय, तुम्हाला जे योग्य वाटेल ते करा; मी नुसता पाहतो..."

आणि श्रीमान व्हॉन रिख्तेरने पुढील हालचाली सुरू केल्या. खुद्द त्या राईमध्येच त्याने एक सुंदर, फुलांनी भरलेली घळ शोधली. त्याने पावलांचे अंतर मोजले, घाईघाईने तासलेल्या काठीने दोन्ही टोकांना खुणा केल्या, पेटीमधून पिस्तुले काढली आणि काडतुसे भरायला तो जमिनीवर बसला. थोडक्यात, पांढऱ्या रुमालाने आपल्या चेहऱ्यावरील घाम सतत पुशीत त्याने आपल्याकडून प्रयत्नांची शिकस्त केली. त्याच्या पाठोपाठ सर्वत्र फिरणाऱ्या पान्तालीओनेला हीव भरल्यासारखे भासत होते. ह्या सर्व प्राथमिक तयाऱ्यांवेळी, दोघे प्रतिस्पर्धी थोडेसे बाजूला उभे होते. शिक्षा झालेली शाळकरी मुलांची जोडी आपल्या मास्तरांकडे ज्या दुर्मुखल्या मुद्रांनी पाहते, तशा रीतीने ते पहात होते.

निर्णायक क्षण येऊन ठेपला...

प्रत्येकाने आपले पिस्तुल आपल्या हाती धरले...[47]

पण या ठिकाणी व्हॉन रिख्तेरने पान्तालीओनेना म्हटले की, द्वंद्वयुद्धाच्या नियमांनुसार त्याने प्रतिस्पर्ध्यांना उद्देशून उपदेशाचा शेवटचा शब्द सांगितला पाहिजे आणि प्राणघातकी "एक, दोन, तीन" उच्चारण्यापूर्वी समझोता घडविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ह्या उपदेशामधून कधीही काहीही निष्पन्न झाले नसले आणि तो केवळ शुद्ध औपचारिक भाग असला, तरी त्यामुळे श्रीमान "त्शिबादोला"च्या खांद्यांवरील जबाबदारीचे ओझे थोडे कमी होत होते. असे सांगणे तथाकथित तटस्थ साक्षीदाराच्या कामांमध्ये खरेच समाविष्ट होते, पण तसा कुणी तटस्थ साक्षीदार तेथे हजर नसल्यामुळे, व्हॉन रिख्तेरने हा आपला खास हक्क आपल्या वडीलधाऱ्या सहकाऱ्याला मोठ्या आनंदाने देऊ केला. अपमान करणाऱ्या अंमलदाराला पाहण्याची इच्छा नसलेला पान्तालीओने एव्हाना एका झुडुपामागे दडून बसला होता. आरंभी त्याला श्रीमान व्हॉन रिख्तेरच्या बोलण्यातील एकही शब्द समजला नाही. त्याला आणखी कारण म्हणजे रिख्तेर नाकात बोलत होता. पण दुसऱ्याच मिनिटाला मात्र पान्तालीओनेच्या अंगी बळ संचारले, तो उत्साहाने पुढे आला; आपल्या

छातीवर मुठी आपटीत घोगऱ्या आवाजात भाषांचे मजेदार मिश्रण करीत तो ओरडला : «A la la la... Che bestialitá! Deux zeun' ommes comme ça qué si battono perchè? Che diavolo? Andate a casa!» *

"मी समझोता स्वीकारणार नाही," सानिन घाईने म्हणाला.

"मी सुद्धा नाही," त्याचा प्रतिस्पर्धी त्याच्या पाठोपाठ म्हणाला.

"आता ओरडा, एक, दोन, तीन," गोंधळलेल्या पान्तालीओनेला व्हॉन रिख्तेरने सांगितले.

पान्तालीओने परत घाईने झुडुपात घुसला. तेथे अंग चोरून, डोळे किलकिले करून आणि मान बाजूला फिरवून तो ओरडला मात्र बेंबीच्या देठापासून : «Una... due e tre!» **

सानिनने प्रथम पिस्तुल झाडले—आणि त्याचा नेम हुकला. झाडाच्या बुंध्यात गोळी सणसणत घुसली. बॅरन व्हॉन डॉनहॉफने ताबडतोब त्याच्या-नंतर पिस्तुल झाडले—त्याने मुद्दामच नेम दुसरीकडे धरला व हवेत गोळी उडविली.

विलक्षण शांतता पसरली... कुणीही जागचे हलले नाही. पान्तालीओने क्षीणपणे कण्हला.

"आपण पुढं जावं अशी तुमची इच्छा आहे काय?" डॉनहॉफने विचारले.

"तुम्ही हवेत गोळी का झाडली?" सानिनने विचारले.

"त्याच्याशी तुम्हाला काय करायचंय?"

"पुढच्या वेळीसुद्धा हवेत गोळी झाडण्याचा तुमचा इरादा आहे काय?" सानिनने पुढे विचारले.

"कदाचित. मला ठाऊक नाही."

"थांबा, थांबा, सद्गृहस्थहो!" व्हॉन रिख्तेर बोलू लागला. "मुख्य पक्षांनी एकमेकांना उद्देशून बोलायचं नाही. हे अगदी चूक आहे."

"गोळी झाडण्याचा माझा हक्क मी सोडतो," सानिन म्हणाला आणि त्याने पिस्तुल जमिनीवर फेकले.

"आणि द्वंद्व पुढे खेळण्याची माझीही इच्छा नाही," व्हॉन डॉनहॉफ

---

* "काय हा पाशवीपणा! दोन तरुण असे लढतात! आणि कशासाठी? काय सैतानीपणा! घरी जा!"

** "एक... दोन... तीन!"



ओरडला व त्यानेही पिस्तुल जमिनीवर भिरकावले. "शिवाय मी आता कबूल करतो की, माझं चुकलं—त्या दिवशी!"

क्षणभर तो अनिश्चित मनाने उभा राहिला व नंतर काहीशा संशयानेच त्याने आपला हात पुढे केला. सानिन वेगाने त्याच्यापाशी चालत गेला आणि डॉनहॉफचा हात आपल्या हातात धरून त्याने हस्तांदोलन केले. त्या दोघा तरुणांनी एकमेकांकडे स्मितपूर्वक कटाक्ष टाकले. दोघांचेही गाल शरमेने लाल झाले होते.

«Bravi! Bravi!» बेभानपणे टाळ्या वाजवीत पान्तालीओने ओरडला. झुडुपामधून एखाद्या लोटयाकबूतरासारखा बाहेर पडला. थोड्या बाजूला, उन्मळून पडलेल्या झाडाच्या बुंध्यावर बसलेला डॉक्टर तात्काळ उठला, खुजामधील पाणी त्याने ओतून टाकले व राईच्या बाहेरच्या दिशेने तो संथपणे चालत निघाला.

"मानाचं समाधान झालं आणि द्वंद्व संपलं," व्हॉन रिख्तेरने जाहीर केले.

«Fuori!» पान्तालीओने परत एकदा किंचाळला. त्याचे मन भूतकाळात धावले होते.

अंमलदारांबरोबर लवून अभिवादनांची देवघेव केल्यानंतर आणि घोडागा-डीत बसल्यानंतर सानिनला प्रसन्नतेची भावना जरी जाणवली नव्हती, तरी हे मान्य केले पाहिजे की, एखाद्या शस्त्रक्रियेतून पार पडल्यानंतर माणसाला जो आराम वाटतो, तो त्याला वाटला होता. पण त्याचवेळी दुसरी एक भावना त्याच्या अंतरंगात उमटली होती... त्या भावनेची लज्जेशी जवळीक होती. आत्ताच्या भेटीत त्याने जी भूमिका बजावली होती ती त्याला पूर्णतः खोटी वाटली होती. तो पारंपारिक औपचारिक मामला ठरला होता, नेहमीची अंमलदार-विद्यार्थी बाब ठरली होती. त्याला तो सुस्त डॉक्टर आठवला, त्याचे स्मित आठवले; बॅरन व्हॉन डॉनहॉफच्या जवळ जवळ गळ्यात गळा घालून सानिन राईबाहेर आला तेव्हा डॉक्टरने आपले नाक कसे मुरडले होते हे त्याला आठवले. आणि नंतर, ठरल्या रिवाजाप्रमाणे पान्तालीओनेने डॉक्टरला चार सोन्याची नाणी दिली तेव्हा... शी:! ह्या सगळ्यात काहीतरी अप्रिय होते!

खरेच, सानिनला काहीसे शरमिंदे आणि अपराधी वाटत होते... पण दुसरे तो काय करू शकला असता? त्या उर्मट अंमलदाराला शासन न होता

तसेच जाऊ देणे त्याला मानवले नसते आणि श्रीमान क्लूबेरप्रमाणे वागणे त्याला जमले नसते. जेम्माच्या रक्षणार्थ तो पुढे सरसावला होता... हे अगदी खरे होते, तरीही त्याचा आत्मा अस्वस्थ होता. त्याला शरम वाटत होती, अगदी अपराध्याप्रमाणे वाटत होते.

पान्तालीओने मात्र विजयाने फुलला होता. एकदम त्याला अभिमानाचे भरते आले होते. रणमैदानावर नुकतीच लढाई जिंकून आलेल्या विजयी सेनापतीलासुद्धा त्याहून अधिक आत्मसमाधानाचा आनंद वाटला नसता. द्वंद्वावेळेचे सानिनचे वागणे पाहून त्याला जोम चढला होता. त्याने सानिनला वीर ठरविले होते. सानिनचे आक्षेप अथवा त्याच्या विनवण्या ऐकून घेण्याची त्याची मुळीच इच्छा नव्हती. 'डॉन जुआन' मधील सेनापतीच्या संगमरवरी अथवा ब्राँझच्या पुतळ्याशी त्याने सानिनची तुलना केली. स्वतःच्या बाबतीत मात्र त्याने कबूल केले की, त्याला काहीशी भीती वाटली होती. "पण मी कलाकार आहे, माझा मूळ स्वभावच भित्रा आहे आणि तुम्ही–तुम्ही हिमाचे आणि ग्रॅनाइटच्या कड्यांचे पुत्र आहात."

ह्या उत्तेजित कलाकाराला कसे शांत करावे हे सानिनला काही केल्या सुचेना.

दोन तासांपूर्वी रस्त्यावर ज्या स्थळी त्यांना एमिल भेटला होता, नेमक्या त्याच स्थळी एका झाडामागून उडी मारून आनंदाने आरोळ्या ठोकीत तो रस्त्यावर धावत आला. डोक्यावरील टोपी हलवीत आणि उंच उड्या मारीत तो सरळ घोडागाडीकडे धावला, घोड्यांना लगाम खेचून ते थांबेपर्यंत वाट न पाहता तो तसाच धडपडत गाडीच्या दाराशी चढला, चाकांखाली सापडता सापडता थोडक्यात वाचला आणि त्याने स्वतःला सानिनवर झोकून दिले.

"तुम्ही जिवंत आहात! तुम्ही जखमी झाला नाहीत!" तो मोठ्यांदा म्हणाला. "मला माफ करा, मी तुमची आज्ञा पाळली नाही, फ्रॅंकफुर्टला मी परत गेलो नाही... मला शक्यच झालं नाही! इथं मी तुमची वाट पहात थांबलो... सांगा मला सगळी हकीकत. तुम्ही त्याला... ठार मारलंत?"

एमिलला शांत करायला व खाली बसवायला सानिनला खूप सायास पडले.

पान्तालीओनेने द्वंद्वयुद्धाचा वृत्तांत तिखट-मीठ लावून अगदी तपशीलवार-पणे कथन केला आणि अर्थातच परत एकदा सेनापतीच्या ब्राँझ पुतळ्याचा उल्लेख करायला तो विसरला नाही. आपला तोल सांभाळण्यासाठी आपले



पाय फाकवून तो चक्क उभा राहिला, आपल्या छातीवर त्याने हातांची घडी ठेवली आणि सेनापती सानिन यांची प्रतिमा दाखविण्यासाठी खांद्यावरून मागे कटाक्ष फेकला. एमिल आ वासून ऐकत होता, अधूनमधून आश्चर्यजनक उद्‌गार काढीत होता अथवा घाईघाईने उभे राहून आपल्या वीर मित्राचे चुंबन घेत होता.

घोडागाडीच्या चाकांचे फ्रॅंकफुर्टच्या फरसबंदीवर प्रतिध्वनी उमटले आणि शेवटी घोडागाडी सानिनच्या पथिकाश्रमापाशी थांबली.

दुसऱ्या मजल्यावर जाणाऱ्या जिन्याच्या पायऱ्या चढण्यास सानिनने आरंभ केला, त्याचे दोन साथीदार त्याच्या मागोमागच होते, तेवढ्यात चेहरा झाकून घेतलेली एक स्त्री अचानक अंधाऱ्या कॉरीडोअरमधून वेगाने बाहेर आली. सानिनच्या अगदी पुढ्यात ती थांबली, तिचा किंचित तोल गेला, कापऱ्या आवाजातील चीत्कार तिच्या मुखातून उमटला आणि धाडधाड जिना उतरून ती रस्त्यावर नाहीशी झाली. चकित झालेल्या नोकराने सांगितले की, ही बाई एक तासाहून जास्त वेळपर्यंत परदेशी गृहस्थाच्या परतण्याची वाट पहात बसली होती. त्या ओझरत्या दर्शनातही सानिनला समजले की, ती जेम्मा होती. तिच्या तपकिरी बुरख्याच्या दाट रेशमाखाली तिचे डोळे त्याने पाहिले होते.

"म्हणजे, फ्रॉलीन जेम्माला ठाऊक होतं?" किंचित स्वर लांबवीत त्याने विचारले. त्याच्या आवाजात चीड होती. त्याच्या पाठोपाठ येणाऱ्या एमिलला आणि पान्तालीओनेला उद्देशून तो जर्मन भाषेत बोलला होता.

एमिलचा चेहरा एकदम आरक्त बनला व शरमल्याच्या खुणा त्यावर उमटल्या.

"मला सगळं सांगावं लागलं तिला," तो चाचरत म्हणाला, "तिनं तर्कानं ओळखलं–आणि मला अशक्य ठरलं... पण आता काही बिघडत नाही," एकदम उत्साहित स्वरात तो पुढे म्हणाला. "सारं काही सुरेख संपलं आणि तुम्ही सुरक्षित परत आलेले तिनं पाहिलं!"

सानिन त्याच्यापासून दूर वळला.

"असे कसे तुम्ही दोघंही बडबडे!" संतापून तो पुटपुटला आणि आपल्या खोलीत जाऊन आरामखुर्चीत बसला.

"रागावू नका ना माझ्यावर," एमिलने विनविले.

"ठीक, ठीक, नाही रागावणार." (खरे म्हणजे सानिन मुळीच रागावला नव्हता–उलट जेम्माला त्यातील **काहीच** माहीत असू नये असे

त्याला वाटणे कसे शक्य होते...) "ठीक आहे–पण आता मिठ्या मारणं खूप झालं. जा आता... मला थोडं एकटं रहायची इच्छा आहे. पडून झोप काढतो. मी दमलोय."

"छान कल्पना!" पान्तालीओने उद्गारला. "तुम्हाला थोडी विश्रांती हवीच. उदात्त सिन्योर, तुम्ही तिला हक्कानं मिळवलीय. चल, एमिल.
हलक्या पावलांनी!
हलक्या पावलांनी!
श-श्श-श्श!"

आपल्या सहकाऱ्यांच्या तावडीतून सुटण्यासाठी केवळ सानिनने झोपेची सबब सांगितली होती. पण एकदा का तो एकटा राहिला तेव्हा त्याला जाणवले की, त्याच्या सर्व अवयवांमधून कमालीचा थकवा भरला होता. आदल्या रात्री त्याचा अजिबात डोळा लागला नव्हता आणि आता त्याने बिछान्यावर अंग टाकताच तात्काळ तो गाढ निद्रेच्या आधीन झाला.

२३

कित्येक तासपर्यंत तो गाढ झोपला. मग स्वप्नात तो परत एक द्वंद्वयुद्ध खेळला. त्याचा प्रतिस्पर्धी श्रीमान क्लूबेर होता आणि देवदाराच्या झाडावर एक पोपट बसला होता व हा पोपट म्हणजे पान्तालीओने होता आणि तो आपली चोच आपटून सारखा म्हणत होता: «Una... due... tre... tre... tre... tre...»

आणि मग tre... tre... tre... स्वप्नातल्यापेक्षा फारच स्पष्टपणे ऐकू आले. त्याने डोळे उघडले व उशीवरून डोके उचलले... कुणीतरी दारावर ठोठावत होते.

"आत या!" सानिन ओरडला.

नोकर आत आला आणि त्याने सांगितले की, एक बाई सानिनला ताबडतोब भेटू इच्छित आहे.

"जेम्मा" त्याच्या डोक्यात विचार चमकून गेला... पण ती स्त्री ठरली जेम्माची आई–फ्राऊ लेनोरे.

खोलीत शिरताक्षणी ती खुर्चीत मटकन बसली आणि तिला रडू कोसळले.

"अरेच्चा, मादाम रोझेल्ली, काय झालं?" तिच्या शेजारी बसत आणि तिच्या हाताला हळूच व प्रेमळपणे स्पर्श करीत सानिनने विचारले. "काय झालंय? मी तुम्हाला विनंती करतो, शांत व्हा!"



"श्रीयुत दिमित्री, मी फार, फार दुःखी आहे!"

"तुम्ही दुःखी आहात?"

"होय! खूप! असं घडेल असं कुणाला वाटलं होतं? अचानक, वज्राघाताप्रमाणं..."

तिचा श्वासोच्छ्वास जड भासत होता.

"पण काय ते? खुलासा करा ना! तुम्हाला पाणी हवंय प्यायला?"

"नको, आभारी आहे." फ्राऊ लेनोरेने आपल्या हातरुमालाने स्वतःचे अश्रू टिपले व अधिकच जोराने रडायला आरंभ केला.

"मला माहीत आहे सगळं! सगळं!"

"सगळं–म्हणजे काय म्हणायचंय तुम्हाला?"

"आज घडलं ते सगळं. आणि त्याचं कारण–तेसुद्धा मला ठाऊक आहे. प्रतिष्ठित पुरुषाप्रमाणं तुम्ही वागलात. पण किती दुर्दैवी परिस्थिती! त्या सोदेनच्या सहलीला माझा विरोध होता तो काही उगाच नव्हे... उगाच नव्हे!" (सहलीच्या दिवशी फ्राऊ लेनोरेने याबद्दल उल्लेख केला नव्हता, पण आता तिची खात्री पटली होती की, तेव्हाच तिला "सर्व काही" आधी दिसले होते.) "आणि तुम्ही एक प्रतिष्ठित गृहस्थ म्हणून, एक स्नेही म्हणून, मी तुमच्यापाशी आल्येय... जरी केवळ पाच दिवसांची तुमची ओळख आहे तरी... तुम्हाला ठाऊक आहे, मी एक विधवा आहे. एकाकी... माझी मुलगी..."

फ्राऊ लेनोरेचा गळा अश्रूंनी दाटला. काय विचार करावा तेच सानिनला समजेना.

"तुमची मुलगी?" त्याने शब्द परत उच्चारले.

"माझी मुलगी–जेम्मा..." फ्राऊ लेनोरेच्या अश्रुभिजल्या हातरुमालामागून कण्हल्याप्रमाणे शब्द उमटले, "आज तिनं मला सांगितलं की, श्रीमान क्लूबेरशी ती लग्न करणार नाही आणि तसं मी त्याला सांगितलं पाहिजे."

सानिन किंचित दचकला. हे त्याने अपेक्षिले नव्हते.

"बेइज्जतीबद्दल तर मी काही म्हणतच नाही आता," फ्राऊ लेनोरे पुढे म्हणाली, "पण एखाद्या मुलीनं आपला वाग्दत्त पती नाकारल्याचं कधी ऐकलंय? श्रीमान दिमित्री, आमचा सर्वनाश घडणार!" फ्राऊ लेनोरेने आपल्या हातरुमालाचा जोरजोराने पिळून बोळा केला. जणू त्यातील आपल्या सर्व दुःखांना पिळून टाकण्याचा तिचा निर्धार झाला होता. "आमच्या दुकानाच्या उत्पन्नावर जगणं यापुढं आम्हाला शक्य नाही, श्रीमान दिमित्री!

आणि श्रीमान क्लूबेर खूप श्रीमंत आहेत, आणि पुढं आणखी आणखी श्रीमंत होतील. आणि त्यांना का नाकारायचं? आपल्या वाग्दत्त वधूचा त्यानं कैवार घेतला नाही म्हणून केवळ? ठीक – त्यांचं ते वागणं तितकंसं चांगलं नव्हतं, पण तो काही सैनिकी पेशाचा माणूस नाही, विद्यापीठात शिकलेला नाही. आणि एखाद्या अज्ञात छोट्या अंमलदाराच्या मूर्खपणाकडं दुर्लक्ष करणं त्यांच्यासारख्या प्रतिष्ठित व्यापाऱ्याळा परवडतं! आणि तसं पाहिलं तर तो काय फार मोठा अपमान होता का?"

"माफ करा, फ्राऊ लेनोरे, पण तुम्ही माझ्यावर आरोप करताय असं वाटतंय..."

"मी तुमच्यावर कसलाही आरोप करत नाही. तुम्ही अगदी वेगळे आहात – सगळ्या रशियनांप्रमाणं तुम्ही लष्करी माणूस आहात..."

"माफ करा, पण मी नाही..."

"तुम्ही परदेशी आहात, पाहुणे आहात, मी तुमची कृतज्ञ आहे," सानिनच्या शब्दांकडे लक्ष न देता फ्राऊ लेनोरे पुढे बोलतच राहिली. तिचा श्वासोच्छ्वास जोरजोराने चालू होता, तिचे हातवारे चालले होते. आपला हातरुमाल परत सरळ करून तिने नाक शिंकरले. ज्या पद्धतीने तिने आपल्या दुःखाला मोकळे केले होते त्यावरूनच पुरेसे स्पष्ट दिसत होते की, उत्तरेकडील आकाशाखाली तिचा जन्म झाला नव्हता.

"आणि श्रीमान क्लूबेरना पुढं दुकानच्या गल्ल्यावर बसायचं तर आपल्या गिऱ्हाईकांशी ते भांडणार कसे? हे अगदी अशक्य आहे. कधी ऐकलंय असं? आणि आता मी त्यांना सांगायचं म्हणे की, त्यांना नाकारलंय! आणि मग आम्ही जगणार कशावर? पूर्वी एंजल केक आणि पिस्ते घातलेला नूगा फक्त आम्हीच बनवत होतो. तेव्हा आमची खूप गिऱ्हाईकं होती. पण आता प्रत्येकजण एंजल केक बनवतो. जरा विचार करा – ह्या सगळ्याशिवाय, तुमच्या द्वंद्वाबद्दल शहरात खूप चर्चा होणार... अशी गोष्ट दाबून रहात नाही. आणि अचानक वाङ्निश्चय मोडायचा... चार लोकात निंदा होणार निंदा! जेम्मा चांगली मुलगी आहे, माझ्यावर तिचं खूप प्रेम आहे, पण ती हट्टी रिपब्लिकन आहे; लोकमताची तिला पर्वा वाटत नाही. तुम्ही एकटेच तेवढे तिला काही सांगू शकाल!"

सानिन अधिकच चकित झाला.

"मी, फ्राऊ लेनोरे?"

"होय, होय, फक्त तुम्हीच! म्हणून तर मी तुमच्याकडं आल्ये... दुसरा उपायच मला सुचत नव्हता. तुम्ही खूप शहाणे आहात, खूप चांगले आहात. तिची बाजू घेऊन तुम्ही उभे झालात. तुमच्यावर ती विश्वास ठेवील. तुमच्यावर तिचा नक्की विश्वास बसला **पाहिजे** – तिच्यासाठी तुम्ही आपलं आयुष्य धोक्यात घातलं होतं. मी माझ्या परीनं सर्व प्रयत्न केले. आता तुम्हीच तिला पटवू शकाल की, ती स्वतःचा आणि आम्हा सर्वांचा नाश करील. तुम्ही माझ्या मुलाला वाचवलंत, आता माझ्या मुलीला वाचवा! देवानंच तुम्हाला इथं धाडलंय... मी तुमच्यासमोर गुडघ्यांवर टेकून विनंती करायला तयार आहे..." आणि जणू सानिनच्या पायांवर स्वतःला झोकून देण्याच्या पवित्र्यात फ्राऊ लेनोरे खुर्चीमधून अर्धवट वर उठली... त्याने तिला थोपविले.

"फ्राऊ लेनोरे! कृपा करा! काय करताहात तुम्ही?"

तिने त्याचे हात घट्ट पकडले. "तुम्ही वचन देता?"

"फ्राऊ लेनोरे, विचार करा, कसा मी..."

"तुम्ही वचन देता? तुमच्या पायांशी या क्षणाला मी मरून पडावं अशी तुमची इच्छा आहे?"

कसे वागावे ते सानिनला समजेना. इटालियन गरम रक्ताशी कसे वागायचे, याचा पूर्वी त्याला कधीही अनुभव आला नव्हता.

"तुम्हाला हवं ते काहीही करायला मी तयार आहे," तो उद्गारला. "फ्रॉलीन जेम्माशी मी बोलीन..."

फ्राऊ लेनोरेने आनंदी चीत्कार काढला.

"पण त्यातून काय निष्पन्न होईल हे खरंच मला माहीत नाही..."

"नाकारू नका! नाकारू नका!" फ्राऊ लेनोरेने विनवणी केली. "तुम्ही तुमचा शब्द मला दिलाय. मला खात्री आहे, त्यातून काहीतरी सुरेख नक्की निर्माण होईल. काही झालं तरी याहून अधिक करण्यासारखं **माझ्यापाशी** काहीही नाही. **माझं** ऐकायला ती तयार नाही."

"श्रीमान क्लूबेरशी ती लग्न करणार नाही असं तिनं तुम्हाला नक्की सांगितलं?" थोडा वेळ थांबून सानिनने विचारले.

"तिनं सपशेल नकार दिलाय. ती अगदी आपल्या बापासारखी, जिओवान बात्तिस्तासारखी, आहे. मनस्वी गरम डोक्याची!"

"गरम डोक्याची? जेम्मा?" सानिनने हळूच विचारले.

"होय, होय, पण ती देवदूतही आहे. तुमचं ती ऐकील. तुम्ही याल ना? लौकर? लौकर? ओह, माझ्या लाडक्या रशियन मित्रा!" फ्राऊ

15-Aug-13 / 18:29:03

लेनोरे आवेगाने खुर्चीमधून उठली व तेवढ्याच आवेगाने तिने खुर्चीवर बसलेल्या सानिनच्या गळयाभोवती आपल्या हातांची मिठी घातली. "एका आईचा आशीर्वाद घ्या–आणि मला पाणी प्यायला द्या!"

सानिनने मादाम रोझेल्लीला पाण्याचा ग्लास आणून दिला, ताबडतोब येण्याचे तिला वचन दिले, जिन्यापासून रस्त्यापर्यंत तिला सोबत केली, आणि आपल्या खोलीत परतून कमालीच्या गोंधळलेल्या अवस्थेत तो उभा राहिला.

"आता आयुष्याचं चक्र उलटं फिरलेलं दिसतंय," तो स्वतःशी म्हणाला. "आणि एवढ्या वेगानं की, मला भोवळ आलीय!" आपल्या हृदयात काय चालले होते ते डोकावून पाहण्याचाही त्याने प्रयत्न केला नाही. सर्व गोंधळ माजला होता एवढेच त्याला माहीत होते. "काय पण दिवस! काय पण दिवस!" त्याच्या ओठांमधून नकळत शब्द बाहेर पडले. "ती गरम डोक्याची? तिची खुद्द आई तसं म्हणाली... आणि मी तिला उपदेश करणार... तिला उपदेश! कसला उपदेश करणार मी?"

सानिनचे डोके खरेच भिरभिरत होते आणि संवेदनांच्या, ठशांच्या, अव्यक्त विचारांच्या त्या संपूर्ण आवर्तावरती जेम्माची प्रतिमा तरंगत होती. हीच प्रतिमा त्या उबदार, विद्युतप्रवाहित रात्री त्याच्या मनावर कायमची कोरली गेली होती. तारकांच्या प्रकाशात अंधाऱ्या खिडकीच्या चौकटीत उभी असलेली तिची प्रतिमा!

## २४

डगमगत्या पावलांनी सानिन मादाम रोझेल्लीच्या घरापाशी आला. त्याच्या हृदयाचे ठोके जोरजोराने पडत होते. आपल्या बरगड्यांशी ते धडका देत असल्याचे त्याला ठळकपणे जाणवत होते. ते ठोके त्याला स्पष्टपणे ऐकूही येत होते. जेम्माला तो काय सांगणार होता? तिच्याशी तो कसे बोलणार होता? दुकानामधून घरात प्रवेश न करता मागील दारातून तो आत शिरला. छोट्या दर्शनी खोलीत त्याला फ्राऊ लेनोरे भेटली. त्याला पाहताच तिला आनंद झाला व भीतीही वाटली.

"मी तुमची वाट पहात होते," आपल्या प्रत्येक हाताने आळीपाळीने त्याचा हात दाबीत हळू आवाजात ती म्हणाली. "बागेत जा–ती तिथं आहे. लक्षात ठेवा–मी तुमच्यावर अवलंबून आहे!"



सानिन बागेत गेला.

पाऊलवाटेशेजारच्या बाकावर जेम्मा बसली होती व एका मोठ्या टोपलीतून खूप पिकलेली चेरीची फळे एका बशीत निवडून ठेवीत होती. सूर्य खाली गेला होता, साताचा सुमार झाला होता. मादाम रोझेल्लीच्या छोट्या बागेत पसरलेले विस्तृत तिरपे सूर्यकिरण सोनेरी रंगापेक्षा अधिक लालसर दिसत होते. अधूनमधून पाने एकमेकांशी हळूच व अगदी अस्पष्टपणे कुजबुजत होती. उशीरा आलेले भुंगे या फुलावरून त्या फुलावर गुणगुणत उडत होते. एक विरही कबूतर एकसुरात व अथकपणे घुमत होते.

सोदेनला जाताना जेम्माने जी मोठी टोपी डोक्यावर घातली होती, तीच टोपी आताही तिच्या डोक्यावर होती. टोपीच्या वाकलेल्या कडेआडून तिने सानिनकडे कटाक्ष टाकला व पुन्हा एकदा ती टोपलीवर झुकली.

सानिन जेम्माजवळ जात होता. नकळतपणे त्याचे प्रत्येक पाऊल अधिकाधिक लहान पडत होते. आणि... आणि... आणि त्याला दुसरा कुठलाही प्रश्न सुचला नाही म्हणून त्याने एवढेच विचारले: ह्या चेरी ती का निवडत आहे?

जेम्माने त्याला उत्तर द्यायला थोडा वेळ घेतला.

"त्या–खूप पिकलेल्या," अखेर तिच्या तोंडून शब्द बाहेर पडले, "मुरंब्यासाठी वापरण्यात येतील, आणि ह्या केकसाठी."

एवढे बोलून जेम्मा अधिकच खाली झुकली. चेरीचे फळ दुहेरी बोटांमध्ये धरलेला तिचा उजवा हात टोपलीच्या व बशीच्या दरम्यान अधांतरी राहिला.

"मी तुमच्यापाशी बसलो तर चालेल?"

"बसा ना." जेम्मा बाकावर थोडी पलिकडे सरकली. सानिन तिच्या शेजारी बसला. "कशी सुरुवात करू?" त्याने स्वतःला प्रश्न केला. पण जेम्माने त्याला मदत केली.

"आज तुम्ही द्वंद्व खेळलात," मनातील गोंधळामुळे गुलाबी बनलेला आपला सुरेख चेहरा पूर्णपणे त्याच्या चेहऱ्यासमोर आणून तिने अधीरपणे विचारले. तिच्या डोळयांमध्ये केवढी गाढ कृतज्ञता उमटली होती. "आणि किती शांत आहात तुम्ही! मला वाटतं, धोका तुमच्या गावीही नाही!"

"पुरे! मी कुठल्याही धोक्यात नव्हतो. सर्व काही विनाअपाय आणि निष्पाप रीतीनं पार पडलं."

जेम्माने आपले बोट आपल्या डोळ्यांसमोर उजवीकडून डावीकडे फिरविले —आणखी एक इटालियन सवय... "छे:, छे:! असं म्हणू नका! तुम्ही मला फसवू शकणार नाही! पान्तालीओनेनं मला सगळं सांगितलंय!"

"आणि तुम्ही त्याच्यावर विश्वास ठेवलात. त्यानं माझी सेनापतीच्या पुतळ्याशी तुलना केली?"

"त्याची भाषा बेडगळ असेल, पण त्याच्या भावना मुळीच बेडगळ नाहीत, अथवा तुम्ही आज जे केलंत त्यात मुळीच बेडगळपणा नाही. आणि हे सारं माझ्यामुळं... माझ्यासाठी... मी हे कधीही विसरणार नाही."

"मी तुम्हाला खात्री देतो, फ्रॉलीन जेम्मा..."

"मी हे कधीही विसरणार नाही," परत एकदा स्थिरपणे त्याच्याकडे पहात ती ठासून म्हणाली व नंतर तिने चेहरा बाजूला वळविला.

आता तिच्या तिरप्या चेहऱ्याच्या सुरेख, धारदार रेषा त्याला दिसत होत्या. आपण असले लावण्य यापूर्वी कधीही पाहिले नाही, त्या क्षणाला जे काही वाटत होते तसे कधीही आपल्याला वाटले नाही, असे त्याने स्वतःला बजावले. त्याच्या अंतरात आग धडाडली होती.

"आणि माझं वचन!" त्याच्या डोक्यात विचार चमकला.

"फ्रॉलीन जेम्मा..." क्षणभर घुटमळून त्याने परत बोलण्याचा प्रयत्न केला.

"काय?"

त्याच्याकडे न वळता ती पिकलेल्या चेरी निवडत राहिली, आपल्या बोटांच्या टोकांमध्ये त्यांचे देठ काळजीपूर्वक धरून मोठ्या सायासांनी त्यांची पाने उलगडत राहिली... पण त्या "काय" शब्दामध्ये किती विश्वास, प्रेम सामावले होते?

"तुमच्या आईनं तुम्हाला काही सांगितलं नाही... त्याबद्दल..."

"कशाबद्दल?"

"माझ्याबद्दल?"

टोपलीमधून उचललेल्या चेरी जेम्माने एकदम परत टोपलीत फेकल्या.

"ती तुमच्याशी बोलत होती?" आता तिने उलट प्रश्न विचारला.

"हो."

"आणि तिनं काय सांगितलं तुम्हाला?"

"त्यांनी मला सांगितलं की तुम्ही... तुम्ही अचानक ठरवलंय... तुमचे पूर्वीचे इरादे बदलायचं!"

जेम्माने परत मान खाली घातली. तिच्या टोपीच्या कडेखाली ती जणू



अदृश्य झाल्याचे भासले. फक्त तिची मान दिसत होती... एखाद्या मोठ्या फुलाच्या देठासारखी लवचिक आणि नाजुक.

"कसले इरादे?"

"तुमचे इरादे... तुमच्या आयुष्याच्या... भविष्यकाळाबद्दलचे."

"म्हणजे... तुम्ही श्रीमान क्लूबेरबद्दल बोलताय का?"

"हो."

"आईनं तुम्हाला सांगितलं की, श्रीमान क्लूबेरची पत्नी बनायची माझी इच्छा नाही?"

"हो."

जेम्मा बाकावर सरकली. टोपली तिरकी झाली व खाली पडली... चेरीची काही फळे पाऊलवाटेवर घरंगळली. एक मिनिट उलटले, दुसरे उलटले...

"कशासाठी तिनं सांगितलं तुम्हाला?" जेम्माचा आवाज आला.

सानिनला अद्याप जेम्माची फक्त मानच दिसत होती. तिची वक्षःस्थळे नेहमीपेक्षा अधिक वेगाने वर-खाली होत होती.

"कशासाठी त्यांनी मला सांगितलं? तुमच्या आईला वाटलं की, एवढ्या थोड्या अवधीत तुमची-माझी इतकी छान मैत्री जमलीय, तुमचा माझ्यावर काही प्रमाणात विश्वास बसलाय आणि मी तुम्हाला काही चांगला सल्ला देऊ शकेन—आणि तुम्ही माझं ऐकाल!"

जेम्माचे हात सावकाशपणे तिच्या मांडीवर सरकले... आणि फ्रॉकच्या चुण्या चिमटीत पकडण्याचा चाळा करू लागले.

"कसला सल्ला देताय मला मस्ये दिमित्री?" थोडे थांबून तिने विचारले.

जेम्माने आपल्या मांडीवर ठेवलेले हात थरथर कापत असल्याचे सानिनला दिसत होते... ती थरथर लपविण्यासाठी आपल्या फ्रॉकच्या चुण्या पकडण्याचा तिचा बहाणा चालला होता. त्या फिकट, कापणाऱ्या बोटांवर त्याने अलगदपणे आपला हात ठेवला.

"जेम्मा," तो म्हणाला, "माझ्याकडं तुम्ही पहात का नाही?"

अचानक हालचाल करून तिने आपल्या डोक्यावरील टोपी मागे पाडली व त्याच्यावर आपली नजर रोखली. पूर्वीप्रमाणेच विश्वासाने आणि कृतज्ञतेने भरलेली. तो बोलण्याची ती वाट पहात होती... पण तिच्या चेहऱ्याचे दर्शन घडताच एकदम तो शरमला व दिपून गेला. तिच्या तारुण्याने मुसमुसलेल्या मुद्रेवर सायंकालीन उबदार सूर्यकिरणांनी मुलामा चढविला होता

आणि खुद्द सूर्यप्रकाशापेक्षा ह्या चेहऱ्यावर उमटलेला भाव जास्त तेजस्वी व ठळक होता.

"मी तुमचा सल्ला ऐकीन, मस्ये दिमित्री," किंचित स्मित करीत आणि किंचित आपल्या भुवया उंचावीत ती म्हणाली. "पण तुमचा काय सल्ला आहे मला?"

"सल्ला?" सानिन परत म्हणाला. "हे बघा, तुमच्या आईला वाटतं की, श्रीमान क्लूबेरनी त्या दिवशी खास धैर्य दाखवलं नाही म्हणून केवळ त्यांना नाकारणं..."

"म्हणून केवळ?" खाली वाकून टोपली उचलीत व बाकावर आपल्या शेजारी ठेवीत जेम्मा तोंडातल्या तोंडात म्हणाली.

"...आणि असं करणं... सर्वसाधारणपणं... त्यांना नाकारणं तुमच्या दृष्टीनं अयोग्य ठरेल. असं पाऊल उचलण्यापूर्वी सर्व परिणामांना जोखणं तुमच्या दृष्टीनं हिताचं ठरेल आणि सरतेशेवटी, तुमच्या वागण्यामुळं कुटुंबातल्या प्रत्येक घटकावर काही जबाबदाऱ्या पडताहेत..."

"हे झालं आईचं मत," जेम्मा मध्येच म्हणाली. "हे सगळे तिचेच शब्द आहेत. मला ते सारं ठाऊक आहे. पण तुमचं काय मत आहे?"

"माझं मत?" सानिन गप्प झाला. घशात आवंढा अडकल्याचे त्याला जाणवले व त्याचा श्वास घुसमटला. "मलासुद्धा वाटतं..." मोठ्या कष्टाने तो म्हणाला.

जेम्मा एकदम सावरून बसली. "तुम्हालासुद्धा? तुम्हाला?"

"हो... म्हणजे..." सानिनला अक्षरशः एकही शब्द पुढे बोलता येईना.

"छान," जेम्मा म्हणाली. "माझे स्नेही ह्या नात्यानं तुम्ही मला माझा निर्णय बदलायला जर सांगत असाल... म्हणजे माझा पूर्वीचा निर्णय मी बदलू नये असं सांगत असाल – तर त्यावर मी विचार करीन." आपण काय करीत आहोत याचे भान न राहून तिने बशीमधील चेरीची फळे परत टोपलीत भरायला आरंभ केला... "तुम्ही म्हणाल तसं मी वागेन अशी आईला आशा वाटतेय... छान! कदाचित खरंच मी तशी वागेन..."

"पण फ्रॉलीन जेम्मा, मला आधी तुमची कारणं समजून घ्यायची आहेत..."

"तुम्ही सांगाल तसं मी करीन," जेम्मा म्हणाली. तिच्या भुवया आकुंचित पावल्या, तिचे गाल फिके पडले व तिने आपला खालचा ओठ



चावला. "तुम्ही माझ्यासाठी एवढं काही केलंय, की तुम्हाला हवं तसं वागणं हे माझं कर्तव्य आहे. तुमची इच्छा पूर्ण करण्याचं माझ्यावर बंधन आहे. मी आईला सांगेन – मी त्यावर विचार करीन. अगबाई, ती स्वतःच येतेय इकडं!"

घरामधून बागेत यायच्या दारामध्ये फ्राऊ लेनोरे वस्तुतः उभी राहिली होती. तिचा धीर सुटलेला होता. गप्प बसून राहणे इतःपर तिला अशक्य झाले होते. सानिनने केव्हाच जेम्माबरोबरचे आपले बोलणे संपविले असणार असा तर्क तिने केला होता. पण खरे म्हणजे फक्त पंधरा मिनिटेच त्यांचे संभाषण चालले होते.

"नाही, नाही, नाही, कृपा करून अजून त्यांना काहीच सांगू नका! मुळीच काही सांगू नका!" एकदम भीतीने झपाटल्याप्रमाणे सानिनने घाईघाईने तिची विनवणी केली. "थांबा... मी तुम्हाला सांगेन, मी तुम्हाला लिहून कळवीन... तोपर्यंत कोणताही निर्णय घेऊ नका... थांबा!"

त्याने जेम्माचा हात दाबला, बाकावरून तो ताडकन उठला व आपली टोपी किंचित उचलून आणि काहीतरी अनाकलनीय पुटपुटत चकित फ्राऊ लेनोरेच्या जवळून वेगाने चालत नाहीसा झाला.

फ्राऊ लेनोरे आपल्या मुलीपाशी गेली.

"जेम्मा, मला सांग बाई..."

जेम्मा एकदम उठली व तिने आपल्या आईला मिठी मारली. "गडे आई, तू आणखी थोडी थांबणार नाहीस का? अगदी थोडी? उद्यापर्यंत? थांबशील? आणि उद्यापर्यंत त्याबद्दल एक चकार शब्द काढायचा नाही..."

अगदी अचानकपणे तिच्या डोळ्यांमधून टपोऱ्या अश्रूधारा वाहू लागल्या होत्या व ह्याचे तिचे तिलाच आश्चर्य वाटलेले दिसत होते. फ्राऊ लेनोरे विशेषच चकित झाली होती, कारण जेम्माच्या मुद्रेवर विषण्णता मुळीच नव्हती; उलट काही असेल तर आनंदच विलसत होता.

"काय झालंय तुला एकदम?" फ्राऊ लेनोरेने विचारले. "तू कधीही रडत नाहीस – आणि आता अगदी अचानक..."

"काही नाही ग आई, काही नाही. जराशी वाट पहा! आपण दोघींनीही वाट पाहिली पाहिजे. उद्यापर्यंत मला काहीही विचारू नको – आणि सूर्य मावळण्यापूर्वी चेरी निवडून टाकू या."

"पण तू शहाणपणानं वागशील ना?"

"मी खूप शहाण्यासारखीच वागतेय!" जेम्माने सूचकतेने मान

हलविली. चेरीचे छोटे गुच्छ आपल्या लालबुंद चेहऱ्याशी उंच धरून ती चेरी गोळा करू लागली. तिने आपले अश्रू पुसले नाही, तिच्या गालांवर ते सुकून गेले.

## २५

जवळ जवळ धावतच सानिन आपल्या पथिकाश्रमात परतला. आपल्या अंतरंगात काय चालले होते हे समजून घेणे फक्त तेथेच, पूर्ण एकांतामध्ये शक्य होते, याची त्याला खात्री होती. आणि खरेच तसे घडले—आपल्या खोलीत तो शिरला व टेबलावर दोन्ही हातांचे कोपर टेकून आणि दोन्ही पंजे आपल्या चेहऱ्यावर दाबून तो बसला न बसला तोच करुण, पोकळ स्वरांमध्ये तो ओरडला: "माझं तिच्यावर प्रेम आहे! मी तिच्यावर वेड्यासारखं प्रेम करतोय!" जळत्या निखाऱ्यावरील राखेचा थर अचानक उडवून लावल्यानंतर जसा तो फुलून पेटतो तसे त्याच्या अंतरंगात सर्व काही धगधगत होते. एक निमिष... आणि त्याला जाणणे शक्य झाले नसते की, तिच्यापाशी तो कसा बसू शकला... तिच्यापाशी!—आणि तिच्याशी बोलला आणि त्याला समजले नाही की, तिच्या पोषाखाची किनारसुद्धा त्याला प्राणप्रिय भासत होती व तो सज्ज होता, तरुणांच्या भाषेत सांगायचे तर "तिच्या पायांशी मरायला!" बागेतील त्या शेवटच्या भेटीने सर्व काही निर्णित केले होते. आता जेव्हा तिची त्याला आठवण येत होती तेव्हा चांदण्याच्या प्रकाशामधील तिची केस विस्कटलेली प्रतिमा त्याच्या डोळ्यांसमोर उभी रहात नव्हती... आता फक्त ती दिसत होती बाकावर बसलेली, अचानक टोपी मागे फेकून त्याच्याकडे विश्वासपूर्वक नजरेने पाहणारी! त्याच्या नसांमधून प्रेमाची हुरहुर, प्रेमाची तहान धडधडू लागली. दोन दिवस आपल्या खिशात बाळगून असलेल्या गुलाबाच्या फुलाची त्याला आठवण झाली. त्याने ते बाहेर काढले व आपल्या ओठांशी एवढ्या जोराने दाबले की, वेदनेने त्याचा चेहरा वेडावाकडा झाला. आता त्याचा तर्क चालत नव्हता, इतःपर भविष्याचा विचार त्याच्या मनात येत नव्हता. हिशेब घालणे त्याने बंद केले होते. आपल्या संपूर्ण भूतकाळापासून त्याने स्वतःला अलग केले होते व पुढे झेप मारली होती. आपल्या एकाकी, ब्रह्मचारी जीवनाच्या भयाण तीराला जखडून ठेवणाऱ्या साखळ्या त्याने तोडल्या होत्या. आनंदी, खळबळत्या, जोरदार प्रवाहात कोणतीही पर्वा न करता त्याने स्वतःला झोकून दिले



होते. तो प्रवाह त्याला कुठे घेऊन चालला होता याची साधी विचारणाही त्याने केली नव्हती. त्याचे छोटे होडगे एखाद्या खडकावर आदळून फुटेल का, याची त्याने क्षिती बाळगली नव्हती. अगदी अलिकडेपर्यंत त्याला शांत करणारे उलान्दच्या प्रेमगीताचे हे संथ प्रवाह नव्हते... ह्या जबरदस्त, अनिवार्य लाटा होत्या. त्या पुढे उसळत जात होत्या आणि त्यांच्याबरोबर तोही वाहात चालला होता.

त्याने एक कागद ओढून घेतला व एकही डाग न पाडता, एकटाकी लेखन केले:

"प्रिय जेम्मा!

"कोणता सल्ला मी तुम्हाला देणार होतो हे तुम्हाला ठाऊक आहे, तुमच्या आईची इच्छा काय आहे हे तुम्हाला ठाऊक आहे आणि तिने मला काय करायला सांगितले हेही तुम्हाला माहीत आहे—पण जे तुम्हाला ठाऊक नाही आणि आता मी तुम्हाला सांगणेच भाग आहे ते म्हणजे माझं तुमच्यावर प्रेम आहे. माझ्या अंतःकरणातल्या सर्व आवेगांनिशी मी तुमच्यावर प्रेम करतोय. असं पूर्वी मी कधीच केलेलं नाही. ही ज्वाला अगदी अचानकपणं माझ्या काळजात पेटलीय, पण ती एवढी जबरदस्त आहे की तिचं वर्णन करायला मला शब्द सापडत नाहीत. जेव्हा तुमची आई माझ्यापाशी मदत मागायला आली तेव्हा ही ज्वाला नुसती धुमसत होती, अन्यथा, एक प्रामाणिक माणूस ह्या नात्यानं, तुमच्या आईनं माझ्यावर लादलेली जबाबदारी कदाचित मी नाकारली असती... आत्ता मी जी कबुली देतोय तीसुद्धा एका प्रामाणिक माणसाची कबुली आहे. तुम्ही कोणाबरोबर वागता आहात हे तुम्हाला माहीत असलं पाहिजे—आपल्यामध्ये कोणतेही गैरसमज असू नयेत. पाहिलंत, मी तुम्हाला सल्ला देऊ शकत नाही... माझं तुमच्यावर प्रेम आहे, प्रेम आहे, प्रेम आहे. माझ्या मनात अगर काळजात दुसरं काहीच नाही.

"दि. सानिन."

पत्राची घडी घालून ते पाकिटात बंद केल्यानंतर सानिनला प्रथम वाटले होते की, नोकराला बोलावून त्याच्या हाती ते पत्र पाठवावे. "नाही, तसं योग्य नाही. एमिलला सांगावं का? पण दुकानात जाऊन त्याला इतर

विक्रेत्यांमधून शोधत बसणं तितकंच चमत्कारिक ठरेल... शिवाय, एव्हाना अंधार पडलाय, कदाचित तो दुकानामधून निघून गेला असेल." असा विचार करूनही, सानिनने डोक्यावर टोपी ठेवली व तो बाहेर पडला. एका कोपऱ्यावर तो वळला, दुसऱ्या कोपऱ्यावर वळला आणि अचानक एमिल त्याच्या दृष्टीस पडला. त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला. खाकेखाली कातडी पिशवी धरून आणि हातात कागदी पुडके धरून तो उत्साही मुलगा घाईघाईने घराकडे चालला होता.

"प्रत्येक प्रेमिकाचा एक भाग्यवान तारा असतो असं म्हणतात ते काही उगीच नव्हे," सानिनच्या मनात आले आणि त्याने एमिलला हाक मारली.

एमिलने मागे वळून पाहिले आणि तो तात्काळ सानिनपाशी धावला.

एमिलला लडिवाळपणाने वागण्यास सानिनने फारसा अवधी दिला नाही. त्याने एमिलच्या हाती पत्र ठेवले आणि ते कुणाला व कशा रीतीने द्यायचे ते समजावले. एमिलने लक्षपूर्वक ऐकून घेतले.

"म्हणजे कुणालाही दिसू नये असं?" चेहऱ्यावर महत्त्वपूर्ण आणि गूढ भाव आणीत त्याने विचारले. जणू त्याला म्हणायचे होते: "हे सगळं कशाबद्दल ते फक्त तुम्हाला आणि मला माहीत आहे."

"होय, मित्रा," सानिन म्हणाला. त्याला काहीसे अवघडल्यासारखे वाटले, पण त्याने एमिलच्या गालावर थोपटले. "आणि जर काही उत्तर असलं... तर तुम्ही ते माझ्यापाशी आणा, होय ना? सगळा वेळ मी घरीच असेन."

"त्याबद्दल मुळीच काळजी करू नका," आनंदाने एमिल कुजबुजला आणि त्याने धूम ठोकली. पळताना त्याने मागे वळून पाहिले व परत एकदा मान डोलावली.

सानिन आपल्या खोलीवर परत गेला, मेणबत्त्या न पेटविता तसेच त्याने आपले अंग दिवाणावर झोकून दिले व डोक्यामागे हात ठेवून तो नव्याने ज्ञात झालेल्या प्रेमसंवेदनेच्या आधीन झाला. त्याच्या संवेदनेचे वर्णन करण्याचा प्रयत्न करण्यात अर्थ नाही. ज्याला ती जाणवली आहे त्याला तिची सुस्त मधुरता माहीत आहे. आणि ज्याला कधीही ती जाणवलेली नाही त्याला ती समजावून सांगणे व्यर्थ आहे.

दार उघडले गेले आणि एमिलचे डोके आत डोकावले.

"मी ते आणलंय," दबत्या आवाजात तो म्हणाला. "हे घ्या—उत्तर!" कागदाचे एक चिटोरे त्याने आपल्या डोक्यावर उंच धरले होते.



सानिन ताडदिशी दिवाणावरून उठला व एमिलच्या हातून त्याने पत्र खेचून घेतले. त्याचा भावनावेग एवढा पराकोटीला पोहोचला होता की, तिचा भाऊ असलेल्या ह्या मुलासमोरही आपल्या भावना लपविण्याचा, शिष्टाचार पाळण्याचा विचार इतःपर त्याच्या मनाला शिवत नव्हता. वस्तुतः त्याला जमले असते तर मोठ्या आनंदाने त्याने त्याच्यासमोर मुखवटे धारण केले असते, स्वतःवर नियंत्रण राखले असते.

सानिन खिडकीपाशी गेला व रस्त्यावरील दिव्याच्या उजेडात पत्र वाचू लागला:

"मी तुम्हाला विनंती करते, तुमची विनवणी करते—**उद्या सबंध दिवसभर आमच्याकडं येऊ नका, तुमचं दर्शन देऊ नका.** माझ्यासाठी हे आवश्यक आहे—फार फार आवश्यक आहे. नंतर सर्व काही ठरेल. तुम्ही माझ्या विनंतीला नकार देणार नाही हे मला ठाऊक आहे, कारण...

**"जेम्मा."**

सानिनने पत्र दोनदा वाचले. तिचे हस्ताक्षर त्याला किती गोड, किती भावस्पर्शी सुंदर भासले! नंतर, क्षणभर विचार करून, त्याने एमिलला मोठ्यांदा त्याचे नांव घेऊन हाक मारली. आपण सूज्ञ तरुण आहोत हे दाखविण्यासाठी धडपडणारा एमिल दरम्यान भिंतीकडे तोंड करून उभा होता आणि नखाने भिंत खरवडत होता. सानिनने हाक मारताच तात्काळ तो त्याच्यापाशी धावला.

"काय हुकूम आहे?"

"मित्रा, माझं ऐका! तुम्ही—"

"मस्ये दिमित्री," तक्रारीच्या सुरात एमिलने त्याला मध्येच अडविले, "तुम्ही मला तू का म्हणत नाही?"

सानिन हसला. "ठीक आहे." (एमिलने आनंदाने एक छोटी उडी मारली.) "तर ऐक मित्रा! **तिथं** तू सांगायचं—कुणाला हे तुला माहीत आहे—की; ती जसं म्हणतेय तसंच सगळं घडेल!" (एमिलने ओठ आवळले व गंभीरपणे मान हलविली.) "...आणि तू... उद्या तू काय करतो आहेस?"

"मी? मी काय करावं अशी तुमची इच्छा आहे?"

"जर शक्य असलं तर उद्या सकाळी लौकर माझ्याकडं ये आणि आपण फ्रॅंकफुर्टभोवतालच्या खेड्यात फिरायला जाऊ. आवडेल तुला?"

एमिलने परत आनंदाने उडी मारली. "याहून जास्त छान ते काय? तुमच्याबरोबर फिरायला जायचं – किती मज्जा! अर्थात, मी येईन."

"आणि समज, त्यांनी तुला जाऊ दिलं नाही?"

"देतील!"

"ऐक... सांगू नको... **कुणाला** ते तुला माहीत आहे... की मी तुला सबंध दिवसभर बोलावलंय!"

"कशाला सांगू? मी नुसता बाहेर पडेन! काय बिघडतंय?"

एमिलने सानिनचे मन:पूर्वक चुंबन घेतले आणि तो पळाला.

खूप वेळपर्यंत सानिन खोलीत येरझाऱ्या घालीत राहिला व उशीरा झोपी गेला. पुन्हा एकदा झिणझिण्या आणणाऱ्या मधुर संवेदनांच्या आहारी तो गेला. त्या वेदना अर्ध्या आनंदी, अर्ध्या भीतीच्या होत्या. आपल्यापुढील नव्या जीवनाचा विचार करण्यात तो गढला. दुसऱ्या दिवशी संपूर्ण वेळ एमिलला सांगाती बोलाविण्याचे आपल्याला सुचले ह्याचा सानिनला अत्यंत आनंद झाला. एमिल हुबेहूब आपल्या बहिणीसारखा दिसायचा. "तो मला तिची आठवण करून देत राहील," सानिनने स्वत:ला बजाविले.

पण एक प्रश्न त्याला सतत टोचत राहिला: आजच्यापेक्षा तो काल अंगदी वेगळा माणूस कसा होता? त्याला भासले की, जेम्मावर त्याचे नेहमीच प्रेम होते – आणि आज जसे तिच्यावर तो प्रेम करीत होता, नेमके तसेच नेहमी तो तिच्यावर प्रेम करीत होता.

## २६

दुसऱ्या दिवशी सकाळी आठ वाजता, पट्टा बांधलेल्या तार्तालियाला सांगाती घेऊन, सानिनच्या खोलीच्या दारापाशी एमिल हजर झाला. त्याचे आई-बाप जरी जर्मन असते, तरीसुद्धा याहून अधिक अचूक वेळेवर येणे त्याला शक्य झाले नसते. घरी त्याने खोटे सांगितले होते की, न्याहारीपूर्वी तो सानिनबरोबर फिरायला जाणार होता व नंतर तसाच परस्पर दुकानात कामावर जाणार होता. सानिन पोषाख करीत होता तेव्हा एमिल त्याच्याशी थोडे भीत भीतच बोलत होता. जेम्माविषयी, श्रीमान क्लूबेरबरोबर झालेल्या तिच्या भांडणाविषयी, तो बोलत होता. पण सानिनने कडक मौन पाळले.



ह्या महत्त्वाच्या मुद्द्यावर किंचितही भाष्य का करायचे नाही हे जणू उमजल्याचा आव आणून एमिलने गंभीर मुद्रा धारण केली.

कॉफीपान करून हे दोघे मित्र निघाले – अर्थातच पायी. फ्रॅंकफुर्टपासून फार दूर नसलेल्या, झाडांच्या रायांनी वेढलेल्या, हाऊझेन नांवाच्या छोट्या खेड्याकडे ते निघाले होते. ताऊनुस पर्वताची पूर्ण रांग इथून दिसायची. दिवस सुरेख होता. सूर्य प्रकाशत होता, त्यांना ऊब देत होता, पण भाजून काढत नव्हता. हिरव्या पानांमधून ताज्या हवेची झुळूक मजेने सळसळत होती. उंच आकाशातील फुगीर ढगांच्या जमिनीवर छोट्या सावल्या पडल्या होत्या. त्या सावल्या झरझर पुढे धावत होत्या. त्या दोघा तरुणांनी लौकरच शहराला मागे टाकले. सपाट, नीटस रस्त्यावरून झपझप पावले टाकीत मोठ्या मजेत ते चालले होते. थोडा वेळ एका राईमध्ये ते भटकले. नंतर खेड्यातील एका खाणावळीत भरपूर जेवले. नंतर डोंगरावर चढले, तेथून देखाव्याचा आनंद त्यांनी लुटला, उतारावरून छोटे गोटे गडगडत सोडले, त्या गोट्यांच्या ससांसारख्या गंमतीदार उड्या पाहून मजेने टाळ्या पिटल्या. शेवटी खालून जाणाऱ्या एका अदृश्य वाटसरूने खणखणीत आवाजात त्यांना शिव्या मोजल्या तेव्हा त्यांनी तो खेळ थांबविला. नंतर खुरट्या, वाळलेल्या, जांभळट-पिवळ्या शेवाळावर ते पडून राहिले. नंतर दुसऱ्या एका गुत्त्यात जाऊन बीयर प्यायले. मग त्यांनी धावण्याच्या शर्यती लावल्या व लांब उडीच्या एकमेकांशी स्पर्धा केल्या. एके ठिकाणी त्यांना प्रतिध्वनी सापडला व मग त्याच्याबरोबर गाऊन आणि आरोळ्या ठोकून त्यांनी गप्पा मारल्या. मग त्यांनी कुस्त्या केल्या, डहाळ्या तोडल्या, आपल्या टोप्यांवर तुरे खोवले आणि नाचसुद्धा केला. तार्तालियाने ह्या सर्व उद्योगांमध्ये आपल्या परीने शक्य होता तेवढा भाग घेतला. एवढे खरे की त्याने गोटे फेकले नाहीत, पण तो त्यांच्या मागोमाग गडगडत गेला; तरुण पुरुष गात होते तेव्हा केकाटला; आणि तोंड वाकडे करीत बीयरसुद्धा प्यायला. एके काळी ज्याच्या तो मालकीचा होता त्या तरुण विद्यार्थ्याने त्याला ही कला शिकविली होती. एमिलचे तो फारसे ऐकत नसे, पण आपला मालक पान्तालीओनेचे मात्र तो ऐकायचा. जेव्हा एमिल त्याला "बोलायची" किंवा "शिंकायची" आज्ञा करायचा तेव्हा फक्त तो आपली शेपूट हलवायचा आणि टोकांशी आत वळलेली जीभ तोंडातून लोंबती ठेवायचा.

त्या दोघा तरुणांना बोलायला खूप विषय सापडले. वयाने मोठा आणि म्हणून अधिक सुजाण ह्या नात्याने, फिरण्याच्या आरंभी सानिनने fatum

अथवा ईश्वरी संकेताचा विषय सुरू केला. माणसाच्या जीवितव्यवसायाचे महत्त्व आणि स्वरूप, तो कसा बनतो, वगैरेवर तो बोलू लागला. पण लौकरच संभाषणाला कमी गंभीर वळण लागले. आपल्या मित्राला आणि रक्षणकर्त्याला रशियाबद्दल प्रश्न विचारण्यास एमिलने आरंभ केला. तेथे द्वंद्वयुद्धे कशी खेळली जात आहेत, तेथील स्त्रिया सुंदर आहेत का, रशियन शिकायला खूप वेळ लागतो का आणि अंमलदाराने सानिनवर नेम धरला तेव्हा सानिनला काय वाटले होते, इत्यादी प्रश्न एमिलने विचारले. याउलट सानिनने एमिलच्या आई-वडिलांची चौकशी केली, एकूण कौटुंबिक परिस्थितीची चौकशी केली. मात्र जेम्माचा नांवाने उल्लेख न करण्याचा कसून प्रयत्न केला. त्याचे मन मात्र जेम्माशिवाय इतर कोणत्याही विषयावर स्थिरावत नव्हते. खरे सांगायचे म्हणजे नेमका तिचा विचार त्याच्या मनात नव्हता, तर दुसऱ्या दिवसाचा, त्याला अभूतपूर्व आणि अमाप आनंदाचा लाभ करून देणाऱ्या गूढ उद्याचा विचार त्याच्या डोक्यात खेळत होता. अधूनमधून त्याच्या अंतःचक्षूंसमोर एक पातळ, झिरझिरीत पडदा ओढला जात होता आणि त्या पडद्याच्या दुसऱ्या बाजूस... एक तरुण, स्तब्ध, देवदूतासमान चेहरा असल्याचा भास होत होता... त्याच्या ओठांवर नाजुक स्मित होते आणि पापण्या खोट्याच कठोरतेने खाली झुकविलेल्या होत्या. आणि हा चेहरा जेम्माचा नव्हता, तर साक्षात सुखाचा चेहरा होता. अखेरीस त्याची घटका भरली, पडदा वर गेला, ओठ विलगले, पापण्या वर झाल्या—ईश्वरी देवतेने त्याला पाहिले—आणि आता फक्त सूर्याचे तेज होते, अमाप आनंद आणि उन्माद होता. ह्या घटकेचा, ह्या उद्याच्या दिवसाचा जेव्हा त्याने विचार केला तेव्हा त्या आनंदाच्या नुसत्या कल्पनेने, सतत वाढत जाणाऱ्या अपेक्षेच्या आसुसत्या रोमांचकतेने त्याच्या काळजाचा ठोका चुकल्याचा भास होत होता.

आणि ही अपेक्षा, हे आसुसलेपण, दुसऱ्या कशालाही अडथळा आणीत नव्हते. त्याच्या प्रत्येक हालचालीत त्याची सोबत करीत होते, त्याच्या वाटेमध्ये कधीही आडवे येत नव्हते. एमिलबरोबर आणखी एका खाणावळीत झकास जेवण झोडायला त्यांनी त्याला प्रतिबंध केला नाही. मात्र मधून मधून विद्युल्लतेप्रमाणे त्याच्या मनात विचार चमकून जात होता—जगात हे जर कुणाला आधी समजले असते? जेवणानंतर एमिलबरोबर बेडुकउड्या खेळण्यात त्याच्या आसुसलेपणाने मुळीच अडथळा आणला नाही. एका विस्तीर्ण हिरव्या कुरणात ते खेळत होते... आपले पाय फाकून एखाद्या



पक्ष्याप्रमाणे एमिलच्या पाठीवरून सानिन झेपावत होता, जोडीला तार्तालियाचे जोरदार भुंकणे चालू होते व अशा वेळी कुरणाच्या एका टोकाला दोन अंमलदार सानिनच्या दृष्टीस पडले आणि तो कमालीचा गोंधळला. एक कालचा त्याचा प्रतिस्पर्धी होता व दुसरा त्याचा साहाय्यक होता हे सानिनने तात्काळ ओळखले: श्रीमान व्हॉन डॉनहॉफ आणि श्रीमान व्हॉन रिख्तेर. प्रत्येकाने आपल्या एका डोळ्यावर चापाचा चष्मा लावला होता व त्या चष्म्यातुन पहात प्रत्येकजण हसत होता... सानिन पायांवर सरळ उभा झाला, मागे फिरून त्याने घाईघाईने आपला कोट अंगात चढविला आणि एमिलला आज्ञार्थी शब्द उच्चारला. दुसऱ्यानेही तात्काळ आपला कोट चढविला आणि दोघे वेगाने तेथून निघून गेले.

फ्रँकफुर्टला ते उशीरा परतले.

"घरी मला रागावणार," सानिनचा निरोप घेताना एमिल म्हणाला. "पण मला त्याची पर्वा नाही. माझा दिवस खूप खूप छान गेला!"

सानिन जेव्हा पथिकाश्रमात परतला तेव्हा जेम्माचे पत्र त्याची वाट पहात होते. दुसऱ्या दिवशी सकाळी सात वाजता, फ्रँकफुर्टमधील अनेक उद्यानांपैकी एका सार्वजनिक उद्यानात तिने भेट ठरविली होती.

त्याचे काळीज लकाकले! तिची आज्ञा पूर्ण पाळल्याबद्दल त्याला आनंद वाटला. देवा रे देवा, ही अतर्क्य, अभूतपूर्व, अशक्य आणि अटळ उद्या त्याला कसले आश्वासन देत होती... कोणती आश्वासने तिच्यात नव्हती!

जेम्माचे पत्र त्याने डोळ्यांनी बारकाईने न्याहाळले. कागदाच्या अखेरीस G ह्या अक्षराला तिने दिलेल्या झोकदार वळणामुळे त्याला तिच्या सुंदर बोटांची, तिच्या सुरेख हाताची आठवण झाली... आपल्या ओठांनी ह्या हाताला आपण कधीच स्पर्श न केल्याचे त्याला आठवले... त्याच्या मनात विचार तरळला: "इटलीच्या बायकांबद्दल म्हणतात ते खरं नाही; त्या नम्र आणि काटेकोर वागतात... विशेषतः जेम्मा. ती राणी आहे, देवता आहे... संगमरवरासारखी विशुद्ध आणि अनघ..."

पण वेळ येईल आणि ती वेळ आता फारशी दूर राहिली नाही...

फ्रँकफुर्टमध्ये त्या रात्री एक माणूस सुखी होता... त्याला झोप लागली, पण एका कवीच्या शब्दांमध्ये तो सांगू शकला असता:

मी झोपलोय... पण जागता पहारा देणारं
माझं काळीज झोपत नाहीय्...[48]

उन्हाळी सूर्याच्या किरणांखालील फुलावर विसावणाऱ्या पतंगाच्या पंखा-प्रमाणे ते हलकेच थरथरत होते.

## २७

सकाळी पाच वाजताच सानिन उठला. सहाच्या दरम्यान पोषाख करून तो तयार झाला आणि साडे-सहा वाजता, जेम्माने आपल्या पत्रात नमूद केलेल्या उद्यानामधील छोटया ग्रीष्म-वाटिकेसमोर तो येरझाऱ्या घालीत होता.

ती सकाळ स्तब्ध, गरम आणि ढगाळ होती. कोणत्याही क्षणी पाऊस कोसळेल असे वारंवार वाटत होते. पण हात पुढे धरला तर ओलसरपणा जाणवत नव्हता. बारकाईने जर कोटाची बाही निरखली तर छोटया मण्यां-प्रमाणे थेंबांच्या हलक्या खुणा आढळत होत्या. ती हलकी बुरबुरही लौकरच थांबली. वारा नांवाची वस्तू जगात कधी नव्हतीच असे एखाद्याने म्हटले असते. आवाज प्रवास करीत नव्हता, तर हवेत ओठगून राहिला होता. दूर अंतरावर पांढुरके धुके दिसत होते. वातावरणात फुलांचा सुवास दरवळला होता.

दुकाने अद्याप बंद होती, पण पादचारी तुरळक दिसू लागले होते. अधूनमधून रस्त्यावरून जाणाऱ्या एखाद-दुसऱ्या घोडागाडीच्या चाकांचा खडखडाट ऐकू येत होता... उद्यानात कुणीही भटकत नव्हते. एक माळी सावकाशपणे आपल्या फावड्याने पाऊलवाट स्वच्छ करीत होता. काळ्या कापडाचा अंगरखा घातलेली एक पांगळी म्हातारी बाई पाऊलवाटेवरून लंगडत लंगडत गेली. त्या जराग्रस्त प्राण्याला पाहून सानिनला क्षणभरही जेम्मा आल्याचा भास झाला नाही, तरीही त्याच्या काळजाची धडधड वाढली व तो काळा ठिपका पार दृष्टीआड होईपर्यंत तो निरखीत राहिला.

सात. चर्चच्या मनोऱ्यावरील घड्याळाने टोले दिले.

सानिन स्तब्ध उभा राहिला. ती येत नाही असे तर घडणार नाही ना? त्याच्या सर्व अवयवांमधून एक थंड शहारा गेला. तसाच एक शहारा एका क्षणानंतर त्याने परत अनुभवला. पण कारण अगदी वेगळे होते— सानिनला आपल्या पाठीशी हलकी पावले वाजलेली ऐकू आली, एका स्त्रीचा पोषाख हलकेच सळसळला... तो वळला—ती आली होती!

पाऊलवाटेवरून जेम्मा त्याच्या मागील दिशेने येत होती. तिने राखी अंगरखा घातला होता व छोटी काळी टोपी तिच्या डोक्यावर होती. तिने



वर पाहून त्याच्याकडे एक कटाक्ष टाकला, आपले डोके बाजूला वळविले आणि जेव्हा ती त्याच्यापाशी पोहोचली तेव्हा वेगाने त्याच्या शेजारून ती पुढे चालत गेली.

"जेम्मा!" ऐकू येईल न येईल अशा स्वरात त्याने हाक मारली.

तिने मानेला किंचित झटका दिला व ती पुढे चालत राहिली. तो तिच्या पाठोपाठ निघाला.

त्याचा श्वास जड येत होता. त्याचे पाय त्याच्या आज्ञा पाळत नव्हते.

ग्रीष्म-वाटिकेवरून जेम्मा पुढे गेली, उजवीकडे वळली, एकच चिमणी पाण्यामध्ये आपले पंख फडफडवीत असलेल्या एका छोटया, उथळ कारंजाला तिने ओलांडले, उंच फुलझाडांच्या झुबक्यामागे ती गेली व एका बाकावर धपकन बसली. तो छान सोयीस्कर आडोसा होता. सानिन तिच्याशेजारी बसला.

एक मिनिट सरले तरी दोघांपैकी कुणीही बोलले नाही. तिने तर त्याच्याकडे साधा दृष्टिक्षेपही टाकला नाही आणि तो तिच्या चेहऱ्याकडे पाहता, एका छोटया छत्रीवर घडी घातलेल्या तिच्या हातांकडे पहात होता. बोलण्यासारखे काय होते? एवढ्या भल्या सकाळी, एकांतात, एकमेकांना एवढे चिकटून ती दोघे बसली होती, ही वस्तुस्थितीच कुठल्याही शब्दांपेक्षा जास्त सूचक होती.

"तुम्ही... माझ्यावर रागावलात?" अखेरीस सानिन कसाबसा बोलला.

याहून अधिक मूर्खपणाचे तो बोलू शकला नसता आणि याची त्याला चांगली जाणीव होती... पण निदान शांतता तर भंगली होती.

"तुमच्यावर रागावलेय?" तिने विचारले. "कशाबद्दल? मुळीच नाही."

"आणि तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवता?" त्याने पुढे विचारले.

"म्हणजे तुम्ही पत्रात जे म्हटलंय त्याच्यावर?"

"हो."

जेम्माने मान खाली घातली व ती काहीच बोलली नाही. तिच्या-हातांमधून छत्री निसटली. पण छत्री खाली पडण्याआधीच चपळाईने तिने पकडली.

"माझ्यावर विश्वास ठेवा! तुम्हाला मी जे लिहिलंय त्यावर विश्वास ठेवा!" सानिन उद्गारला. त्याचा सगळा भित्रेपणा अचानक नाहीसा झाला होता आणि आता तो तळमळून बोलत होता. "जगात जर सत्य

नांवाची एखादी वस्तू असेल, पवित्र, अखंडनीय सत्य – तर ती म्हणजे मी तुमच्यावर प्रेम करतो. जेम्मा, माझं तुमच्यावर अत्यंत प्रेम आहे!"

तिने क्षणभर त्याच्याकडे तिरपा कटाक्ष टाकला आणि परत एकदा छत्री तिच्या हातून निसटली.

"माझ्यावर विश्वास ठेवा, विश्वास ठेवा!" तिच्यासमोर हात पसरीत त्याने विनविले. पण तिला स्पर्श करण्याचा धीर मात्र त्याला झाला नाही. "कशी मी तुमची खात्री पटवू?"

तिने परत त्याच्याकडे कटाक्ष टाकला.

"मस्ये दिमित्री, मला सांगा," ती म्हणाली. "त्या दिवशी तुम्ही माझं मन वळवायला आलात, तेव्हाही तुम्हाला माहीत नव्हतं... जाणवलं नव्हतं..."

"मला जाणवलं होतं," अधीरपणे सानिन उद्गारला, "पण मला माहीत नव्हतं. माझ्या डोळ्यांनी ज्या क्षणी तुम्हाला पाहिलं तेव्हापासूनच माझं तुमच्यावर प्रेम जडलं होतं, पण तुम्ही माझ्या दृष्टीनं कोण बनला आहात, याची चटकन मला जाणीव झाली नव्हती. शिवाय... तुमचा विवाह ठरल्याचं मी ऐकलं होतं... आता तुमच्या आईच्या विनंतीबद्दल बोलायचं, तर पहिली गोष्ट म्हणजे, मी तिला नकार कसा देणार? आणि दुसरी गोष्ट म्हणजे, मला असं वाटतंय तुम्ही तर्क करू शकाल **अशा रीतीनं** तुमच्या आईची विनंती मी पूर्ण केलीय..."

धपधप पावले वाजली आणि तरटाची पिशवी खांद्याला अडकवलेला एक धिप्पाड माणूस, बहुधा परदेशी, झुडुपांमागून अवतरला. बाकावर बसलेल्या ह्या जोडप्याकडे त्याने तिऱ्हाईत प्रवाशाच्या बेमुर्वत नजरेने पाहिले, तो मोठ्यांदा खोकला आणि आपल्या वाटेने पुढे निघून गेला.

"तुमच्या आईनं," अवजड पावलांचा आवाज नाहीसा होताच सानिन म्हणाला, "मला सांगितलं की तुमचा नकार लोकापवादाला कारण ठरील" (जेम्माला आपल्या कपाळाला किंचित आठ्या घातल्या), "शिवाय माझ्या कृतीनं मी अप्रिय चर्चेला विशिष्ट मर्यादेपर्यंत कारण दिलं होतं... आणि परिणामी... तुमच्या भावी पतीला, श्रीमान क्लूबेरना, तुम्ही नकार देऊ नये म्हणून तुमचं मन वळवणं ही काही अंशी माझी जबाबदारी होऊन बसली होती."

"मस्ये दिमित्री," सानिन ज्या बाजूला होता त्या बाजूच्या आपल्या केसांवर हात फिरवीत जेम्मा म्हणाली, "श्रीमान क्लूबेरना माझे भावी पती



म्हणून संबोधायचं कृपया थांबवा. मी त्यांची पत्नी कधीही होणार नाही. मी त्यांना नकार दिलाय."

"नकार दिला? केव्हा?"

"काल."

"त्यांच्या तोंडावर?"

"त्यांच्या तोंडावर. आमच्या घरी. आम्हाला भेटायला ते आले होते."

"जेम्मा! याचा अर्थ तुमचं माझ्यावर प्रेम आहे?"

ती त्याच्याकडे वळली.

"तसं नसतं तर मी ही अशी आले असते का?" बाकावर आपले हात सोडीत ती अस्फुट बोलली.

पंजे वर करून बाकावर पडलेल्या त्या अगतिक हातांना सानिनने धरले, आपल्या डोळ्यांना लावले, ओठांशी धरले... आणि काल त्याच्यासमोर फडफडणारा पडदा आता दूर झाला. त्याचे सुख समोर होते, हीच ती तेजस्वी मुद्रा होती!

जेम्माकडे थेट, धीट नजरेने पाहण्यासाठी त्याने आपले डोके वर उचलले. तिने त्याच्या दृष्टीला आपली दृष्टी भिडविली. ती किंचित अधोवदना होती. झुकवलेल्या पापण्यांआड तिचे डोळे आनंदाश्रूंनी चमकत होते. तिच्या मुद्रेवर केवळ स्मित नव्हते, तर आनंदी मूक हसू होते.

तिला आपल्या छातीशी धरण्याचा त्याने किंचित प्रयत्न केला, पण तसेच मूक हास्य करीत ती मागे सरली व त्याच्याकडे पाहून तिने मान हलविली. "थांब!" तिचे आनंदी डोळे जणू म्हणत होते.

"ओह्, जेम्मा!" सानिन एकदम ओरडला. "माझ्यावर तू प्रेम करशील" (त्याच्या ओठांवाटे तिला उद्देशून "तू" असा शब्द बाहेर पडला तेव्हा त्याच्या हृदयाच्या तारा झणझणल्या), "असं कधी तरी वाटणं मला शक्य होतं का?"

"मी स्वतःसुद्धा कधी अशी अपेक्षा धरली नव्हती," जेम्मा हळूच म्हणाली.

"ज्या फ्रँकफुर्टमध्ये केवळ एक-दोन तास घालविण्याच्या हेतूनं मी आलो होतो," सानिन पुढे बोलत राहिला, "तिथं माझ्या सबंध जीवनाचा आनंद मला गवसेल, असं कधी वाटणं मला शक्य होतं का?"

"तुमच्या संपूर्ण जीवनाचा? खरं, अगदी खरं?" जेम्माने विचारले.

"सबंध जीवन, कायमचं आणि सदाचं!" नव्या उत्साहाने सानिन उद्गारला.

त्यांच्या बाकापासून अवघ्या दोन पावले अंतरावर माळ्याचे फावडे अचानक खरडल्याचा आवाज झाला.

"घरी जाऊ या," जेम्मा पुटपुटली. "एकत्र – तुझी इच्छा आहे?"

त्या क्षणी जर त्याला ती म्हणाली असती: "समुद्रात उडी टाक – **तुझी इच्छा आहे**?" तर तिचे वाक्य पूर्ण होण्याच्या आतच त्याने खोल पाण्यात सूर मारला असता.

ती दोघे उद्यानामधून एकत्र बाहेर पडली. शहर टाळून आणि उपनगरातील निवांत रस्ते निवडून, त्यांनी आपला मोर्चा घराकडे वळविला.

२८

सानिन जेम्माच्या बरोबरीने चालत होता. अधूनमधून तो काही पावले मागे रहात होता, तिच्यावरून आपली नजर कधीही ढळवीत नव्हता. सारा वेळ त्याच्या मुखावर स्मित खेळत होते. आणि तिला जरी घाई असल्याचे भासत होते, तरी अचानकपणे ती थांबत होती. खरे सांगायचे तर ती दोघे स्वप्नात असल्याप्रमाणे चालत होती. त्याचा चेहरा फिका पडला होता, तर भावनावेगामुळे तिचा चेहरा गुलाबी बनला होता. काही क्षणांपूर्वी त्या दोघांच्या मनांनी एकमेकांसमोर पत्करलेली शरणागती खूप उचंबळून टाकणारी होती, खूप नवी होती, खूप धास्तावणारी होती. त्यांची पूर्ण आयुष्ये एवढ्या आकस्मिकपणे पालटून गेली होती की, त्या दोघांपैकी कुणीही अद्याप सावरले नव्हते. त्यांना एवढेच माहीत होते की, त्या रात्री त्यांना एकमेकांच्या मिठीत अडकविणाऱ्या झंझावातासारख्या एका झंझावातात ती आता सापडली होती. चालत असताना सानिनला जाणवले की, जणू तो जेम्माला एका नव्या रूपात पहात होता. तिच्या चालीमधील, तिच्या हालचालींमधील विशिष्ट लकबी अवघ्या एका क्षणात त्याच्या ध्यानात आल्या. किती अपार प्रिय व गोड होत्या त्या! आणि तिलासुद्धा जाणवले की, तो तिच्याकडे **वेगळ्या दृष्टीने** पहात होता.

ती दोघेसुद्धा प्रथमच प्रेमात पडली होती. पहिल्या प्रेमाचे सर्व चमत्कार त्यांच्यात घडत होते. पहिले प्रेम हे क्रांतीसारखे असते. दैनंदिन जीवनाची चाकोरी एका क्षणात मोडून नष्ट होते. यौवन अडथळ्यांसमोर उभे ठाकते. त्याची तेजस्वी ध्वजा त्या अडथळ्यांवर उंच फडकत असते. मृत्यू किंवा नवे जीवन यांपैकी नशीबात जे काही असेल त्याचे उत्साहाने स्वागत करायला ते सज्ज असते.



"कोण? आपला म्हातारा तर नव्हे?" त्यांच्या पलिकडून घाईघाईने जाणाऱ्या, त्यांच्या ध्यानी येऊ नये अशी जणू धडपड करणाऱ्या, मफलरमध्ये चेहरा गुंडाळलेल्या एका व्यक्तीकडे बोट दाखवीत सानिन उद्गारला. अत्यानंदाच्या त्या मन:स्थितीत जेम्माशी काहीतरी वेगळ्याच विषयावर बोलण्याची गरज सानिनला जाणवली. मात्र प्रेमाबद्दल नव्हे. ते सर्व निश्चित झाले होते, तो विषय पवित्र होता.

"होय, तो पान्तालीओने आहे," मजेने आणि आनंदाने जेम्मा उत्तरली. "त्यानं बहुधा माझा घरापासून पाठलाग केला. कालसुद्धा सबंध दिवस तो माझा पाठलाग करत होता... तो तर्कानं जाणतो."

"तो तर्कानं जाणतो!" आनंदून सानिनने तिचेच शब्द परत उच्चारले. जेम्माच्या तोंडून उमटलेल्या कोणत्या गोष्टींनी त्याला आनंद झाला नसता?

आदल्या दिवशी काय घडले त्याचा तपशीलवार वृत्तांत सांगण्याची नंतर त्याने जेम्माला विनंती केली.

तिने तात्काळ घाईघाईने, गोंधळल्या मन:स्थितीत कथन केले. मधून मधून ती स्मित करीत होती, उसासे टाकीत होती, सानिनबरोबर जलद तेजस्वी कटाक्षांची देवघेव करीत होती. दोन दिवसांपूर्वीच्या संभाषणानंतर तिच्या आईने तिच्यापासून ठाम आश्वासन मिळविण्याचा कसा प्रयत्न केला होता, एक दिवसाचा अवधी मागून फ्राऊ लेनोरेला तिने कसे दूर राखले होते, निर्णय लांबणीवर टाकण्याचा आग्रह तिने कसा धरला व त्या कामी किती सायास पडले, श्रीमान क्लूबेर अचानकपणे कसा आला होता, त्याचा पोषाख नेहमीपेक्षाही कसा अधिक कडक आणि टापटिपीचा होता, परक्या रशियनाच्या अक्षम्य पोरकट वर्तनाचा त्याला आलेला संताप त्याने कसा व्यक्त केला होता, हे तिने सानिनला सांगितले. "**तुझं द्वंद्व** त्याला, श्रीमान क्लूबेरला, अत्यंत अपमान करणारं वाटलं (हे शब्द त्याचेच) आणि **तुला** घरात प्रवेश देऊ नये अशी त्यानं मागणी केली. कारण," इथे जेम्माने क्लूबेरच्या वर्तनाची आणि आवाजाची सूक्ष्म नक्कल केली, "'त्यामुळं माझ्या कीर्तीवर कलंक लागतोय. जणू काही मी माझ्या स्वत:च्या वाग्दत्त पत्नीच्या रक्षणास असमर्थ ठरलो, जर हे आवश्यक किंवा फायद्याचं वाटलं असतं तर! उद्या सगळ्या फ्रँकफुर्टला माहीत होईल की, माझ्या भावी पत्नीसाठी एक परका माणूस अंमलदाराबरोबर लढला – अशी गोष्ट कधी कुणी ऐकलीय! माझ्या कीर्तीवर हा कलंक आहे.' आणि आश्चर्य म्हणजे माझी आई त्याच्याशी सहमत झाली. पण मी ताबडतोब त्याला सांगून

टाकलं की, त्याच्या कीर्तीची त्यानं काळजी करू नये आणि त्याच्या भावी पत्नीबद्दलच्या चर्चेचा त्यानं अपमान वाटून घेऊ नये, कारण इतःपर मी त्याची वाग्दत्त पत्नी नाही आणि त्याची बायको कधीही होणार नाही. त्याच्याशी संबंध कायमचे तोडून टाकण्यापूर्वी तुमच्याशी... तुझ्याशी, मी बोलायला हवं होतं हे मान्य करते, पण तो अचानक आला... आणि माझा स्वतःवर ताबा राहिला नाही. आईने तर घाबरून किंकाळी फोडली, पण मी दुसऱ्या खोलीत गेले आणि त्याची अंगठी आणून त्याला परत दिली. तुझं लक्ष नव्हतं – दोन दिवसांपूर्वीच ती अंगठी मी बोटातून काढून टाकली होती. त्याला कमालीचा अपमान वाटला. पण तो इतका पोकळ आणि गर्विष्ठ आहे की, फारसे न बोलता सरळ निघून गेला. अर्थात आईची खूप बोलणी मला सहन करावी लागली. तिला झालेलं दुःख पाहून मला खूप वाईट वाटलं आणि माझ्याकडून थोडी घाई झाली असंही वाटलं. पण माझ्यापाशी तुझं पत्र होतं आणि त्याहीपूर्वी मला ठाऊक होतं..."

"की मी तुझ्यावर प्रेम करत आहे," सानिनने घाईघाईने तिचे वाक्य पूर्ण केले.

"होय... की तू माझ्यावर प्रेम करत आहेस."

आपल्या कथनाचा धागा सोडून जेम्मा बडबडत राहिली. तिचा चेहरा स्मिताने फुलला होता, आपला आवाज ती खाली करीत होती व कुणी जवळ आले अथवा जवळून गेले तर एकदम थांबत होती. उन्मन अवस्थेत सानिन तिचे बोलणे ऐकत होता. आदल्या दिवशी तिच्या हस्ताक्षराचे जसे तो कौतुक करीत बसला होता, तसेच आता तो तिच्या आवाजाच्या ध्वनीचे कौतुक करीत होता.

"आई फार अस्वस्थ झालीय," जेम्मा म्हणाली. तिचे शब्द घाई-गडबडीने उमटत होते. "श्रीमान क्लूबेर मला आवडत नाही, प्रेमापोटी मी त्याच्याशी लग्न ठरवलं नव्हतं तर तिनं माझ्यामागं सारखा लकडा लावला होता म्हणून मी होकार दिला होता, ही वस्तुस्थिती तिच्या डोक्यातच शिरत नाही... तिला संशय आहे... तुम्ही... तू ... स्पष्ट सांगायचं तर मी तुझ्या प्रेमात पडलेय हे तिला खात्रीनं समजलंय आणि तिच्या दृष्टीनं सर्वांत वाईट म्हणजे त्या दिवशी ही कल्पना तिच्या डोक्यातच आली नाही आणि माझं मन वळविण्याचा तिनं तुला आग्रह केला... किती विचित्र मागणी होती, नाही का? आता तुला ती कावेबाज कारस्थानी



म्हणते, तिच्या विश्वासाचा तू गैरफायदा घेतलास असं म्हणते आणि मला-सुद्धा तू फसवशील असा मला इशारा देते..."

"पण जेम्मा," सानिन ओरडला, "तू तिला सांगितलं नाहीस..."

"मी तिला काहीही सांगितलं नाही. तुझ्याशी बोलण्यापूर्वी तसं करण्याचा मला काय अधिकार होता?"

सानिनने आपले हात उडविले.

"मला वाटतं जेम्मा, निदान आता तरी तिला तू सगळं सांगशील आणि मला तिच्यापाशी घेऊन जाशील... मी फसवा नाही हे मला तुझ्या आईसमोर सिद्ध करायचंय."

अंतर्यामी उदार, प्रामाणिक भावना उचंबळून आल्यामुळे सानिनची छाती खाली-वर झाली.

जेम्मा विस्फारल्या डोळ्यांनी त्याच्याकडे टक लावून पहात होती. "आत्ता माझ्याबरोबर आईकडं जायची तुझी इच्छा आहे असं तुला म्हणायचंय? आईपाशी? जी म्हणतेय... आपल्यामध्ये काहीही असू शकणार नाही – त्यातून कधीच काही निष्पन्न होणार नाही!" असा एक शब्द होता जो जेम्मा उच्चारू शकली नाही... तो शब्द तिचे ओठ भाजत होता असे भासले. पण हे जाणून, तो शब्द उच्चारण्याचे अतीव सुख सानिनने अनुभवले.

"तुझ्याशी लग्न करणं, जेम्मा, तुझा नवरा होणं, याहून अधिक भाग्याची दुसरी गोष्ट माझ्या कल्पनेत येत नाही."

त्याच्या प्रेमाला, औदार्याला, निर्धाराला इतःपर कोणत्याही मर्यादा राहिल्या नव्हत्या.

जेव्हा तो हे बोलला, तेव्हा क्षणभर स्तब्ध उभी असलेली जेम्मा पूर्वीपेक्षाही भरभर चालू लागली... ह्या प्रचंड, अनपेक्षित सुखापासून पळण्याची तिची इच्छा असावी असे भासत होते. जणू त्या सुखाचा भार तिला असह्य होत होता.

पण अचानक तिचे पाय थरथरले. पुढील कोपऱ्याच्या वळणावरून, अवघ्या काही पावलांच्या अंतरावर, नवी टोपी आणि नवा कोट परिधान केलेला, बाणासारखा ताठ व छोट्या केसाळ कुत्र्याप्रमाणे कुरळ्या केसांचा श्रीमान क्लूबेर अवतीर्ण झाला. प्रथम जेम्मा आणि नंतर सानिन दृष्टीस पडताच त्याने आतल्या आत तुच्छतादर्शक चीत्कार काढल्याचे जाणवले, आपली डौलदार आकृती त्याने अधिक मागे झुकविली आणि अक्कडबाजपणे

तो त्यांच्या दिशेने येऊ लागला. सानिन क्षणभर दचकला, पण क्लूबेरचा चेहरा पाहताच – त्यावर तुच्छ आश्चर्याचा आणि करुणेचाही भाव आणण्याचा क्लूबेरने प्रयत्न केला होता – त्याच्या गुलाबी, सामान्य मुद्रेवर कटाक्ष टाकताच, अचानक सानिनच्या शरीरातून संतापाची लाट उसळली व त्याने पाऊल पुढे टाकले.

जेम्माने त्याचा दंड धरला, शांत निर्धाराने त्याच्या हातामध्ये आपला हात गुंफला व आपल्या पूर्वीच्या वाग्दत्त पतीच्या चेहऱ्यावर थेट नजर लावली... क्लूबेरने आपले डोळे किलकिले केले; जणू तो स्वतःमध्ये संकोचून गेल्याचे भासले. वाटेतून बाजूला होत दात आवळून तो पुटपुटला –

"गाण्याची ठरीव अखेर!" (Das alte Ende vom Liede!), मग त्याच अक्कडबाजपणे झपझप पावले टाकीत निघून गेला.

"तो हरामखोर काय म्हणाला?" सानिनने विचारले. क्लूबेरच्या पाठोपाठ धावण्याच्या पवित्र्यात तो सज्ज होता. पण जेम्माने त्याला धरून ठेवले आणि पुढे चालायला भाग पाडले. तिचा हात अजूनही त्याच्या हातात गुंफलेला होता.

दूरवर रोझेल्लीचे दुकान दिसू लागले. जेम्मा परत थांबली.

"दिमित्री, मस्ये दिमित्री," ती म्हणाली. "आपण अजून तिथं गेलेलो नाही, आपण अजून आईला भेटलेलो नाही... जर विचार करायला तुम्हाला अजून अवधी हवा असेल, जर... तुम्ही अजूनही मुक्त आहात, दिमित्री."

उत्तरादाखल सानिनने केवळ तिचा हात आपल्या छातीवर गच्च दाबला आणि तिला पुढे खेचले.

"आई," फ्राऊ लेनोरे ज्या खोलीत बसली होती तेथे सानिनबरोबर जात जेम्मा म्हणाली, "मी तुझ्यापाशी अस्सल घेऊन आल्येय!"

२९

जेम्माने जरी जाहीर केले असते की, आपल्याबरोबर ती कॉलरा अथवा खुद्द मृत्यूला घेऊन आली होती, तरी फ्राऊ लेनोरेने ही बातमी त्याहून अधिक निराशेने ऐकली नसती. ती एका कोपऱ्यात तात्काळ भिंतीकडे तोंड करून मटकन खाली बसली. तिला रडू कोसळले. हेल काढून ती विव्हळू लागली. रशियन शेतकरी बाई जशी आपल्या नवऱ्याच्या अथवा मुलाच्या शवपेटी-



पाशी बसून विव्हळते, अगदी तश्शी. क्षणभर जेम्मा इतकी गांगरली की, आपल्या आईपाशी न जाता तेथेच खोलीच्या मध्यभागी थबकून उभी राहिली. सानिनचा तर स्वतःवरचा ताबा पुरता सुटला होता व तो स्वतःच रडायच्या बेतात होता. सांत्वन करण्यास अशक्य ठरलेले ते रडणे एक तासभर चालले - आख्खा तास! दुकानाचे रस्त्याकडील दार बंद करावे, म्हणजे कुणी तिऱ्हाईत तेथे येणार नाही, असा पान्तालीओनेने निर्णय घेतला. सुदैवाने अजून खूप सकाळची वेळ होती. म्हातारा स्वतः चकित झाला होता. जेम्मा आणि सानिन यांनी दाखविलेली घाई त्याला मान्य होत नव्हती, पण त्याचे हृदय त्यांच्यावर टीका करण्यासही राजी नव्हते. उलट त्यांना गरज पडली तर आपले संरक्षण देण्यास तो सज्ज होता, एवढा त्याला क्लूबेरचा तिटकारा होता. एमिल स्वतःला आपल्या मित्रामधील आणि बहिणीमधील दुवा समजत होता व सर्व काही उत्तम पार पडल्याबद्दल त्याला मनातल्या मनात अभिमान वाटत होता. फ्राऊ लेनोरे ह्या गोष्टीचे एवढे वाईट का वाटून घेत होती हे त्याला समजत नव्हते आणि बायका अविचारी असतात अशा तात्काळ निष्कर्षाला येऊन तो पोहोचला होता. सानिनची अवस्था सर्वात वाईट होती. जेव्हा जेव्हा तो फ्राऊ लेनोरेच्या जवळ जाई तेव्हा तेव्हा तिचा विव्हळण्याचा सूर उंचावे व आपल्या हातांनी ती त्याला दूर सारी. आदबशीर अंतर राखून सानिन अनेकदा मोठ्यांदा ओरडला: "तुमच्या मुलीला मागणी घालायला मी आलोय!" पण व्यर्थ. फ्राऊ लेनोरे स्वतःवरच चिडली होती. काहीही न दिसण्याइतपत अशी कशी ती आंधळी बनली? "जर माझा जिओवान बात्तिस्ता जिवंत असता," अश्रूभरल्या डोळ्यांनी ती ओरडली, "हे सगळं कधीच घडलं नसतं." "अरे देवा, हा काय प्रकार?" सानिनने स्वतःलाच प्रश्न केला. "सरतेशेवटी हा सगळा वेडपटपणा आहे!" जेम्माकडे पाहण्याची त्याची हिंमत होत नव्हती व तीसुद्धा आपली नजर त्याच्या चेहऱ्यावर उचलू शकत नव्हती. आपल्या आईचे धीराने सांत्वन करण्यावरच तिने तात्पुरते समाधान मानून घेतले होते. तिलाही तिच्या आईने प्रथम दूर लोटून दिले होते...

अखेरीस हळू हळू वादळ शमले. फ्राऊ लेनोरेने रडणे थांबविले व ज्या कोपऱ्यात ती अंगाचे मुटकुळे करून पडली होती, तेथून खिडकीजवळच्या आरामखुर्चीपर्यंत तिला नेण्यास तिने जेम्माला परवानगी दिली. जेम्माने तिला नारिंगी सरबत दिले, त्याचे घुटकेही तिने घेतले. सानिनला तिने स्वतःजवळ येऊ दिले नाही, पण निदान त्या खोलीमध्ये राहू दिले (त्याने

तात्काळ तेथून निघून जावे असा आरंभी तिने आग्रह धरला होता), आणि जेव्हा तो बोलला तेव्हा तिने त्याला अडथळा केला नाही. ह्या शांततेचा चटकन फायदा घेऊन सानिनने आपल्या वक्तृत्वकलेचे खासे प्रदर्शन केले. अशा कळकळीच्या धारणेने आपल्या इराद्यांचे व भावनांचे जेम्मासमोर तो विवेचन करू शकला असता अथवा नाही, याबद्दल शंकाच आहे. «Barber of Seville» मधील आल्माविवाप्रमाणे भावना अत्यंत खऱ्या होत्या व इरादे अत्यंत विशुद्ध होते. फ्राऊ लेनोरेपासून अथवा स्वतःपासूनही त्याने आपल्या इराद्यांमधील तोटे लपविले नाही. पण हे तोटे केवळ दिखाऊ होते. हे खरे होते की, तो परदेशो होता, त्याच्याशी त्यांची नुकतीच ओळख झाली होती व खुद्द त्याच्याबद्दल आणि त्याच्या परिस्थितीबद्दल त्यांना काहीच माहिती नव्हती. पण तो प्रतिष्ठित गृहस्थ होता आणि भिकारी नव्हता हे सिद्ध करण्यासाठी त्यांच्यासमोर भरपूर पुरावा सादर करण्याची त्याची तयारी होती. आपल्या देशबांधवांकडून त्याबद्दल त्याने निर्विवाद हमी आणून दिली असती. जेम्मा त्याच्याबरोबर सुखी होईल आणि तिचा तिच्या कुटुंबापासून घडणारा वियोग जास्तीत जास्त मधुर करण्याचा तो प्रयत्न करील, अशी आशा त्याने व्यक्त केली. पण वियोगाचा उल्लेख होताच, "वियोग" हा शब्द उच्चारताच, जवळ जवळ सर्वनाश होण्याची पाळी आली होती. फ्राऊ लेनोरेचे सर्वांग थरथर कापू लागले. खुर्चीतल्या खुर्चीत ती थाडथाड उडू लागली. सानिन घाईघाईने पुढे म्हणाला की, वियोग केवळ तात्पुरता होईल आणि कदाचित त्याची गरजही भासणार नाही.

सानिनचे वक्तृत्व वाया गेले नाही. कष्टी आणि रागीट मुद्रेने का होईना, पण फ्राऊ लेनोरे त्याच्याकडे पाहू लागली. निदान तिचा पूर्वीचा तिरस्कार आणि संताप नाहीसा झाला होता. मग तिने त्याला अधिक जवळ येऊ दिले व नंतर तर स्वतःजवळ बसूही दिले (तिच्या दुसऱ्या बाजूला जेम्मा बसली होती). मग केवळ आपल्या डोळ्यांनीच नव्हे तर शब्दांनीही दूषणे देऊ लागली. तिचे हृदय विरघळत असल्याचे ते चिन्ह होते. तिने तक्रारी करायला आरंभ केला, पण त्या तक्रारी हळू हळू इतक्या मवाळ होत गेल्या व त्यांचे प्रश्नांमध्ये रूपांतर झाले—एकदा तिच्या मुलीला, तर एकदा सानिनला, ती प्रश्न विचारू लागली. मग तिने त्याला आपला हात धरू दिला आणि तो तिने पटकन मागे घेतला नाही... मग तिने आणखी काही अश्रू ढाळले, पण ते अगदी वेगळे होते... नंतर तिने खेदाने



स्मित केले आणि जिओवान बात्तिस्ता त्यांच्यात नसल्याबद्दल खेद व्यक्त केला, पण पूर्वीपेक्षा अगदी वेगळ्या अर्थाने... आणखी एक क्षण सरला व दोन पापी—सानिन आणि जेम्मा—तिच्या पायांशी गुडघे टेकून बसले होते, तर ती आळीपाळीने त्यांच्या डोक्यांवर आपले हात ठेवीत होती. आणखी एक क्षण गेला, आणि ती दोघेही तिला मिठ्या मारीत होती, तिची चुंबने घेत होती. आनंदाने चेहरा उजळलेला एमिल धावत खोलीत गेला आणि त्या निकट बसलेल्या गटाशी मिसळून गेला.

पान्तालीओने खोलीत डोकावला, एकाच वेळी त्याने स्मित केले आणि आठ्या घातल्या व रस्त्याकडील दार उघडायला तो दुकानात गेला.

## ३०

निराश मनःस्थितीमधून विषण्णतेत आणि विषण्णतेमधून मूक शरणागतीमध्ये फ्राऊ लेनोरेचे स्थित्यंतर फार वेगाने घडले. आणि त्या मूक शरणागतीचे गुप्त समाधानामध्येही जलद रूपांतर घडले, पण ते शिष्टाचारादाखल लपविण्यात आले व त्याला आवर घालण्यात आला होता. फ्राऊ लेनोरेला सानिनची पहिल्यांदा ओळख झाली त्या दिवसापासून तो आवडू लागला होता. तिचा तो जावई होणार ह्या कल्पनेची जेव्हा तिला सवय झाली, तेव्हा तिला त्यात फारसे वावगे काही वाटले नाही. मात्र आपल्या चेहऱ्यावर काहीसा घायाळ अथवा चिंतायुक्त भाव आणखी थोडा काळ दाखविणे आपले कर्तव्य आहे, असे तिला वाटत होते. शिवाय, गेल्या काही दिवसांमधील घटना लक्षणीय होत्या... एकाहून एक वरचढ होत्या. एक व्यवहारी बाई आणि आई ह्या नात्याने, सानिनला सर्व प्रकारचे प्रश्न विचारणे आपले कर्तव्य आहे असे फ्राऊ लेनोरेचे मत होते. आणि सकाळी जेम्माला भेटायला म्हणून बाहेर पडलेल्या सानिनच्या डोक्यात तिच्याशी लग्न करण्याचे विचार मुळीच नव्हते, पण आता तो भावनेच्या आहारी गेला होता व विवाहेच्छुच्या भूमिकेत अत्यंत उत्साहाने शिरला होता, सर्व प्रश्नांची ताबडतोब आणि तपशीलवार उत्तरे देत होता. तो खरेच उमराव घराण्यातील होता याबद्दल स्वतःचे समाधान करून घेऊन आणि तो प्रिन्स नव्हता याबद्दल काहीसे आश्चर्य व्यक्त करून, फ्राऊ लेनोरेने अत्यंत गंभीर मुद्रा केली आणि त्याला आगाऊ इशारा दिला की, ती त्याच्याशी अगदी निर्भीडपणे वागणार आहे, आईचे पवित्र कर्तव्य ह्या नात्याने तसे वागणे तिला



16—2158

भाग होते. त्यावर सानिन उत्तरला की, तिच्याकडून त्याची दुसरी कसलीच अपेक्षा नव्हती आणि आपली मुळीच गय करू नये अशी त्याने तिला विनंती केली.

नंतर फ्राऊ लेनोरेने म्हटले की, श्रीमान क्लूबेरचे ( आपले ओठ किंचित आवळून, क्षणभर घुटमळून एक किंचित उसासा टाकीत तिने त्याचे नांव उच्चारले ), जेम्माच्या **माजी** वाग्दत्त पतीचे, उत्पन्न एव्हाना आठ हजार गिल्डर होते, ही रक्कम दर वर्षागणिक वाढत जाणार होती व सानिनचे उत्पन्न किती होते हे ती जाणू इच्छित होती.

"आठ हजार गिल्डर," सानिन स्वर लांबवीत म्हणाला. "म्हणजे आमच्या पैशात सुमारे पंधरा हजार रूबल... माझं उत्पन्न त्याहून खूपच कमी आहे. तुला गुबेर्नियात माझी छोटीशी इस्टेट आहे. तिची चांगली व्यवस्था पाहिली तर पाच-सहा हजार तिच्यातून मिळू शकतील आणि तेवढे मिळणारच... शिवाय जर मी सरकारी नोकरी पत्करली तर मला सहज दोन हजार पगार मिळेल."

"रशियात नोकरी!" फ्राऊ लेनोरे उद्‌गारली. "म्हणजे मला जेम्माचा वियोग सहन करावा लागणार."

"मी राजनैतिक सेवेत नोकरी मिळवीन," सानिन म्हणाला. "माझ्या काही ओळखी आहेत... त्याचा अर्थ परदेशी वास्तव्य. किंवा आणखी मी काय करू शकेन ते तुम्हाला सांगतो आणि तो सर्वात उत्तम मार्ग ठरेल... माझी इस्टेट मी विकू शकतो आणि एखाद्या किफायतशीर धंद्यात ते पैसे गुंतवू शकतो – उदाहरणादाखल, तुमच्या मिठाईच्या धंद्यात सुधारणा करायला." आपण मूर्खासारखे बोलत आहोत याची खुद्द सानिनला जाणीव होती, पण एका विलक्षण अविचारीपणाने त्याचा पगडा घेतला होता. त्याने जेम्माकडे पाहिले. संभाषणाचा ओघ व्यवहाराकडे वळताच एकदा ती खोलीत येरझाऱ्या घालू लागली होती व एकदा बसून रहात होती. त्याने तिच्याकडे पाहिले व इतःपर अडथळे त्याच्या दृष्टीने अस्तित्वात नव्हते. त्या क्षणाला, शक्यतो उत्तम रीतीने, सर्व व्यवस्था करायला तो सज्ज होता. तिने काळजी करू नये यासाठी वाट्टेल ते करायला तो तयार होता.

"धंदा सुधारायला श्रीमान क्लूबेरही मला छोटीशी रक्कम देणार होते," थोडेसे घुटमळून फ्राऊ लेनोरे म्हणाली.

"आई! कृपा करून!..." जेम्मा इटालियन भाषेत ओरडली.



"पोरी, या गोष्टी वेळीच बोलून टाकल्या पाहिजेत," फ्राऊ लेनोरेने त्याच भाषेत तिला उत्तर दिले.

ती परत सानिनकडे वळली आणि रशियात लग्नाचे कायदे कसे आहेत, प्रशियात कॅथलिकांशी लग्न करायला अडचण येते तशी परिस्थिती तेथे नाही ना ( त्यावेळी १८४० सालात, मिश्र विवाहांबाबतच्या प्रश्नावरील प्रशियन सरकारचे आणि कलोनच्या आर्चबिशपचे भांडण सबंध जर्मनीमध्ये सर्वांच्या आठवणीत होते ) वगैरे विचारणा तिने केल्या. मात्र, रशियन उमरावाशी लग्न केल्यामुळे आपली मुलगीही उमराव कुळात दाखल होणार आहे हे जेव्हा फ्राऊ लेनोरेला समजले तेव्हा तिने काहीसे समाधान व्यक्त केले. "पण त्यासाठी प्रथम तुम्हाला रशियाला जावं लागेल, होय ना?"

"कशासाठी?"

"तुमच्या सम्राटाची परवानगी घेण्यासाठी?"

तशी मुळीच गरज नव्हती हे सानिनने तिला समजावून सांगितले... पण पुढे त्याने म्हटले की, लग्नापूर्वी रशियाला एक धावती भेट देणे कदाचित त्याला आवश्यक ठरेल ( जेव्हा हे शब्द त्याने उच्चारले तेव्हा त्याच्या हृदयाला पीळ पडून वेदना झाल्या आणि जेम्माने त्याच्याकडे पाहिले तेव्हा तिला त्याच्या वेदना समजल्या व लाजून ती कष्टी बनली ) – आणि मायभूमीतील मुक्कामात आपली इस्टेट विकण्याचा तो प्रयत्न करील... कोणत्याही परिस्थितीत आवश्यक तेवढे पैसे तो घेऊन येणार आहे...

"अंगरख्यासाठी तुम्ही मला सुरेख अस्त्राखान फर आणाल?" फ्राऊ लेनोरे म्हणाली. "असं सांगतात की, ती फर खूपच सुंदर असते आणि तिथं खूप स्वस्त मिळते."

"अगदी आनंदानं, नक्की आणीन. जेम्मासाठीही आणीन!" सानिन उंच आवाजात म्हणाला.

"आणि माझ्यासाठी चांदीचं कशीदाकाम केलेली बकऱ्याच्या कातड्याची टोपी!" खोलीमध्ये डोकावीत एमिल मध्येच उद्‌गारला.

"ठीक आहे... आणि पान्तालीओनेसाठी बूट."

"ह्या किरकोळ बाबी पुरे झाल्या," फ्राऊ लेनोरे म्हणाली. "आता आपण गंभीर गोष्टींबद्दल बोलतोय. आणखी एक," ती व्यवहारी बाई पुढे म्हणाली, "तुम्ही तुमची इस्टेट विकणार म्हणता. म्हणजे तुमचे शेतकरीसुद्धा तुम्हाला विकावे लागणार?"

सानिनच्या हृदयात तीव्र वेदना झाली. मादाम रोझेल्ली आणि तिची

मुलगी यांच्याबरोबर चर्चा करताना भूदास पद्धती, त्याच्याच शब्दात सांगायचे तर, त्याच्या मनात प्रचंड संताप निर्माण करीत होती व त्याने पुनःपुन्हा त्यांना खात्रीपूर्वक सांगितले होते की, कोणत्याही परिस्थितीत शेतकऱ्यांची विक्री करण्यास तो कधीही राजी होणार नाही, कारण असे व्यवहार त्याला अनीतीचे वाटत आहे.

"ज्याच्याबद्दल माझं चांगलं मत आहे अशा गृहस्थाला माझी इस्टेट विकायचा मी प्रयत्न करीन," अडखळत तो म्हणाला. "किंवा कदाचित शेतकरी स्वतःच आपलं स्वातंत्र्य विकत घ्यायची तयारी दाखवतील."

"ते सर्वात उत्तम होईल," फ्राऊ लेनोरेने संमती दर्शविली. "सरते-शेवटी, माणसांना विकायचं म्हणजे..."

"पशूपणा!" एमिलमागे क्षणभरासाठी दारात अवतरलेला पान्तालीओने गरजला आणि आपल्या झुलुपाला एक झटका देऊन तात्काळ नाहीसा झाला.

"मला हे नाही आवडत!" सानिन स्वतःशी म्हणाला आणि त्याने जेम्माकडे एक चोरून कटाक्ष टाकला. त्याचे शेवटचे शब्द तिने ऐकल्याचे दिसले नाही. "काही हरकत नाही!" त्याला वाटले.

जवळ जवळ जेवणाच्या वेळेपर्यंत अशा प्रकारचे व्यावहारिक संभाषण चालले. त्या संभाषणाच्या अखेरी फ्राऊ लेनोरे खूपच मृदु बनली, त्याला दिमित्री म्हणू लागली, बोट हलवून प्रेमाने दटावू लागली, त्याच्या विश्वास-घातकीपणाचा सूड घेईन असा धाक घालू लागली. त्याच्या कुटुंबाविषयीही तिने त्याला प्रदीर्घ आणि तपशीलवार प्रश्नावली विचारली, कारण "तेसुद्धा खूप महत्त्वाचे" होते. रशियन चर्चमध्ये विवाहसोहळा कसा होतो याचे वर्णन करण्यास तिने त्याला सांगितले. शुभ्र लांब झगा आणि सोनेरी मुकुट घालून जेम्मा विवाहवेदीवर उभी राहणार ह्या कल्पनेने ती हरखली.

"कारण ती राणीसारखी सुंदर आहे," मातृत्वाच्या अभिमानाने ती म्हणाली. "खरंच, तिच्यासारखी सुंदर राणी जगात कुठं नाही."

"जगात दुसरी जेम्मा नाही!" सानिनने तिच्या सुरात सूर मिसळला.

"होय – म्हणूनच तिला जेम्मा म्हणतात!" (इटालियनमध्ये जेम्मा म्हणजे मौल्यवान रत्न.)

जेम्मा एकदम आपल्या आईला बिलगली आणि तिची चुंबने घेऊ लागली... असे भासले जणू आत्ता कोठे ती मोकळेपणी श्वास घेऊ लागली होती, जणू तिच्या खांद्यावरचे जड ओझे दूर झाले होते.

अतिरेकी आनंदाच्या भावनेने सानिनला एकदम गुदमरल्यासारखे झाले.



याच खोल्यांमध्ये बसून नुकतीच रंगविलेली स्वप्ने खरी होत होती, साक्षात खरी होत होती, ह्या विचाराने त्याला बालिश आनंद झाला होता. तो एवढा उत्तेजित झाला होता की, सरळ दुकानात जावे असे त्याला वाटले. काही दिवसांपूर्वी जसा तो गल्ल्यामागे उभा राहिला होता, तसे उभे राहण्याचा त्याने निर्धार केला होता... "आता तसं करण्याचा मला पूर्ण अधिकार आहे! आता मी कुटुंबातलाच एक बनलोय."

आणि तो खरोखरीच गल्ल्यामागे उभा राहिला व खरेच त्याने गिऱ्हाई-कांची सेवा बजावली. म्हणजे दोन छोट्या मुलींना पौंडभर मिठाई त्याने विकली... अथवा खरे म्हणजे आख्खे दोन पौंड मिठाई त्याने त्या मुलींना दिली आणि पैसे मात्र एका पौंडाच्या किंमतीच्या निम्मे घेतले.

जेवणाच्या वेळी जेम्माचा मान्यताप्राप्त भावी पती ह्या नात्याने तो तिच्याशेजारी बसला. फ्राऊ लेनोरे अजूनही आपल्या व्यावहारिक विचारांचा पाठपुरावा करीत होती. एमिल खूप हसला व सानिन जेव्हा रशियाला जाईल तेव्हा आपल्यालाही त्याने न्यावे म्हणून गोडीगुलाबी लावीत राहिला. पंधरवड्याच्या आत सानिनने जायचे असे ठरले. एकटा पान्तालीओने काहीसा दुर्मुखला दिसला व त्याबद्दल फ्राऊ लेनोरेने त्याला चिडविले: "आणि म्हणे साहाय्यक बनला होता!" पान्तालीओनेने डोळे वटारले.

ह्या सर्व काळात जेम्मा क्वचितच बोलली. पण तिचा चेहरा कमालीचा सुंदर व तेजस्वी दिसत होता. जेवणानंतर तिने सानिनला क्षणभरासाठी आपल्याबरोबर बागेत बोलाविले. दोन दिवसांपूर्वी चेरी निवडत ज्या बाकावर ती बसली होती त्या बाकाशी थबकून ती त्याला म्हणाली: "दिमित्री, माझ्यावर रागवू नकोस, पण मला पुन्हा एकदा तुला सांगायचंय की, तुझ्यावर कसलंही बंधन..."

त्याने तिला वाक्य पुरते बोलू दिले नाही.

जेम्माने आपला चेहरा बाजूला वळविला.

"आणि आई जे काही म्हणाली, वेगवेगळ्या धर्मासंबंधी – बघ!"

आपल्या मानेभोवती एका बारीक दोऱ्यावर लटकणारा रत्नजडित क्रूस तिने हातात धरला व एवढ्या जोरात ओढला, की तो दोरा तुटला आणि तिने क्रूस त्याच्या हाती दिला.

"जर मी तुझी आहे, तर तुझा धर्म तो माझा धर्म."

सानिन आणि जेम्मा जेव्हा घरात परत गेले तेव्हा सानिनचे डोळे ओलावले होते. संध्याकाळच्या दरम्यान सर्व काही पूर्वीप्रमाणे सुरळीत चालू लागले होते. पत्त्यांचा डावही ते खेळले.

सानिन दुसऱ्या दिवशी सकाळी लौकर जागा झाला. मानवी सुखाच्या अत्युच्च शिखरावर तो विराजमान झाला होता. पण त्याची झोपमोड व्हायला हे कारण नव्हते. लौकरात लौकर आणि किफायतशीरपणे आपली इस्टेट कशी विकायची हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न त्याच्या मनाची शांती ढळवीत होता. अनेक प्रकारच्या योजना त्याच्या डोक्यात दाटी करीत होत्या, पण अजून काहीही निश्चित ठरत नव्हते. बाहेर मोकळ्या हवेत आपले मन ताजेतवाने करण्यासाठी तो गेला. तयार योजना घेऊन जेम्मा-समोर दाखल होण्याचा त्याचा ठाम इरादा होता.

समोरची गलेलठ्ठ, पण उत्तम पोषाख केलेली, किंचित झोकांड्या खात व लंगडत चालणारी ही आकृती कुणाची बरे होती? अंबाडीसारख्या केसांच्या पुंजक्यांनी वेढलेली ही गर्दन, थेट खांद्यांमधून उगवल्यासारखे वाटणारे हे डोके, ही मऊ थुलथुलीत पाठ, हे गुबगुबीत लोंबते हात त्याने कुठे बरे पाहिले होते? हा पोलोझोव तर नव्हे? त्याचा जुना शाळूसोबती? गेल्या पाच वर्षांत ज्याचे त्याला दर्शन झाले नव्हते तो? सानिनने आपला चालण्याचा वेग वाढविला आणि त्या आकृतीला गाठून पुढे गेल्यावर मागे वळून पाहिले... रुंद पिळवट चेहरा, डुकरासारखे पिचपिचे डोळे आणि पांढुरक्या पापण्या व भुवया, अपरे चपटे नाक, एकत्र चिकटल्यासारखे भासणारे जाड ओठ, गोल केसविहीन हनुवटी–आणि त्या एकूण मुद्रेवरील भाव–आंबट, सुस्त, अविश्वासू–अरेच्चा, तोच होता, इप्पोलित पोलोझोव!

"पुन्हा माझा सुदैवी तारा उगवलाय!" सानिनच्या मनात विचार चमकला.

"पोलोझोव! इप्पोलित सीदोरीच! तूच ना?"

ती आकृती थबकली, पिचपिचे डोळे वर झाले, क्षणभर शांतता पसरली. अखेरीस ओठ विलग झाले आणि घोगरा कृत्रिम तार-स्वर उमटला:

"दमित्री सानिन?"

"दस्तुरखुद्द!" सानिन ओरडला आणि त्याने पोलोझोवचा एक हात दाबला. त्याचे दोन्ही हात नमदी मोजांमध्ये गुरफटलेले होते व त्याच्या गुबगुबीत कुशींच्या बाजूला निर्जीवपणे लोंबत होते. "इथं बरेच दिवस आहेस का? कुठून आलास? कुठं राहिला आहेस?"

"मी काल वीसबादेनहून आलो," सावकाश सुरात पोलोझोव उत्तरला.



"माझ्या बायकोसाठी काही वस्तू खरेदी करतोय आणि आज मी वीसबादेनला परत चाललोय."

"अस्सं! तू लग्न केलंस तर! आणि तुझी बायको खूप सुरेख आहे म्हणतात!"

पोलोझोवने आपले डोळे दुसरीकडे वळविले.

"हो, असं म्हणतात!"

सानिन हसला. "शाळेत होतास तसाच अजून निर्विकार राहिलेला आहेस!"

"आणि कशासाठी मी बदलायचं?"

"असंही म्हणतात," सानिनने "म्हणतात" शब्दावर जोर देत म्हटले, "की तुझी बायको खूप श्रीमंत आहे."

"हो, असंही म्हणतात."

"आणि तुला स्वतःला ठाऊक नाही, इप्पोलित सीदोरीच?"

"हे बघ, बंधो–दमित्री... अं... पावलोविच, हो पावलोविच–माझ्या बायकोच्या कारभारात मी नाक खुपसत नाही."

"काय म्हणतोस? अजिबात नाही?"

पोलोझोवने परत नजर बाजूला वळविली. "अजिबात नाही, बंधो... ती तिच्या मर्जीनं वागते आणि मीही माझ्या मर्जीनं वागतो."

"आत्ता कुठं चाललायस?" सानिनने विचारले.

"आत्ता मी कुठंही चाललो नाही. रस्त्यात उभं राहून तुझ्याशी बोलतोय. आपलं बोलणं संपलं म्हणजे मी माझ्या हॉटेलात परत जाईन आणि न्याहरी करीन."

"मी तुला सोबत करू?"

"म्हणजे–न्याहरीला?"

"हो."

"जरूर चल–एकत्र खाण्यात जास्त गंमत येते. मात्र तू बडबड्या नाहीस ना?"

"मला तसं वाटत नाही."

"तर मग चल?"

पोलोझोव जागचा पुढे हलला व सानिन त्याच्याबरोबर चालू लागला. असा मठ्ठ माणूस श्रीमंत आणि सुंदर बायको कशी मिळवू शकला असा प्रश्न सानिनने स्वतःला विचारला, पोलोझोवचे ओठ परत गच्च मिटले होते

15-Aug-13 / 18:29:06

व तो सूं सूं आवाज करीत श्वासोच्छ्वास करीत होता आणि झुलत चालला होता. तो श्रीमंत नव्हता, मोठ्या घरातील नव्हता अथवा स्वतः हुषारही नव्हता. शाळेत त्याला मूर्ख, आळशी मुलगा, झोपाळू आणि खादाड म्हणून ओळखायचे. आणि "लाळ्या" असे त्याला टोपणनांव पडले होते.

"आणि त्याची बायको जर एवढी श्रीमंत असेल—कुठल्यातरी कंत्राटदाराची ती मुलगी आहे असं म्हणतात—तर माझी इस्टेट विकत घेणार नाही का? आपल्या बायकोच्या कारभाराशी आपल्याला काही कर्तव्य नाही असं हा म्हणतोय— पण तसं असणं अशक्य! शिवाय मी योग्य, आकर्षक किंमत सांगीन. प्रयत्न करायला काय हरकत? कदाचित ह्या सगळ्याचा अर्थ माझा भाग्यतारा चढत्या कमानीवर आहे. बस्स, ठरलं! मी प्रयत्न करणार!"

फ्रँकफुर्टमधील एका सर्वोत्तम हॉटेलात पोलोझोव सानिनला घेऊन गेला. अर्थात त्या हॉटेलात तो रहात होता हे सांगणे न लगे! खोलीतील टेबल-खुर्च्यांवर पुठ्ठ्याच्या खोक्यांचे, लाकडी पेट्यांचे, पुडक्यांचे उंच ढीग पडले होते... "बंधो, ही सगळी खरेदी मार्या निकोलायेवनासाठी!" (मार्या निकोलायेवना हे पोलोझोवच्या बायकोचे नांव होते.) पोलोझोव खुर्चीत धब्बदिशी बसला. आपला टाय ढिला करीत तो कण्हला: "शीः! काय हा उकाडा!" मग त्याने घंटी वाजवून मुख्य वेटरला बोलाविले आणि भरपूर न्याहरीची यादी सांगितली. "आणि माझी घोडागाडी एक वाजता तयार ठेवा! बरोब्बर एक वाजता! समजलं?"

मुख्य वेटरने लवून अभिवादन केले आणि अदबीने माघारी जात तो नाहीसा झाला.

पोलोझोवने आपल्या बंडीची बटणे मोकळी केली. ज्या पद्धतीने त्याने भुवया उंचावल्या होत्या, नाकपुड्या फेंदारल्या होत्या आणि नाकाला मुरड घातली होती, त्यावरून अगदी स्पष्ट होते की, बोलणे म्हणजे त्याच्या दृष्टीने अगदी असह्य ओझे ठरले असते. सानिन संभाषणाचा भार स्वतःवर घेणार आहे अथवा त्याच्या जिभेला व्यायाम घडविण्याची सक्ती करणार आहे, याची तो चिंतातुर मनाने वाट पहात होता.

सानिनने आपल्या मित्राची मन:स्थिती जाणली व प्रश्न विचारून त्याला त्रास देण्याचे टाळले. अगदी कमीत कमी, आवश्यक तेवढेच त्याने विचारले. त्याला समजले की, पोलोझोवने भालाईत पलटणीत दोन वर्षांची लष्करी सेवा बजाविली होती (गणवेषातील आखूड जाकीटात त्याचा अवतार



अगदी प्रेक्षणीय असावा!), तीन वर्षांपूर्वी लग्न केले होते आणि आता एक वर्षाहून अधिक काळ तो आपल्या बायकोसह परदेशी वास्तव्य करून होता. त्याची बायको "वीसबादेनमध्ये काही उपचार घेत होती" व नंतर तेथून त्यांचा पॅरिसला जाण्याचा इरादा होता. स्वतःच्या बाजूने सानिनसुद्धा आपल्या भूतकाळाबद्दल आणि भावी योजनांबद्दल कमीत कमी बोलला. त्याने सरळ मुद्द्याला हात घातला व आपली इस्टेट विकण्याचा इरादा बोलून दाखविला.

पोलोझोवने मुकाटपणे त्याचे बोलणे ऐकून घेतले. न्याहरी जेथून येणार होती त्या दाराकडे तो वारंवार कटाक्ष टाकीत होता. शेवटी न्याहरी आली. दोन साहाय्यकांना सांगाती घेऊन, चांदीच्या आवरणांखाली झाकलेले अनेक पदार्थ मुख्य वेटर घेऊन आला.

"तुझी इस्टेट तुला गुबेर्नियात आहे का?" टेबलाशी बसत व सदऱ्याच्या कॉलरमध्ये रुमाल खोचत पोलोझोवने विचारले.

"होय."

"येफ्रेमोव ऊयेझ्द... मला ठाऊक आहे."

"माझ्या अलेक्सेयेवकाला तू जाणतोस?" टेबलाशी बसत सानिन म्हणाला.

"अर्थात." पोलोझोवने ऑम्लेटचा बकाणा भरीत म्हटले. "मार्या निकोलायेवना—माझी बायको—तिची इस्टेट शेजारीच आहे... वेटर, बाटलीचं बूच उघड! जमीन चांगली आहे, पण तुझ्या शेतकऱ्यांनी सगळी झाडं तोडून टाकलीत. इस्टेट विकायचं कारण काय तुला?"

"मित्रा, मला पैशांची गरज आहे. मी स्वस्तात विकीन. बरं पण मला सांग, तूच का विकत घेत नाहीस?"

पोलोझोवने मदिरेचा प्याला गट्ट केला, रुमालाने आपले ओठ पुसले व पुन्हा सावकाशपणे आणि मचामचा आवाज करीत रवंथ करायला प्रारंभ केला.

"हं," शेवटी तो म्हणाला. "मी इस्टेटी विकत घेत नाही—भांडवल नाही! जरा लोणी दे इकडं. अर्थात, माझी बायको घेईल. तिच्याशी बोल तू. जर तू फार पैसे मागितले नाहीस तर ती हरकत घेणार नाही. पण काय गाढव आहेत हे जर्मन! मासे कसे बनवायचे हे माहीत नाही! खरं म्हणजे त्याहून अधिक सोपं दुसरं काहीही नाही. तरीही फुशारक्या मारत असतात: 'पितृभूमी एकत्र केली पाहिजे.' वेटर, ही गचाळ वस्तू घेऊन जा इथून."

“म्हणजे तुझी बायको सगळा कारभार स्वतः पाहते असं म्हणायचंय तुला ?” सानिनने विचारले.

“होय, होय. ही कटलेटं चांगली आहेत. खाऊन बघ. द्मित्री पावलोविच, मी तुला सांगितलं, माझ्या बायकोच्या कोणत्याही भानगडीत मी ढवळाढवळ करत नाही आणि पुन्हा एकदा हेच सांगतो.”

पोलोझोव मचामचा आवाज करीत चघळत राहिला.

“हं, हं... पण मी तिच्याशी बोलायचं कसं, इप्पोलित सीदोरीच ?”

“अगदी सोपं आहे, द्मीत्री पावलोविच. वीसबादेनला जा. इथून ते फारसं लांब नाही. वेटर, इंग्लिश मोहरी नाही का? नाही? जंगली! मात्र अजिबात वेळ दवडू नको. परवा आम्ही तिथून जाणार आहोत. तुला मी ग्लासभर दारू देतो – ह्या मद्याला सुंदर गंध आहे, आंबट शिरका नाही.”

पोलोझोवचा चेहरा लालबुंद आणि उत्तेजित बनला होता. जेव्हा तो खात असे... अथवा पीत असे, तेव्हाच फक्त त्याचा चेहरा उजळायचा.

“काय करावं ते खरंच मला समजत नाही,” सानिन तोंडातल्या तोंडात म्हणाला.

“विकण्याची तुला एवढी घाई आहे?”

“होय मित्रा, परिस्थिती तशीच आहे.”

“आणि तुला मोठी रक्कम हवीय ?”

“होय. मी... कसं सांगू? माझ्या मनानं घेतलंय – लग्न करायचंय !”

ओठाशी उचललेला मद्याचा प्याला पोलोझोवने परत खाली टेबलावर ठेवला.

“लग्न करायचंय !” चकित घोगऱ्या आवाजात तो म्हणाला आणि आपल्या पोटावर त्याने आपल्या गुबगुबीत हातांची घडी घातली. “अचानक ?”

“होय... अगदी लौकरच.”

“अर्थात तुझी भावी पत्नी रशियात असणार ?”

“नाही, ती रशियात नाही.”

“मग ती कुठाय ?”

“इथं, फ्रँकफुर्टमध्ये.”

“आणि ती कोण आहे ?”

“ती जर्मन आहे, म्हणजे, मूळची ती इटालियन आहे. फ्रँकफुर्टमध्ये ती राहते.”



“तिच्यापाशी काही भांडवल आहे ?”

“मुळीच नाही.”

“मग तुझं प्रेम फार तीव्र असलं पाहिजे.”

“गंमतीदारच आहेस! अर्थात आहे.”

“आणि म्हणून तुला पैसे हवेत ?”

“होय... तसंच आहे.”

पोलोझोवने मद्याचा घुटका घेतला, तोंड धुतले, आपल्या बोटांची टोके पाण्यात बुचकळली, आपल्या रुमालावर काळजीपूर्वकपणे पुसली व सिगार काढून पेटविली. सानिन मुकाटपणे त्याला पहात होता.

“दुसरा मार्ग नाही,” शेवटी पोलोझोव म्हणाला, त्याने डोके मागे झुकविले आणि धुराची बारीक रेषा सोडली. “जाऊन माझ्या बायकोला भेट. तिची इच्छा असली तर तुझ्या सगळ्या समस्या ती सोडवू शकेल.”

“पण मी तिला भेटणार कसा? तू म्हणतोस, तुम्ही परवा तिथून जाणार.”

पोलोझोवने डोळे मिटून घेतले.

“मी सांगतो काय करायचं,” ओठांमध्ये सिगार फिरवीत आणि सुस्कारा टाकीत तो म्हणाला : “घरी जा, लौकरात लौकर सामान बांध आणि तडक इथं परत ये. एक वाजता मी निघतोय, माझ्या गाडीत भरपूर जागा आहे, तुला मी बरोबर घेईन. ते सगळ्यात उत्तम ठरेल. आणि आता मी माझी डुलकी काढतो. बंधू, खाल्ल्यानंतर मी नेहमी डुलकी काढतो. निसर्गाची ती मागणी आहे आणि मी तिला विरोध करत नाही. आणि मला आता त्रास देऊ नको.”

सानिनने क्षणभर विचार केला – आणि एकदम डोके वर उचलले. त्याच्या मनाचा निर्धार झाला होता.

“छान! मी तयार आहे – धन्यवाद! इथं मी साडेबारा वाजता येतो आणि वीसबादेनला आपण बरोबर जाऊ. तुझी बायको रागावणार नाही अशी आशा करतो.”

पण पोलोझोव एव्हाना घोरू लागला होता. “मला त्रास देऊ नको!” असे पुटपुटत त्याने पायांची चाळवाचाळव केली व लौकरच लहान मुलासारखा तो झोपी गेला.

त्या धिप्पाड आकृतीवर, डोक्यावर, मानेवर, उंचावलेल्या सफरचंदासारख्या गोल हनुवटीवर त्याने एक अखेरचा कटाक्ष टाकला व हॉटेलमधून

बाहेर पडून रोझेल्लीच्या दुकानाच्या दिशेने झपाझपा चालू लागला. जेम्माच्या मनाची पूर्वतयारी करणे आवश्यक होते.

## ३२

जेम्मा आपल्या आईबरोबर दुकानात असल्याचे त्याला आढळले. दोन खिडक्यांमधील मोकळी जागा घडीच्या फूटपट्टीने खाली वाकून मोजण्यात फ्राऊ लेनोरे गुंतली होती. सानिनला पाहताच ती ताठ उभी झाली व आनंदाने तिने त्याचे स्वागत केले. मात्र त्यात किंचित शरमेची झाक होती.

"काल तुमचं बोलणं ऐकल्यापासून," ती म्हणाली, "आमचं दुकान कसं सुधारायचं याबद्दलच्या वेगवेगळ्या कल्पनांनी माझ्या डोक्यात नुसती गर्दी केलीय. या जागेत दोन आरशांची कपाटं ठेवता येतील. सध्या ती फॅशन आहे. आणि मग..."

"छान! सुरेख!" सानिन मध्येच म्हणाला. "त्या सगळ्या गोष्टींचा विचार केला पाहिजेच... पण जरा इकडं या, मला तुम्हाला काही सांगायचंय." त्याने फ्राऊ लेनोरेला आणि जेम्माला आपला हात देऊन मागील खोलीकडे नेले. फ्राऊ लेनोरे घाबरली आणि फूटपट्टी तिच्या हातातून निसटली. जेम्माही आरंभी काहीशी भेदरली होती, पण सानिनकडे एक कटाक्ष टाकताच ती शांत झाली होती. त्याचा चेहरा गंभीर दिसला, तरीही त्यावर आनंदी निर्धार उमटलेला होता.

त्या दोघींना त्याने बसायला सांगितले व स्वतः उभे राहून, आपल्या केसांमधून हात फिरवीत व हातवारे करीत, त्याने त्यांना सर्व हकीकत सांगितली: पोलोझोवबरोबर त्याची झालेली भेट, त्याची वीसबादेनची आगामी सफर, त्याची इस्टेट विकण्याची शक्यता, इत्यादी. "अशा काही घडामोडी घडल्यात की, रशियाला जाण्याचीही गरज कदाचित मला भासणार नाही. आणि मी अपेक्षिल्यापेक्षा खूपच आधी आपण विवाहसोहळा करू शकू."

"तुम्हाला केव्हा जायला पाहिजे?" जेम्माने विचारले.

"आजच–आणखी एका तासानंतर. माझ्या मित्रानं गाडी ठरवलीय आणि तो मला आपल्याबरोबर घेऊन जातोय."

"तुम्ही आम्हाला पत्र लिहाल ना?"

"क्षणाचाही विलंब न लावता. त्या बाईशी बोलणं होताच मी लिहीन."



"तुम्ही म्हणता, ही बाई–खूप श्रीमंत आहे?" व्यवहारी फ्राऊ लेनोरेने विचारले.

"प्रचंड श्रीमंत! तिचा बाप लक्षाधीश होता आणि त्यानं सगळं तिच्यासाठी ठेवलं."

"सगळं तिच्यासाठी? हे तुमचं सुदैवच. पण ध्यानात ठेवा, तुमची इस्टेट अगदी स्वस्तात विकू नका. खंबीरपणानं आणि सूज्ञपणानं वागा. भावनेच्या आहारी जाऊ नका. जेम्माचा नवरा लौकरात लौकर होण्याची तुमची इच्छा मी जाणते... पण त्या सर्वाआधी सावध वागलं पाहिजे. लक्षात ठेवा–तुमच्या इस्टेटीचे जेवढे जास्त पैसे मिळतील, तेवढे तुम्हा दोघांसाठी जास्त पैसे राहतील–आणि तुमच्या मुलांसाठी."

जेम्मा बाजूला वळली आणि हाताला झटका देत सानिन म्हणाला: "माझ्या सावधपणाबद्दल तुम्ही निश्चित रहा फ्राऊ लेनोरे. आणि घासाघीस करण्याचा माझा इरादा नाही. मी एक किंमत सांगीन आणि तिनं ती पत्करली तर छानच, नाही तर तिनं काय करावं हा तिचा प्रश्न."

"तुमच्या ओळखीची आहे–ही बाई?" जेम्माने विचारले.

"तिचा चेहरासुद्धा कधी पाहिलेला नाही."

"आणि परत केव्हा याल?"

"जर यातून काहीच निष्पन्न नाही झालं तर परवा. जर सगळं सुरळीत गेलं तर एक-दोन दिवस मला रहावं लागेल. कोणत्याही परिस्थितीत मी एक क्षणही वाया घालवणार नाही. माझं काळीज मी इथं ठेवून जातोय. अरेच्चा, मी इथं तुमच्याबरोबर बोलत उभा आहे, पण निघण्याआधी मला माझ्या हॉटेलवर जाऊन सामान घेतलं पाहिजे... मला यश लाभावं म्हणून तुमचा हात द्या फ्राऊ लेनोरे–रशियात आम्ही नेहमी तसं करतो."

"उजवा, की डावा?

"डावा–तो काळजाच्या जास्त जवळ असतो. मी परवा परत येईन–माझ्या ढालीसह अथवा माझ्या ढालीवर! मी विजयी होऊन परतेन असं माझं मन मला सांगतंय. माझ्या प्रेमळ, लाडक्या माणसांनो, मी चलतो. अच्छा!"

फ्राऊ लेनोरेभोवती आपल्या हातांची मिठी घालून त्याने तिचे चुंबन घेतले. पण जेम्माला मात्र एक क्षणासाठी त्याने तिच्या खोलीत त्याच्याबरोबर चलायला सांगितले. तिच्यासाठी त्याला काही खास महत्त्वाचे सांगायचे होते... खरे म्हणजे एकांतात तिचा निरोप घेण्याची त्याची

इच्छा होती. फ्राऊ लेनोरेने हे जाणले आणि ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट कोणती ते शोधण्याचा प्रयत्न केला नाही...

जेम्माच्या खोलीत सानिन यापूर्वी कधीही गेला नव्हता. प्रेमाची जादू त्याच्यावर घडली होती ; प्रेमाची ज्वाला त्याच्या अंतःकरणात पेटली होती ; प्रेमाचा उन्माद, त्याचे गोड इशारे तो अनुभवीत होता. तो पवित्र उंबरठा ओलांडताना ह्या सर्व अनुभूतींनी त्याचे अंतःकरण भरले होते... भावनावेगाने त्याने भोवती नजर टाकली व त्या गोड सुंदरीच्या पायांशी पडून तिच्या कटिवर आपले मुख टेकले...

"तू माझा आहेस ना?" ती हळूच म्हणाली. "लौकर परत येशील ना?"

"मी सर्वस्वी तुझाच! मी परत येईन!" धपापत्या उराने तो म्हणाला.

"माझ्या लाडक्या, मी तुझी वाट पाहीन."

त्यानंतर काही मिनिटांनी सानिन भरवेगाने रस्त्यांवरून आपल्या पथिकाश्रमाकडे जात होता. पान्तालीओने विस्कटल्या अवतारात त्याच्या पाठोपाठ दुकानाच्या द्वारापर्यंत आला व धमकीवजा हात उगारून त्याला उद्देशून काहीतरी ओरडला ते सानिनच्या ध्यानातसुद्धा आले नाही.

बरोब्बर पाऊण वाजता सानिन पोलोझोवसमोर हजर झाला. चार घोड्यांची बग्गी एव्हाना हॉटेलसमोर उभी होती. सानिनला पाहताच पोलोझोव एवढेच म्हणाला : "म्हणजे तू नक्की ठरवलंस तर!" उन्हाळी हवा असूनही त्याने डोक्यावर टोपी घातली, ओव्हरकोट चढवला, पावसाळी रबरी बूट पायात घातले, कानात कापसाचे बोळे कोंबले व त्याची स्वारी पोर्चमध्ये गेली. त्याच्या हुकुमांनुसार, हॉटेलच्या सेवकांनी त्याच्या असंख्य खरेदीवस्तूंना बग्गीत ठेवले होते, पोलोझोव जेथे बसणार होता त्या जागेभोवती उशा, पिशव्या, पुडकी रचून ठेवली होती, त्याच्या पायांपाशी खाद्यपदार्थ भरलेली करंडी ठेवली होती आणि पेटीवरील आसनावर ट्रंक बांधली होती. ह्या सर्व सेवेबद्दल पोलोझोवने त्यांना सढळ हाताने बक्षिशी दिली आणि गलेलठ्ठ दरवानाचा मागील बाजूने हलकाच आधार घेऊन कण्हत-कुंथत तो बग्गीत चढून बसला. आसनावर त्याने आपले शरीर कसेबसे कोंबले, भोवतालची विविध पुडकी आरामशीरपणे रचून घेतली, एक सिगार काढून पेटविली व मगच त्याने सानिनला खूण करून जणू म्हटले : "तूसुद्धा आत चढ." सानिन त्याच्या शेजारी बसला. पोलोझोवने दरवानामार्फत गाडीवानाला निरोप दिला की, त्याला बक्षिशी पाहिजे असेल तर गाडी कशी हाकायची याबद्दल त्याने विचार करावा. बग्गीच्या पायऱ्या खडखडल्या, दार खाडदिशी बंद झाले व बग्गी पुढे निघाली.

## ३३

आजकाल फ्रँकफुर्टहून वीसबाडेनला आगगाडीने जायला एक तासाहून कमी वेळ लागतो. त्याकाळी एक्सप्रेस टपालाची घोडागाडी हे अंतर तीन तासात कापायची. निदान पाच वेळा घोडे बदलावे लागत.

ओठांमध्ये सिगार ठेवून पोलोझोव कदाचित डुलकी घेत होता अथवा निव्वळ झुलत होता. तो अगदी कमी बोलला. खिडकीबाहेर त्याने एकदाही नजर टाकली नाही, रम्य देखाव्यांमध्ये त्याला मुळीच रस नव्हता. निसर्ग म्हणजे आपल्या दृष्टीने विष होय, असे त्याने चक्क जाहीर केले. सानिनही बोलला नाही. देखावे कौतुकाने पाहण्यात त्यानेही वेळ वाया घालविला नाही. विचार करण्यासारख्या इतर अनेक गोष्टी त्याच्यापाशी होत्या. विचारांमध्ये आणि आठवणींमध्ये तो पूर्ण बुडून गेला. प्रत्येक टप्प्यावर पोलोझोव ठरलेले पैसे देत होता, आपल्या घड्याळावरून वेळेची खात्री करून घेत होता आणि गाडीवानांच्या उत्साहानुसार त्यांना भरपूर बक्षिशी देत होता अगर त्याउलट वागत होता. अर्धा प्रवास संपल्यानंतर त्याने करंडीमधून दोन संत्री काढली, त्यातील सर्वात उत्तम स्वतःसाठी निवडून घेतले व दुसरे सानिनला दिले. सानिनने आपल्या मित्राला एकदा नीट न्याहाळून पाहिले व तो खो खो हसत सुटला.

"कशाला हसतो आहेस?" आपल्या आखूड पांढऱ्या नखांनी काळजीपूर्वक संत्रे सोलीत पोलोझोवने विचारले.

"मी?" सानिन उत्तरला. "आपल्या ह्या प्रवासाला मी हसतोय."

"काय आहे त्यात" चंद्रकोरीच्या आकाराचा संत्र्याचा तुकडा आपल्या तोंडात कोंबत पोलोझोवने विचारले.

"तो एवढा विचित्र वाटतोय. मला कबूल केलं पाहिजे की, चीनच्या सम्राटाबद्दल जसा मी कालपर्यंत विचार केला नव्हता, तसाच तुझाही केला नव्हता. आणि आज मी तुझ्याशेजारी बसून माझी इस्टेट तुझ्या बायकोला विकण्यासाठी निघालोय, जिच्याबद्दलही मला काडीमात्र माहिती नाही."

"काहीही होऊ शकतं," पोलोझोव म्हणाला. "आणखी वयानं थोडा मोठा हो, मग तुला कशाचंच आश्चर्य वाटणार नाही. उदाहरणादाखल, घोड्यावर बसून जाणारा अंमलदार म्हणून तू माझ्याबद्दल कल्पना करू शकशील? पण मी तसा होतो आणि ग्रँड ड्यूक मिखाईल पावलोविच हुकूम करायचे: "ह्या जाड्या अंमलदाराला दौडायला लावा! आणखी वेगानं!"

सानिनने डोक्याच्या मागील बाजूस खाजविले.

"इप्पोलित सीदोरीच, तुझी बायको कशी आहे ते सांग मला! कसा आहे तिचा स्वभाव? तिच्याबद्दल मला काहीतरी माहिती असली पाहिजे."

"वेगानं दौड करायचा हुकूम द्यायला त्याचं काय जातं?" अनपेक्षित संतापाने पोलोझोव उद्‌गारला. "पण माझं काय? तेव्हा मी मनाशी विचार केला: हुद्दा आणि फिती गेल्या खड्डयात! नकोत मला! आँ—माझी बायको? ती इतर चार माणसांसारखी माणूस आहे. मात्र बेसावध तिच्या तावडीत सापडू नकोस, तिला ते आवडत नाही. मुख्य बाब म्हणजे सारखं बोलत रहा... तिला हसायला विषय दे. तुझ्या प्रेमाबाबत तिला सांग, वगैरे वगैरे... पण मनोरंजक बनवून सांग."

"मनोरंजक?"

"हो. तू प्रेमात पडला आहेस आणि तुला लग्न करायचंय असं तू मला सांगितलंस ना? तर त्याबद्दल सांग सगळं तिला."

सानिनला हा अपमान वाटला. "त्यात तुला मनोरंजक काय वाटलं?"

पोलोझोवने आपले डोळे फक्त गरगरा फिरविले. संत्र्याचा रस त्याच्या हनुवटीवर ओघळला.

"वस्तू खरेदी करण्यासाठी तुझ्या बायकोनं तुला फ्रँकफुर्टला पाठवलं?" थोडे थांबून सानिनने विचारले.

"हो."

"आणि काय खरेदी केलीस?"

"खेळणी. तुला माहीत नाही?"

"खेळणी? तुला मुलं आहेत?"

पोलोझोव झटकन सानिनपासून मागे सरला.

"काय? कशाबद्दल मला मुलं असावीत? बायकी रिकामटेकडे उद्योग... टोप्या, कपडे!"

"त्यातलं तुला काही समजतं?"



"हो."

"पण तुझ्या बायकोच्या कसल्याही गोष्टींशी तुझा काही संबंध नाही, असं तू मला सांगितलंस ना?"

"तिच्या इतर कारभारांबद्दल म्हणायचं होतं मला. ही बाब ठीक आहे. करण्यासारखं याहून दुसरं चांगलं नाही, म्हणून मी तिकडं लक्ष देतो. आणि माझ्या बायकोचा माझ्या निवडीवर विश्वास आहे. शिवाय सौदा करण्यात मी पटाईत आहे."

पोलोझोवचे बोलणे अडखळत होऊ लागले. तो दमला होता.

"आणि तुझी बायको खूप श्रीमंत आहे?"

"होय, होय, श्रीमंत आहे. पण आपला बहुतेक पैसा ती स्वत:पाशीच ठेवते."

"पण याबद्दल तू तक्रार करू शकशील असं मला वाटत नाही."

"मी तिचा नवरा आहे ना? माझ्या संधी मी का हुकवायच्या? शिवाय, मी तिच्या खूप उपयोगी पडतो. तिला माझ्याबरोबर छान आहे! मी फार सोयीस्कर नवरा आहे."

पोलोझोवने रेशमी रुमालाने आपला चेहरा पुसला आणि जोराने फुरकला. "माझी दया कर!" अशी जणू तो विनवणी करीत होता. "आणखी एक शब्दही मला उच्चारायला लावू नको! मला ते किती जड जातंय पहा!"

सानिनने त्याला त्रास दिला नाही व पुन्हा एकदा तो विचारात गढला.

बग्गी ज्याच्यासमोर येऊन थांबली ते वीसबादेन हॉटेल एखाद्या राजवाड्यासारखेच होते. त्याच्या खूप दूरच्या अंतर्भागात घंटा वाजल्या आणि एकदम लगबग सुरू झाली. मुख्य प्रवेशद्वारापाशी काळ्या टेल-कोटांमधील प्रतिष्ठित माणसे वावरताना दिसू लागली. सोनेरी फितींनी झगमगणाऱ्या नोकराने थाटात बग्गीचे दार उघडले.

विजयी वीराप्रमाणे पोलोझोव खाली उतरला व सुगंधित, गालिचा अंथरलेल्या पायऱ्या चढू लागला. तसाच उत्तम पोषाख केलेली, पण रशियन धाटणीच्या चेहऱ्याची एक व्यक्ती त्याला भेटायला धावली. तो त्याचा मदतनीस होता. पोलोझोवने त्याला सांगितले की, यापुढे त्याला तो नेहमी बरोबर घेऊन जाणार आहे, कारण आदल्या दिवशी फ्रँकफुर्टमध्ये सबंध

रात्रभर गरम पाणी मिळाले नव्हते. मदतनीसाने हे ऐकल्यावर भीतीदायक चेहरा केला आणि आपल्या धन्याचे रबरी बूट काढण्यासाठी अधीरपणे तो खाली वाकला.

"मार्या निकोलायेवना घरात आहे?" पोलोझोवने विचारले.

"होय सरकार. बाईसाहेब पोषाख करताहेत. काउंटेस लासूनस्काया-बरोबर जेवायला जाणार आहेत."

"ओह्—ती होय! एक मिनिट थांब. बग्गीत काही वस्तू आहेत. तू स्वतः सगळ्या बाहेर काढ आणि वरती घेऊन ये. आणि तू द्मित्री पावलोविच," पुढे तो म्हणाला, "तुझ्यासाठी एक खोली घे आणि पाऊण तासानंतर परत ये. माझ्याबरोबर जेवायला ये."

पोलोझोव डुलत गेला. सानिनने एक स्वस्तातली खोली घेतली. तेथे स्वच्छ होऊन व थोडी विश्रांती घेऊन महाराज प्रिन्स व्हॉन पोलोझॉफ यांच्या आलीशान खोल्यांकडे तो निघाला.

हा "प्रिन्स" आरामशीर गुबगुबीत मखमाली खुर्चीवर अत्यंत सुरेख दालनात बसलेला त्याला आढळला. सानिनच्या सुस्त मित्राने एव्हाना आंघोळ केली होती आणि छानपैकी सॅटिनचा गाऊन परिधान केला होता. त्याच्या डोक्यावर किरमिजी फेज टोपी होती. सानिन त्याच्यापाशी गेला व काही मिनिटे त्याला न्याहाळत राहिला. पोलोझोव एखाद्या पुतळ्याप्रमाणे स्तब्ध बसला होता. सानिनच्या दिशेने ना त्याने आपले डोके वळविले, ना भुवया उंचावल्या, ना चकार शब्द काढला. अगदी साक्षात शाही रुबाब! सानिनने त्याच्याकडे एक-दोन मिनिटे टक लावून पाहिले व ह्या पवित्र शांततेचा भंग करण्यासाठी तो काहीतरी बोलणार, एवढ्यात शेजारच्या खोलीचे दार अचानक उघडले गेले आणि काळ्या किनारीचा पांढरा पोषाख केलेली एक सुंदर तरुणी दारात अवतीर्ण झाली. तिच्या बोटांवर आणि मानेभोवती हिरे लखलखत होते—साक्षात मार्या निकोलायेवना पोलोझोवा उभी होती! तिचा विपुल पिंगट केशसंभार तिच्या चेहऱ्याच्या दोन्ही बाजूंना विखुरला होता. तिने केसांच्या वेण्या घातल्या होत्या, पण पिना लावल्या नव्हत्या.

## ३४

"ओह्! माफ करा!" किंचित लाजून आणि किंचित थट्टेखोर स्मित करीत ती उद्गारली. त्याच वेळी तिने आपल्या वेणीचे एक टोक उचलले



व आपले टप्पोरे राखी तेजस्वी डोळे सानिनवर रोखले. "तुम्ही एव्हाना इथं आला असाल अशी मला कल्पना नव्हती."

"सानिन, द्मित्री पावलोविच, माझ्या बालपणचा मित्र," आपले डोके न वळविता अथवा वर न उचलता फक्त सानिनच्या दिशेने बोट दाखवीत पोलोझोव म्हणाला.

"हो, मला ठाऊक आहे—तू मला सांगितलंस. खूप आनंद झाला तुम्हाला भेटून. पण मी तुला सांगणार होते इप्पोलित सीदोरीच... माझी मोलकरीण आज इतकी मूर्खासारखी वागतेय..."

"तुझे केस विंचरून द्यायचेत?"

"हो, तुझी हरकत नसली तर. माफ करा," पूर्वीप्रमाणेच सानिनकडे पाहून स्मित करीत आणि मान डोलावीत मार्या निकोलायेवना म्हणाली. वेगाने वळून ती दारामधून नाहीशी झाली. तिच्या सुंदर मानेचा, रेखीव खांद्यांचा व कमनीय कंबरेचा क्षणिक पण डौलदार ठसा आपल्या मागे ठेवून गेली.

पोलोझोव उठला व मोठ्या कष्टाने झुलत त्याच दारामधून पलिकडे गेला.

"प्रिन्स पोलोझॉफ"च्या दालनात आपण आहोत याची घरमालकिणीला उत्तम कल्पना होती आणि खरोखरीच सुंदर असलेल्या आपल्या केसांचे केवळ प्रदर्शन करण्यासाठी तेथे ती आली होती याबद्दल सानिनला किंचितही संदेह नव्हता. मादाम पोलोझोवाच्या ह्या युक्तीचा सानिनला मनातल्या मनात आनंदच झाला—जर ती माझ्यावर छाप पाडू पाहतेय, माझ्यासमोर नखरा करू पाहतेय, तर इस्टेटीच्या किंमतीवर माझ्याशी कदाचित ती फारशी खळखळ करणार नाही! जेम्माने त्याचे काळीज एवढे व्यापले होते की इतर सर्व स्त्रिया त्याला कःपदार्थ वाटत होत्या, त्यांच्याकडे त्याचे ध्यानही जात नव्हते आणि यावेळीही त्याच्या डोक्यात फक्त एवढाच विचार आला: "मला सांगण्यात आलं होतं ते अगदी खरं होतं—ही बाई दिलखेचक आहे!"

सध्याच्या उन्मन मनःस्थितीत जर तो नसता, तर निःसंशयपणे त्याची प्रतिक्रिया अगदी वेगळ्या तऱ्हेने व्यक्त झाली असती—मार्या निकोलायेवना पोलोझोवा, ऊर्फ कोलीश्किना, ही अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण व्यक्ती होती. आणि याचे कारण ती सुंदर होती असे मुळीच नव्हे. खरे म्हणजे हीन कुळात जन्मल्याच्या खुणा तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होत्या. तिचे कपाळ

15-Aug-13 / 18:29:07

उतरते होते, नाक काहीसे गुबगुबीत होते व त्याचे टोक वर वळले होते. तिची त्वचा नाजुक नव्हती अथवा हात-पायही सुंदर नव्हते. पण त्यामुळे कुठे बिघडत होते? ती काही पूष्कीनची "सौंदर्य देवता" नव्हती[49], जिला पाहणारा प्रत्येकजण थबकत होता. तिच्या जोमदार स्त्रीत्वामध्ये – रशियन आणि जिप्सी यांच्या मिश्रणात – गोडवा होता व त्यामुळे तिला पाहणारा आपोआपच थबकत होता.

पण सानिनचा जेम्माच्या प्रतिमेने बचाव केला होता. जुन्या काळच्या कवींनी गायलेल्या तिहेरी चिलखताप्रमाणे!

दहा मिनिटांनंतर मार्या निकोलायेवना आपल्या नवऱ्यासह परत अवतीर्ण झाली. ती सानिनपाशी गेली. तिच्या त्या केवळ चालीत असे काही होते, वास्स! ज्या चालीपायी पुरातन काळी अनेक मूर्खांची डोकी फिरून गेली होती. "ही स्त्री जेव्हा तुझ्यापाशी येते तेव्हा ती जणू तुझ्या संपूर्ण जीवनाचं सुख घेऊन येतेय," त्यांपैकी अशा एकाने म्हटले होते. आपले दोन्ही हात पसरून ती सानिनपाशी गेली आणि अत्यंत मधाळ, पण भिडस्त आवाजात रशियनमध्ये म्हणाली: "तुम्ही माझ्यासाठी थांबाल ना? मी लौकर परत येईन!"

सानिन आदरपूर्वक झुकला, पण मार्या निकोलायेवना एव्हाना दारानजीकच्या पडद्यामागे अदृश्य झाली होती. अदृश्य होता होता तिने मान मागे वळवून परत एकदा स्मित केले होते व आपला पूर्वीचा डौलदार ठसा ती माघारी ठेवून गेली होती.

जेव्हा ती स्मित करायची तेव्हा तिच्या गालांवर एक नव्हे, दोनही नव्हे, तर तीन खळ्या पडायच्या. तिच्या ओठांपेक्षा तिच्या डोळ्यांमध्ये अधिक स्मित उमटायचे. तिच्या लांब, रसदार लाल ओठांच्या डाव्या कोपऱ्यात दोन छोटे तीळ होते.

पोलोझोव डुलत डुलत खोलीत आला आणि परत आपल्या आरामखुर्चीत स्थानापन्न झाला. तो नेहमीप्रमाणेच गप्प होता, पण त्याच्या पांढुरक्या, अकाली सुरकुतलेल्या गालांवर एक विचित्र अर्धवट स्मित अधूनमधून उमटत होते.

सानिनपेक्षा अवघ्या तीन वर्षांनी तो मोठा होता, पण खूपच वयस्क दिसत होता.

आपल्या पाहुण्याला त्याने जेवणाची जी मेजवानी दिली ती अत्यंत चोखंदळ खवैय्या माणसालाही निःसंशयरीत्या समाधान देणारी होती, पण



सानिनला तो मामला अत्यंत कटाळवाणा व कधीही न संपणारा भासला. पोलोझोव सावकाश खात होता, "भावनापूर्वक, समजून घेऊन आणि योग्य भर देऊन!"[50] आपल्या बशीवर तो लक्षपूर्वक झुकत होता व जवळ जवळ प्रत्येक घासापूर्वी प्रथम हुंगून पहात होता. मद्याचा घोट गिळण्यापूर्वी तो तोंडात खळखळ घोळवीत होता आणि नंतर ओठांवरून जीभ चाटत होता... पण भाजलेले मांस आणताच अचानक त्याने बोलायला आरंभ केला – आणि कशाबद्दल तो बोलला? मरीनो मेंढ्यांविषयी. त्यांचा एक कळप विकत घेण्याचा त्याचा इरादा होता. अत्यंत तपशीलवारपणे, हळुवारपणे आणि अल्पार्थवाचक नामे वापरून. जवळ जवळ उकळत्या कॉफीचा एक कप प्यायल्यानंतर (अत्यंत रडव्या, त्रासदायक आवाजात त्याने वेटरला अनेकदा आठवण करून दिली की, काल त्याला थंड कॉफी देण्यात आली होती – "बर्फासारखी गार") व आपल्या पिवळ्या, वाकड्या दातांनी हॅवाना सिगारचे टोक चावून तोडल्यानंतर, आपल्या नेहमीच्या सवयीप्रमाणे तो झोपला. सानिनला यावेळी खूप बरे वाटले. तो खोलीत येरझाऱ्या घालू लागला. जाड गालिचामुळे त्याच्या पावलांचा आवाज होत नव्हता. जेम्माबरोबरच्या भावी जीवनाची आणि तिच्यापाशी कोणती बातमी घेऊन जाता येईल त्याबद्दलची स्वप्ने रंगविण्यात तो मग्न झाला होता. पण पोलोझोव नेहमीपेक्षा लौकर जागा झाला. तसे त्याने स्वतःसुद्धा बोलून दाखविले – तो अवघा दीड तास झोपला होता! बर्फ घातलेल्या सोडा-वॉटरचा एक ग्लास आणि नोकराने आणून दिलेल्या हिरव्यागार रंगाच्या "कीयेव" काचेच्या बरणीमधून रशियन मुरंब्याचे सात-आठ चमचे त्याने गट्ट केले. त्या मुरंब्यांविना जिवंत राहणे आपल्याला शक्य नाही, असे तो म्हणाला. मग आपल्या सुजलेल्या पापण्यांचे डोळे सानिनकडे वळवून त्याने त्याला दूराकी ("गाढव" – अनु.) खेळ खेळायला बोलाविले. सानिन आनंदाने कबूल झाला. पोलोझोव नाहीतर परत आपल्या कोकरांबद्दल, मेंढ्यांबद्दल आणि जाड शेपटीच्या बकऱ्यांबद्दल बोलायला सुरुवात करील अशी त्याला भीती वाटत होती. यजमान व पाहुणा दिवाणखान्यात आले, नोकराने पत्त्यांचा डाव आणून दिला आणि खेळ सुरू झाला. अर्थात पैशासाठी ते खेळत नव्हते.

मार्या निकोलायेवना जेव्हा काऊंटेस लासूनस्कायाकडून परतली तेव्हा हे दोघे ह्या निष्पाप खेळात रंगलेले तिला आढळले.

पत्त्यांचे टेबल आणि पत्ते पाहताच ती मोठ्यांदा हसली. सानिन ताड-

दिशी उभा झाला, पण ती ओरडली – "चालू दे, चालू दे, मी कपडे बदलते आणि तुमच्याकडं परत येते!" ती पुन्हा एकदा अदृश्य झाली; आपल्या पोषाखाची सळसळ करीत व हातमोजे काढीत.

आणि खरेच ती खूप लौकर परतली. मघाच्या सुंदर पोषाखाऐवजी आता तिने लोंबत्या बाह्यांचा सैलसर रेशमी जांभळा अंगरखा घातला होता व कमरेशी जाड पिळाची दोरी बांधली होती. आपल्या नवऱ्यापाशी ती बसून राहिली व तो "गाढव" ठरीपर्यंत वाट पहात बसून राहिली. मग ती म्हणाली: "खूप झालं जाडू!" ("जाडू" शब्दासरशी सानिनने चकित होऊन तिच्याकडे पाहिले, पण त्याच्या नजरेला धीटपणे आपली नजर भिडवीत आणि आपल्या सर्व खळ्यांचे दर्शन घडवीत ती मजेने हसली.) "आता पुरे. तू पेंगुळलेला मला दिसतो आहेस. माझ्या हाताचं चुंबन घे आणि जा. मस्ये सानिन आणि मी थोडा वेळ बोलत बसणार आहोत."

"मला झोप आलेली नाही," खुर्चीमधून कष्टाने उठत पोलोझोव कुरकुरला. "पण तुला हवं असेल तर मी जाईन आणि तुझ्या हाताचं चुंबन घेईन."

तिने आपल्या हाताचा पंजा वर धरला, पण सारा वेळ ती सानिनकडे पाहून स्मित करीत होती.

पोलोझोवनेही त्याच्याकडे एक कटाक्ष टाकला आणि निरोपाचा शब्दही न बोलता तो खोलीतून निघून गेला.

"हं, आता सांगा मला सगळं सगळं!" आपले हातांचे उघडे कोपर टेबलावर टेकीत व एका हाताच्या नखांच्या दुसऱ्या हाताच्या नखांवर अधीरपणे टिचक्या वाजवीत ती उत्सुकतेने म्हणाली. "म्हणतात ते खरंच का – तुम्ही लग्न करताय?"

असे बोलताना मार्या निकोलायेवनाने सानिनच्या डोळ्यांमध्ये सतत आणि शोधकपणे पाहता यावे म्हणून आपले डोके किंचित एका बाजूला कलते केले.

## ३५

मादाम पोलोझोवाचे असे मनमोकळे वागणे पाहून कदाचित सानिनला अवघड वाटले असते, जरी तो नवखा नव्हता व तऱ्हेतऱ्हेच्या माणसांबरोबर त्याचा संबंध आला होता. पण ह्या मुक्त आणि अतिपरिचित वागण्यातच



आपल्या कामाचा शुभ शकुन होतोय असे त्याला वाटले. "ह्या श्रीमंत बाईच्या लहरी पुरवायच्या," त्याने ठरविले आणि तिने ज्या छचोरपणे विचारले होते त्याच सुरात तो उत्तरला: "होय, मी लग्न करायचं ठरवलंय!"

"कुणाशी? परदेशी आहे?"

"हो."

"तुमची फार काळची ओळख नाही, होय ना? तुम्ही तिला फ्रँकफुर्टमध्ये भेटलात?"

"बरोब्बर."

"कोण आहे ती? विचारलं तर चालेल?"

"चालेल. ती मिठाईवाल्याची मुलगी आहे."

मार्या निकोलायेवनाने आपले डोळे विस्फारले आणि भुवयांची कमान केली.

"अय्या, कित्ती छान," ती हळूच उद्गारली. "कमाल आहे! तुमच्यासारखे तरुण इतःपर भेटणार नाहीत असं मला वाटायला लागलं होतं. एका मिठाईवाल्याची मुलगी!"

"तुम्हाला ह्याचं आश्चर्य वाटलेलं दिसतंय," गंभीरपणे सानिन म्हणाला, "पण पहिली गोष्ट म्हणजे मला दूषित पूर्वग्रह नाहीत..."

"**पहिली गोष्ट** म्हणजे मला याचं मुळीच आश्चर्य वाटत नाही," त्याला अडवीत मार्या निकोलायेवना म्हणाली, "मलाही दूषित पूर्वग्रह नाहीत. मी स्वतः शेतमजुराची मुलगी आहे. होय, खरंच! मला आश्चर्य वाटतंय आणि आनंद होतोय तो प्रेम करायला न भिणाऱ्या पुरुषाला भेटण्याचा. तुमचं तिच्यावर प्रेम आहे, होय ना?"

"होय."

"ती खूप खूप सुंदर आहे?"

सानिनला ह्या प्रश्नाचा किंचित धक्का बसला... पण आता माघार घ्यायला खूप उशीर झाला होता.

"तुम्हाला माहीतच आहे मार्या निकोलायेवना," तो बोलू लागला, "प्रत्येक प्रेमिकाला आपली प्रेयसी अनुपम वाटते. पण माझी भावी पत्नी – खरोखर सुंदर आहे."

"खरंच? कोणत्या प्रकारचं सौंदर्य आहे तिचं? इटालियन? अभिजात?"

"होय, तिचा चेहरा अत्यंत रेखीव आहे."

"तिची प्रतिमा तुमच्यापाशी नाही?"

"नाही." (त्या काळी फोटो काढण्याची कला अस्तित्वात नव्हती आणि दागेरा पद्धतीच्या प्रतिमा नुकत्याच लोकप्रिय होऊ लागल्या होत्या[51].)

"तिचं नांव काय?"

"जेम्मा."

"आणि तुमचं?"

"दमित्री."

"आणि तुमच्या वडलांचं?"

"पावलोविच."

"हे बघा," त्याच हलक्या आवाजात मार्या निकोलायेवना बोलली. "तुम्ही मला खूप आवडलात दमित्री पावलोविच. तुम्ही भले माणूस आहात अशी माझी खात्री आहे. तुमचा हात द्या. आपण एकमेकांचे स्नेही बनू."

आपल्या बळकट, शुभ्र, घडीव बोटांनी तिने त्याचा हात जोरात दाबला. त्याच्या हातापेक्षा तिचा हात फारसा लहान नव्हता, पण तो त्याच्या हातापेक्षा खूपच जास्त उबदार होता, मऊ होता आणि त्या हातामध्ये खूप जोमदारपणा होता.

"माझ्या डोक्यात आत्ता काय आलंय ठाऊक आहे?"

"काय?"

"तुम्ही माझ्यावर रागावणार नाही ना? तुम्ही म्हणता, ती तुमची वाग्दत्त पत्नी आहे. पण हे खरंच... अगदी आवश्यक होतं का?"

सानिनच्या कपाळाला आठ्या पडल्या. "मला तुमचा रोख समजला नाही मार्या निकोलायेवना."

आपल्या गालावर आलेली केसांची बट डोक्याला मागे झटका देऊन दूर करीत मार्या निकोलायेवना शांतपणे हसली. "तो खरंच प्रेमात आहे, तो खरंच छान आहे," किंचित कष्टी होत आणि किंचित विमनस्कपणे ती पुटपुटली.

"शिलेदार! आणि यानंतर, इतःपर आदर्शवादी उरले नाहीत असं म्हणणाऱ्यांवर कसा विश्वास ठेवायचा!"

मार्या निकोलायेवना शुद्ध रशियन धाटणीने, अस्सल मॉस्को-बोलीत बोलत होती. तिची बोली उच्चभ्रूंची नव्हती, तर सर्वसामान्यांची होती.

"तुम्ही बहुधा जुन्या विचारांच्या, धर्मभिरू कुटुंबात लहानाचे मोठे



झालात?" ती म्हणाली. "रशियाच्या कुठल्या भागातून आला आहात?"

"तूला गुबेर्निया."

"म्हणजे आपण एकाच गावचे. माझे वडील... माझे वडील कोण हे तुम्हाला माहीत आहे ना?"

"होय."

"त्यांचा जन्म तूलामधलाच... ते तूलावासी होते. ठीक आहे..." (मार्या निकोलायेवनाने हे शब्द मुद्दाम मध्यमवर्गीय पद्धतीने उच्चारले.*) "आता आपण कामाला लागू."

"कामाला लागू... म्हणजे? असं म्हणण्यात तुमचा हेतू काय?"

मार्या निकोलायेवनाने आपले डोळे किलकिले केले. "तुम्ही इथं कशासाठी आला आहात?" (जेव्हा तिने आपले डोळे किलकिले केले तेव्हा त्यांच्यात खूप प्रेमळ आणि थोडासा उपरोधाचा भाव उमटला. पण जेव्हा ती डोळे विस्फारायची तेव्हा त्यांच्या थंड तेजस्वी गहिराईमध्ये काहीतरी कठोर आणि दुष्ट चमक उमटायची. रात्रीसारख्या गर्द काळ्या रंगाच्या तिच्या दाट, किंचित कमानदार भुवयांमुळे तिच्या डोळ्यांना विशेष सौंदर्य प्राप्त झाले होते.) "तुमची इस्टेट मी खरेदी करावी अशी तुमची इच्छा आहे ना? लग्न करण्यासाठी तुम्हाला पैशांची गरज आहे हे खरं ना? काय?"

"हो."

"आणि तुम्हाला बरेच पैसे हवे आहेत?"

"आरंभी काही हजार फ्रँकवर भागेल. तुमच्या नवऱ्याला माझी इस्टेट माहीत आहे. तुम्ही त्याच्याशी सल्ला-मसलत करू शकता. मी फार मोठी किंमत मागणार नाही."

मार्या निकोलायेवनाने आपले डोके अत्यंत सावकाशपणे डावीकडून उजवीकडे वळविले. "**पहिली गोष्ट** म्हणजे," प्रत्येक शब्द अलगपणे उच्चारीत आणि आपल्या नखांनी सानिनच्या फ्रॉक-कोटाच्या बाहीवर टिचक्या मारीत ती बोलू लागली, "माझ्या नवऱ्याचा सल्ला घेण्याची मला सवय नाही, फक्त कपड्यांबाबतीत सोडून – त्यात तो निष्णात आहे. आणि **दुसरी गोष्ट**, तुम्ही कमी किंमत सांगाल असं का म्हणता? सध्या तुम्ही प्रेमात आहात आणि कोणताही त्याग करायला सज्ज आहात ह्याचा फायदा

---

* "खराशो" ह्या रशियन उच्चाराऐवजी "खेरशो" – अनु.

घेण्याची माझी मुळीच इच्छा नाही... तुमच्याकडून त्यागांची मला अपेक्षा नाही. काय? तुमच्या.... काय म्हणता तुम्ही त्यांना? — ऊर्मींना उत्तेजन देण्याऐवजी मी तुम्हाला जिवंत सोलून काढणार? माझी ती सवय नाही. प्रसंगी मी निर्दय होऊ शकते — पण वेगळ्या रीतीनं."

ती आपल्याला हसते आहे अथवा खरेच प्रामाणिकपणे बोलते आहे, याचा योग्य अंदाज करणे सानिनला जमेना. पण तो स्वतःला बजावीत राहिला: "तुझ्यापासून मला सावध राहिलं पाहिजे बाई!"

रशियन समोवार, कप-बशा, साय, कुरकुरीत बिस्कीटे व इतर मिठाई भरलेला मोठा ट्रे घेऊन एक नोकर खोलीत आला आणि सानिन व मादाम पोलोझोवा यांच्या दरम्यान टेबलावर ठेवून गुडुप झाला.

तिने त्याच्यासाठी कपात चहा ओतला. "तुमची हरकत नाही ना?" असे म्हणत तिने नुसत्या बोटांनी साखरेचा खडा उचलून त्याच्या कपात टाकला. खरे म्हणजे चिमटा तिच्या शेजारीच टेबलावर होता.

"मुळीच नाही... अशा सुंदर हातांनी..."

त्याने वाक्य पुरे केले नाही आणि चहाच्या पहिल्याच घुटक्याबरोबर तो घुसमटला, तर ती मात्र त्याच्याकडे थेट, एकटक पहात राहिली.

"माझ्या इस्टेटीच्या कमी किंमतीचा मी उल्लेख केला," तो पुढे बोलू लागला, "कारण मी असं गृहीत धरलं की, तुम्ही परदेशी असल्यामुळं आत्ता तुमच्यापाशी पूर्ण रक्कम नसेल; शिवाय अशा परिस्थितीत इस्टेटीची विक्री अथवा खरेदी जरा रीतीला धरून नाही, आणि म्हणून या गोष्टींचा विचार करणं भाग आहे असं मला वाटलं."

सानिन आपल्या युक्तिवादांमध्ये गुरफटत चालला होता, तर आपल्या खुर्चीवर शांतपणे मागे रेलून, हातांची घडी घालून, सानिनच्या चेहऱ्याकडे टक लावून मार्या निकोलायेवना पहात बसली होती. शेवटी तो बोलायचा थांबला.

"हरकत नाही, बोला पुढं, बोला," जणू त्याच्या मदतीला येत तो म्हणाली. "मी ऐकतेय — तुमचं बोलणं ऐकायला मला आवडतंय. बोला पुढं!"

सानिन आपल्या इस्टेटीचे वर्णन करू लागला. ती किती एकरांची होती, नक्की कुठे होती, तिची आर्थिक उत्पन्ने कोणती होती, त्यांच्यापासून उत्तम नफा कसा काढायचा... इत्यादी गोष्टी तो तिला सांगू लागला. खुद्द घराच्या रमणीय स्थळाचाही त्याने उल्लेख केला. मार्या निकोलायेवना सारा वेळ त्याच्याकडे जास्तच एकतानतेने आणि प्रफुल्लित मुद्रेने पहात होती. तिचे ओठ किंचित हलायचे, पण त्यांच्यावर स्मित नव्हते. आपला खालचा ओठ ती चावत होती. शेवटी त्याला विचित्र वाटू लागले व दुसऱ्यांदा तो गप्प झाला.



"दमित्री पावलोविच," मार्या निकोलायेवनाने बोलायला आरंभ केला आणि विचार करायला ती थांबली. "दमित्री पावलोविच," ती परत म्हणाली, "मला खात्री आहे की, तुमच्या इस्टेटीची खरेदी मला फायदेशीर ठरेल आणि किंमतीबाबत आपलं एकमत होईल. पण तुम्ही दोन दिवसांचा अवधी दिला पाहिजे... होय, दोन दिवस! तुमच्या भावी पत्नीपासून दोन दिवसांचा वियोग सहन करणं तुम्हाला जमेल? तुमच्या मर्जीविरुद्ध मी तुम्हाला अधिक काळ थोपवून धरणार नाही. तसं मी वचन देते. पण आत्ता तुम्हाला पाच-सहा हजार फ्रँक हवे असले तर तेवढं कर्ज मी तुम्हाला आनंदानं देऊ शकेन — त्याचा हिशेब आपण नंतर करू."

सानिन उठला. "मार्या निकोलायेवना, तुम्हाला अगदी अनोळखी असलेल्या माझ्यासारख्या माणसाला ज्या प्रेमानं आणि तत्परतेनं तुम्ही मदत करू पाहता आहात, त्याबद्दल मी तुमचे आभार मानतो. पण जर तुम्हाला अत्यंत आवश्यक असेल, तर माझ्या इस्टेटीसंबंधातला तुमचा निर्णय ऐकण्यासाठी दोन दिवस थांबायला मी तयार आहे."

"मला त्याची आवश्यकता आहे दमित्री पावलोविच. तुम्हाला हे खूप कठीण जाईल का? खूप? सांगा मला."

"माझ्या भावी पत्नीवर माझं प्रेम आहे, मार्या निकोलायेवना, आणि तिचा वियोग सहन करणं मला सोपं नाही."

"ओह्, तुम्ही सुवर्णमोलाचे गृहस्थ आहात!" सुस्कारा टाकीत मार्या निकोलायेवना म्हणाली. "फार काळ तुम्हाला तिष्ठत ठेवणार नाही मी, असं वचन देते. तुम्ही निघालात?"

"खूप उशीर झालाय!" सानिन म्हणाला.

"शिवाय तुमच्या प्रवासानंतर आणि माझ्या नवऱ्याशी वुराकी खेळल्यानंतर तुम्हाला विश्रांती घेणं आवश्यक आहे. मला सांगा, माझ्या नवऱ्याचे, इप्पोलित सीदोरीचचे, खूप जिवाभावाचे मित्र आहात का तुम्ही?"

"आम्ही शाळेत एकत्र होतो."

आणि तेव्हाही तो तसाच होता?"

"कसा?" सानिनने विचारले.

मार्या निकोलायेवना अचानक हसली. ती एवढी हसली की, तिचा चेहरा लाल झाला. खुर्चीतून उठताना तिने आपल्या ओठांवर आपला हातरुमाल ठेवला व जणू थकव्यापायी झोक देत सानिनपाशी ती गेली आणि त्याच्यापुढे तिने आपला हात धरला.

तो झुकला आणि दाराकडे गेला.

"उद्या सकाळी लौकर या इथं, ऐकलंत का?" त्याच्या पाठी ती ओरडली.

खोलीतून बाहेर जाताना त्याने मागे वळून पाहिले तेव्हा ती परत खुर्चीत बसलेली व डोक्यामागे हात धरून विचारात गढलेली त्याला आढळली. तिच्या अंगरख्याच्या सैल बाह्या तिच्या खांद्यांपर्यंत घसरल्या होत्या आणि त्या हातांचे दर्शन, तिची एकूण आकृती, रोमांचकरीत्या सुंदर होती हे मान्य न करणे अशक्य होते.

## ३६

सानिनच्या खोलीत मध्यरात्रीनंतरही बराच वेळपर्यंत अद्याप दिवा जळत होता. टेबलाशी बसून तो "त्याच्या जेम्माला" पत्र लिहित होता. त्याने तिला सर्व कथन केले होते; पोलोझोव नवरा-बायकोचे वर्णन केले होते, पण स्वतःच्या भावना प्रकट करण्यावरच पत्रात जास्त भर दिला होता आणि तीन दिवसांच्या आत तिला भेटण्याचे वचन देऊन समारोप केला होता. (त्यानंतर तीन उद्गार चिन्हे काढली होती.) दुसऱ्या दिवशी भल्या सकाळीच त्याने हे पत्र पोस्टात नेऊन टाकले व कूरहाऊस उद्यानात तो फिरायला गेला. तेथे आधीपासूनच बँड वाजत होता. मात्र अजून माणसे तुरळक होती. 'रॉबर्ट द्याबल'[52]मधील मिश्र-संगीत ऐकण्यासाठी बँड-स्टँडसमोर तो थांबला. मग कॉफी प्यायल्यानंतर मुख्य रस्त्यापासून बाजूला जाणाऱ्या एका आळीत वळला व बाकावर बसून विचार करू लागला.

छत्रीच्या मुठीचा एक जोरदार फटका त्याच्या खांद्यावर जाणवला. तो दचकला... त्याच्या समोर मार्या निकोलायेवना उभी होती. शेवाळी रंगाच्या तलम कापडाचा पोषाख तिने केला होता, पांढरी टोपी तिच्या डोक्यावर होती व हातात नमदी मोजे होते. उन्हाळी प्रातःकालाप्रमाणे ती ताजी टवटवीत आणि गुलाबी दिसत होती. पण मस्त झोपेची मधुरं सुस्ती अजूनही तिच्या हालचालींमधून आणि नजरेमधून जाणवत होती.



"नमस्ते!" ती म्हणाली. "तुम्हाला बोलावण्यासाठी आज सकाळी मी निरोप पाठवला होता, पण तोवर तुम्ही बाहेर गेला होतात. आत्ता मी फक्त दुसरा ग्लास प्यायलेय. इथं खनिज पाण्याचे माझ्यावर उपचार चालू आहेत. कशाला ते देवच जाणे! माझ्यापेक्षा जास्त निरोगी आणखी कोण असू शकणार? –तर म्हणून मला आख्खा तासभर चालावं लागतं. माझ्या सोबतीला येता? मग आपण कॉफी पिऊ."

"माझी कॉफी झाली," बाकावरून उठत सानिन म्हणाला. "पण तुमच्याबरोबर फिरायला मला आनंद वाटेल."

"तर मग तुमचा हात द्या मला. घाबरू नका–तुमची प्रेयसी इथं नाही. ती तुम्हाला पाहणार नाही."

सानिनने बळेच स्मित केले. जेव्हा जेव्हा मार्या निकोलायेवना जेम्माचा उल्लेख करायची, तेव्हा तेव्हा त्याला अप्रिय संवेदना जाणवायची. पण तरीही तो घाईघाईने तिच्यासमोर झुकला. मार्या निकोलायेवनाचा हात सावकाशपणे आणि अलगदपणे त्याच्या दंडावर विसावला, मग संपूर्ण दंडावरून निसटला व जणू त्याला चिकटून बसला.

"इकडून चला," आपली उघडी छत्री एका खांद्यावर ठेवीत ती म्हणाली. "ह्या बागेची मला पुरती माहिती आहे. इथल्या सगळ्या सुंदर ठिकाणांचं मी तुम्हाला दर्शन घडवीन. आणि माहीत आहे" (हे दोन शब्द वारंवार उच्चारायची तिला सवय होती), "आता खरेदीबद्दल आपण बोलायचं नाही. न्याहरीनंतर त्या विषयावर व्यवस्थित चर्चा करू. आता तुम्ही स्वतःची माहिती मला सांगा... म्हणजे कुणाशी व्यवहार करायचा आहे याची मला कल्पना येईल. आणि नंतर, तुमची इच्छा असेल तर मी माझ्याबद्दल सांगीन. चालेल?"

"पण मार्या निकोलायेवना, तुम्हाला त्यात काय स्वारस्य..."

"थांबा! थांबा! तुम्ही माझ्याबद्दल गैरसमज करून घेतलात. तुमच्याशी छचोर वागण्याचा मी मुळीच प्रयत्न करत नाही." मार्या निकोलायेवनाने खांदे उडविले. "ज्या माणसाची प्रेयसी प्राचीन पुतळ्यासारखी आहे त्याच्याशी छचोर वागायचा मी कशाला प्रयत्न करीन? पण तुमच्यापाशी माल आहे आणि मी व्यापारी आहे. मला सांगा बघू त्याबद्दल! मी काय खरेदी करतेय एवढंच नव्हे, तर कुणाकडून खरेदी करतेय, हेही मला जाणून घ्यायचंय. माझ्या वडलांचा तो कायदा होता. तर, सुरू करा... तुमचं बालपण वगळा आणि किती काळापासून तुम्ही परदेशी आहात इथून

सुरुवात करा. आणि आत्तापर्यंत तुम्ही कुठं कुठं गेलात? एवढं वेगानं चालू नका. कसलीच घाई नाही."

"इथं मी इटलीहून आलो. तिथं बरेच महिनेपर्यंत माझा मुक्काम होता."

"प्रत्येक इटालियन गोष्टीकडं तुम्ही आकर्षित होत आहात असं दिसतं. तुमची वस्तू तुम्हाला तिथं गवसली नाही हे आश्चर्यच! तुम्हाला कलेची आवड आहे? चित्रांची? अथवा संगीत जास्त आवडतं?"

"मला कलेची आवड आहे... सर्व सुंदर गोष्टी मला आवडतात."

"आणि संगीत?"

"संगीतसुद्धा."

"पण मला मुळीच आवडत नाही. मला फक्त रशियन गाणी आवडतात. तीसुद्धा फक्त खेड्यात असताना आणि वसंताच्या मोसमात. माहीत आहे, गाणी आणि नाच असं एकत्र... लाल रुमाल, बायकांच्या कपाळांवर मोत्याच्या माळा, कुरणांमध्ये कोवळं गवत, धुराचा वास... ते मला आवडतं! पण माझ्याबद्दल नको बोलायला! तुमच्याबद्दल सांगा मला..."

अधूनमधून सानिनकडे कटाक्ष फेकीत मार्या निकोलायेवना फिरत होती. ती खूप उंच होती व तिचा चेहरा जवळ जवळ त्याच्या चेहऱ्याच्या पातळीशी समांतर होता.

आपल्या आयुष्याबद्दलची हकीकत तिला सांगायला त्याने प्रारंभ केला. सुरुवातीला त्याच्या कथनात अनिच्छा होती, असंबद्धता होती. पण नंतर मात्र त्याला हुरूप चढला व त्याची रसवंती वाहू लागली. मार्या निकोलायेवना उत्तम श्रोती होती आणि ती स्वतः एवढ्या मनमोकळेपणाने वागायची, की इतरही नकळतपणे मोकळे वागू लागत. कार्डिनल रेत्झ[53] ज्याला le terrible don de la familiarité म्हणत ते तिच्यात होते. आपले प्रवास, पीटरबुर्गमधील आपले जीवन, आपला यौवनकाळ, यासंबंधी सानिन तिच्याशी बोलला... जर मार्या निकोलायेवना ही उच्चभ्रू समाजातील चालीरीतींनुसार वागणारी खानदान स्त्री असती, तर एवढ्या मोकळेपणाने तो तिच्याशी कधीही बोलला नसता. पण तिने स्वतःला चांगला स्नेही म्हणवून घेतले होते आणि कोणताही नखरा तिने सहन केला नसता. आणि नेमक्या अशाच रीतीने सानिनसमोर ती दाखल झाली. मात्र हा "चांगला स्नेही" त्याच वेळी त्याच्या शेजारून मांजरीच्या चालीने चालत होता, त्याच्या



हातावर किंचित भार देऊन त्याच्या चेहऱ्याकडे पहात होता; एका तरुणीच्या रूपात त्याच्या शेजारून चालताना बेभान करणारी प्रबळ मोहिनी घालीत होता. आम्हा दुबळ्या मर्त्यांना विनाशाला नेणारी मोहिनी! अशी मोहिनी फक्त स्लाव स्वभावांमध्ये असते आणि तीसुद्धा शुद्ध रक्ताच्या नव्हे, तर मिश्र रक्ताच्या!

सुमारे तासाहून अधिक काळपर्यंत सानिन आणि मार्या निकोलायेवना गप्पा मारीत फिरत होते. एकदाही ते एका जागी थबकले नाही, उलट उद्यानातील असंख्य वाटांवरून सतत चालत राहिले होते. चढावरील वाटांवरून जाताना न थांबता समोरच्या दृश्यांना कौतुकाने निरखीत होते, तर उतारावरून खाली येऊन झाडांच्या अभेद्य सावलीत मिसळून जात होते. आणि हा सारा वेळ त्यांचे हात एकमेकांमध्ये गुंफलेले होते. अधूनमधून सानिनच्या अंतःकरणात नकळतपणे चीड उमटत होती. जेम्माबरोबर, त्याच्या लाडक्या जेम्माबरोबर, असा प्रदीर्घ विहार यापूर्वी त्याने कधीही केला नव्हता... आणि ह्या स्त्रीने त्याचा ताबा घेतला होता – आणि खलास!

"तुम्ही दमला तर नाही ना?" त्याने तिला अनेकदा विचारले होते.

"मी कधीही दमत नाही," ती उत्तरली होती.

उद्यानात विहार करणारी इतर माणसे त्यांना अधूनमधून भेटत होती. जवळ जवळ प्रत्येक व्यक्ती मार्या निकोलायेवनाला अभिवादन करीत होती. कुणी केवळ औपचारिकरीत्या, तर कुणी आवर्जून. त्यांपैकी एका काळसर वर्णाच्या, अद्ययावत भपकेबाज पोषाख केलेल्या गृहस्थाला उद्देशून, दूरवरूनच तिने निर्दोष पॅरिस-उच्चारात म्हटले: «Comte, vous savez, il ne faut pas venir me voir — ni aujourd'hui, ni demain.» (ऐकलंत का सरदार, माझ्याकडं आज यायचं नाही आणि उद्याही नाही. – अनु.)

त्याने मुकाटपणे आपली टोपी वर उंचावली आणि लवून अभिवादन केले.

"कोण आहे तो?" सानिनने विचारले. सर्व रशियनांप्रमाणे त्यालाही प्रश्न विचारण्याची वाईट खोड होती.

"तो? एक फ्रेंच... त्यांच्यापैकी खूपजण इथं घोटाळताहेत... माझं प्रियाराधन करतोय. पण आता कॉफीची वेळ झाली. चला, घरी जाऊ या. तुम्हाला परत भूक लागली असावी. माझ्या भल्या माणसानं एव्हाना आपल्या डोळ्यांवरची झापडं काढली असतील."

"भला माणूस! झापडं!" सानिनने स्वतःशीच हे शब्द परत उच्चारले. "आणि ही बाई किती सुंदर फ्रेंच बोलते! कमालच आहे!"

मार्या निकोलायेवनाचा अंदाज चुकला नव्हता. ती आणि सानिन जेव्हा हॉटेलात परतले तेव्हा "भला माणूस", अथवा "जाड्या", आपली नेहमीची तुर्की टोपी डोक्यावर चढवून न्याहरीच्या टेबलापाशी आधीच बसलेला होता.

"तुझी वाट पाहून पाहून थकलो!" ओठांना मुरड घालीत तो उद्गारला. "तुझ्याशिवायच कॉफी पिणार होतो आत्ता!"

"काही बिघडलं नाही," मार्या निकोलायेवना आनंदी स्वरात म्हणाली. "रागावलास का? तुझ्या दृष्टीनं ते चांगलंच आहे. नाही तर अगदीच दगड बनशील. बघ, तुझ्यासाठी मी एक पाहुणा आणलाय! तावडतोब घंटी वाजव– आपण कॉफी पिऊ! जगातली सर्वोत्तम कॉफी – ड्रेस्डेनमध्ये बनविलेल्या कप-बशांमधून, मेजावरच्या हिमशुभ्र आच्छादनावर!"

तिने आपली टोपी व हातमोजे भिरकावून दिले आणि टाळ्या वाजविल्या.

पोलोझोवने आपल्या भुवयांआडून तिच्या दिशेने एक कटाक्ष फेकला.

"तू आज एवढी उल्हसित कशामुळं झालीस, मार्या निकोलायेवना?" दबल्या स्वरात त्याने विचारले.

"तुला काय करायचंय त्याच्याशी, इप्पोलित सीदोरीच? तू घंटी वाजव! बसा तुम्ही दूमित्री पावलोविच आणि पुन्हा एकदा कॉफी प्या. ओह्, हुकूम द्यायला मला किती आवडतं! पृथ्वीवर त्यापरतं दुसरं कुठलंही सुख नाही."

"जेव्हा तुझी आज्ञा पाळली जाते," तिचा नवरा गुरगुरला.

"अर्थातच! म्हणून तर मी एवढी उल्हासात आहे. विशेषतः तुझ्याबरोबर. आहे की नाही, जाडू? आली पहा कॉफी!"

वेटरने आणलेल्या प्रचंड ट्रेमध्ये नाटकाच्या जाहिरातीचाही एक कागद होता. मार्या निकोलायेवनाने त्यावर तात्काळ झडप घातली.

"नाटक!" नाराजीच्या सुरात ती म्हणाली. "जर्मन नाटक! पण जर्मन प्रहसनापेक्षा बरं!" वेटरकडे वळून ती म्हणाली: "माझ्यासाठी



बॉक्सची तिकीटं ठेवा – स्टेजबॉक्सची – नाहीतर नको, Fremden-Loge* ची जास्त चांगली. ऐकलंस, मला Fremden-Loge पाहिजे."

"आणि Fremden-Loge जर नगराध्यक्षांनी घेतला असला तर..." वेटरने धाडस करून विचारले.

"नगराध्यक्षांना दहा थेलर दे – आणि Fremden-Loge मलाच मिळेल अशी व्यवस्था कर. समजलं?"

वेटरने नम्रपणे मान खाली झुकविली.

"तुम्ही माझ्याबरोबर नाटकाला याल, दूमित्री पावलोविच? जर्मन नट भयानक असतात, पण तरीही येतो असं म्हणा... याल ना? खरंच? कित्ती छान आहात! आणि जाड्या, तू येतोस?"

"जशी तुझी इच्छा," ओठांशी नुकत्याच वर धरलेल्या कपात पोलोझोव म्हणाला.

"तू घरीच राहणं जास्त चांगलं. तू थिएटरात नेहमी झोपी जातोस आणि तुला जर्मन भाषाही नीट समजत नाही. मी सांगत्ये तू काय करायचं ते – मॅनेजरला पत्र लिही, आपल्या चक्कीबद्दल. शेतकऱ्यांचं धान्य दळून देण्याबद्दल. त्याला सांग, मी ते चालवून घेणार नाही, नाही, नाही! सबंध संध्याकाळसाठी तुला हे काम..."

"ठीक आहे," पोलोझोव म्हणाला.

"उत्तम! तू खूप हुशार आहेस लाडक्या! आणि मंडळी, आता आपण मॅनेजरचा उल्लेख केलाच आहे, तर आपल्या मुख्य कामाची चर्चा करू या. वेटरनं न्याहरीच्या बशा उचलून टेबल स्वच्छ केलं म्हणजे तुम्ही तुमच्या इस्टेटीबद्दलची इत्थंभूत माहिती आम्हाला सांगा, दूमित्री पावलोविच. अगदी सगळी सगळी माहिती – तुमची अपेक्षित किंमत, किती रक्कम तुम्हाला आधी पाहिजे – सगळं!" ("सरतेशेवटी!" सानिनच्या मनात आले. "देवाची कृपा!") "थोडंसं तुम्ही मला आधी सांगितलंय, तुमच्या बागेचं वर्णन किती आल्हादक रीतीनं तुम्ही केलं होतं हे मला आठवतंय – पण जाड्या तिथं नव्हता... त्यालाही ऐकू द्या – तो काहीतरी उपयुक्त गोष्ट सुचवील. तुमच्या विवाहाला मी मदत करू शकेन ही कल्पना मला सुखवतेय – शिवाय मी तुम्हाला वचन दिलं होतं की, न्याहरीनंतर मी तुमच्या

*खास परदेशी पाहुण्यांसाठी राखलेला सज्जा – अनु.

कामाकडं लक्ष देईन आणि मी माझी वचनं नेहमी पाळते, होय ना, इप्पोलित सीदोरीच?"

पोलोझोवने आपल्या चेहऱ्यावरून हात फिरविला.

"जे खरं ते खरं – तुम्ही कधीही, कुणालाही फसवत नाही."

आणि कधीही फसवणार नाही. चला, दमित्री पावलोविच, मांडा तुमची कैफियत – सेनेटमध्ये आपण म्हणतो त्याप्रमाणं!"

३७

सानिनने "आपली कैफियत मांडायला" आरंभ केला. आपल्या इस्टेटीचे त्याने दुसऱ्यांदा वर्णन केले, मात्र तेथील निसर्ग रमणीयतेचा उल्लेख न करता "आकडेवारीसाठी" अधूनमधून तो पोलोझोवचा आधार घेत होता. पण पोलोझोव फक्त घसा खाकरायचा आणि मान हलवायचा. त्याचे ते करणे मान्यता अथवा अमान्यतादर्शक होते हे फक्त देवच जाणे! मार्या निकोलायेवनाला त्याच्या मदतीची मुळीच गरज नव्हती. तिने आपल्या अंगच्या व्यापारी आणि कारभारविषयक क्षमतांचे दर्शन घडविले. त्याबद्दल कोणत्याही शंकेला जागा राहिली नाही, फक्त तिचे हे गुण पाहणाऱ्याला चकित करीत होते. व्यवस्थापनाच्या सर्व आतल्या आणि बाहेरल्या गोष्टी तिला ठाऊक होत्या; तिने अत्यंत चौकस प्रश्न विचारले, सर्व माहिती तपशीलवार विचारून घेतली. तिचा प्रत्येक शब्द लक्ष्यभेद करीत होता. अशा परीक्षेची सानिनने अपेक्षा केली नव्हती आणि तशी त्याची पूर्वतयारीही नव्हती. ही प्रश्नोत्तरे दीड तासपर्यंत चालली. एखाद्या कठोर आणि तीक्ष्ण बुद्धीच्या न्यायाधीशासमोर अरुंद बाकड्यावर बसून उत्तरे देणाऱ्या गुन्हेगाराप्रमाणे सानिनला वाटत होते. "अरेच्चा! ही तर चक्क उलटतपासणी चाललीय!" स्वतःशी तो चिडून पुटपुटला. मार्या निकोलायेवना सतत हसत होती. जणू तिला ही सर्व गंमत वाटत होती. पण तरीही हे सर्व सोसणे सानिनला मुळीच सोपे गेले नाही. आणि "उलटतपासणी" मध्ये जेव्हा त्याला आढळले की, "जमिनीची फेरवाटणी" व "नांगरट" ह्या शब्दांचा नेमका अर्थ त्याला ठाऊक नव्हता, तेव्हा मात्र त्याला घाम फुटला...

"ठीक आहे," अखेरीस मार्या निकोलायेवना निर्णायक स्वरात म्हणाली, "तुमची इस्टेट आता मला ठाऊक झाली... अगदी तुमच्याप्रमाणंच. तुमची दरडोई किंमत काय?" (सर्वश्रुतच आहे की, त्या काळी इस्टेटीची किंमत



तिच्यावर काम करणाऱ्या शेतकऱ्यांच्या संख्येनुसार ओळखली जात असे.)

"अं... मला वाटतं... पाचशे रूबलपेक्षा कमी घेणं शक्य नाही..." सानिन मोठ्या कष्टाने बोलला. (अरे पान्तालीओने, पान्तालीओने, कुठे आहेस तू? आता पुन्हा एकदा उद्गार काढायची तुझी पाळी आली : Barbari!)

जणू काही विचार करण्यासाठी म्हणून मार्या निकोलायेवनाने आपली नजर छताकडे वर उचलली.

"असं आहे तर?" थोडा वेळ थांबून अखेर ती म्हणाली. "ही किंमत मला मान्य आहे. पण निर्णय घ्यायला मी दोन दिवसांचा अवधी मागते आणि उद्यापर्यंत तुम्हाला वाट पहावी लागेल. मला वाटतं, आपलं एकमत होईल आणि मग अनामत रक्कम म्हणून तुम्हाला किती पैसे पाहिजेत हे तुम्ही मला सांगाल. आणि आता – basta cosi!"* सानिन काहीतरी आक्षेप घेणार असे पाहून ती उद्गारली. "घाणेरड्या गोष्टींची आपण खूप वेळ चर्चा केली... á demain les affaires.** माहीत आहे: आता मी मोकळं सोडते" (या ठिकाणी तिने आपल्या कमरपट्ट्यातील छोट्या घड्याळात पाहिले) "...तीन वाजेपर्यंत... तुम्हाला मी थोडी विश्रांती दिली पाहिजे. जाऊन रूलेट खेळा!"

"मला जुगार खेळायला आवडत नाही," सानिन म्हणाला.

"खरंच? तुम्ही अगदी आदर्श पुरुष आहात! मीसुद्धा जुगार खेळत नाही. पैसे उधळणं मूर्खपणाचं आहे. पण कॅसिनोमध्ये जाऊन निदान लोकांचे चेहरे न्याहाळा. खूप चित्र-विचित्र माणसं दिसतील. तिथं एक म्हातारी आहे – डोक्यावर मुगुट घातलेली आणि मिशावाली! अगदी कमाल आहे ती! शिवाय आपला एक प्रिन्सही तिथं असतो – तोही खूप मजेदार आहे. भव्य आकृती, धारदार नाक आणि तो जेव्हा एक थेलर जुगारावर लावतो तेव्हा हळूच बंडीखाली हात घालून क्रूस-चिन्ह करतो. मासिकं वाचा, भटका, थोडक्यात म्हणजे तुम्हाला हवं ते करा... पण तीन वाजता मी तुमची वाट पाहते... de pied ferme.*** आधीच जेवून घेतलं पाहिजे. हे विचित्र जर्मन लोक संध्याकाळचा खेळ साडे सहा वाजता सुरू करतात." तिने हात पुढे केला. «Sans rancune ,n'est-ce pas?»****

---

* पुरे झाले! – अनु.

** काम उद्या! – अनु.

*** न चुकता!

**** "झालं गेलं विसरून जावं, खरं ना?"

"कमाल आहे, मार्या निकोलायेवना, तुमच्याबद्दल मी आकस कशाला धरू?"

"तुम्हाला छळल्याबद्दल. अजून थांबा, आणखी पुढं खूप घडायचं आहे!" ती पुढे म्हणाली. तिचे डोळे आकुंचित झाले होते आणि तिच्या लालबुंद बनलेल्या गालांवर तिच्या सर्व खळया एकाच वेळी उमटल्या होत्या. "अच्छा!"

सानिनने किंचित झुकून अभिवादन केले आणि तेथून तो बाहेर निघून गेला. त्याच्या माघारी आनंदी हास्याच्या लकेरी त्याला ऐकू आल्या व पुढील प्रसंगाचे त्याला आरशात प्रतिबिंब दिसले: मार्या निकोलायेवनाने आपल्या नवऱ्याची तुर्की टोपी त्याच्या डोळ्यांवर पुढे खेचली होती व तो अगतिकपणे दोन्ही हात उडवीत होता.

## ३८

आपल्या खोलीत आपण अगदी एकटे आहोत असे जेव्हा सानिनला आढळले तेव्हा त्याने अत्यंत आनंदाने सुटकेचा दीर्घ सुस्कारा टाकला. त्याला विश्रांतीची गरज होती असे मार्या निकोलायेवना म्हणाली होती ते अगदी खरे होते. ह्या सर्व नव्या ओळखींपासून, भेटी-गाठींपासून, संभाषणांपासून त्याला विश्रांती हवी होती. त्याला स्वतःला अगदी परक्या असलेल्या ह्या स्त्रीच्या अचानक अनाहूत जवळिकीमुळे निर्माण झालेल्या व त्याच्या हृदयात आणि मनात घुसलेल्या वाफा झटकून टाकण्यासाठी त्याला विश्रांतीची जरूरी होती. आणि हे सर्व घडत होते तरी कसल्या भलत्या वेळी! जेम्मा त्याच्यावर प्रेम करीत आहे हे त्याला समजले होते आणि तिच्याशी त्याने वाङ्‌निश्चय केला होता त्याच्या अगदी दुसऱ्याच दिवशी! पावित्र्याचे हे विडंबन होते. आपल्या विशुद्ध, निष्कलंक कबूतरीची त्याने मनातल्या मनात हजार वेळा क्षमा मागितली, पण स्वतःला कशाबद्दल नेमका ठपका द्यावा हेच त्याला उमजत नव्हते. तिने दिलेल्या क्रूसाची त्याने हजार वेळा चुंबने घेतली. ज्या कामासाठी तो वीसबादेनला आला होता ते काम जलद आणि अनुकूलरीत्या होईल ह्या आशेने केवळ तो तेथे थांबून राहिला होता. अन्यथा, तो केव्हाच आपल्या लाडक्या फ्रँकफुर्टला धावला असता; त्याला आता स्वतःच्या घराप्रमाणे वाटणाऱ्या प्रिय घराकडे धावला असता, तिच्या पायांशी त्याने लोळण घेतली असती... पण इलाज नव्हता! विषाचा प्याला तळापर्यंत प्राशन करणे आवश्यक होते – कपडे करणे, जेवायला जाणे आणि तेथून



थिएटरला जाणे... दुसऱ्या दिवशी तिने त्याला लौकर सोडले तर किती बहार येईल!

आणखी एका गोष्टीचा त्याला त्रास होत होता; एवढेच नव्हे तर राग येत होता. जेम्माविषयीच्या, त्यांच्या एकत्र जीवनाविषयीच्या रम्य कल्पना करण्यात तो सतत दंग रहात होता, भविष्यकाळातील सुखस्वप्ने रंगविण्यात रमत होता; पण तरीही, ही तिऱ्हाईत बाई, ही मादाम पोलोझोवा, सतत त्याचा पाठलाग करीत होती. बळेच त्याच्या नजरेसमोर उभी रहात होती. आणि तिची प्रतिमा तो झटकून टाकू शकत नव्हता, तिचा आवाज विसरू शकत नव्हता, तिने सांगितलेल्या गोष्टी विसरू शकत नव्हता. तिच्या अत्तराचा विशिष्ट सूक्ष्म, ताजा गंध त्याला सतत जाणवत होता. पिवळ्या लिलीच्या फुलांसारखा तो सुवास तिच्या वस्त्रांमधून दरवळत त्याच्या घ्राणेंद्रियांमध्ये घुसला होता. ही स्त्री उघडपणे त्याच्याशी खेळत होती. एकामागून एक युक्त्या योजीत होती. पण का? काय पाहिजे होते तिला? बिघडलेल्या, श्रीमंत स्त्रीची ही केवळ एक लहर होती का? नीतीभ्रष्ट म्हणून जिचे वर्णन करता येईल अशा स्त्रीची ही एक लहर होती का? आणि तो नवरा! काय विचित्र प्राणी! त्याचे तिच्याशी कशा प्रकारचे संबंध होते? आणि ह्या प्रश्नांनी सानिनचा मेंदू खाण्याचे काय कारण? श्रीयुत पोलोझोव आणि त्याची बायको त्याच्या दृष्टीने कोण होते? उन्हाळ्यातील तेजस्वी आणि निरभ्र दिवसाप्रमाणे असणाऱ्या तरुणीकडे त्याचे हृदय आकर्षित झाले होते, तरीही ही छळणारी प्रतिमा दूर हुसकावून लावणे त्याला का जमत नाही? त्या पवित्र चेहऱ्यामागे हा चेहरा ओटंगून राहण्याचे धैर्यच कसे करीत आहे? पण तो चेहरा तेथे आहे, एवढेच नव्हे तर त्याच्यावर उपहासात्मक हास्य विलसत आहे. ते लुटारू राखी डोळे, तिच्या गालांवरील त्या खळया, त्या सापासारख्या वेण्या अर्थातच ह्या गोष्टींनी त्याचा एवढा काही ताबा घेतला नव्हता, जेणेकरून त्यांना तो झटकून टाकू शकत नव्हता?

मूर्खपणा! मूर्खपणा! उद्या हे सर्व नाहीसे होईल. त्याच्या कसल्याही खुणा मागे उरणार नाहीत. पण उद्या त्याला ती जाऊ देईल का?

ह्या प्रश्नांची त्याने मनातल्या मनात अनेकदा उजळणी केली. नंतर, तीन वाजण्याचा सुमार झाला तेव्हा त्याने काळा फ्रॉक-कोट अंगात घातला व पोलोझोवांकडे जाण्याआधी थोडा वेळ उद्यानात फिरायला गेला.

त्यांच्या दिवाणखान्यात कुणा राजदूतावासातील एक चिटणीस बसल्याचे त्याला आढळले. तो गृहस्थ उंच, सोनेरी केसांचा, जर्मन वंशातील होता. त्याचा चेहरा धारदार होता आणि डोक्याच्या मागील बाजूस त्याने आपले केस मधोमध दुभागले होते (त्या काळी ती फॅशन होती), आणि त्याच्याबरोबर दुसरा कोण होता? तो होता व्हॉन डॉनहॉफ, काही दिवसांपूर्वी ज्याच्याशी द्वंद्व झाले होते तो अंमलदार! त्याची येथे भेट होईल असे सानिनला कदापी वाटले नव्हते. क्षणभर त्याला अवघडल्यासारखे झाले, पण तरीही त्याने लवून अभिवादन केले.

"तुमची पूर्वी भेट झालीय?" मार्या निकोलायेवनाने विचारले. सानिनचे अवघडलेपण तिच्या नजरेतून निसटले नव्हते.

"तो बहुमान मला आधीच मिळालाय," डॉनहॉफ म्हणाला आणि मार्या निकोलायेवनाकडे किंचित झुकत सस्मित मुद्रेने खालच्या आवाजात पुढे म्हणाला: "हाच तो... तुमचा देशबांधव... रशियन..."

"खरंच!" तीसुद्धा खालच्या आवाजात उद्गारली व हाताचे बोट हलवून तिने त्याला दटावले. त्याला आणि त्या लंबू चिटणीसाला तिने तात्काळ निरोप दिला. तो चिटणीस बिचारा तिच्या विभ्रमांनी पुरता घायाळ झाला होता व तिच्याकडे आ वासून पहात होता. डॉनहॉफ ताबडतोब निमूटपणे तेथून निघून गेला. काही न सांगताही कसे वागावे याची जाण असलेल्या कौटुंबिक मित्राप्रमाणे. तो चिटणीस मात्र काहीसा हटून बसला होता, पण मार्या निकोलायेवनाने फारसा घोळ न घालता त्याची ब्याद घालविली.

"तुमच्या बाईसाहेबांकडं परत जा," ती त्याला म्हणाली. (त्यावेळी वीसबादेनमध्ये कुणी एक Principessa di Monaco रहात होती). "माझ्यासारख्या सामान्य कुळातल्या बाईसाठी कशाला वेळ दवडता आहात?"

"मादाम," दुर्दैवी चिटणीस तिला खात्री देऊ लागला, "जगातल्या सर्व principesse ..."

पण मार्या निकोलायेवना निष्ठुर होती आणि चिटणीसाला स्वतःच्या विभागलेल्या भांगासह माघार घ्यावी लागली.

मार्या निकोलायेवनाने त्या दिवशी पोषाखाचा थाट उडविला होता. आमच्या आजीबाईच्या भाषेत सांगायचे तर "स्वतःला फायदेशीर" अशी ती सजली होती. तिने गुलाबी रेशमी पोषाख परिधान केला होता व त्याच्या बाह्या फोन्ताज पद्धतीच्या होत्या. तिच्या प्रत्येक कानात मोठा



हिरा चमकत होता. तिचे डोळेही हिऱ्यांप्रमाणेच तेजस्वी होते. ती अत्यंत उल्हसित मनःस्थितीत होती व सर्वोत्तम मोहनास्त्रांनी ती सज्ज बनली होती.

तिने सानिनला आपल्या शेजारी बसविले आणि पॅरिससंबंधी ती त्याच्याशी बोलू लागली. लौकरच तिचा पॅरिसला जाण्याचा इरादा होता. जर्मनांबद्दल तिने मत व्यक्त केले की, तिला ते अत्यंत रटाळ लोक वाटत आहेत, हुशारी दाखविण्याच्या प्रयत्नात ते मूर्ख ठरत आहेत व जेव्हा मूर्खासारखे वागतात तेव्हा त्यांची हुशारी गैरसोयीची भासत आहे. आणि अचानक तिने त्याला रोखठोक प्रश्न केला: आत्ता जो अंमलदार निघून गेला होता त्याच्याबरोबर एका स्त्रीवरून तुम्ही द्वंद्व केले होते हे खरे होते का?

"तुम्हाला कसं समजलं?" चकित झालेला सानिन पुटपुटला.

"जग अफवांनी खच्चून भरलेलं आहे, द्मित्री पावलोविच, आणि तुमचं हजार वेळा बरोबरच होतं हे मला ठाऊक आहे आणि तुम्ही अस्सल शिलेदारासारखे वागलात! ही स्त्रीच तुमची प्रेयसी होती का?"

सानिनने आपल्या कपाळाला किंचित आठ्या घातल्या...

"ठीक आहे, मी नाही विचारणार," मार्या निकोलायेवना घाईघाईने म्हणाली. "तुम्हाला त्याबद्दल बोललेलं आवडत नाही, मला क्षमा करा पुन्हा मी असं करणार नाही! रागावू नका!" हातात वर्तमानपत्र धरून शेजारच्या खोलीतून पोलोझोव अवतीर्ण झाला. "तुला काय पाहिजे? का जेवण तयार आहे?" तिने त्याला विचारले.

"एका मिनिटात जेवण येईल. 'उत्तरेची मधमाशी' मध्ये मी काय वाचलं ठाऊक आहे... प्रिन्स ग्रोमोबोय वारले."

मार्या निकोलायेवनाने एकदम वर पाहिले.

"खरंच? देव त्यांच्या आत्म्याला शांती देवो! दर फेब्रुवारीत माझ्या वाढदिवसाला," सानिनकडे वळून ती सांगू लागली, "माझ्या सर्व खोल्या ते कॅमेलियाच्या फुलांनी सजवायचे. पण केवळ एवढ्यासाठी पीटरबुर्गमध्ये हिवाळ्यात राहण्याला अर्थ नाही. त्यांचं वय सत्तरपेक्षा जास्त असावं," परत आपल्या नवऱ्याला उद्देशून ती पुढे म्हणाली.

"हो. त्यांच्या उत्तरक्रियेचं वर्णन वर्तमानपत्रात दिलंय. सगळा दरबार हजर होता. त्या प्रसंगावर प्रिन्स कोवरीझकिननी कविता लिहिल्या."

"केवढा चांगुलपणा त्यांचा!"

"त्या कविता मी तुला वाचून दाखवू का? प्रिन्सनी त्यांना अस्सल मुत्सद्दी पुरुष म्हटलंय."

"नको, नको, वाचू नको! ते आणि मुत्सद्दी पुरुष! ते पुरुष होते फक्त तात्याना यूरेवनाचे. चला, जेवायला जाऊ या. जिवंत असलेल्यांनी जिवंत माणसांचा विचार केलेला चांगला. द्मित्री पावलोविच–तुमचा हात!"

आदल्या दिवसाप्रमाणेच जेवण सुरेख होते आणि गप्पागोष्टींमध्ये ते पार पडले. मार्या निकोलायेवना संभाषणचतुर होती–बाईच्या दृष्टीने दुर्मिळ गुण, विशेषत: रशियन! शब्द निवडायला तिला मुळीच त्रास पडत नव्हता आणि तिच्या देशबांधव स्त्रियांवर तिचा मुख्य रोख होता. तिच्या बोचऱ्या आणि उठावदार शब्दांपायी सानिन अनेकदा खदखदून हसला. ढोंग, गुळगुळीत भाषा आणि खोटेपणा यांच्याबद्दल मार्या निकोलायेवनाला विलक्षण तिडीक होती... आणि ह्या गोष्टी तिला सर्वत्र आढळत होत्या. ज्या कनिष्ठ वातावरणात ती लहानाची मोठी झाली होती त्याचा तिला दिमाख वाटत होता. त्याबद्दल ती बढाया मारीत होती, आपल्या नातेवाईकांच्या आणि बालपणच्या विचित्र गोष्टी सांगत होती व स्वत:ला खेडवळ म्हणवून घेत होती. तिच्या वयाच्या बहुसंख्य स्त्रियांपेक्षा तिने खूप काही अनुभवले होते याची सानिनला जाणीव झाली.

आणि पोलोझोव बुद्धयाच खात होता, मनःपूर्वक पीत होता. मात्र अधूनमधून आपल्या फिकट, मठ्ठ दिसणाऱ्या, पण सताड विस्फारलेल्या डोळ्यांनी आपल्या बायकोकडे वा सानिनकडे कटाक्ष फेकीत होता. "किती हुशार आहेस रे लाडक्या!" मार्या निकोलायेवना त्याच्याकडे वळून उंच स्वरात म्हणाली. "फ्रँकफुर्टमध्ये किती छान खरेदी केलीस! त्याबद्दल मी तुझ्या कपाळाचं चुंबन घेतलं असतं, पण तुला ते नकोय!"

"बरोबर, मला नकोय," चांदीच्या सुरीने अननस कापीत पोलोझोव म्हणाला.

टेबलावर टिचक्या वाजवीत मार्या निकोलायेवनाने त्याला न्याहाळून पाहिले.

"आपली पैज अजून कायम आहे?" तिने सहेतुक विचारले.

"अर्थात."

"छान! तू हरशील."

पोलोझोवने आपली हनुवटी पुढे काढली.

"मार्या निकोलायेवना, तुला कितीही खात्री वाटत असली, तरी यावेळी मात्र तूच हरणार असं मला वाटतंय!"



"कशाबद्दल पैज लागलीय?" सानिनने विचारले. "मला समजेल का?"

"आत्ताच नाही," मार्या निकोलायेवना उत्तरली आणि हसली.

घड्याळात सातचे टोले वाजले. बग्गी तयार असल्याची नोकराने वर्दी आणली. पोलोझोवने आपल्या बायकोला पोचविले आणि तात्काळ तो परत खुर्चीत येऊन बसला.

"मॅनेजरला पत्र लिहायला विसरू नकोस!" मार्या निकोलायेवनाने हॉलमधून जाता जाता मोठ्याने ओरडून त्याला सांगितले.

"नाही विसरणार–काळजी करू नको! मी शब्द पाळणारा माणूस आहे!"

## ३९

१८४० मध्ये वीसबादेन थिएटर ही एक गचाळ वास्तू होती आणि तेथील नाटककंपनी सर्व जर्मन नाटककंपन्यांप्रमाणेच सुमार पद्धतीने आणि नाटकी आवेशाने प्रयोग करण्यात रतिभरही कमी नव्हती. त्याचे अलिकडच्या काळातील उत्तम उदाहरण म्हणजे सुप्रसिद्ध श्रीयुत देवरिएन्त यांच्या "विख्यात" दिग्दर्शनाखालील कार्लस्रूहे कंपनी.[54] "सन्माननीय बाईसाहेब व्हॉन पोलोझॉफ" यांच्यासाठी राखून ठेवलेल्या बॉक्सच्या मागे (वेटरने ह्या बॉक्सची तिकीटे कशी मिळविली हे देवच जाणे! स्टेट-डिरेक्टरना त्याने लाच चारली हे शक्य होते का?) दिवाणांनी सजवलेली एक छोटी खोली होती. बॉक्समध्ये प्रवेश करण्यापूर्वी मार्या निकोलायेवनाने सानिनला चिकाचा पडदा सोडायला सांगितले.

"लोकांनी मला पाहू नये अशी माझी इच्छा आहे," ती म्हणाली, "नाही तर इथं एकच गर्दी उसळेल." त्याला प्रेक्षागृहाकडे पाठ करायला लावून तिने आपल्या शेजारी बसविले. त्यामुळे बॉक्स रिकामी भासत होती.

वाद्यवृंदाने «Le Nozze di Figaro» ची आरंभीची गत वाजविली... पडदा वर गेला, नाटक सुरू झाले.

अनेक देशी नाटकांपैकी ते एक नाटक होते. लेखकापाशी प्रतिभेपेक्षा पंडिती बुद्धिमत्ता जास्त होती. कुठल्यातरी "गहन" किंवा "जिव्हाळ्याच्या" कल्पनेचे निर्दोषपणे, पण निर्जीव पद्धतीने त्या नाटकात चर्वितचर्वण केलेले होते. तथाकथित शोककारक संघर्ष त्यात सादर केला होता व एक

प्रकारचा कंटाळवाणेपणा ते नाटक पसरवीत होते. त्याला "आशियाई" म्हणता आले असते – जसा साधा कॉलरा व आशियाई कॉलरा यांच्यात भेद आहे तसा! अर्ध्या अंकापर्यंत मार्या निकोलायेवना संयमपूर्वक बसली, पण आपली प्रेयसी बेइमान आहे असे जेव्हा प्रेमिकाला कळले (त्याने फुगीर बाह्यांचा, मखमाली कॉलरचा तपकिरी फ्रॉक-कोट घातला होता, त्याच्या पट्टेरी बंडीला मोत्यांची बटणे होती, हिरव्या तुमानीवर कमावलेल्या चामड्याचे पट्टे होते आणि पांढरे नमदी हातमोजे होते), आपल्या मुठी छातीशी दाबून व हातांचे कोपर तिरपे पुढे काढून एखाद्या कुत्र्याप्रमाणे तो केकाटू लागला, तेव्हा मात्र पुढे नाटक पाहणे मार्या निकोलायेवनाला अशक्य ठरले.

"अत्यंत भिकार अशा छोट्या प्रांतिक गावातला सर्वांत वाईट फ्रेंच नटसुद्धा सर्वोत्तम, सुप्रसिद्ध जर्मन नटापेक्षा जास्त चांगला आणि जास्त स्वाभाविक अभिनय करतो!" संतापून ती म्हणाली. "इकडं या," आपल्या शेजारच्या दिवाणावर हाताच्या थापट्या मारीत ती सानिनला म्हणाली. "आपण गप्पा मारू या."

सानिनने तिच्या आज्ञेचे पालन केले.

मार्या निकोलायेवनाने त्याच्याकडे कटाक्ष टाकला.

"तुम्ही अगदी रेशमाप्रमाणं नरम आहात असं मला दिसतंय. तुमच्या बायकोला तुमच्याबरोबर राहणं सोपं जाईल. त्या विदूषकानं –" केकाटणाऱ्या नटाकडे आपल्या पंख्याच्या टोकाने निर्देश करून (जो एका खाजगी घरातील मास्तरची भूमिका करीत होता) "त्या विदूषकानं मला माझ्या तारुण्याची आठवण करून दिली. एकेकाळी मी एका मास्तरांच्या प्रेमात होते. माझं ते पहिलं – नव्हे, माझं दुसरं प्रेम. पहिल्या वेळी मी प्रेमात पडले होते दन्स्कोय मठातल्या एका पुजाऱ्यावर. मी बारा वर्षांची होते. फक्त रविवारच्या दिवशी मी त्याला पहायची. मखमाली अंगरखा तो घालायचा, सुगंधी पाण्याचा त्याला वास यायचा. धुपारती घेऊन लोकांच्या गर्दीतून जाताना बायकांना उद्देशून फ्रेंचमध्ये म्हणायचा: 'पार्दोन, एक्सक्यूझे' आणि कधीही आपली नजर वर उचलायचा नाही. आणि त्याच्या डोळ्यांच्या पापण्या! ह्या एवढ्या लांब होत्या!" मार्या निकोलायेवनाने आपल्या अंगठ्याच्या नखाने आपल्या करंगळीची अर्धी लांबी मोजली व सानिनला दाखविली. "माझ्या मास्तरांचं नाव होतं – monsieur Gaston! ते खूप विद्वान होते, खूप कडक, स्विस माणूस – आणि त्यांचा चेहरा भक्कम होता. डांबरासारखे काळे कल्ले, ग्रीक धाटणीचा धारदार चेहरा



आणि ओतीव लोखंडातून घडवल्यासारखे ओठ. मला त्यांची भीती वाटायची. तेवढ्या एकाच माणसाची मला आजवर भीती वाटली आहे. माझ्या भावाचे ते मास्तर होते – तो वारला... बुडून मेला. माझासुद्धा भयानक मृत्यू घडणार आहे असं भविष्य एका जिप्सीनं मला एकदा सांगितलं होतं, पण तो सगळा फालतूपणा आहे. माझा त्यावर विश्वास नाही. इप्पोलित सीदोरीच कट्यारीसकट तुमच्या नजरेसमोर उभा राहतो?"

"कट्यारीसारख्याच दुसऱ्या अनेक गोष्टींनी एखाद्याला मरण येऊ शकतं," सानिन म्हणाला.

"तो सगळा मूर्खपणा आहे. तुमच्या शकुनअपशकुनांवर विश्वास आहे? माझा मुळीच नाही. पण जे होईल ते होईल! Monsieur Gaston आमच्या घरातच रहायचे. त्यांची खोली माझ्या खोलीच्या वरती होती. काहीवेळा रात्रीची मी जागी व्हायची आणि त्यांच्या पावलांचा आवाज ऐकत रहायची. ते खूप उशीरा झोपी जात आणि भीतीपायी किंवा दुसऱ्या कसल्या भावनेपायी मला चक्कर यायची. माझे वडील स्वतः साक्षर नव्हते, पण त्यांनी आम्हाला चांगलं शिक्षण दिलं. आश्चर्य म्हणजे मला लॅटिनसुद्धा येतं!"

"तुम्हाला? लॅटिन?"

"हो – मला! Monsieur Gaston नी मला शिकवलं. त्यांच्याबरोबर मी 'एनेइड'[55] वाचलं. खूप नीरस, पण त्यात काही चांगल्या जागा आहेत. दीदो आणि एनेई जंगलात असतात तो भाग आठवतो?..."

"हो, हो, मला आठवतो," सानिन लगबगीने म्हणाला. आपले लॅटिनचे ज्ञान तो फार पूर्वीच विसरून गेला होता व 'एनेइड' त्याला अगदी पुसट आठवत होते.

मार्या निकोलायेवनाने आपला ठेवणीतला तिरपा वरचा कटाक्ष त्याच्याकडे फेकला. "मी फार शिकलेली आहे असा उगीच समज करून घेऊ नका. देवाला ठाऊक आहे की मी शिकलेली नाही आणि कोणतंही प्राविण्य मी साध्य केलेलं नाही. लिहिणं मला जमत नाही... मोठ्यांदा वाचणंसुद्धा येत नाही. खरंच, मला पियानो वाजवता येत नाही, रेखाचित्रं काढता येत नाहीत, अथवा शिवणकाम करता येत नाही – काहीही येत नाही! तुम्हाला जशी मी आत्ता दिसतेय त्यापलिकडे मी काहीही नाही!"

तिने आपले बाहू पसरले. "हे सगळं मी तुम्हाला सांगत्येय," ती पुढे बोलू लागली, "याचं पहिलं कारण म्हणजे त्या मूर्खांची वटवट ऐकायला लागू नये" (तिने रंगमंचाकडे बोट दाखविले; तेथे त्या क्षणी नटाऐवजी

एक अभिनेत्री केकाटत होती व तिनेही आपल्या हातांचे कोपर तसेच वर कोनात धरले होते), "आणि दुसरं कारण म्हणजे, मी तुमचं देणं लागते — काल तुम्ही तुमच्याबद्दल मला सांगितलं होतं."

"माझी माहिती ऐकण्यात तुम्हाला आनंद वाटत होता," सानिन उद्गारला.

मार्या निकोलायेवना एकदम त्याच्याकडे वळली.

"आणि मी कशा प्रकारची बाई आहे हे जाणून घेण्यात तुम्हाला आनंद वाटत नाही? अर्थात मला याचं आश्चर्य वाटलं नाही," दिवाणाच्या उशांवर परत मागे बरेलून सत ती ठेपु म्हणाली. "पुरुष जेव्हा ल ग्नकरणार असतो, तेसुद्धा प्रेमाखातर आणि द्वंद्व खेळल्यावर, त्याला इतर बायकांबद्दल विचार करायला वेळ नसतो."

मार्या निकोलायेवना बोलायची थांबली आणि आपल्या मोठ्या, सरळ ओळीत असलेल्या, दुधासारख्या शुभ्र दातांनी पंख्याची मूठ कुरतडू लागली.

पुन्हा एकदा सानिनला सर्वांगामध्ये वाफा उसळत असल्याचा भास झाला. गेले दोन दिवस त्या वाफा त्याला घुसमटून टाकीत होत्या, त्याच्या मनाला वेढून टाकीत होत्या.

त्याचे आणि मार्या निकोलायेवनाचे संभाषण खालच्या आवाजांमध्ये, अगदी कुजबुजीच्या स्वरूपात चालू होते व त्याचा त्याला अधिक त्रास होत होता, मनःक्षोभ होत होता.

हे सर्व केव्हा एकदा संपणार? दुबळ्या मनाची माणसे कुठल्याही गोष्टीची स्वतः अखेर करीत नाहीत, तर ती अखेर आपोआप घडण्याची वाट पाहतात.

रंगमंचावर कुणीतरी शिंकले. नाटकात "विनोदी क्षण" अथवा "घटक" म्हणून लेखकाने शिंक वापरली होती. नाटकात दुसरा काहीही विनोदी घटक नव्हता आणि एवढ्यावरच समाधान मानून प्रेक्षक हसले.

त्या हशाचासुद्धा सानिनला त्रास झाला.

असे काही क्षण यायचे की तो चिडला होता अथवा आनंदी होता, कंटाळला होता अथवा रमला होता, हेच त्याला स्वतःला समजत नव्हते. ओह्, जेम्माने जर त्याला पाहिले असते तर!

"गंमत आहे की नाही?" मार्या निकोलायेवना अचानक म्हणाली. "एखादा माणूस अगदी शांतपणानं सांगतो: 'लग्न करण्याचा माझा इरादा



आहे' पण कुणीही शांतपणं असं सांगत नाही: 'मी स्वतःला पाण्यात फेकून देणार आहे.' आणि सरतेशेवटी — फरक तो काय? खूपच गंमतीदार आहे, होय की नाही?"

सानिनला संतापाची उबळ आली. "त्यात फार फरक आहे मार्या निकोलायेवना. काही लोकांना पाण्यात उडी टाकण्याची मुळीच भीती वाटत नाही — कारण ते पोहू शकतात. आणि विचित्र लग्नांबाबत म्हणायचं तर... आता तुम्ही विषय काढलाच म्हणून..."

जीभ चावून तो एकदम थांबला.

मार्या निकोलायेवनाने आपल्या हाताच्या पंजावर पंख्याचा फटका मारला.

"तुम्हाला काय बोलायचं होतं ते पूर्ण करा, द्मित्री पावलोविच, तुमचं बोलणं पूर्ण करा. मला माहीत आहे तुम्हाला काय म्हणायचं होतं: 'बाई ग, तुम्ही विषय काढलाच आहात तर,' तुम्ही म्हणणार होतात, '**तुमच्या** स्वतःच्या लग्नाहून अधिक विचित्र काय असू शकणार? तुमचा नवरा लहान पोर होता तेव्हापासून मी त्याला ओळखतोय हे विसरू नका!' हेच तुम्ही म्हणणार होतात, ज्याला पोहता येतं असे तुम्ही!"

"माफ करा —" सानिन बोलू लागला.

"खरं आहे की नाही? खरं आहे ना?" मार्या निकोलायेवनाने खोदून विचारले. "बघा पाहू माझ्या चेहऱ्याकडं आणि सांगा, जे मी बोलले ते खरं नव्हतं!"

कुठे पहावे ते सानिनला कळत नव्हते.

"ठीक आहे — तुमचा आग्रहच असेल तर सांगतो, हे खरं आहे," सरतेशेवटी तो म्हणाला.

मार्या निकोलायेवनाने डोके हलविले. "ठीक आहे... आणि तुम्ही स्वतःला कधी प्रश्न केला नाही, पोहता येणाऱ्या तुम्ही... जी बाई गरीब नाही, मूर्ख नाही किंवा सामान्य रूपाचीही नाही, अशा बाईनं अशी विचित्र कृती करण्याचं कारण काय असावं? कदाचित याबद्दल तुम्हाला स्वारस्य वाटत नसावं! काही हरकत नाही. मी तुम्हाला कारण सांगीन, पण आत्ता नाही. मध्यांतर संपल्यानंतर सांगीन. कुणीतरी आत येईल अशी सारखी मला धास्ती वाटतेय..."

मार्या निकोलायेवनाच्या तोंडून हे शब्द बाहेर पडले न पडले तोच बॉक्सचे दार अर्धवट उघडले गेले व त्यातून एक चेहरा आत डोकावला —

लालबुंद चेहरा, घामाने चकचकणारा, तरुण असूनही दंतविहीन, खाली लोंबणारे नाक, लांब केसांच्या झुलुपांआड वटवाघुळासारखे प्रचंड कान; मंद, चौकस डोळ्यांवर सोनेरी फ्रेमचा चष्मा आणि चष्म्यावर चापाचा चष्मा. तो चेहरा बॉक्समध्ये डोकावला, मार्या निकोलायेवना दृष्टीस पडताच त्याने गिळगिळीत हास्य केले व अनेकदा माना डोलावल्या. डोक्याला सावरून धरणारी लुकडी मान उघडी झाली.

मार्या निकोलायेवनाने त्या चेहऱ्यावर आपल्या हातरुमालाचा झटका मारला. "मी घरात नाही! Ich bin nicht zu Hause, Herr P.! Ich bin nicht zu Hause... श्शू:!"

त्या चेहऱ्यावर आश्चर्य उमटले, तो बळेच हसला आणि एके काळी ज्याच्या पायांशी त्याने लोळण घेतली होती त्या लिस्तचे अनुकरण करीत नाहीसे होण्यापूर्वी रडव्या आवाजात म्हणाला: «Sehr gut! Sehr gut!»*

"कोण हा विचित्र प्राणी?" सानिनने पृच्छा केली.

"तो? वीसबादेनचा टीकाकार. साहित्य समीक्षक, भाडोत्री हस्तक – काय म्हणायचं ते म्हणा! स्थानिक कंत्राटदाराकडं तो नोकरीला आहे, म्हणून प्रत्येक गोष्टीची त्याला स्तुती करावी लागते आणि प्रत्येकाबद्दल उत्सुकता दाखवावी लागते. मात्र प्रत्यक्षात त्याच्या मनात जहर भरलेलं असतं, फक्त ते ओकायची त्याची हिंमत होत नाही. मला त्याची भीती वाटते. फार कुचाळखोर आहे. मी थिएटरमध्ये आहे ही बातमी तो खात्रीनं प्रत्येकाला सांगणार. पण काय बिघडतं म्हणा त्यामुळं!"

वाद्यवृंदाने वॉल्तझ वाजविला, पडदा फडफडला आणि प्रेमाचा व विव्हळण्याचा प्रसंग सुरू झाला.

"तर," दिवाणावर परत रेलून बसत मार्या निकोलायेवना म्हणाली, "तुम्ही अशा परिस्थितीत सापडला आहात आणि तुमच्या प्रेयसीच्या सहवासाचा आनंद लुटण्याऐवजी तुम्हाला माझ्याशेजारी बसावं लागतंय, म्हणून उगाच रागानं डोळे वटारू नका! मला तुमचं मन समजतं आणि तुम्हाला हवं तिथं जाऊ देण्याचं मी वचन दिलंय – पण आत्ता माझी कहाणी ऐका. सर्वांत मला काय आवडतं हे तुम्हाला जाणून घ्यायचंय?"

"स्वातंत्र्य," सानिनने अंदाज बोलून दाखविला.

मार्या निकोलायेवनाने त्याच्या हातावर आपला हात ठेवला.

---

*"खूप छान! खूप छान!"



"होय, द्मित्री पावलोविच," ती म्हणाली. तिच्या आवाजात अस्सल प्रामाणिकपणा व गांभीर्य होते. "सर्वांत मोलाचं आणि सर्वप्रथम म्हणजे स्वातंत्र्य. आणि मी बढाई मारतेय असं कृपया समजू नका – त्यात कौतुकास्पद असं काही नाही – पण जशी मी नेहमी आहे, **तशीच** नेहमी राहीन, माझ्या मरणाच्या दिवसापर्यंत. मला वाटतं, मी लहानपणापासून खूप लाचारी पाहिली असावी आणि तिचा मला खूप त्रास झाला. आणि... आणि... Monsieur Gaston नी, माझ्या मास्तरांनी, माझे डोळे उघडले. इप्पोलित सीदोरोचबरोबर मी लग्न का केलं, ह्याचं कारण बहुधा आत्ता तुम्हाला उमगलं असावं. त्याच्याबरोबर मी मुक्त आहे. कमालीची मुक्त आहे, हवेसारखी स्वतंत्र आहे, वाऱ्यासारखी मोकळी आहे... आणि लग्नापूर्वीच मला हे ठाऊक होतं, त्याच्याबरोबर लग्न करूनही मी मुक्त कझाक राहीन हे मला ठाऊक होतं!"

मार्या निकोलायेवना बोलायची थांबली आणि तिने हातातील पंखा बाजूला ठेवला.

"आणखी एक गोष्ट तुम्हाला सांगायला मला काही वाटणार नाही – विचार करण्याला माझा आक्षेप नाही... तसं करणं मनोरंजक आहे आणि तेवढ्यासाठी तर आपल्याला मनं लाभलीत. पण माझ्या स्वतःच्या कृतींचे परिणाम काय घडतील याचा मात्र मी कधीही विचार करत नाही. त्यांच्याविषयी मी कधीही विचार करत नाही, कोणतेही परिणाम घडले तरी त्यांची खंती बाळगत नाही. तसा खेद करण्यात अर्थ नाही... माझं ब्रीद आहे: «Cela ne tire pas à conséquence»* – रशियनमध्ये कसं सांगायचं मला माहीत नाही. सरतेशेवटी tire à conséquence मध्ये आहे काय? **इथं**, ह्या जगात, कुणी माझ्यापाशी हिशेब मागणार नाही आणि तिथं" (तिने वरती बोट दाखविले), "तिथं जो काही जमा-खर्च व्हायचा असेल तो खुशाल होऊं दे. जेव्हा **तिथं** माझा निवाडा होईल तेव्हा **मी** ही मी असणार नाही. तुम्ही ऐकताय ना? कंटाळला नाही?"

सानिन डोके खाली घालून बसला होता. आता त्याने ते वर उचलले. "मी मुळीच कंटाळलो नाही, मार्या निकोलायेवना, मी अत्यंत कुतूहलानं तुमचं बोलणं ऐकतोय. मात्र कबूल करतो की, तुम्ही हे सारं मला का सांगता आहात, असा मी स्वतःला प्रश्न करतोय."

---

*त्यामुळं परिणामांचा घाव बरा होत नाही.

मार्या निकोलायेवना दिवाणावर किंचित सरकली. "तुम्ही स्वतःला प्रश्न विचारता आहात? एवढे तुम्ही मंद बुद्धीचे आहात? अथवा हा केवळ नम्रपणा?"

सानिनने आपले डोके अधिक वर उचलले.

"हे सारं मी तुम्हाला सांगतेय," मार्या निकोलायेवना पुढे शांत स्वरात म्हणाली, पण तिच्या चेहऱ्यावरील भाव मात्र तिच्या स्वराशी जुळते नव्हते, "कारण मला तुम्ही आवडला आहात. चकित होऊ नका, मी थट्टा करत नाही. कारण माझी अप्रिय आठवण तुम्ही सांगाती नेऊ नये असं मला वाटतं... जरी मला त्याची फिकीर नाही—म्हणजे चुकीच्या असं म्हणायचंय मला. म्हणून मी तुम्हाला खेचून इथं आणलं, तुमच्याशी मी इथं एकटी बसल्येय आणि एवढं मोकळेपणानं बोलतेय. होय, खरंच, मी खोटं बोलत नाही. आणि द्मित्री पावलोविच, लक्षात ठेवा, मला माहीत आहे की तुम्ही दुसऱ्या एका स्त्रीच्या प्रेमात आहात आणि तिच्याशी लग्न करणार आहात... माझ्या निःस्वार्थीपणाची कदर करा. अर्थात आता तुमच्या बाजूनं तुम्ही म्हणू शकता : Cela ne tire pas à conséquence!"

ती हसली, पण तिचे हसणे अर्ध्यात तुटले आणि जणू स्वतःच्याच शब्दांनी चकित झाल्याप्रमाणे ती स्तब्ध बसून राहिली. नेहमी आनंदी आणि धीट असणाऱ्या तिच्या डोळ्यांमध्ये भित्रेपणाची अथवा कारुण्याचीही छटा उमटली होती.

"नागीण! ही नागीण आहे!" सानिनच्या मनात आले. "पण किती सुंदर नागीण!"

"माझा चष्मा द्या," मार्या निकोलायेवना एकदम म्हणाली. "मला पहायचंय—ती Jeune premiére खरंच एवढी भयानक आहे का? तरुणांनी तिच्या प्रेमात पडू नये अशा नैतिक हेतूनं सरकारनं तिची नेमणूक केली असावी, असंच वाटतंय!"

सानिनने तिला तिचा चष्मा दिला व तिने त्याच्याकडून चष्मा घेतल्या-नंतर क्षणभरासाठी त्याचा हात धरून ठेवला.

"एवढे गंभीर होऊ नका," स्मित करीत ती हळूच कुजबुजली. "माहीत आहे : कुणीही मला बांधू शकत नाही, पण मीही दुसऱ्यांना बांधून ठेवण्याचा कधी प्रयत्न करत नाही. मला स्वातंत्र्य आवडतं आणि कोणत्याही जबाबदाऱ्या मी जाणत नाही—आणि केवळ माझ्यापुरतंच हे लागू नाही. आता थोडं पलिकडं सरका. नाटक ऐकू या."



मार्या निकोलायेवनाने आपला चष्मा रंगमंचावर रोखला आणि सानिनही त्याच दिशेने पाहू लागला. त्या अर्धवट अंधाऱ्या बॉक्समध्ये तिच्या शेजारी बसून तिच्या पुष्ट देहाची ऊब व त्याचा मादक गंध तो नकळतपणे अनुभवीत होता. त्या संध्याकाळच्या दरम्यान, विशेषतः शेवटच्या काही मिनिटांमध्ये, तिने जे काही त्याला सांगितले होते त्या सर्व गोष्टींची त्याच्या मनात नकळतपणे उजळणी चालू होती.

## ४०

नाटक पुढे तासभर किंवा त्याहून अधिक वेळ चालले होते. पण मार्या निकोलायेवना आणि सानिन यांनी लौकरच रंगमंचाकडे पाहणे थांबविले व ते दोघे परत संभाषणात गढली. पूर्वीच्याच मार्गाने त्यांच्या संभाषणाची गाडी चालली होती, पण यावेळी सानिन तेवढासा गप्प राहिला नव्हता. स्वतःचा आणि मार्या निकोलायेवनाचा त्याला मनातून राग आला होता. तिच्या "सिद्धांता"चा फोलपणा दाखविण्याचा त्याने प्रयत्न केला. जणू काही तिला सिद्धांतांमध्ये खास रस होता! त्याने तिच्याशी युक्तिवाद मांडायला आरंभ केला. या गोष्टीचा तिला मनातून आनंद झाला. जर तो वाद घालतोय तर त्याचा अर्थ तो आधीन होतोय किंवा आधीन होईल. त्याने आमीषाला तोंड लावले होते, तो शरण येत होता, नरम बनत होता. तिने वाद घातला, ती हसली, तिने एकमत दाखविले, विचार करायचा बहाणा केला, ती तुटून पडली... आणि हा सारा वेळ त्यांचे चेहरे एकमे-कांच्या अधिकाधिक जवळ येत होते. त्याचे डोळे इतःपर तिच्या डोळ्यांपासून दुसरीकडे वळत नव्हते... तिचे डोळे त्याच्या चेहऱ्यावरून फिरत असल्याचे भासत होते, आणि उत्तरादाखल सभ्यतेपायी तो स्मित करीत होता, पण तरीही तो स्मित करीत होता. तो गूढ बोलू लागला होता, परस्पर संबं-धातील प्रामाणिकपणाविषयी तो युक्तिवाद करीत होता, कर्तव्याबाबत, प्रेमातील आणि विवाहातील पावित्र्याबाबत युक्तिवाद करीत होता, हे तिच्या योजनांना पूरकच होते. अशा अमूर्त, गूढ गोष्टी सर्वोत्तम आरंभबिंदू ठरतात हे प्रत्येकाला ठाऊक आहे...

मार्या निकोलायेवना ज्यांना उत्तम ठाऊक होती ते सांगायचे की, जेव्हा तिच्या धसमुसळ्या आणि खंबीर स्वभावात काहीतरी नाजुक व नम्र, काहीतरी बालिकेच्या लज्जेसमान जागे व्हायचे—असे कुठून जागे व्हायचे



19—2138

कोण जाणे! –तेव्हा... तेव्हा गोष्टींनी धोकादायक वळण घेतले होते.

सानिनच्या बाबतीत आता असेच धोक्याचे वळण आले होते. क्षणभर मन केंद्रित करणे जर त्याला जमले असते तर त्याला स्वत:चाच संताप आला असता; पण मन केंद्रित करायला अथवा स्वत:चा तिटकारा करायला त्याच्यापाशी वेळच नव्हता.

आणि तिने वेळेचा भरपूर सदुपयोग करून घेतला. आणि हे सर्व केवळ तो दिसायला वाईट नव्हता म्हणून! कुठे फायदा आणि कुठे तोटा, हे कसे समजायचे?

नाटक संपले. मार्या निकोलायेवनाने सानिनला आपल्या अंगावर शाल टाकायला सांगितले. तिच्या खरोखरीच सुंदर खांद्यांभोवती तो शालीच्या मऊ घड्या गुंडाळीत होता तेव्हा ती स्तब्ध उभी राहिली. मग त्याच्या बाहूला धरून ती बाहेर कॉरीडॉरमध्ये गेली व जवळजवळ किंचाळलीच– बॉक्सच्या दारापाशीच डॉनहॉफ एखाद्या भुतासारखा उभा होता. आणि त्याच्या पाठीशी वीसबादेनच्या टीकाकाराची हास्यास्पद आकृती उभी होती. साहित्य-समीक्षकाच्या चकाकत्या मुद्रेवर आसुरी समाधान विलसत होते.

"मादाम, तुमची बग्गी शोधून आणू काय?" त्या तरुण अंमलदाराने म्हटले आणि त्याच्या आवाजात कष्टाने दाबून धरलेल्या रागाची धार जाणवली.

"नको, आभारी आहे," ती उत्तरली. "माझा नोकर करील ते काम. तुम्ही इथंच थांबा!" हुकूमवजा स्वरात ती अस्पष्टपणे उद्गारली व सानिनला खेचून घेत वेगाने पुढे निघून गेली.

"चालते व्हा! उगीच कशाला गोंडा घोळताय?" एकदम समीक्षकाकडे वळून डॉनहॉफ खेकसला. आपला राग कुणावर तरी काढणे त्याला भाग होते.

«Sehr gut! Sehr gut!» मागे सरत समीक्षक पुटपुटला.

पोर्चमध्ये वाट पाहणाऱ्या मार्या निकोलायेवनाच्या नोकराने निमिषार्धात तिची बग्गी हुडकून काढली. ती घाईघाईने बग्गीत बसली व तिच्या पाठोपाठ सानिननेही आत उडी मारली. धाडदिशी दार बंद झाले आणि मार्या निकोलायेवनाला हास्याच्या उकळ्या फुटल्या.

"कशाला हसताय?" सानिनने तिला विचारले.

"अग बाई, मला माफ करा... सहज डोक्यात कल्पना आली: डॉनहॉफनं तुमच्याशी आणखी एक द्वंद्व खेळलं तर काय होईल? माझ्यावरून? कित्ती छान होईल नाही?"



"तुमच्या तो चांगल्या ओळखीचा आहे?" सानिनने विचारले.

"तो पोरगा? तो माझा निरोप्या आहे. तुम्ही काळजी करू नका."

"मी मुळीच काळजी करत नाही."

मार्या निकोलायेवनाने सुस्कारा टाकला.

"हं, मला ठाऊक आहे, तुम्ही काळजी करत नाही. माहीत आहे: तुम्ही इतके चांगले आहात की, माझी शेवटची विनंती नाकारणार नाही याची मला खात्री आहे. तीन दिवसांनंतर मी पॅरिसला जातेय आणि तुम्ही फ्रॅंकफुर्टला परत जाताय हे विसरू नका. आपण परत केव्हा भेटू कुणास ठाऊक!"

"कोणती विनंती?"

"मला वाटतं, तुम्हाला घोड्यावर बसता येतं?"

"हो."

"छान. उद्या सकाळी मी तुम्हाला माझ्याबरोबर घेऊन जाईन. आपण दोघं शहराबाहेर रपेटीला जाऊ. उत्तम घोडे मागवू. मग परत येऊन आपल्या व्यवहाराची बोलणी पक्की करू आणि खलास! चकित होऊ नका असे! ही एक लहर आहे, मी वेडी आहे असं म्हणू नका–कदाचित मी असेनही वेडी–पण नुसतं म्हणा: 'मी येईन.'"

मार्या निकोलायेवनाने आपला चेहरा त्याच्याकडे वळविला. बग्गीत अंधार होता, पण त्यामुळे तिचे डोळे अधिकच तेजाने चमकत होते.

"ठीक आहे, मी येईन," उसासा टाकीत सानिन म्हणाला.

"ओहो! तुम्ही उसासा टाकलात!" चिडवण्याच्या सुरात ती म्हणाली. "तुम्ही तसा उसासा का टाकलात हे मला ठाऊक आहे. तुम्हाला म्हणायचंय: एकदा सुरुवात केल्यावर आता माघार घेता येत नाही! पण नाही! तसं मुळीच नाही! तुम्ही कित्ती छान आहात आणि मी माझं वचन पाळीन. हा माझा हात, हातमोजाविना, उजवा, कामाचा. धरा त्याला–आणि त्याच्यावर विश्वास ठेवा. मी कशा प्रकारची बाई आहे, मला नीटसं ठाऊक नाही, पण निदान मी प्रामाणिक आहे. जिच्याशी व्यवहार करावा अशी आहे."

आपण काय करतो आहोत हे उमजायच्या आतच सानिनने तिचा हात आपल्या ओठांना लावला. आपला हात हळूच मागे घेऊन मार्या निकोलायेवना एकदम गप्प झाली. बग्गी थांबेपर्यंत ती अगदी चूप बसून राहिली.

बाहेर पडण्यासाठी ती उठली. काय घडले बरे? सानिनला नुसता भास झाला अथवा त्याच्या गालावर ओझरता गरम स्पर्श झाला?

"उद्या!" मार्या निकोलायेवना कुजबुजली. तिचे हॉटेलात आगमन होताच सोनेरी केसांचा टोप घातलेल्या द्वारपालाने चार फांद्यांचे शमादान हाती धरले होते. त्या प्रकाशात उजळलेल्या जिन्याच्या पायऱ्या ती चढू लागली. जाण्याआधी नजर खाली वळवून ती म्हणाली: "उद्या!"

सानिन आपल्या खोलीवर परतला तेव्हा जेम्माचे पत्र टेबलावर पडले होते. प्रथम त्याला भीती वाटली, पण क्षणानंतर त्याला आनंद वाटला. स्वतःपासून आपल्या भीतीला दडविण्यासाठी! पत्रात मोजक्याच ओळी होत्या. त्याच्या "कामाच्या अनुकूल आरंभाबद्दल" तिने आनंद व्यक्त केला होता, त्याला धीर धरण्याचा उपदेश केला होता आणि पुढे लिहिले होते की, घरी सगळे छान होते व त्याच्या परतीची आनंदाने वाट पहात होते. सानिनला ते पत्र काहीसे थंडे भासले. पण त्याने लेखणी व कागद उचलले आणि... परत फेकून दिले. "काय लिहू? उद्या तर मी स्वतःच परत जाईन–वेळ झाली परतीची!"

तो ताबडतोब बिछान्यावर आडवा झाला आणि लौकरात लौकर झोपण्याचा त्याने प्रयत्न केला. जर तो जागा राहिला असता तर नक्की त्याच्या मनात जेम्माविषयीचे विचार सुरू झाले असते आणि तिचा विचार करायला त्याला काहीशी लाज वाटत होती. त्याच्या सदसद्विवेकबुद्धीची त्याला टोचणी लागली होती. पण उद्यापर्यंत सर्व संपून जाईल, ह्या चमत्कारिक बाईचा तो कायमचा निरोप घेईल व हा सर्व मूर्खपणा विसरून जाईल, अशा विचाराचा त्याने स्वतःला दिलासा दिला.

दुबळ्या मनाची माणसे जेव्हा स्वतःशी बोलतात तेव्हा दमदार शब्द वापरण्याची त्यांना खोड असते. Et puis... cela ne tire pas à consèquence!

४१

सानिन झोपी गेला तेव्हा त्याचे विचार असे होते. पण दुसऱ्या दिवशी सकाळी मार्या निकोलायेवनाने चाबकाच्या पोवळ्याच्या मुठीने त्याच्या खोलीचे दार अधीरेपणाने ठोठावले आणि ती दारात येऊन उभी राहिली तेव्हा त्याच्या मनात कोणते विचार होते? गडद निळ्या रपेटीच्या पोषाखाचा लांब सोगा तिच्या हातावर आडवा पडला होता, सैलसर वेणी घातलेल्या तिच्या केसांवर छोटीशी टोपी विसावली होती, मुख-आच्छादन खांद्यावर



मागे फेकले होते; तिच्या ओठांवर, तिच्या डोळ्यात एक आव्हानात्मक स्मित होते व तिच्या सर्व मुखावर ते पसरत होते. त्यावेळी त्याला काय वाटले, याबद्दल इतिहास मौन पाळतो.

"काय? तयार झालात?" तिचा आनंदी आवाज खणखणला.

सानिनने कोटाची बटणे लावली व मुकाटपणे टोपी उचलली. मार्या निकोलायेवनाने त्याच्याकडे एक तेजस्वी कटाक्ष फेकला, मान हलविली व ती जिन्यावरून खाली पळत गेली. तो तिच्या पाठोपाठ धावला.

प्रवेशद्वारासमोर रस्त्यावर घोडे एव्हाना उभे होते. तीन घोडे होते– मार्या निकोलायेवनासाठी पिंगट-सोनेरी रंगाची, निमुळत्या तोंडाची आणि थरथरत्या ओठांची, ठसठशीत काळ्या डोळ्यांची, हरणासारख्या पायांची, किंचित कृश, पण देखणी आणि ज्वालेसारखी गरम अशी खानदान घोडी होती; सानिनसाठी बळकट, रुंद छातीचा, भरदार स्नायूंचा, संपूर्ण काळ्या रंगाचा घोडा होता; तिसरा घोडा मोतद्दारासाठी होता. मार्या निकोलायेवनाने अलगद खोगीरावर झेप घेतली. घोडीने जमीन खुरांनी उकरली, ती थयथया नाचली, शेपटीची कमान करून तिने पुठ्ठ्यात घातली. पण मार्या निकोलायेवनाने (ती निष्णात घोडेस्वार होती) आपले आसन भक्कम ठेवले. अजून तिने पोलोझोवचा निरोप घेतला नव्हता. आपल्या नेहमीच्या तुर्की टोपीत व गुंड्या मोकळ्या सुटलेल्या अंगरख्यात तो सज्जात अवतीर्ण झाला व त्याने सुती हातरुमाल फडफडवला. मात्र त्याच्या मुद्रेवर किंचितही स्मित नव्हते, उलट कपाळाला आठ्या पडल्या होत्या. सानिनसुद्धा आपल्या घोड्यावर स्वार झाला. मार्या निकोलायेवनाने आपल्या चाबकाने पोलोझोवला सलाम ठोकला आणि आपल्या घोडीच्या कमानदार सपाट मानेवर त्या चाबकाचा फटका मारला. घोडी किंचित मागे सरून पुढे झेपावली व डेक्यात पावले टाकीत, लगामाची काढणी चावीत, घाबरटपणे फुरफुर करीत चालू लागली. मार्या निकोलायेवनाकडे पहात सानिन मागून घोड्यावरून जात होता. तिची सडपातळ, लवचिक आकृती–व्यवस्थित पण फारसा घट्ट पट्टा न बांधलेली–सहजपणे, आत्मविश्वासू डौलाने झुलत होती. मागे कटाक्ष टाकून तिने डोळ्यांच्या इशाऱ्याने त्याला हाक घातली. तो तिच्या जोडीने दौडू लागला.

"किती छान आहे नाही?" ती म्हणाली. "आपण अलग होण्यापूर्वी मला तुम्हाला सांगायचंय की तुम्ही फार फार छान आहात. आणि ह्याचा तुम्हाला कधीही खेद होणार नाही."

हे शेवटचे शब्द उच्चारून तिने अनेक वेळा आपली मान हलविली. जणू त्या शब्दांवर भर देण्याची आणि त्यांचे महत्त्व त्याला पटविण्याची तिची इच्छा होती.

तिला एवढी आनंदी पाहून सानिन चकित झाला होता. लहान मुले जेव्हा खूप खूप आनंदी होतात तेव्हा त्यांच्या मुद्रांवर जो पवित्र भाव उमटलेला असतो, तो भाव तिच्या मुद्रेवर उमटला होता.

शहराच्या जवळच्या वेशीपर्यंत ते मंद चालीने गेले, पण गावाबाहेर जाताच त्यांनी दौड सुरू केली. हवा सुरेख होती. उन्हाळ्यातील दिवसासारखी. वाऱ्याचे झोत त्यांच्या चेहऱ्यांना जाणवत होते; प्रसन्न शीळ घालीत त्यांच्या कानांमागून जात होते. ती दोघे मजेत होती. यौवनभरल्या, निकोप जीवनाच्या जाणीवेने, ज्या मुक्त, जलद गतीने ती जात होती तिच्या जाणीवेने, ती दोघेही झपाटली होती व प्रत्येक हालचालीसरशी ही जाणीव अधिक वाढत होती. मार्या निकोलायेवनाने आपल्या घोडीचा लगाम खेचला व परत मंद चालीने जायला सुरुवात केली. सानिनने तिचे अनुकरण केले.

"आह्!" तिने एक गहिरा, आनंदभरा निःश्वास टाकला, "जगण्याला लायक अशी एवढी एकच गोष्ट आहे! हवी ती गोष्ट घडवून आणणं, अशक्यप्राय वाटणारी! माझा प्याला भरलाय, माझा आत्मा काठोकाठ तृप्त बनलाय!" तिने आपला हात आपल्या गळ्यावर आडवा धरला. "आणि किती सुस्वभावी आहोत असं वाटतं. पहा, किती दयाळू आहे मी आता! मला वाटतं की, सबंध जगाला मिठी घालू शकेन. नाही, सबंध जगाला नाही – त्याला मी मिठी घालणार नाही." रस्त्याच्या कडेने सरपटत जाणाऱ्या, लक्तरांमधल्या एका म्हाताऱ्याकडे तिने चावकाने निर्देश केला. "पण त्याला आनंदी करायला माझी हरकत नाही. ए – हे घे!" जर्मन भाषेत ती मोठ्यांदा ओरडली आणि म्हाताऱ्याच्या पायाशी तिने आपला बटवा फेकला. तो छोटा, जड बटवा (त्याकाळी पर्स वगैरे नव्हत्या) रस्त्यावर धप्प आवाज करीत पडला. तो वाटसरू चमकून एकदम थांबला, पण मार्या निकोलायेवना नुसती खो खो हसत सुटली आणि तिने घोडीला टाच मारली.

"घोड्यावरची रपेट करण्यात तुम्हाला एवढा आनंद वाटतो?" तिला गाठल्यावर सानिनने विचारले.

मार्या निकोलायेवनाने अचानक परत घोडीचा लगाम खेचला. घोडा थांबविण्याचा इतर कुठलाही प्रकार तिला मान्य नव्हता.



"त्याच्या कृतज्ञतेपासून मला लांब पळायचं होतं. जो कुणी माझे आभार मानतो तो माझा आनंद बिघडवतो. माहीत आहे, मी त्याच्यासाठी नव्हे तर माझ्यासाठी तसं वागले. मग त्यानं आभार मानायचं धाडस कसं करायचं? काय म्हणालात? मला ऐकू आलं नाही."

"मी विचारलं... आज तुम्ही एवढ्या आनंदात का आहात हे मला जाणून घ्यायचं होतं!"

"माहीत आहे का," मार्या निकोलायेवना म्हणाली. एक तर पुन्हा तिला सानिनचे बोलणे ऐकू आले नाही, अथवा त्याच्या प्रश्नाला उत्तर देण्याची गरज भासली नाही. "आपल्या पाठोपाठ येणाऱ्या त्या मोतद्दाराचा मला अगदी वीट आलाय. ही साहेब मंडळी घरी केव्हा परतणार याचाच बहुधा सगळा वेळ तो विचार करत असावा... त्याची ब्याद आपण कशी घालवायची?" झटकन तिने आपल्या खिशातून एक छोटी टिपणवही काढली. "एक पत्र लिहून त्याला परत गावात पाठवू का? नको, ते चालणार नाही. ओह्, आलं ध्यानात. ती पुढं दारूचा गुत्ता आहे ना?"

तिने दाखविलेल्या दिशेने सानिनने नजर फेकली.

"तसं वाटतंय खरं!"

"सुरेख! मी त्याला तिथं बीयर प्यायला थांबवते आणि आपण परत येईपर्यंत तिथंच वाट पहायला सांगते."

"पण त्याला काय वाटेल?"

"आपल्याला काय करायचंय त्याच्याशी? आणि तो मुळीच विचार करणार नाही. तो फक्त बीयर पीत राहील. चल, सानिन" (प्रथमच तिने त्याला त्याच्या आडनांवाने हाक मारली) "मार टाच!"

गुत्त्यापाशी पोहोचल्यानंतर मार्या निकोलायेवनाने मोतद्दाराला आपल्यापाशी बोलविले आणि आपल्या इच्छा त्याला सांगितल्या. इंग्रज रक्ताच्या आणि इंग्लिश स्वभावाच्या त्या मोतद्दाराने मुकाटपणे आपला हात उंचावून टोपीच्या टोकाला लावला व घोड्यावरून खाली उडी टाकून, घोड्याचा लगाम हाती धरून तो निघून गेला.

"आपण आता हवेसारखे मुक्त आहोत!" मार्या निकोलायेवना ओरडली. "कुठं जायचं? उत्तरेला? दक्षिणेला? पूर्वेला? अथवा पश्चिमेला? पहा – हंगेरीच्या राजाच्या राज्यारोहणावेळी तो जसा होता तशी मी आहे" (चावकाने तिने चारही दिशा दाखविल्या). "सारं आपलं आहे. नाही, माहीत आहे का: पहा, किती सुंदर डोंगर आहे तिथं – आणि किती सुरेख जंगल! चला, डोंगरात जाऊ या! डोंगरात!

In die Berge, wo die Freiheit thront!"*

हमरस्ता सोडून तिने एका अरुंद, न मळलेल्या वाटेने दौडायला आरंभ केला. ती वाट खरेच डोंगरांकडे जात होती असे भासले. सानिन तिच्या पाठोपाठ दौडू लागला.

## ४२

त्या वाटेची लौकरच पाऊलवाट बनली आणि शेवटी तीसुद्धा अदृश्य होऊन पाण्याच्या एका खंदकाने तुटली होती. परत मागे जाण्याचा सानिनने सल्ला दिला, पण मार्या निकोलायेवना म्हणाली: "नाही, मला डोंगरात जायचंय. पाखरं जशी उडतात तसं सरळ दौडत जाऊ या." तिने आपल्या घोडीला खंदकावरून उडी मारायला लावली. सानिनने तसेच केले. खंदकानंतर एक कुरण आले. प्रथम ते कोरडे होते, नंतरचा भाग ओलसर-दमट होता आणि शेवटी तर चक्क दलदल होती. सगळ्या बाजूंनी पाणी वर येत होते. मार्या निकोलायेवना त्या पाणथळ प्रदेशातून मुद्दाम घोडी नेत होती, हसत होती व उद्गारत होती:

"आपण लहान मुलं आहोत अशी कल्पना करू या."

"माहीत आहे का," तिने सानिनला विचारले, "पाणथळीत शिकार कशी करतात?"

"होय," तो उत्तरला.

"माझे काका कुत्र्यांच्या मदतीनं तशी शिकार करायचे," ती पुढे सांगू लागली. "वसंतामधल्या दिवसात मी त्यांच्याबरोबर घोड्यावरून जायची. खूप मज्जा! आता तुम्ही आणि मी पाणथळीत शिकार करतोय. मात्र मला दिसतंय: तुम्ही रशियन आहात आणि तरीही इटालियन मुलीशी लग्न करू इच्छिताय. अर्थात तो तुमचा प्रश्न. अगं बाई! परत खंदक? हूप-ला!"

घोडीने उडी मारली आणि मार्या निकोलायेवनाची टोपी खाली पडली. तिचे केस तिच्या खांद्यांवर सैरभैर मोकळे सुटले. सानिन घोड्यावरून उतरून टोपी उचलण्याच्या बेतात होता, तोच ती ओरडली: "हात लावू

---

*डोंगरात कुठेतरी स्वातंत्र्याचे राज्य आहे.—अनु.



नका! मी स्वत: घेते!" हातातील चाबकाने आपल्या मुख-वस्त्राचे एक टोक पकडून ती खोगीरावरून खाली वाकली व खरोखरीच तिने टोपी वर उचलून परत आपल्या डोक्यावर ठेवली. मात्र केसांना पुन्हा टोपीत न खोवता एक आरोळी ठोकून तिने टाच मारली. तिच्या जोडीने सानिन दौडत होता, तिच्या जोडीने चरांवरून उड्या घेत होता; कुंपणांना, नाल्यांना ओलांडीत होता. काहीवेळा त्याची उडी अपुरी पडत होती, मेटाकुटीने तो अडथळे ओलांडीत होता, चढांवरून आणि उतारांवरून दौडत होता. आणि हा सारा वेळ तिच्या चेहऱ्याकडे पहात होता. किती विलक्षण चेहरा होता तो—उमलणाऱ्या फुलासारखा. उत्सुक, तेजस्वी, बेभान डोळे विस्फारलेले होते; ओठ विलगले होते; फुगीर बनलेल्या नाकपुड्या अधीरपणे हवा आत ओढत होत्या. ती आपल्या समोर अगदी सरळ पहात होती. जणू तिचा निर्भय आत्मा ती जे काही पाहील त्याचा ताबा घेईल असे वाटत होते—धरती, आकाश, सूर्य, हवा! तिला फक्त एकच खेद वाटत असल्याचे भासत होते—मात करण्याजोगा पुरेसा धोका तिला आढळत नव्हता. "सानिन," ती ओरडली, "हे ब्यूर्गेरच्या लेनोरेसारखं[56] आहे. फक्त तुम्ही मेलेले नाही, होय ना? मेलेले नाही ना? मी जिवंत आहे!" तिच्या बेफाम पाशवी वृत्ती उसळून आल्या होत्या. इत:पर ती घोड्याला दौडत नेणारी ॲमेझॉन नव्हती; आता ती तरुण हयग्रीवा होती. अर्धं देवता आणि अर्धं पशू. आणि तिचा उत्फुल्ल हर्ष पाहून समोरचा रम्य निसर्गप्रदेश मूक चकितपणे उभा होता.

सरतेशेवटी मार्या निकोलायेवनाने आपल्या फेसाळलेल्या, चिखलाने लडबडलेल्या घोडीचा लगाम खेचला. तिच्या वजनाखाली घोडी थरथरत होती आणि सानिनचा बळकट, पण वजनदार घोडा जोरजोराने धापा टाकीत होता.

"मजा आली की नाही?" उन्मादक दबत्या आवाजात मार्या निकोलायेवनाने विचारले.

"आली खरी!" सानिन उत्साहाने उतरला. त्याचेही रक्त जोरात उसळू लागले होते.

"अजून जरा थांबा. पुढं खूप काही घडायचंय!" तिने आपला हात सरळ केला. त्यावरील हातमोजा फाटला होता.

"मी तुम्हाला डोंगरात घेऊन जाईन, रानात घेऊन जाईन, असं म्हटलं होतं ना! ते पहा डोंगर!" खरेच—हे तुफानी घोडेस्वार ज्या

स्थळापर्यंत आले होते तेथून सुमारे दोनशे यार्डांवर माथ्यावर रानांचे आच्छादन घेतलेले डोंगर उभे होते. "पहा–त्यांच्याकडं जायची वाट. आपण जरा दम खाऊ आणि मग पुढं जाऊ! मात्र मंद चालीनं. आपल्या घोड्यांना आपण विश्रांती दिली पाहिजे."

ती दोघे पुढे निघाली. एक जोरदार झटका देऊन मार्या निकोलायेवनाने आपले केस मागे उडविले. मग आपल्या हातमोजांकडे तिने एकवार नजर टाकली व त्यांना काढून टाकले. "माझ्या हातांना चामड्याचा वास येईल," ती म्हणाली, "पण तुम्ही त्याचं काही वाटून घेणार नाही, होय ना?"

मार्या निकोलायेवनाने स्मित केले आणि सानिननेही स्मित केले. त्या जोरदार घोडदौडीने त्यांच्यातील जवळीक पूर्ण केल्याचे, त्यांना मित्र बनविल्याचे, भासत होते.

"तुमचं वय काय?" अचानक तिने विचारले.

"बावीस."

"अय्या, खरंच? माझंसुद्धा बावीस वय आहे. छान वय. त्यांची एकत्र बेरीज केली तरीही म्हातारपण खूप लांब राहील. बाई गं, किती गरम होतंय! मी खूप लाल झालेय का?"

"पॉपीच्या फुलासारखी लाल."

मार्या निकोलायेवनाने आपल्या हातरुमालाने आपला चेहरा पुसला.

"रानात पोचलो म्हणजे थंड वाटेल. एवढं जुनं जंगल आहे, एखाद्या जुन्या मित्रासारखं! तुम्हाला मित्र आहेत?"

सानिन विचार करायला थांबला. "आहेत... पण फार नाहीत. अस्सल नाहीत."

"मला अस्सल मित्र आहेत, पण ते जुने नाहीत. ही माझी घोडी– फार चांगली मित्र आहे. पहा, किती काळजीपूर्वक वाहून नेतेय मला! ओह्! किती छान वाटतंय इथं! परवा मी खरंच पॅरिसला चाललेय का?"

"हो–खरंच चाललात?" सानिनने विचारले.

"आणि तुम्ही फ्रँकफुर्टला?"

"मी नक्की फ्रँकफुर्टला जातोय!"

"ठीक आहे तर–देव तुमचं भलं करो! पण आजचा दिवस मात्र आपला–आपला!"



घोडे रानाच्या सीमेपर्यंत पोहोचले आणि रानात शिरले. सर्व बाजूंनी त्यांना विशल आणि मऊ सावलीने वेढले.

"हा तर स्वर्ग!" मार्या निकोलायेवना उद्‌गारली. "आणखी दाट सावलीत जाऊ या, सानिन!"

हलकेच झुलत आणि जोरजोराने श्वासोच्छ्वास करीत घोडे "आणखी दाट सावलीत" गेले. त्यांच्या वाटेने एकदम वळण घेतले होते व एका अरुंद खिंडीत ती शिरली होती. त्या घनदाट, सुस्त वातावरणामध्ये रानटी झुडुपांचा, नेचरीचा, राळेचा, दमट ओलीचा आणि गेल्या वर्षीच्या कुजलेल्या पानांचा संमिश्र वास भरला होता. प्रचंड तपकिरी सुळक्यांच्या भेगांमधून झोंबरा गारवा येत होता. वाटेच्या दोन्ही बाजूंना हिरवे शेवाळे माजलेली गोल टेकाडे उभी होती.

"थांबा!" मार्या निकोलायेवना ओरडली. "ह्या मखमाली उशीवर बसून विश्रांती घ्यायची माझी इच्छा आहे. उतरायला मला मदत करा!"

सानिनने घोड्यावरून खाली उडी घेतली व तो तिच्याकडे धावला. ती त्याच्या खांद्यावर झुकली, चटकन तिने खाली उडी मारली आणि शेवाळी टेकाडावर ती बसली. दोन्ही घोड्यांच्या लगामांना धरून तो तिच्यासमोर उभा राहिला.

तिने आपले डोळे त्याच्या चेहऱ्यावर रोखले.

"सानिन, तुम्हाला विसरणं माहीत आहे?"

आदल्या दिवशी बग्गीत काय घडले होते त्याची सानिनला आठवण झाली. "हा प्रश्न आहे अथवा राग?" त्याने प्रतिटोला मारला.

"आयुष्यात मी कधी कुणावर रागावले नाही. भारलेल्या अवस्थेवर तुमचा विश्वास आहे?"

"म्हणजे?"

"मंत्रमुग्ध होणं माहीत आहे: आपल्या गाण्यांमधून त्याबद्दल गातात. रशियन लोकगीतांमधून!"

"ओह्, त्याबद्दल म्हणायचंय तुम्हाला!" हेल काढीत सानिन म्हणाला.

"हो–माझा त्यावर विश्वास आहे. आणि एक दिवस तुमचाही विश्वास बसेल."

"मंत्रमुग्ध," सानिनने परत शब्द उच्चारला. "काहीही शक्य आहे. पूर्वी माझा त्यावर विश्वास नव्हता, पण आत्ता आहे. इतःपर मी स्वतःलाच ओळखत नाही."

मार्या निकोलायेवना विचारात पडल्याचे भासले आणि तिने आपल्या पाठीमागे नजर टाकली.

"ही जागा मला काहीशी परिचित वाटतेय. सानिन, त्या ओकच्या प्रचंड झाडामागं पहा–तिथं एक लाल लाकडी क्रूस आहे का?"

सानिनने त्या दिशेने काही पावले टाकली.

"हो, आहे."

मार्या निकोलायेवना गालातल्या गालात हसली. "छान. आपण कुठं आहोत हे आता माझ्या ध्यानात आलं. अजून आपण वाट चुकलेलो नाही. आवाज कसला हा–लाकूडतोड्याचा?"

सानिनने दाट झाडीत डोकावून पाहिले. "होय, कुणीतरी वाळक्या फांद्या तोडतंय."

"मला माझे केस नीट केले पाहिजेत," मार्या निकोलायेवना म्हणाली. "नाहीतर तो मला अशी पाहील आणि नाही नाही ते भलते तर्क करील." तिने टोपी उतरवली व गंभीर शांततेत आपल्या लांब वेण्या परत घालायला आरंभ केला. सानिन तिच्या पुढ्यात उभा होता. तिच्या पोषाखाच्या काळ्या चुण्यांमधून तिचे डौलदार स्नायू स्पष्ट उठून दिसत होते. तिच्या पोषाखावर शेवाळाचे पुंजके इकडे तिकडे चिकटले होते.

सानिनच्या मागील एका घोड्याने अचानक मान उडविली. नकळतपणे सानिन दचकला. तो नखशिखांत थरथरला. त्याच्या अंतरंगात प्रचंड कल्लोळ माजला होता. फिडलच्या तारांप्रमाणे त्याच्या चित्तवत्ती ताणलेल्या होत्या. आपण स्वतःला इतःपर ओळखू शकत नाही असे जेव्हा तो म्हणाला होता तेव्हा खरे बोलला होता. तो खरेच भारल्यासारखा झाला होता. त्याचे सर्वांग एकाच गोष्टीने, एकाच विचाराने, एकाच इच्छेने भारले होते. मार्या निकोलायेवनाने त्याच्याकडे चौकसपणे न्याहाळून पाहिले.

"आता ठीक झालं," आपली टोपी परत डोक्यावर ठेवीत सरतेशेवटी ती म्हणाली. "तुम्ही खाली का बसत नाही? इथं! नाही, एक मिनिट थांबा–खाली बसू नका. काय झालं?"

झाडांच्या शेंड्यांवर, रानातील हवा एका पोकळ गडगडाटाने हादरली.

"वीज चमकली काय?"

"असं वाटतंय," सानिन उतरला.

"आह्, हा खरा उत्सवाचा दिवस! निखळ उत्सव! फक्त एवढंच घडायचं बाकी उरलं होतं!" पुन्हा एकदा गडगडाट झाला. त्याची पट्टी



वर उंचावली व सावकाशपणे कंपायमान होत विरत गेली. "ब्राव्हो! Bis! काल 'एनेइड'बद्दल बोलत होतो ते आठवतंय? तीसुद्धा वादळी पावसात जंगलात सापडली होती. पण आपण निवारा घेतला पाहिजे." ती चटकन उठून उभी राहिली. "माझा घोडा आणखी जवळ आणा! तुमचा हात पुढं करा. छान! मी फारशी जड नाही."

पक्ष्याप्रमाणे झटकन ती घोडीवर विराजमान झाली. सानिनही आपल्या घोड्यावर स्वार झाला.

"तुम्ही–घरी निघालात?" अनिश्चित स्वरात सानिनने विचारले.

"घरी!!!" लगाम गोळा करीत उंच स्वरात ती खोचकपणे म्हणाली. "माझ्या पाठोपाठ चला!" जवळ जवळ उद्धटपणे तिने आज्ञा केली.

वाटेवरून तिने घोडी चालवीत नेली, लाल क्रूस मागे टाकला, मैदानात उतरली, फाटा फुटेपर्यंत सरळ गेली, उजवीकडे वळली आणि पुन्हा एकदा डोंगराचा चढणीचा रस्ता तिने धरला. त्या रस्त्याने ती निबिड जंगलात आत आत जात राहिली. मात्र ती कोठे चालली होती हे तिला ठाऊक होते असे दिसत होते. ती काहीही बोलली नाही आणि तिने कधीही मागे वळून पाहिले नाही. मोठ्या दिमाखात ती पुढे जात होती. आणि तो तिच्यामागून नम्रपणे व आज्ञाधारकपणे जात होता. त्याच्या धडधडत्या काळजात निर्धाराची एकही ठिणगी उरली नव्हती. पावसाची हलकी भुरभुर सुरू झाली. ती आपल्या घोडीला पुढे दामटीत होती व सानिनही फार मागे पडत नव्हता. सरतेशेवटी कोवळ्या देवदारांच्या गर्द हिरव्या पालवीमधून, एका उंच राखाडी खडकाच्या पायथ्याशी, जाळीदार ताटीचे दार असलेले एक जुनाट खोपट त्याच्या दृष्टीस पडले. मार्या निकोलायेवनाने खुरट्या झुडुपांमधून घोडीला पुढे दामटले व त्या खोपटाच्या नेमक्या दारासमोर तिने खाली उडी मारली. "एनेई!" ती अस्फुट उद्गारली.

चार तासांनंतर, मार्या निकोलायेवना आणि सानिन, पेंगणाऱ्या मोतद्दारासह वीसबादेनला हॉटेलात परतले. मॉन्शर पोलोझोव आपल्या बायकोच्या भेटीला आला तेव्हा त्याच्या हाती व्यवस्थापकाला लिहिलेले पत्र होते. त्याने तिच्याकडे चिकित्सकपणे एक कटाक्ष टाकला. त्याच्या चेहऱ्यावर असमाधानाची छटा स्पष्ट दिसत होती. "मी हरलो असं तुला सांगायचंय का?" तो पुटपुटला.

उत्तरादाखल मार्या निकोलायेवनाने केवळ खांदे उडविले.

15-Aug-13 / 18:29:10

आणि त्याच दिवशी, आणखी दोन तासांनंतर, सानिन आपल्या खोलीत तिच्यासमोर उभा होता. पूर्ण पराभूत अवस्थेत, जणू नष्ट झाल्यासारखा...

"कुठं जाणार तू?" तिने त्याला विचारलं. "पॅरिसला–अथवा फ्रँकफुर्टला?"

"जिथं तू जाशील तिथं मी येईन. आणि जिथं तू असशील तिथं मी राहीन! तू मला दूर हाकलून देईपर्यंत!" तो अगतिकतेने म्हणाला व गुडघे टेकून त्याने आपले ओठ तिच्या हातांवर दाबले. आपले हात सोडवून तिने ते त्याच्या डोक्यावर ठेवले... आणि दाही बोटांनी अचानक त्याचे केस गच्च आवळले. त्या दीनवाण्या केसांमधून सावकाशपणे बोटे फिरवीत व त्यांना पीळ घालीत ती ताठपणे उभी होती. तिच्या ओठांवर विजयी स्मित विलसत होते, तर सताड विस्फारलेल्या तिच्या शुभ्र तेजाळ डोळ्यांमध्ये केवळ निष्ठुर निर्विकारता होती आणि विजयाचे समाधान तरळत होते. बहिरीससाणा जेव्हा आपल्या भक्ष्याच्या शरीरात नख्या खुपसतो तेव्हा त्याचे डोळे असेच दिसतात.

४३

आपल्या नि:स्तब्ध अभ्यासिकेत कागदपत्र चाळीत असताना सानिनला जेव्हा तो रत्नजडित क्रूस सापडला, तेव्हा त्याला ह्या गोष्टी आठवल्या. नुकतेच कथन केलेले प्रसंग त्याच्या अंत:चक्षूंसमोर ठळकपणे एकापाठोपाठ उमटत गेले. पण मादाम पोलोझोवासमोर त्याने केलेल्या प्रार्थनेच्या मानहानीकारक क्षणापर्यंत जेव्हा तो येऊन ठेपला, तिच्या पायांपाशी तो कोसळला त्या वेळेपर्यंत जेव्हा तो पोहोचला, त्याच्या गुलामगिरोचा जेव्हा आरंभ झाला, तेव्हा त्या आठवणींपासून त्याने आपले तोंड फिरविले. त्यापुढे त्या आठवणी सहन करणे त्याला अशक्य ठरले. त्याची स्मृती त्याला दगा देत होती असे मुळीच नव्हे! त्या क्षणानंतर काय घडले होते ते त्याला चांगले स्मरत होते, पण आत्तासुद्धा, इतक्या वर्षांनंतरसुद्धा, शरमेने त्याचा जीव घुसमटत होता. अजिंक्य अशा आत्म-तिरस्काराची भावना एखाद्या लाटेप्रमाणे आपला कबजा घेईल अशी त्याला भीती वाटत होती. आपल्या स्मृतीला त्याने दाबून टाकले नसते तर त्याच्या इतर सर्व संवेदना नष्ट झाल्या असत्या, ह्याची त्याला जाणीव होती. पण उसळणाऱ्या आठवणींपासून कितीही तोंड फिरविण्याचा त्याने प्रयत्न केला, तरी त्यांना पूर्णपणे



गाडून टाकणे त्याला जमले नव्हते. जेम्माला त्याने पाठविलेल्या केविलवाण्या, अश्रुभरल्या, खोट्या, दयनीय पत्राची त्याला आठवण झाली. त्याच्या पत्राला कधीच उत्तर मिळाले नव्हते. अशा फसवणुकीनंतर, अशा विश्वासघातानंतर तिच्या समोर उभे रहायचे, तिच्याकडे परतायचे...! छे:, छे:, असे वागण्यापासून परावृत्त करण्याइतपत त्याची सदसद्विवेकबुद्धी नक्की शिल्लक होती, त्याचा मान निश्चित शिल्लक होता! शिवाय, त्याने स्वत:वरचा सर्व विश्वास गमावला होता, स्वत:विषयीचा त्याचा सर्व आदर नष्ट झाला होता. कुठल्याही गोष्टीला उत्तर देण्याचे इत:पर त्याच्यात धाडस राहिले नव्हते. सानिनला तेही आठवले–शी: ... अगदी लज्जास्पद!... फ्रँकफुर्टहून आपल्या वस्तू आणण्यासाठी त्याने पोलोझोवच्या नोकराला कसे धाडले होते, तो किती घाबरला होता, पॅरिसला लौकरात लौकर पोहोचायचे ह्या एकच एक विचाराने तो कसा झपाटला होता! मार्या निकोलायेवनाच्या आज्ञेवरून त्याने इप्पोलित सोदोरोचची मर्जी संपादन करण्याचा कसा प्रयत्न केला होता, व्हॉन डॉनहॉफशी मिळते कसे घेतले होते! मार्या निकोलायेवनाने त्याला भेट दिली होती तसलीच लोखंडी अंगठी त्याने डॉनहॉफच्या बोटांमध्येही कशी पाहिली होती! नंतर त्याहूनही वाईट अधिक लज्जास्पद आठवणी जाग्या झाल्या. वेटरने त्याच्या हाती एक ओळखपत्र आणून दिले होते. त्यावर नांव कोरले होते: पान्तालीओने चिप्पातोला, मोदेनाच्या ड्यूकचा दरबारी गायक. तो त्या म्हाताऱ्यापासून तोंड लपवून राहिला होता, पण तरीही हॉटेलच्या कॉरीडॉरमध्ये त्यांची गाठ पडलीच होती. त्याच्या वर वळलेल्या पांढऱ्या झुलुपाखालील त्याचा रागीट चेहरा सानिनच्या नजरेसमोर अजूनही उभा रहात होता. म्हातारे डोळे जळत्या निखाऱ्यांसारखे फुलले होते आणि धडकी भरविणाऱ्या आरोळ्या व शाप सानिनच्या कानात घुमत होते: «Maledizione! Codardo! Infame traditore!»* सानिनचा चेहरा वेडावाकडा झाला, त्याने आपले डोके गदगदा हलविले, पुन:पुन्हा मान बाजूला फिरविली, पण प्रवासी घोडागाडीच्या पुढील भागातील अरुंद बाकावर बसलेली स्वत:ची प्रतिमा अजूनही त्याला दिसतेय. मागील आरामशीर आसनावर मार्या निकोलायेवना व इप्पोलित सोदोरोच बसले होते. बोसवादेनच्या रस्त्यांवरून चार घोडे ठेक्यात दौडत होते–पॅरिसकडे, पॅरिसकडे! सानिनने सोलून दिलेली नासपाती इप्पोलित सोदोरोच

---

* नतद्रष्ट! भेकड! विश्वासघातकी! –अनु.

खातोय आणि मार्या निकोलायेवना सानिनकडे सस्मित पाहतेय. त्याला ते स्मित एव्हाना परिचित झालेय... तो गुलाम बनलाय आणि ते मालकिणीचे स्मित आहे, त्याच्याहून श्रेष्ठ असलेल्या व्यक्तीचे...

बापरे! पण त्या रस्त्याच्या वळणावर, शहराच्या वेशींपासून जवळच, परत तो पान्तालीओने तर नव्हे? आणि त्याच्याबरोबर कोण आहे? एमिलिओ तर नाही? होय, तोच तो, उत्साही, एकेकाळचा निष्ठावंत पोरगा! अगदी अलिकडेच त्याचे तरुण हृदय आपल्या नायकाविषयीच्या, आपल्या आदर्शाविषयीच्या आदराने कसे भरून आले होते आणि आता त्याचा फिकट, सुंदर चेहरा–तो इतका सुंदर होता की मार्या निकोलायेवनाच्या तो ध्यानात आला व तिने बग्गीच्या खिडकीतून डोकावून पाहिले–हा उदात्त चेहरा आता रागाने आणि तिरस्काराने फुलला होता. त्याचे डोळे–अगदी तिच्यासारखे असलेले–सानिनकडे वटारून पहात होते, ओठ गच्च आवळले होते... केवळ अपमानकारक शब्द उच्चारायलाच ते उघडत होते...

आता पान्तालीओनेने हात पसरले व सानिनला बोटाने दाखविले–कुणाला? तार्तालियाला, तो त्याच्याशेजारी उभा होता. तार्तालिया सानिनवर भुंकतोय व त्या प्रामाणिक कुत्र्याच्या खुद्द भुंकण्यामध्येच असह्य अपमान उमटतोय... छी:!

आणि मग–पॅरिसमधले जीवन. गुलामाला ज्ञात असलेले सर्व अपमान, दुष्ट छळवाद. त्याला मत्सर दाखवायचा, तक्रार करायचा अधिकार नाही आणि सरतेशेवटी वापरलेला हातमोजा बाजूला फेकून द्यावा तसे त्याला फेकून देणे...

नंतर मायभूमीला परतणे, बिघडलेले आणि उध्वस्त जीवन, क्षुद्र चिंता, क्षुद्र काळज्या, कडवट, निष्फळ. पश्चात्ताप व तेवढीच कडवट, निष्फळ विस्मृती! त्याला झालेले शासन दिसत नाही, पण सतत ठणकणाऱ्या वेदनेप्रमाणे दर क्षणाला त्याला अखंडपणे टोचणी लावतेय; एखादे महाप्रचंड, अगणित कर्ज थेंबा-थेंबाने परत फेडावे तसे वाटतेय...

त्याचा प्याला पूर्ण भरला होता... बस्स! पुरे!

जेम्माने त्याला दिलेला तो छोटा क्रूस कसा काय राहिला होता? त्याने तो परत का केला नव्हता? आणि या क्षणापर्यंत तो त्याच्या दृष्टीला कसा पडला नव्हता? चिंतनात तो दीर्घ काळपर्यंत गढून गेला. आणि इतक्या वर्षांचा अनुभव असूनही अजून त्याला समजत नव्हते की, ज्या



जेम्मावर त्याने एवढे मनापासून प्रेम केले होते, एवढ्या आवेगाने प्रेम केले होते, त्या जेम्माला, त्याने जिच्यावर कधीही प्रेम केले नव्हते अशा एका स्त्रीपायी कसे टाकून दिले? दुसऱ्या दिवशी त्याने आपल्या सर्व मित्रांना आणि परिचितांना आश्चर्याचा धक्का दिला: आपण परदेशी जात असल्याचे त्याने जाहीर केले.

समाज थक्क झाला. हिवाळ्याच्या ऐन मध्यावर सानिन पीटरबुर्ग सोडून चालला होता. आणि नुकतेच घर घेऊन त्याची उत्तम सजावट केल्यानंतर. शिवाय इटालियन ऑपेराच्या मोसमाची तिकीटे प्राप्त केल्यानंतर! ज्या मोसमात मादाम पात्ती–हो, मादाम पात्ती, भाग घेत होती. मित्र आणि परिचित स्तंभित झाले. पण इतरांच्या बाबींचा विचार फार वेळ करीत बसणे मानवी स्वभावात नाही. त्यामुळे सानिन जेव्हा परदेशी निघाला तेव्हा स्टेशनवर त्याला निरोप द्यायला फक्त एकच व्यक्ती आली होती... फ्रेंच शिंपी. आणि तोसुद्धा आपली न मिळालेली शिवणावळ वसूल करण्याच्या आशेने... «Pour un saute-en-barque en velours noir, tout à fait chic».*

## ४४

आपण परदेशी जात असल्याचे सानिनने मित्रांना सांगितले, पण नेमके कोठे जात आहोत ते मात्र सांगितले नाही. वाचकाला सहज तर्क करता येईल की, त्याने सरळ फ्रॅंकफुर्टची वाट धरली. सर्वव्यापी लोहमार्गामुळे पीटरबुर्ग सोडल्यानंतर तीन दिवसांनी तो फ्रॅंकफुर्टला पोहोचला. १८४० पासून त्याने त्या शहराला भेट दिली नव्हती. "श्वेत हंस" अजूनही पूर्वीच्या स्थळी होते, पण इतःपर ते प्रथम दर्जाचे हॉटेल मानले जात नव्हते. त्सेईल हा फ्रॅंकफुर्टमधील मुख्य रस्ता फारसा बदलला नव्हता, पण मादाम रोझेल्लीच्या घराचा अथवा तिचे मिठाईचे दुकान ज्या रस्त्यावर होते त्या रस्त्याचा, मागमूसही उरला नव्हता. एके काळी खूप परिचित असलेल्या त्या रस्त्यांवरून सुन्न मनःस्थितीत सानिन भटकला, पण त्याला ओळखीचे काहीही आढळले नाही. जुन्या इमारती नाहीशा झाल्या होत्या. त्यांच्या जागी नवे रस्ते आले होते व त्या नव्या रस्त्यांच्या दुतर्फा मोठ्या घरांच्या आणि

* "अत्याधुनिक फॅशनच्या, काळ्या मखमालीच्या खलाशी जाकीटासाठी."

डौलदार बंगल्यांच्या रांगा उभ्या झाल्या होत्या. सार्वजनिक उद्यानात ज्या ठिकाणी त्याने जेम्मापाशी आपले प्रेम प्रकट केले होते, तेथील झाडे-झुडुपे आता एवढी उंच वाढली होती आणि ती जागा एवढी वेगळी भासत होती, की तेच ते जुने उद्यान होते का, असा सानिनला प्रश्न पडला. तो काय करणार होता? कशा आणि कुठे चौकशा करणार होता? तीस वर्षे उलटली होती. त्यांनी हाती घेतलेले काम सोपे नव्हते. त्याने खूप विचारले तरी रोझेल्ली हे नांवसुद्धा कुणी ऐकलेले नव्हते. हॉटेलच्या मालकाने त्याला सल्ला दिला की, सार्वजनिक ग्रंथालयात त्याने चौकशी करावी. तेथे सगळी जुनी वर्तमानपत्रे आढळली असती. पण त्यांचा कितपत उपयोग झाला असता याबाबत हॉटेलचा मालक निश्चितपणे काहीच सांगू शकत नव्हता. अतिनिराश मनःस्थितीत सानिनने अखेरीस श्रीमान क्लूबेरची चौकशी केली. ते नांव हॉटेल-मालकाला चांगले ठाऊक होते, पण येथेही सानिनला अपयश आले. तो ऐटबाज व्यापारी भरभराट करीत धनपती बनला होता, पण नंतर त्याचे प्रचंड नुकसान घडून दिवाळे वाजले होते आणि तुरुंगात त्याला मरण आले होते. मात्र ह्या बातमीने सानिनला किंचितही दुःख झाले नाही. फलःप्राप्तीची आशा न धरता तो भटकंती करू लागला... आणि एक दिवस, फ्रँकफुर्ट डिरेक्टरीची पाने चाळीत असताना त्याला व्हॉन डॉनहॉफचे नांव आढळले. मेजरपदावर असताना तो निवृत्त झाला होता (Major A. D.) सानिनने तात्काळ बग्गी केली व तो निघाला. मात्र हा विशिष्ट व्हॉन डॉनहॉफ हा त्याला माहीत असलेलाच होता का, आणि समजा, जरी **तोच तो** असला, तरी रोझेल्ली कुटुंबाबद्दल तो सानिनला काही सांगू शकला असता का, याबाबत सानिन काहीही सांगू शकला नसता. पण बुडत्याला काडीचा आधार!

सेवानिवृत्त मेजर घरीच असल्याचे सानिनला आढळले. समोरचा पांढरे केसवाला सद्गृहस्थ म्हणजेच आपला पुरातन शत्रू, हे सानिनने तात्काळ ओळखले. व्हॉन डॉनहॉफनेही सानिनला ओळखले व त्याच्या भेटीचा त्याला आनंदसुद्धा झाला, कारण त्यामुळे त्याला आपले तारुण्य व तारुण्यातील मर्कटचेष्टा आठवल्या. त्याच्याकडून सानिनला माहिती समजली की, रोझेल्ली कुटुंब फार पूर्वीच अमेरिकेत न्यूयॉर्कमध्ये स्थायिक झाले होते, जेम्माने एका उद्योगपतीशी लग्न केले होते; खुद्द डॉनहॉफचा अशा एका उद्योग-पतीशी परिचय होता ज्याचा अमेरिकेशी मोठ्या प्रमाणात व्यापार चालत असल्याने जेम्माच्या पतीचा पत्ता त्याला माहीत असण्याची शक्यता होती.



सानिनने व्हॉन डॉनहॉफला आग्रह करून त्या परिचित उद्योगपतीला भेटायला लावले आणि काय आनंदाची बातमी! – व्हॉन डॉनहॉफने जेम्माच्या पतीचा पत्ता आणला: श्री. जेरेमी स्लोकम, ५०१, ब्रॉडवे, न्यूयॉर्क. पण हा पत्ता १८६३ सालातील होता.

"आपण आशा धरू या," व्हॉन डॉनहॉफ ओरडला, "की आपली पूर्वीची फ्रँकफुर्ट-सुंदरी अजून जिवंत आहे आणि न्यूयॉर्क सोडून गेलेली नाही! बरं पण एक सांगा," आवाज खाली आणत तो पुढे म्हणाला, "ती रशियन बाई, त्यावेळी वीसबादेनमध्ये रहात होती ती... मादाम व्हॉन बो... व्हॉन बोलोझोव – अजून जिवंत आहे का?"

"नाही," सानिन म्हणाला. "फार पूर्वीच वारली!"

व्हॉन डॉनहॉफने नजर वर केली, पण सानिनने कपाळाला आठ्या घालून तोंड फिरविलेले पाहताच तो अधिक काही न बोलता निघून गेला.

त्याच दिवशी सानिनने न्यूयॉर्कमधील सौ. जेम्मा स्लोकमना पत्र लि-हिले. त्यात त्याने सांगितले होते की, तो फ्रँकफुर्टहून ते पत्र लिहीत होता व तिचा शोध घेण्याच्या एकमेव उद्देशानेच तो तेथे आला होता. तिच्याकडून उतराची अपेक्षा धरण्याचा त्याला तिळमात्र हक्क नव्हता याची पूर्ण जाणीव असल्याचेही त्याने त्यात कबूल केले होते. तिच्या क्षमेस पात्र होण्यासारखे त्याने काहीही केलेले नव्हते आणि सध्याच्या तिच्या सुखी परिस्थितीमध्ये कदाचित ती त्याचे अस्तित्वसुद्धा केव्हाच विसरून गेली असावी. त्याने पुढे लिहिले होते की, एका अनपेक्षित प्रसंगामुळे सारा भूतकाळ त्याच्या नजरेसमोर ठळकपणे उभा राहिला होता व त्यामुळे तिला स्वतःची आठवण करून देण्याचा त्याने निर्धार केला होता. आपल्या एकाकी, आनंदहीन, पत्नी वा मूल नसलेल्या जीवनाची हकीकत त्याने पत्रात कथन केली होती. त्याने विनवले होते की, त्याच्या पत्रलेखनामागील कारण तिने समजून घेण्याचा प्रयत्न करावा आणि दीर्घकाळपर्यंत त्याला छळणारी अपराधाची भावना घेऊन – ज्या अपराधाला अद्याप क्षमा झाली नव्हती – त्याने मरू नये तिच्याबद्दलच्या किंचित का होईना पण कसल्यातरी वार्तेने, नव्या जगातील तिच्या जीवनाविषयीच्या माहितीने त्याला आनंदित करावे, अशी त्याने मागणी केली होती. "मला केवळ एक शब्द लिहून," सानिनने आपल्या

पत्राची अखेर केली होती, "तुम्ही तुमच्या उदात्त अंतःकरणाला साजेसं सत्कृत्य करणार आहात आणि त्याबद्दल माझ्या जीवनाच्या शेवटच्या दिवसापर्यंत तुमचा उपकृत राहीन. मी सध्या **'श्वेत हंस'** मध्ये राहतोय" (ह्या शब्दांखाली त्याने रेघ मारली होती) "आणि वसंताच्या मोसमापर्यंत तुमच्या उत्तराची वाट पहात इथं राहीन."

त्याने पत्र पाठविले व तो वाट पहात राहिला. पूर्ण सहा आठवडेपर्यंत तो हॉटेलात राहिला. आपल्या खोलीमधून तो क्वचितच बाहेर पडला आणि इतर कुणालाही भेटला नाही. रशियाहून व इतर कुठूनही त्याला कुणीही पत्र लिहिणारे नव्हते व त्याला ते इष्टच वाटत होते. जर त्याला पत्र आले असते तर त्याला आधीच समजले असते की, त्याला अपेक्षित असणारे पत्र आले होते. सकाळपासून रात्रीपर्यंत तो वाचन करायचा— मासिकांचे नव्हे, तर गंभीर ऐतिहासिक खंडांचे! सतत वाचन, मौन, संन्याशासारखे एकांतवासातील जीवन—त्याच्या मनःस्थितीला नेमक्या याच गोष्टींची गरज होती. केवळ एवढ्यासाठीसुद्धा तो जेम्माचा आभारी होता. पण ती जिवंत होती अथवा मरण पावली होती? ती उत्तर देईल काय?

अखेरीस न्यूयॉर्कहून, अमेरिकन तिकीट लावलेले पत्र त्याच्याकडे आले. लिफाफ्यावरील हस्ताक्षर इंग्लिश होते. त्याने ते ओळखले नाही व त्याच्या काळजात एक कळ उमटली. तो लिफाफा फोडून चटकन उघडण्याचा धीर त्याला होईना. तसे त्याने केले तेव्हा प्रथम सहीवर नजर टाकली—जेम्मा. त्याच्या डोळ्यांमध्ये अश्रू काठोकाठ भरून आले. आपले आडनांव न लिहिता केवळ नांवाने तिने सही केली होती याचाच अर्थ समझोत्याचे, क्षमा केल्याचे ते प्रतीक होते, असे त्याला भासले. निळसर पातळ कागदाची घडी त्याने उलगडली आणि एक फोटो त्यातून खाली पडला. घाईघाईने त्याने तो फोटो उचलला आणि त्याच्यावर वज्राघात झाला—ती खुद्द जेम्मा होती! तीस वर्षांपूर्वी त्याला माहीत होती तशीच तरुण! तेच डोळे, तेच ओठ, तीच चेहऱ्याची घाटणी! फोटोच्या मागे लिहिले होते: "माझी मुलगी, मरीआन्ना." ते पत्र अगदी साधे आणि प्रेमळ होते. आपल्याला न घुटमळता पत्र लिहिल्याबद्दल, आपल्यावर विश्वास ठेवल्याबद्दल, जेम्माने सानिनचे आभार मानले होते. त्याच्या पलायनानंतर तिला दुःखद काळ कंठावा लागला होता ही वस्तुस्थिती तिने लपविली नव्हती, पण तावडतोब पुढे लिहिले होते की, त्याच्याशी झालेली भेट तिला नेहमीच सुदैवी वाटत आली होती व अद्यापही तसेच वाटत आहे, कारण ह्या भेटीमुळे श्रीमान क्लूबेरची



पत्नी होण्याचे तिच्या नशीबातून टळले होते आणि अप्रत्यक्षरीत्या का होईना, पण सध्याच्या नवऱ्याबरोबर विवाह घडण्यास तो कारणीभूत ठरला होता. ह्या पतीबरोबर गेली सत्तावीस वर्षे ती अत्यंत सुखा-समाधानात संसार करीत आहे. त्यांचे घर सबंध न्यूयॉर्क शहराला माहीत आहे. जेम्माने सानिनला पुढे माहिती दिली होती की, तिला पाच मुले आहेत—चार मुलगे आणि अठरा वर्षांची मुलगी. मुलीचे लौकरच लग्न होणार आहे. तिचा फोटो तिने पत्रासोबत पाठविला होता, कारण मुलगी आपल्या आईची हुबेहूब प्रतिकृती आहे. असे सर्वसाधारण मत आहे. वाईट बातम्या जेम्माने पत्राच्या अखेरी दिल्या होत्या. फ्राऊ लेनोरे न्यूयॉर्कमध्ये वारली होती. आपल्या मुलीच्या आणि जावयाच्या पाठोपाठ ती न्यूयॉर्कला गेली होती, आपल्या मुलीच्या आणि नातवंडांच्या सुखाचे कौतुक करण्याइतपत दीर्घ काळ जगली होती. पान्तालीओनेचासुद्धा अमेरिकेला जाण्याचा इरादा होता, पण फ्रँकफुर्ट सोडण्यापूर्वीच त्याला मृत्यू आला होता. "आणि एमिलिओला, आपल्या लाडक्या, अतुलनीय एमिलिओला, आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढताना सिसिलीत गौरवास्पद मरण लाभले.[57] महान गॅरीबाल्दीबरोबरच्या 'हजार'मध्ये त्याचा समावेश होता. आमच्या लाडक्या भावाच्या मरणाचा आम्हाला खूप शोक झाला, अश्रुसिंचन करताना त्याचा आम्हाला अभिमान वाटत होता आणि नेहमीच त्याचा आम्हाला अभिमान वाटत राहील, त्याची आठवण आम्हाला पवित्र राहील! त्याचा उदात्त, निःस्वार्थ आत्मा हुतात्म्याच्या किरीटाला पात्र होता." सानिनचे आयुष्य दुःखी ठरल्याबद्दल जेम्माने विषाद प्रकट केला होता, त्याला सर्वप्रथम शांतता आणि आत्मिक समाधान लाभावे अशी इच्छा व्यक्त केली होती आणि त्याच्याशी परतभेट होणे ही जरी असंभाव्यता आहे हे तिला माहीत होते, तरी त्याला परत भेटण्यास आनंद होईल असे तिने कळविले होते...

हे पत्र वाचताना सानिनच्या भावना काय होत्या त्याचे वर्णन करण्याचा आम्ही प्रयत्न करणार नाही. अशा भावना व्यक्त करण्यास समाधानकारक शब्द नाहीत. त्या खूप खोल, खूप बळकट आणि शब्दांहून कमी स्पष्ट आहेत. केवळ संगीतच अशा भावनांना प्रकट करू शकते.

सानिनने तावडतोब उत्तर लिहिले व भावी वधूला भेटवस्तू धाडली— मोत्यांच्या सुंदर माळेला जोडलेला रत्नजडित क्रूस. त्यावर अक्षरे होती: "मरिआन्ना स्लोकमला—अज्ञात स्नेह्याकडून." ह्या भेटवस्तूला खूप खर्च आला, तरी त्यामुळे तो काही कफल्लक बनला नाही. फ्रँकफुर्टला त्याने

प्रथम भेट दिली होती त्यानंतरच्या तीस वर्षांच्या काळात त्याने बरीच संपत्ती जमविली होती. मे महिन्याच्या आरंभी तो पीटरबुर्गला परतला. पण कदाचित फार दिवसांसाठी नव्हे. अशा अफवा आहेत की, आपली सर्व इस्टेट त्याने विक्रीला काढली आहे व तो अमेरिकेला जातोय.

बादेन-बादेन, १८७१

## टीपा

[1] प्रस्तुत कथा १८५८ साली 'सोव्हरेमेन्निक' नियतकालिकाच्या पहिल्या अंकात प्रथम प्रसिद्ध झाली.—पान १३

[2] "...एखादा गाईड नुसता नजरेला पडला..."—शब्दशः पगारी नोकर पथिकाश्रमातील परिचारक, भाडोत्री मार्गदर्शक.—पान १३

[3] "...ड्रेस्डेनच्या 'ग्रूने गेवोल्बे'मध्ये मला वेड लागायचे तेवढे बाकी उरले होते..."—जर्मन भाषेत ग्रूने गेवोल्बेचा शब्दशः अर्थ 'हिरवा घुमट'. ड्रेस्डेन शहरातील 'मौल्यवान रत्नभांडारा'चे नांव. तेथे तीन हजार मौल्यवान अलंकार ठेवलेले आहेत. त्यात सॅक्सन राजांच्या राजमुकुटांचा समावेश आहे.—पान १३

[4] "...जुन्या धर्तीच्या लान्नेर वॉल्तझ्चे सूर..."—जोसेफ लान्नेर (१८०१-१८४३) ऑस्ट्रियातील संगीतकार. व्हिएन्ना वॉल्तझ्चे एक रचनाकार.—पान २१

[5] "अजून झोपलास काय? गितार छेडून तुला जागं करीन"—मिखाईल ग्लिन्का (१८०४-१८५७) यांनी रचलेल्या प्रेमगीतामधून. शब्द आहेत अलेक्सान्द्र पूष्कीन यांच्या 'मी इथं आहे, इनेझेलया' कवितेतील.—पान २२

[6] "...तिची आकृती फर्निसिना भित्तीचित्रांमधल्या राफाएलच्या छोट्या गालातेयासारखी..."—विख्यात भित्तीचित्र 'गालातेयाचा दिग्विजय.' रोममधील फर्निसिना प्रासादात इटलीचे नामवंत चित्रकार राफाएल (१४८३-१५२०) यांनी चितारलेल्या सुप्रसिद्ध भित्तीचित्रांपैकी एक.—पान २९

[7] "...मातुष्का, गलुबूष्का!"–गूरीलेवरचित (१८०३-१८५८) एक गाणे. ह्या गाण्याची अतिदूर किर्ती पसरली व लोकगीत म्हणून ते मान्यता पावले.–पान ३०

[8] "...गागीनला 'हेर्मान आणि डोरोथी' हे पुस्तक मोठ्यांदा वाचून दाखवीत होतो..."–जर्मन कवी आणि तत्त्वज्ञ ग्योते (१७९७) यांनी लिहिलेले महाकाव्य.–पान ३२

[9] "...लोरेलीयेची कथा किती सुंदर आहे..."–अनेक काव्यनिर्मितींना स्फूर्तिदायक ठरलेली लोरेलीयेची दंतकथा. जर्मन कवी का. ब्रेन्तानो (१७७८-१८४२) यांच्या "गोद्वी" कादंबरीतील पोवाडा; दुसरी कविता जर्मन कवी हे. हायने यांच्या "पुन्हा मातृभूमीस उद्देशून" मालिकेतील (१८२३). लोरेलीयेची प्राचीन दंतकथा मार्गदर्शक पुस्तिकांमधूनही वर्णिली आहे.–पान ४४

[10] "कुठे आहे क्रूस, कुठे शाखांच्या सावल्या, माझ्या दुर्दैवी मातेच्या थडग्यावर!..–" अ. पूष्कीनची (१७९९-१८३८) पद्यमय कादंबरी "येवगेनी अनेगिन" मधून. पूष्कीनच्या "माझ्या बापड्या दाईविषयी" मधून. (प्रकरण ८, कडवे १६).–पान ४५

[11] "...मला तात्याना व्हायला आवडेल..."– पूष्कीनची पद्यमय कादंबरी 'येवगेनी अनेगिन'ची नायिका. कच्च्या आराखड्यात आस्या आणि पूष्कीनची तात्याना यांच्यात आणखी अनेक प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष तुलना होत्या.–पान ४६

[12] प्रस्तुत कथा "बिब्लिओत्येका द्ल्या च्तेनिया" (वाचन-ग्रंथालय) नियतकालिकाच्या मार्च १८६०च्या अंकात प्रसिद्ध झाली होती. रशियन साहित्य-समीक्षक आणि स्मरणकथा लेखक पावेल आनेन्कोव (१८१३-१८८७) यांच्या सन्मानार्थ हा अंक प्रकाशित झाला होता.–पान ७०

[13] "...कैदानोवचा इतिहास..."–इ. कैदानोव, त्सारस्कोये सेलोच्या लीसेयममध्ये १८११ ते १८४१ ह्या काळातील प्राध्यापक. विद्यार्थ्यांसाठी



त्यांनी लिहिलेल्या इतिहासाच्या पुस्तकाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. "श्वैकि राजकीय इतिहासाच्या ज्ञानाचा मार्गदर्शक" ह्या त्यांच्या पुस्तकाचा येथे संदर्भ आहे.–पान ७२

[14] "...प्रिन्सेसपदाचा माझ्यावर फारसा प्रभाव पडला नाही. शिलरचे 'दरोडेखोर' मी नुकतेच वाचले होते..."–महान जर्मन कवी शिलर (१७५९-१८०५) यांनी जुलूमशाहीचा निषेध करण्यासाठी लिहिलेले नाटक. गेल्या शतकाच्या तिसऱ्या आणि चौथ्या दशकांमध्ये रशियन तरुणांवर ह्या नाटकाचा फार मोठा प्रभाव पडला होता.–पान ७४

[15] "...श्री. रेरी यांनी आपले कसब दाखविण्याच्या खूप पूर्वी अत्यंत नाठाळ घोड्यांना वठणीवर आणले होते..." "जंगली घोड्यांना प्रशिक्षित करण्याची आधुनिक कला" ह्या पुस्तकाचे लेखक, रेरी (१८५८). ते अमेरिकेहून आले होते आणि "नाठाळ घोड्यांना प्रशिक्षित करण्याचे लक्षणीय कसब" त्यांच्यापाशी होते.–पान ९८

[16] "जॉर्जियाच्या डोंगरात"–रशियन महाकवी पूष्कीन यांची कविता (१८२९).
"...प्रेम न करणं त्याच्या ताकदीबाहेरचं आहे..."–कवितेची शेवटची ओळ.–पान १०५

[17] "...अर्थात रोमँटिक शैलीत, बायरनच्या..."–जॉर्ज नोएल गॉर्डन बायरन (१७८८-१८२४)–श्रेष्ठ इंग्लिश कवी; क्रांतिकारक रोमांचवादाचे एक प्रतिनिधी.–पान ११०

[18] "...तोन्कोशेयेवनं आपल्या 'एल्-त्रोवादोर' स्पॅनिश कादंबरीत..."–तुर्गेनेव यांनी 'एल्-त्रोवादोर अथवा सूडासाठी सूड' ह्या निनांवी कादंबरीचे लेखक तोन्कोचेयेव ह्यांच्या आडनांवात किंचित बदल केला. १८२६ सालातील स्पॅनिश सत्यकथा. रशियन आवृत्ती (१८३३).
–पान ११०

[19] "...मला ते क्लिओपात्राच्या सोनेरी पडावाच्या किरमिजी शिडांसारखे वाटतात. अँथनीच्या भेटीला ती निघाली होती तेव्हा..." –ग्रीक लेखक, इतिहासकार, तत्त्वज्ञ, प्लूटार्क (इ. स. सुमारे ४६-१२७) यांनी लिहिलेल्या चरित्राचा नायक.

मार्क अँथनी–रोममधील मुत्सद्दी आणि सरसेनापती (खि. पू. ८३-३०). क्लिओपात्रा–प्तोलोमी वंशातील राणी (खि. पू. ६३-३०). मार्क अँथनीची ती सहकारी आणि प्रेमिका होती. (खि. पू. ३७ मध्ये मार्क अँथनीने क्लिओपात्राशी विवाह केला.)–पान ११०

[20] "...फ्रैताग मला एक घोडा देतोय..." –फ्रैयताग हा १८३० नंतरच्या काळातील मॉस्कोतील एक नामवंत रेसघोड्यांचा मालक.–पान ११४

[21] "...मालेक-आदेल मातिल्दाला घोड्यावरून घेऊन जात असलेल्या चित्राची मला आठवण आली..." –फ्रेंच लेखक स. कोतेन (मारी-सोफी–रिस्तो) यांच्या 'मातिल्दा अथवा धर्मयुद्धांच्या इतिहासातील टिपणे' (१८०५) ह्या कादंबरीतील पात्रे. ह्या कादंबरीचा रशियन भाषेत १८०६ साली अनुवाद झाला व त्याच्या अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या.–पान ११७

[22] "...वाट तुझी मी पाहतो. पश्चिमवारा झुळझुळतो..." –कवी आणि टीकाकार प्योत्र व्याझेम्स्की यांच्या "मी तुझी वाट पाहीन" ह्या प्रेमगीतातील शब्द (१८१६).–पान ११७

[23] "...खोम्याकोवच्या शोकांतिकेमधील येर्माकने तान्यांना उद्देशून केलेले भाषण ओरडून म्हणायला मी आरंभ केला..." –'येर्माक' (१८३२)–अलेक्सेई खोम्याकोव यांची पद्यमय शोकांतिका (१८०४-१८६०).–पान ११७

[24] «Journal de Débats»–पॅरिसमधील वृत्तपत्र.–पान ११८

[25] "...तुम्ही बार्व्येप्रमाणे त्याच्यावर लांबलचक रचना केली असती..." –ऑगस्त बार्व्ये (१८०३-१८८२)–फ्रेंच क्रांतिकारक कवी, 'याम्बी' नामक महत्त्वपूर्ण काव्यसंग्रहाचे रचनाकार. १८३२ मध्ये त्यांचा काव्यसंग्रह



पॅरिसमध्ये प्रसिद्ध झाला. रशियात त्याच्यावर सेन्सरने तात्काळ बंदी घातली.–पान १२५

[26] "...आणि 'टेलीग्राफ'मध्ये छापली असती..." –'मस्कोवस्की टेलीग्राफ'–एक पुरोगामी साहित्य-समीक्षा नियतकालिक (१८२५-१८३४).–पान १२५

[27] "कुठं सुंदर तरुणा? –नीज इथं!" –पूष्कीन यांच्या 'त्सिगानी' (जिप्सी) ह्या रोमांचक गीतातील नायक अलेकोच्या तोंडचे उद्‌गार.–पान १३०

[28] "...देमूत हॉटेलमध्ये ती उतरली होती..." –पीटरबुर्गमधील एक हॉटेल. त्याचे पहिले मालक फ्यो. देमूत यांचे नांव त्याला प्राप्त झाले.–पान १४६

[29] "...भावनाहीन ओठांनी मरणाची बातमी सांगितली... आणि माझ्या भावनाहीन कानांनी तो ऐकली..." –पूष्कीन यांच्या 'माझ्या मातृभूमीच्या निळ्या आकाशाखाली' कवितेमधील ओळी (१८२६).–पान १४६

[30] ही कथा १८७२ साली 'वेस्तनिक एव्ररोपी' नियतकालिकाच्या पहिल्या अंकात प्रथम प्रसिद्ध झाली. पॅरिसमधील 'तुर्गेनेव दफ्तरखान्या'त ह्या कथेचा अंतिम मसुदा व तयार हस्तलिखित पहायला मिळतात.–पान १४९

[31] "...दान्नेकरची आरीआद्‌ना तो पहायला गेला..." –'चित्त्यावरचा आरीआदना'–प्रभावी जर्मन शिल्पकार दान्नेकर (१७५८-१८४१) यांची फ्रँकफुर्ट-ऑन-माईनमधील एका वस्तुसंग्रहालयात ठेवलेली एक महत्त्वपूर्ण शिल्परचना.–पान १५२

[32] "...ग्योथेच्या घराला त्याने भेट दिली..." महान जर्मन लेखक योहान्न

वोल्फगांग ग्योथे (१७४९-१८३२) यांचा जन्म झाला ते फ्रँकफुर्ट-ऑन-माईनमधील घर.–पान १५२

33 "...पालाझो-पिट्टीमधील आल्लोरीच्या ज्यूडिथप्रमाणे..."– 'ज्यूडिथ'–नामवंत इटालियन चित्रकार ख्रिस्तोफानो आल्लोरी (१५७७-१६२१) यांचे फ्लॉरेन्समध्ये आढळणारे चित्र. 'पालाझो पिट्टी'–फ्लॉरेन्स शहरातील एक म्यूझियम. त्यात १६-१७ व्या शतकांमधील इटालियन व इतर देशांच्या नामवंत चित्रकारांच्या चित्रकृती जतन करून ठेवलेल्या आहेत.–पान १५५

34 "«Demetrio e Polibio» ऑपेरा..." जॉ. रोस्सिनी यांचा आरंभीच्या काळातील एक ऑपेरा. १८१२ साली रोममध्ये त्याचा पहिला प्रयोग झाला.–पान १५९

35 "...एखाद्या उग्र चेहऱ्याच्या लुटारूसारखा दिसत होता, रिनाल्दो रिनाल्दीनीसारखा..."–जर्मन लेखक विल्पीऊस (१७६२-१८२७) यांच्या एका साहस-कादंबरीचा 'रिनाल्दो रिनाल्दीनी, दरोडेखोरांचा प्रमुख'–नायक.–पान १५९

36 "...अजरामर कोरेंजिओच्या भित्तीचित्रांनी वैभवशाली चर्चचा घुमट नटलेला होता..."–पार्मेमधील चर्चच्या घुमटावर कोरेंजिओ यांची "मेरी मातेचे स्वर्गारोहण" (१६ वे शतक) नामक वैशिष्ट्यपूर्ण भित्तीचित्रे पहायला मिळतात.–पान १५९

37 "...त्या काळी लोकप्रिय असलेल्या रशियन कवी बेनेदिक्तोवच्या कवितांमधीलसुद्धा..."–व्लादीमिर बेनेदिक्तोव (१८०७-१८७३)–रशियन कवी.–पान १६२

38 "...सुप्रसिद्ध मध्यस्वर गायक गार्सियाविषयी बोलायला त्याने आरंभ केला..." मॅन्युएल गार्सिया (१७७५-१८३२) जगप्रसिद्ध स्पॅनिश ऑपेरा गायक आणि संगीतरचनाकार. पॉलीना विआर्दो-गार्सिया ह्या विख्यात गायिकेचे वडील आणि गुरू. ह्या गायिकेबद्दल तुर्गेनेव यांच्या मनात गाढ प्रेमभावना वसत होती.–पान १६३



39 «Matrimonio segreto» च्या ('गुप्त विवाह') आरीआमधून..."–इटलीचे संगीतकार दोमेनिको चिमारोझा (१७४९-१८०१) यांचा ऑपेरा.–पान १६४

40 "...मीरोप अगर क्लीतेम्नेस्त्राची भूमिका तिनं करावी..."–मीरोप ही एका प्राचीन दंतकथेची नायिका आणि मेस्सेनचा राजा क्रीस्फोन्तची बायको. जुलमी पोलीफोन्तने मीरोपच्या पतीचा व पुत्रांचा वध करून तिच्याशी जबरीने विवाह केला. क्लीतेम्नेस्त्रा–प्राचीन पुराणकथेत राजा आगामेमनोनची पत्नी. तिने आपल्या पतीचा खून केला व खुद्द तिच्या पुत्राने–ओरेस्ताने–तिचा खून केला.–पान १६८

41 "...त्यांच्याकडून Narren-oder Russen-Preise (मूर्खांच्या अथवा रशियनांच्या किंमती)–उकळायची हे त्याचे ध्येय होते..." लेखकाची टीप: पूर्वी आणि आताही, मे महिन्यात अनेक रशियनांचे फ्रँकफुर्टमध्ये आगमन झाल्यानंतर सर्व दुकानांमधील किंमती वर चढत आणि त्यांना «Russen» (रशियन) अथवा-अरेरे! «Narren» (मूर्खांच्या) किंमती म्हणून ओळखत!–पान १७१

42 "...राफाएलच्या Fornarina प्रमाणं..."–चरित्रात्मक दंतकथेनुसार इटलीचे चित्रकार राफाएल यांची गरीब घरातील प्रेमिका. रोममधील प्रासादातील चित्राला तिचे नांव देण्यात आले आहे.–पान १७२

43 «Der Freischütz» ("मुक्त बाण")–जर्मन संगीतकार कार्ल मारी वेबेर (१७८६-१८२६) यांचा रोमांचवादी ऑपेरा.–पान १७६

44 हॉफमान्न (१७७६-१८२२)–जर्मन लेखक आणि संगीतकार. १२ व्या प्रकरणाच्या आरंभी हॉफमान्नची लघुकादंबरी "चूक" मधील प्रसंग समाविष्ट केला आहे.–पान १७७

45 "...उलान्दच्या प्रेमगीतात म्हटल्याप्रमाणे... होडीतून त्यांचा प्रवास चालला होता..."–जर्मन रोमांचवादी कवी लुडविग उलान्द (१७८७-१८६२) यांच्या "होडी" («Das schifflein») चा संदर्भ.–पान १७८

[46] वेर्नादोत्त (१७६४-१८४४) – नेपोलियनच्या लढायांमध्ये भाग घेतलेला एक फ्रेंच मार्शल. – पान १७९

[47] "...प्रत्येकाने आपले पिस्तुल आपल्या हाती धरले..." पुष्कीनच्या 'येवगेनी अनेगिन' मधील उतारा. (प्रकरण ६, कडवे २९). – पान २०७

[48] "...मी झोपलोय... पण जागता पहारा देणारं माझं काळीज झोपत नाहीय्..." – कवी ल्येव मेइ (१८२२-१८६२) यांच्या "यहुद्यांची गाणी" मालिकेतील एका गाण्यामधून उद्धृत केलेली चुकीची ओळ. – पान २२९

[49] "...ती काही पुष्कीनची 'सौंदर्य देवता' नव्हती..." पुष्कीन यांच्या "सुंदरी". (१८३२) कवितेमधून. – पान २६०

[50] "...भावनापूर्वक, समजून घेऊन आणि योग्य भर देऊन..." अलेक्सांद्र ग्रिबोयेदोव (१७९५-१८२९) यांचे विनोदी नाटक 'गोरे अत् ऊमा' ('अकलेचे दुःख') मधून. – पान २६१

[51] "दागेरा पद्धतीच्या प्रतिमा नुकत्याच लोकप्रिय होऊ लागल्या होत्या–" दागेरापद्धती – १८३९ साली दागेर यांनी शोधून काढलेली छायाचित्र पद्धती (ह्या जुन्या पद्धतीत छायचित्रांच्या अनेक प्रती काढता येत नसत). – पान २६४

[52] "रॉबर्ट द्याबल" – जॉ. मेयेरबेर यांचा ऑपेरा. १८३१ साली प्रथम प्रयोग. – पान २६८

[53] "कार्डिनल रेत्झ" (१६१४-१६७९) फ्रेंच मुत्सद्दी, अत्यंत गुणी, बुद्धिमान आठवणींचे लेखक. – पान २७०

[54] "...सुप्रसिद्ध श्रीयुत देवरिएन्त यांच्या "विख्यात" दिग्दर्शनाखालील कार्लस्रुहे कंपनी." देवरिएन्त एदुआर्द (१८०१-१८७७) – जर्मन नट, नाटककार आणि रंगभूमीवरील प्रसिद्ध व्यक्ती. – पान २८१



[55] "एनेइड" – प्राचीन ग्रीक कवी वेर्गिलिया (ख्रि. पू. पहिले शतक) यांचे काव्य. – पान २८३

[56] "...ब्यूर्गेरच्या लेनोरेसारखं..." – "लेनोरा" – जर्मन कवी ब्यूर्गेर (१७४७-१७९४) यांचा पोवाडा. – पान २९७

[57] "...आणि एमिलिओला... आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढताना सिसिलीत गौरवास्पद मरण लाभले..." तुर्गेनेव येथे इटलीमधील राष्ट्रीय मुक्ती संघर्षातील एका प्रसंगाचा संदर्भ देत आहेत. जूझेप्पी गॅरीबाल्दी (१८६०) यांच्या नेतृत्वाखाली "लाल सदरेवाले" नामक तुकडीमधून हजारो लोक विजयी संचलन करत गेले होते. – पान ३०९

मान्नीय वाचक !

प्रस्तुत पुस्तकाबाबतची आपली मते आणि सूचना जाणून घेण्यास आम्हाला आनंद वाटेल.

रशियन आणि सोविएत साहित्याचे तुमच्या मातृभाषेतील अनुवाद आमच्या लोकांच्या संस्कृतीची व जीवनाची सखोल ओळख करून घेण्यास आपल्याला मदत करतील अशी आशा आहे. आमचा पत्ता : 'रादुगा' प्रकाशन, १७ झूबोवस्की बुलवार, मॉस्को ११९०२१, सोविएत संघ

Иван Тургенев. Три повести о любви,
на языке маратхи

Перевод сделан по изданию: И. С. Тургенев
Полное собрание сочинений и писем в 28-ми томах.
Москва — Ленинград, изд-во «Наука», 1960—1968